भारत-गौरव-ग्रंथमाला-पुष्प १०४ वें.

# श्रीमन्महाभारतार्थ

## ( महाभारताचें सुबोध मराठी भाषांतर )



## षष्ठ खंड.

उद्योगपर्व, अध्याय १३४-१५६. भीष्मपर्व, अ० १-४९.




न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।
—भ. गी. अ. ४, ३८.

लेखकः—

आचार्यभक्त विष्णु वामन बापटशास्त्री,
संस्थापक, आचार्यकुल, पुणें.

वार्यमाणोऽपि पापेभ्यः पापात्मा पापमिच्छति ।
चोद्यमानोऽपि पापेन शुभात्मा शुभमिच्छति ॥ पृ. १५.
सर्वशास्त्रमयी गीता सर्वदेवमयो हरिः ।
सर्वतीर्थमयी गङ्गा सर्ववेदमयो मनुः ॥ पृ. ४५३.

शके १८५३. ] किंमत ~~साडेतीन~~ रुपये. [ सन १९३२.
चार

# विषयानुक्रमणिका.



## ५. उद्योगपर्व. (पुढें चालू)



### भगवद्यानपर्व ६. पृ. १–४३.

---

## सैन्यनिर्याणपर्व ७. पृ. ४३–६४.

---

## उलूकदूतागमनपर्व ८. पृ. ६४–८३.



---

## रथातिरथसंख्यानपर्व ९. पृ. ८३–९८.



---

## अम्बोपाख्यानपर्व १०. ९९–१५६.

---

## ६ भीष्मपर्व.



### जम्बुखंडविनिर्माणपर्व १. पृ. १५९–१९०.



---

## भूमिपर्व २. पृ. १९०–१९५.



---

## भगवद्गीतापर्व ३. पृ. १९६–४५२.

---

## भीष्मवधपर्व. ४ पृ. ४५३–४८०.



---

# श्रीमन्महाभारतार्थ

## ( महाभारताचें मराठी सुबोध भाषांतर. )



### षष्ठ खंड.



### ५ उद्योगपर्व ( पुढें चालू )



### भगवद्यानपर्व ६.



अध्याय १३४ वा.

[ १ विदुलेनें पुत्राची निंदा करून त्याला शत्रूच्या वधाविषयीं केलेली प्रेरणा. ]

( १ ) विदुला—हे पुत्रा, अशा अवस्थेंत तूं जर पुरुषार्थांचा त्याग करशील, तर हीन लोकांनीं सेवन केलेल्या मार्गाला सत्वरच प्राप्त होशील. जो क्षत्रिय स्वपराक्रमानें आपलें तेज यथाशक्ति प्रकट करीत नाहीं, तो जीविताकांक्षी पुरुष चोरच म्हटला जातो. तथापि मरणोन्मुखाला औषध जसें रुचत नाहीं, तसें तुला माझें हें अर्थपूर्ण, युक्तियुक्त व हितावह भाषण ग्राह्य वाटत नाहीं.

सिंधुराजाचे प्रजाजन जसे संतुष्ट असावे तसे नाहींत. ते दुर्बलतेमुळें कर्तव्यमूढ होऊन राज्यावर संकट येण्याची वाट पहात आहेत. शिवाय तुझे अनुचर तुला साह्य करण्यास तयार आहेत. पण ते साह्यकर्ते उद्युक्त असतांहि तूं जर कांहीं पुरुषार्थ दाखविला नाहींस, तर तुला पौरुषहीन झालेला पाहून ते शत्रुपक्षाचा आश्रय करतील. यास्तव तूं त्यांचा संग्रह कर व एखाद्या गिरि-दुर्गांत जाऊन रहा. तेथें शत्रूवर संकट ओढवण्याच्या संधीची मार्गप्रतीक्षा कर. तो काल लवकरच येईल. कारण तुझा शत्रु कांहीं अजरामर नाहीं.

तुझें नांव 'संजय' आहे खरें, पण मला तुझ्या ठिकाणीं त्या नांवाची यथार्थता दिसत नाहीं. तस्मात् हे माझ्या पुत्रा, आपलें नांव अन्वर्थक कर. तें व्यर्थ होऊं देऊं नको. तूं जेव्हां बाल होतास, तेव्हां एका ब्राह्मणानें 'हा बालक महाप्राज्ञ व सम्यग्दृष्टि होईल, याच्यावर महत्संकट येईल; पण त्यांतून हा पार पडून पुनः त्याची समृद्धि होईल' असें म्हटलें होतें. मला त्या शब्दांचें स्मरण होत आहे व त्याच्या वचनाप्रमाणें 'तुझा विजय होईल' असेंच मला वाटत आहे. यास्तव मी तुला वारंवार तेंच तें सांगत आहें व पुढेंहि पुनः पुनः तेंच सांगेन.

हे संजया, जो पुरुष कार्य करण्यास सिद्ध होतो, त्याला साह्य करणारे अनुयायी मिळतात व न्यायानें अर्थ संपादन करणारांस निश्चयानें सिद्धि प्राप्त होते. 'माझ्या पूर्वजांची व माझीहि युद्धांत समृद्धि किंवा असमृद्धि अवश्य होणारी आहे' हें जाणून युद्धाला सज्ज हो. लाभ व अलाभ हे दोन्ही सम मानून युद्ध कर. युद्धापासून पराङ्मुख होऊं नको. युद्ध न केल्यास दारिद्र्य प्राप्त होतें व जेथें आज भोजन मिळत नाहीं व उद्यांच्या अन्नाचीहि भ्रांति असते, त्यासारखी पापी अवस्था दुसरी कोणतीहि नाहीं, असें शंबरानें म्हटलें आहे.

पति-पुत्रांच्या वधाहूनहि[1] दारिद्र्य हें परम दुःख आहे, असें म्हटलें आहे. दारिद्र्य साक्षात् मरणच होय. कारण पति-पुत्रांचें निधन सृष्टिक्रमानेंच प्राप्त असल्यामुळें दारिद्र्यासारखें शोच्य कांहीं नाहीं. एका सरोवरांतील कमलिनी जशी दुसऱ्या सरोवरांत प्रवेश करिते, तशी मी पित्याच्या श्रेष्ठ कुलांत उत्पन्न झाल्यें व पतीच्या या सत्कुलांत आल्यें. मी सर्व कल्याणांनीं युक्त व सर्वांची स्वामिनी होत्यें. अमूल्य वस्त्रालंकार धारण करणाऱ्या माझ्या भर्त्याकडून परम सत्कार होत असे. पूर्वीं माझा हृष्ट झालेला सुहृद्वर्ग मला आपल्या सुहृदांच्या समुदायांत पहात असे.

हे संजया, तुझी भार्या व मी यांना जेव्हां तूं अतिशय दुर्बल झालेलें पहाशील, तेव्हां तुझ्या जीविताचा तरी काय उपयोग! आमच्या आश्रयाला असलेले, सेवा करणारे, दास, भृत्य, आचार्य, ऋत्विक् व पुरोहित उपजीवि-

१ पतिपुत्रवधादेतत्परमं दुःखमब्रवीत् ।
दारिद्र्यमिति यत्प्रोक्तं पर्यायमरणं हि तत् ॥

केच्या अभावीं आमचा त्याग करून जर निघून गेले, तर तुझ्या जिवंत राह-ण्यांत तरी काय अर्थ ! मला जर आज पूर्वीप्रमाणें तुझा श्लाघ्य व यशस्कर पराक्रम दिसला नाहीं तर माझ्या हृदयाला शांति कोठली ! यापूर्वी मीं किंवा माझ्या पतीनें याचक ब्राह्मणाला 'नाहीं' असें कदापि म्हटलेलें नाहीं. पण आतां जर मजवर ब्राह्मणाला 'नाहीं' म्हणण्याचा प्रसंग आला तर माझें हृदय विदीर्ण होईल. आम्ही दुसऱ्याला आश्रय देणारे आहों. कोणाचे आश्रित होणारे नाहीं. किंवा दुसऱ्याच्या आज्ञेत वागणारे नाहीं. असें असतांना मजवर परक्याच्या आश्रयानें रहाण्याचा जर प्रसंग आला, तर मी तत्काल प्राणत्याग करीन.

समुद्रांत बुडत असलेल्या आम्हांला तूं परतीरावर ने. नौकारहित असलेल्या आमची नौका हो. आम्हां निराश्रितांचा आधार हो आणि आम्हां मृतांना संजी-वन दे. हे संजया, तूं जर ही क्लीबासारखी वृत्ति टाकून जीविताची आशा न धरतां यत्न करशील, तर आपल्या सर्व शत्रूंना जिंकण्यास समर्थ होशील. यास्तव असा खिन्न व हतबल होऊं नको. या पापी जीवनाचा त्याग कर.

शूर पुरुष एका शत्रूच्या वधानेंच प्रसिद्धीला येतो. इंद्राला केवल वृत्रा-सुराचा वध करून महेंद्रपद प्राप्त झालें. माहेंद्र यज्ञभाग मिळूं लागला व तो लोकांचा ईश्वर झाला. तस्मात् हे पुत्रा, तूं समरांगणांत आपलें नांव सांगून सज्ज झालेल्या शत्रूंना युद्धाचें आह्वान कर आणि सैन्याच्या अग्रभागीं अस-लेल्या योद्धयांना पळवून लावून व श्रेष्ठ वीरांचा वध करून यश मिळीव.

हीन पुरुष युद्धांत भीतीनें परवश होऊन देह ठेवितात. त्यामुळें शूर व दक्ष अशा प्रतिपक्षाला सहजच समृद्ध इष्टप्राप्ति होते. दीर्घदर्शी बुद्धिमान् पुरुष राज्याचा विनाश झाला, किंवा जीविताचाहि संशय प्राप्त होऊन मरणाचा प्रसंग ओढवला, तरी शत्रूंचा अवशेष राहूं देत नाहींत.

हे पुत्रा, शत्रूला जिंकून राज्य संपादन करणें किंवा युद्धांत देह ठेवून स्वर्ग मिळविणें, हीं दोन्ही अमृततुल्य आहेत. यास्तव त्यांतील एक द्वार निरुद्ध झालें आहे, असें मानून तूं दुसऱ्या मार्गाचा स्वीकार कर म्ह० उल्केप्रमाणें शत्रूवर झडप घाल. हे राजन्, रणांत शत्रूचा वध करून स्वधर्माचें पालन कर.

हे संजया, तेजाच्या अभावीं शत्रूला निर्भय करणाऱ्या, शोक करणाऱ्या आणि स्वकीयांकडून व जयघोष करणाऱ्या शत्रूंकडून आवृत झालेल्या तुझ्या सारख्या

पुत्राला दीनाप्रमाणें स्थित असलेलें पहाण्याचा प्रसंग मजवर न येवो. तूं पूर्वींप्रमाणेंच सौवीर कन्यांसह हृष्ट हो. त्यांच्याकडून विविध द्रव्यादि उपायांनीं आपली स्तुति करून घे. असा दुर्बल होऊन शत्रूंच्या देशांतील सिंधुकन्यांच्या अधीन होऊं नको.

विद्या, रूप व सत्कुल यांनीं युक्त असलेला तुझ्यासारखा लोकप्रसिद्ध यशस्वी तरुण वीर जर कर्तव्यपराङ्मुख होईल, तर अदान्त वृषभाप्रमाणें त्याला भार वाहावा लागेल. अशा अवस्थेला मी तर साक्षात् मरणच समजतें. मीं जर तुला शत्रूंशीं प्रिय भाषण करतांना व त्याच्या मागून जातांना पाहिलें, तर माझें हृदय शांत होणें शक्य नाहीं. आमच्या या कुलांत यापूर्वीं शत्रूच्या मागून कोणीहि चालला नाहीं. यास्तव तुला परक्याचा अनुचर होऊन जिवंत रहाणेंच उचित नाहीं.

आमच्या पूर्वजांचें, त्यांच्या पूर्वजांचें व इतरहि प्राचीन क्षत्रियांचें शाश्वत हृदय मी जाणतें. तें प्रजापतीनें शाश्वत व अव्यय निर्माण केलें आहे. कोणीहि सत्कुलांत उत्पन्न झालेला क्षत्रधर्मज्ञ क्षत्रिय भयानें कोणापुढें कदापि नम्र होत नसतो. [1]उद्यम करावा. उद्यम हाच पुरुषार्थ आहे. अस्थानीं मोडावें, पण नम्र होऊं नये. त्या उदार मनाच्या पुरुषानें मत्त हत्तीप्रमाणें पर्यटन करावें. संजया, धर्मासाठीं आत्मवेत्त्या ब्राह्मणापुढें नित्य नम्र व्हावें. परंतु पुरुषानें सहायसंपन्न किंवा सहायशून्य असतांनाहि इतर वर्णांच्या पापी लोकांचें दंडानें यावज्जीव नियमन करावें. ५. ६. १३४.

---

## अध्याय १३५ वा.

[ १ पुत्राचा प्रश्न. २ मातेचें उपहासयुक्त उत्तर. ३ पुत्राचें असहायत्व कथन. ४ मातेनें निषेधपूर्वक केलेलें समाधान. ]

( १ ) पुत्र—हे वीरप्रज्ञे माते, तूं अमर्षी आहेस, हें मला ठाऊक आहे. पण अशी निष्ठुर कां होतेस ! तूं माझ्याविषयीं आपलें हृदय लोखंडासारखें कठिण कां केलें आहेस ! अरे अरे, ही क्षत्रवृत्ति किती निर्दय आहे ! जसें एखाद्या परक्याच्या मुलाला रणांगणावर जाण्यास सांगावें, तसें तूं मला

---

१ उद्यच्छेदेव न नमेदुद्यमो ह्येव पौरुषम् ।
अप्यपर्वणि भज्येत न नमेतेह कस्यचित् ॥

परमातेप्रमाणें युद्धांत नियुक्त करीत आहेस! मी तुझा एकुलता एक पुत्र असतांना तूं मला अशा प्रकारचें क्रूर वचन बोलत आहेस! माझ्यावांचून तुला दुसरें अपत्य नाहीं, असें असतांना समरांगणांत माझा जर वध झाला, तर माझ्या अभावीं तुला समग्र पृथ्वीचें राज्य घेऊन तरी काय करावयाचें आहे! किंवा वस्त्राभरणें, ऐश्वर्य व जीवित यांचा तरी विशेषतः प्रिय पुत्रावांचून तुला काय उपयोग!

(२) माता—हे वत्सा, विद्वानांच्या गृहस्थादि सर्व अवस्था धर्मार्थासाठींच असतात. त्यांकडे लक्ष देऊन मी तुला युद्धाची प्रेरणा करीत आहें. ह्या पराक्रमाला योग्य काल प्राप्त झालेला आहे. तो व्यर्थ घालवून तूं जर आपलें युद्धरूपी कर्तव्य करणार नाहींस, तर लोक तुला असंभावित समजतील व तुझा तिरस्कार करतील. यावेळीं मी जर तुझी दया केली तर तें 'खरें वात्सल्य' होणार नाहीं. गर्दभी जशी स्वसंततीवर उभय लोकांना उपयुक्त नसलेलेंहि वात्सल्य दाखविते, तसें माझें हें पुत्रवात्सल्य दुर्बल व निरुपयोगी होईल.

बा संजया, तूं या सज्जनांनीं निंद्य मानलेल्या व मूर्खांनीं सेवन केलेल्या मार्गाचा त्याग कर. सर्व प्रजा ज्या अविद्येचा आश्रय करितात, ती फार मोठी आहे. तूंहि जर तिचेंच अवलंबन करून अनात्म देहावर आत्मबुद्धि ठेवीत असशील व देहाचा नाश झाला असतां आत्म्याचा नाश होतो, असें जर मानीत असशील, तर तुझें सद्वृत्त फारच प्रशंसनीय आहे, म्हणावयाचें! तुझ्या अशा विद्वत्तेनें तर तू मला फारच प्रिय होशील! मूढा! तूं जर असा देहात्मवादी दुरात्मा निपजलास तर मला प्रिय होण्याऐवजीं माझ्या द्वेषालाच पात्र होशील, समजलास! यास्तव तूं धर्मार्थांनीं, देव-मानुषगुणांनीं व सज्जनांनीं सेविलेल्या आचरणानें युक्त हो. याच्या विपरीत कदापि होऊं नको.

हे पुत्रा, जो पुरुष अशा प्रकारच्या अनम्र, निरुद्योगी व दुर्बुद्धि पुत्र व नातु यांच्या सहवासांत रमतो, त्याचें प्रजाफल व्यर्थ होतें.

जे पुरुषाधम विहित कर्तव्य न करितां स्वस्थ बसतात व जर कांहीं केलेंच तर निंद्यकर्म आरंभितात त्यांना इहलोकीं व परलोकीं सुख प्राप्त होत नाहीं. हे संजया, विधात्यानें क्षत्रियजाति यालोकीं युद्धासाठीं आणि जयासाठीं निर्माण केली आहे. क्षत्रियाचा युद्धांत जय झाला किंवा वध झाला तरी त्याला इंद्राचें सालोक्य प्राप्त होतें. शत्रूंना वश करून क्षत्रियाला जें सुख मिळतें, तें सुख पवित्र स्वर्गांतील इंद्रभुवनांतहि नसतें.

क्रोधानें दग्ध होणाऱ्या मानी पुरुषानें अनेकदा शत्रूनें जिंकलें असलें तरी त्याला जिंकण्याच्या इच्छेनें त्यावर चालून जावें. म्हणजे तो स्वतःच्या जीवाला तरी मुकतो किंवा शत्रूचा तरी पराभव करितो. यावांचून अन्य प्रकारानें त्याला शांति कोठली ! या लोकीं विचारी पुरुषाला अल्प ऐश्वर्य अप्रिय वाटत असतें. ज्याला अल्प लाभहि प्रिय असतो, त्याचें तें अल्प ऐश्वर्य निश्चयानें नष्ट होतें. प्रिय मानलेला अल्प लाभ अनर्थकर होतो. यास्तव राजानें कदापि अल्पसंतुष्ट होऊं नये. अल्पसंतोषानें पुरुषाचा विजय होत नसतो. समाधानवृत्ति कल्याणप्रद नाहीं. सागराला मिळणाऱ्या गंगेप्रमाणें उद्यमरहित पुरुष निश्चयानें नामशेष होतो.

पुत्र—हे माते, तूं आपलें मन असें निष्ठुर करूं नको. विशेषतः मज पुत्राला तरी असें बोलूं नको. माझ्याकडे दयेनें पहा.

माता—हे वत्सा, तुझ्या या वचनानें तर मला अधिकच आनंद होत आहे. तूं आपल्या देहाचें रक्षण करण्याच्या इच्छेनें दयेची याचना करीत आहेस, ही माझी केवढी समृद्धि !! ठीक आहे. तूंच ज्याअर्थीं 'मजवर दया कर' अशी प्रार्थना करीत आहेस, त्याअर्थीं मीं त्याच्या उलट वज्रासारखें हृदय करून तुला युद्धाची प्रेरणा आतांपर्यंत केली व यापुढेंहि करीन. हे पुत्रा, मी तुझें अभिनंदन करीन, पण तें केव्हां ! ज्या वेळीं सर्व सैंधवांचा रणांत संहार करून व संकटें सोसून विजयी झालेल्या तुला मी पाहीन, त्यावेळीं मोठ्या प्रेमानें मी तुझा सत्कार करीन.

( ३ ) पुत्र—हे माते, तूं म्हणतेस तें सर्व खरें; परंतु द्रव्यरहित, सहायशून्य अशा माझी कार्यसिद्धि कशी होणार व जय तरी कोठला मिळणार ! स्वतःची ही दारुण अवस्था मनांत जाणून स्वर्गापासून निवृत्त होणाऱ्या पातकी जीवाप्रमाणें माझें चित्त युद्धापासून निवृत्त होतें. तुला जर याचा कांहीं उपाय दिसत असला तर मला तो सांग. तूं बुद्धिमती आहेस, यास्तव मी तुला विचारीत आहें. तूं मला योग्य उपाय सुचविलास म्हणजे तुझ्या आज्ञेप्रमाणें मी सर्व करीन.

( ४ ) माता—हे पुत्रा, आपली पूर्वींची असमृद्ध स्थिति मनांत आणून आपला स्वतःचा कदापि अवमान करूं नये. कारण पूर्वीं प्राप्त असलेले अर्थ नष्ट होतात, नसलेले प्राप्त होतात व दुसरे नाश पावतात. तस्मात् मूर्खांनीं

क्रोधानें प्रेरित होऊन धर्मादि अर्थासाठीं आरंभ करूं नये. तर पंडितांनीं आदरानें तें संपादण्याचा यत्न करावा.

सर्व कर्मांच्या फलांत नित्यत्व व अनित्यत्व असतें, हें जाणून कार्याला आरंभ करणाऱ्या पंडितांना केव्हां ऐश्वर्यप्राप्ति होत नाहीं, तर कधीं त्यांचे इष्टार्थ सिद्ध होतात. परंतु जे लोक कार्याला मुळीं आरंभच करीत नाहींत, त्यांना 'कर्माचा अभाव' हें एकच फल प्राप्त होतें. परंतु कर्म करणारांस कार्यसिद्धि किंवा असिद्धि असें दोन प्रकारचें फल मिळतें. ज्यानें सर्व अर्थांची अनित्यता पूर्वींच जाणलेली असते तो स्वतःची पीडा व शत्रूची समृद्धि या दोन्ही प्रतिकूल गोष्टींना दूर करितो.

हे पुत्रा, तूं नृपात्मज आहेस. यास्तव यत्न कर, दक्ष रहा व उत्कर्षप्रद होणाऱ्या कर्मांत सज्ज हो. 'माझें मंगल होईलच' असा मनाचा निश्चय करून सतत अव्यथित चित्तानें देवांसह ब्राह्मणांचें पूजन करणाऱ्या राजाची सत्वर वृद्धि होते. सूर्य जसा पूर्व दिशेकडे नियमानें जातो, तशी लक्ष्मी त्याचा आश्रय करते.

वत्सा, याप्रमाणें मीं तुला अनेक उपायांचें निदर्शन केलें. तुला प्रोत्साहन देणारे लोकवृत्तांत सांगितले. मला तूं शुभलक्षणांनीं युक्त असलेला दिसत आहेस, यास्तव कांहीं पुरुषार्थ कर. स्वपराक्रम प्रकट करण्याचा हाच काल आहे. यास्तव यावेळीं इष्ट अर्थ प्राप्त करून घे. तुझ्या आश्रयाला जे क्रुद्ध, लोभी, दुर्बल, गर्विष्ठ, अवमानित व स्पर्धा करणारे लोक असतील, त्या सर्वांना भोजन व वेतन अगोदर दे व त्यांना आपल्या वश करून घे. अशा रीतीनें तूं शत्रूंच्या फार मोठ्या अनुयायांचा भेद करूं शकशील. त्या लोभी दुर्बल लोकांना तूं जर वेतनादि योग्यवेळीं दिलें नाहींस तर क्रुद्ध झालेले ते तुझा त्याग करून शत्रूंचा आश्रय करतील; यास्तव तूं मधुर भाषणानें त्यांचा संग्रह कर. तूं आलस्य सोडून नित्य प्रातःकाळीं उठत जा, व तुझ्या परिजनांना प्रिय वाणीनें आणि भोजन-वेतनादिकांनीं संतुष्ट करीत जा, म्हणजे ते तुझें प्रिय करतील. अशारीतीनें तूं सहायसंपन्न झालास म्हणजे मेघांना घालवून देणाऱ्या महावेगवान् वायूप्रमाणें बलाढ्य शत्रूंचाहि पराभव करण्यास समर्थ होशील.

आपला प्रतिस्पर्धी जीवावर उदार होऊन युद्धाला सज्ज झाला आहे, हें जेव्हां जीविताकाङ्क्षी शत्रु जाणतो, तेव्हां तो घरांत सर्प शिरल्याप्रमाणें उद्वेग

पावतो. परंतु शत्रु पराक्रमी आहे, तो आपल्या अधीन होणें शक्य नाहीं, असें आढळून आल्यास साम व दान या उपायांनीं वाक्पटु दूतांच्या द्वारा त्याला वश करून घ्यावें किंवा वादाच्या योगानें त्याला निरुत्तर करावें व त्याला जिंकण्याचा आपला हेतु गुप्त ठेवून तात्पूर्ता शम करावा व या अवकाशांत धनवृद्धि करण्याचा यत्न करावा.

बा संजया, यो जगांत धनवानाला मित्र भजतात व त्याचा आश्रय करितात आणि तो धनहीन होतांच त्याचे बांधव पुनः त्याचा त्याग करितात, त्याचा विश्वास धरीत नाहींत. उलट सर्व निर्धनाची निंदा करितात. याप्रमाणें शत्रूला अनुकूल करून त्याच्याशीं क्षणिक शम जरी झाला तरी त्याचा कदापि विश्वास करूं नये. कारण शत्रूवर विश्वास ठेवून 'आज मला हें राज्य प्राप्त होईल' अशी आशा करणें व्यर्थ आहे. ५. ६. १३५.

---

## अध्याय १३६ वा.

[१ मातेच्या प्रेरणेनें संजयाची शत्रूला जिंकण्याची प्रतिज्ञा. २ या आख्यानाची फलश्रुति ]

( १ ) माता—हे पुत्रा, राजानें कसल्याहि संकटास भिऊं नये. मनांतून जरी भय वाटलें तरी भ्याल्यासारखें वर्तन करूं नये. कारण राजाला भ्यालेलें पहातांच त्याचे सर्व अनुचर भयभीत होतात आणि सर्व राष्ट्र, सैन्य व अमात्य त्यांच्याविषयीं विपरीत बुद्धि करूं लागतात. ती कशी तें सांगत्यें ऐक.

कांहीं लोक शत्रूचा आश्रय करितात. कित्येक त्याग करून जातात आणि पूर्वी ज्यांचा अवमान झालेला असेल ते राजावरच प्रहार करण्याची इच्छा करितात. त्यांतील जे अत्यंत सुहृद् असतात, तेच आपत्तींतहि राजाची सेवा करितात. ज्याप्रमाणें धेनु आपल्या बद्ध वत्सार्चे लालन करितात, त्याप्रमाणें कल्याणाची इच्छा करणारे दुर्बल सुहृद् राजाची परिचर्या करितात. मृतबांधवाविषयीं शोक करणाऱ्या आप्तजनांप्रमाणें ते दुःखित राजासाठीं दुःखी होतात.

हे पुत्रा, पूर्वी तूं ज्यांचा सन्मान केला आहेस व जे अद्यापि तुला पूज्य आहेत, असेहि तुझे कांहीं सुहृद् आहेत. 'आमच्या राजाचा संकटांतून उद्धार

---

१ धनवन्तं हि मित्राणि भजन्ते चाश्रयन्ति च ।
स्खलितार्थं पुनस्तानि संत्यजन्ति च बान्धवाः ॥

करून राष्ट्राचें संरक्षण करणें हें आमचें कर्तव्य आहे' असा अभिमान बाळगणारेहि तुला साह्यकर्ते आहेत. यास्तव तूं हताश होऊं नको. भयभीत झालेल्या तुझा सुहृद् त्याग न करोत. हे संजया, तुझा प्रभाव, पुरुषार्थ व बुद्धि जाणण्याच्या इच्छेनें आणि तुझें धैर्य व तेज वाढविण्यासाठीं मी इतकें बोलत आहें. तें जर तूं योग्यप्रकारें जाणशील व मी तुला यथार्थ सांगत आहें असें जर मानीत असशील तर ऊठ. तुझा हा सौम्यपणा टाकून दे व उग्रस्वरूप धारण कर आणि जय मिळविण्यास सज्ज हो.

हे वीरा, आपल्याजवळ फार मोठा द्रव्यसंचय आहे, तो तूं जाणत नाहींस. तो मला एकटीला ठाऊक आहे. इतर कोणालाहि माहित नाहीं. मी तो द्रव्यनिधि तुला प्राप्त करून देईन. हे संजया, युद्धपराङ्मुख न होणारे व तुझ्याबरोबर सुख-दुःख सहन करणारे तुझे आणखींहि अनेक सुहृद् आहेत. उत्कर्ष पावण्याची व कांहीं इष्टार्थांची इच्छा करणाऱ्या पुरुषाला जशा सचिवांची अपेक्षा असते, तसे साह्यकर्ते तुला विपुल आहेत.

कुंती—हे कृष्णा, मातेचें हें अशाप्रकारचें विचित्र पदें व अक्षरें यांनीं युक्त आणि प्रोत्साहनपर भाषण ऐकून त्या मंदमति पुत्राच्या अंतःकरणावरील अज्ञानपटल दूर झालें व तो असें वचन बोलला.

पुत्र—हे माते, ज्या मला तुझ्यासारखी भावी उत्कर्ष जाणणारी शिक्षयित्री आहे, तो मी समुद्रांत बुडालेल्या भूमीचाहि उद्धार करीन, पित्याच्या राज्याची धुरा धारण करण्यासाठीं युद्धांत प्राण देईन. परंतु उद्योगरहित होऊन बसणार नाहीं. तुझें उत्तरोत्तर श्रवणीय भाषण ऐकण्यासाठींच मी वारंवार स्वस्थ बसलों आणि 'तुझें हृदय वज्रासारखें कठिण आहे. पुत्राविषयींहि तूं स्नेहशून्य आहेस' इत्यादि प्रतिकूल वचनेंहि मुद्दामच बोललों. अमृतप्राशनानें जशी तृप्ति होत नाहीं, तशी तुझ्या दुर्लभ वचनाच्या श्रवणानेंहि तृप्ति होत नाहीं. आतां मी शत्रूंच्या निग्रहासाठीं व जय मिळविण्यासाठीं बांधवांचें साह्य घेऊन उद्यम आरंभितों.

( २ ) कुंती—हे मधुसूदना, जातिवंत अश्व जसा प्रतोदाच्या केवल फटकाऱ्यानेंच भरधांव चालूं लागतो, तसा तो पुत्र मातेच्या वाक्यरूपी बाणांनीं विद्ध होऊन जागृत झाला व त्यानें तिच्या आज्ञेप्रमाणें सर्व कार्य केलें.

शत्रूकडून पीडिलेल्या व निराश झालेल्या राजाला त्याच्या मंत्र्यानें उत्साह देणारें, तेजाची वृद्धि करणारें, उग्र व उत्तम असें हें आख्यान कथन करावें.

विजयी होण्याची आकांक्षा करणाऱ्या पुरुषानें हा 'जय' नामक इतिहास अवश्य ऐकावा. याच्या श्रवणानें शत्रूंचा नाश होऊन सत्वर पृथ्वीला जिंकतां येतें. वीर-पुत्र उत्पन्न होण्यासाठीं हें पुंसवनच आहे. गर्भिणीनें हें आख्यान वारंवार ऐकलें असतां ती निश्चयानें वीर पुत्र प्रसवते. विद्याशूर, तपःशूर दानशूर, तपस्वी, ब्राह्मी श्रीनें देदीप्यमान होणारा, सज्जनांना मान्य, तेजस्वी, बलाढ्य, भाग्यवान्, महारथ, धृतिमान्, अजिंक्य, विजयी, अपराजित, दुर्जनांचा नियंता, धर्मनिष्ठांचा संरक्षक व सत्यपराक्रमी अशा पुत्राला क्षत्रिय स्त्री जन्म देते. ५. ६. १३६.

---

## अध्याय १३७ वा.

[ १ कुंतीचा स्वपुत्रांना संदेश. २ भगवानाचा कर्णाला स्वरथांत घेऊन उपदेश. ३ उपप्लव्यनगरीस गमन. ]

(१) **कुंती**—हे केशवा, अर्जुनाला माझा असा निरोप सांग कीं, तूं जेव्हां जन्माला आलास, तेव्हां तुझ्या जननाशोच्यांतच मी एकदा आश्रमांत स्त्रियांच्या परिवारांत बसलें होत्यें. त्यावेळीं अंतरिक्षांत अशी दिव्य व मनोरम देववाणी झाली.—"हे कुंति, तुझा हा पुत्र प्रतिइंद्रच निपजेल. हा युद्धांत जमलेल्या सर्व कुरूंना जिंकील. भीमसेन ज्याचा साह्यकर्ता आहे, तो तुझा हा तृतीय पुत्र शत्रूला व्याकुल करील, पृथ्वी जिंकून घेईल आणि त्याचें यश स्वर्गाला स्पर्श करील. वासुदेवाच्या साह्यानें युक्त असलेला हा वीर संग्रामांत शत्रूंचा वध करून शत्रूंनें हरण केलेल्या व आपल्या नष्ट झालेल्या पितरांच्या राज्यांशाचा पुनः उद्धार करील. भ्रात्यांसह हा सत्यप्रतिज्ञ बीभत्सु तीन अश्वमेध यज्ञ करील."

हे अच्युता, देववाणीनें सांगितल्याप्रमाणें हा धनंजय बलाढ्य व दुरासद आहे, हें तूंहि जाणतोसच. हे दाशार्हा, त्याप्रमाणें सव घडून येवो. या लोकीं जर धर्म प्रतिष्ठित असेल, तर ती वाणी सत्य होईल आणि हे कृष्णा, तूंहि हें सर्व घडवून आणशील. या आकाशवाणीमध्यें मला कांहींच दोष दिसत नाहीं. धर्मच प्रजेचें धारण करितो, यास्तव त्या महद्धर्माला नमस्कार असो.

हे माधवा, धनंजयाला माझा असा निरोप सांग आणि युद्धाला नित्य उद्युक्त असलेल्या वृकोदराला म्हणावें कीं, ज्यासाठीं क्षत्रियस्त्री पुत्रांना जन्म देते, तो

काल आतां प्राप्त झाला आहे. श्रेष्ठ पुरुष शत्रूंशीं वैर उत्पन्न झालें असतां कदापि हताश होत नसतात. तुला भीमसेनाचा स्वभाव ठाऊकच आहे. शत्रूंचा नाश केल्यावांचून तो कदापि शान्त होत नाहीं.

त्याचप्रमाणें सत्कुलांत उत्पन्न झालेल्या यशस्विनी पांचालीला सांग कीं, हे महाभागे, माझ्या सर्व पुत्रांशीं तूं समभावानें वागल्येस हें तुला शोभण्यासारखेंच व यथायोग्य आहे. हे कृष्णा, महात्म्या पांडुनृपतीची ती स्नुषा सर्व धर्मांचा विशेष जाणणारी आहे.

क्षत्रधर्मांत रत असलेल्या उभय माद्रीपुत्रांना माझा असा निरोप कळीव कीं, स्वपराक्रमानें संपादन केलेलें ऐश्वर्य जीविताहूनहि श्रेष्ठ आहे. यास्तव जीवावर उदार होऊन पराक्रमानें राज्य मिळवा. स्वपराक्रमानें मिळविलेलेंच ऐश्वर्य क्षात्रधर्मावर जिवंत रहाणाऱ्या पुरुषाच्या मनाला सर्वदा संतुष्ट करितें.

हे पुरुषोत्तमा, मी पुत्रांना युद्धाला उद्युक्त करीत आहें, तें निष्कारण नव्हे. त्यांना म्हणावें, तुम्ही सर्व धर्मवर्धनशील वीर तेथें बसलेले असतांना तुमच्या समक्ष कौरवांनीं पांचालीला जीं कठोर वचनें ऐकविलीं, तीं कोण सहन करील ? कृष्णा, शत्रूनें आमचें राज्य हरण केल्याचें मला दुःख होत नाहीं. माझ्या पुत्रांचा द्यूतांत पराजय झाल्याचा विषाद वाटत नाहीं, किंवा पुत्रांचा वनवासहि माझ्या दुःखाचें कारण नाहीं. तर त्या सभेमध्यें रोदन करीत असलेल्या श्रेष्ठ द्रौपदीला कौरवांनीं जें निष्ठुर भाषण ऐकविलें, त्याचेंच मला अतिशय दुःख होत आहे. वत्सा कृष्णा, याज्ञसेनी सर्वदा क्षत्रधर्मांचें पालन करीत असते. ती धर्मराजाची सम्राज्ञी त्यावेळीं स्त्रीधर्मिणी असूनहि तिला सभेंत आणलें आणि सनाथ असलेल्या तिचे नाथ तेथें समक्ष असतांहि त्यांतील एकहि तिच्या साह्यार्थ धांवला नाहीं.

हे महाबाहो, धनुर्धरांतील श्रेष्ठ अर्जुनाला म्हणावें कीं, तूं द्रौपदीच्या उपदेशाप्रमाणें शत्रूंच्या स्त्रियांना वैधव्य येईल असा यत्न कर. ( शत्रूंचा संहार कर. ) हे दोघे भीमार्जुन यम व अंतक यांच्यासारखे अत्यंत क्रुद्ध झाले, म्हणजे साक्षात् देवांचाहि नाश करतील, मग इतरांची काय कथा ! कृष्णेला सभेंत नेलें, यांत वस्तुतः त्या दोघां वीरांचाच अपमान आहे. त्याचप्रमाणें कुरुश्रेष्ठांच्या समक्ष दुःशासन भीमाला जीं दुर्वचनें बोलला, त्याचेंहि मी त्याला

१ न हि वैरं समासाद्य सीदन्ति पुरुषर्षभाः ॥

पुनः पुनः स्मरण करून देतें. ठीक आहे, बा कृष्णा तूं आतां जा. तुझा मार्ग तुला सुखकर होवो. द्रौपदी व पुत्र यांसह पांडवांना मीं कुशल विचारलें आहे, असें सांग आणि त्यांना पुनः पुनः माझें कुशल कथन कर. माझ्या पुत्रांचें संरक्षण कर.

**वैशंपायन**—राजा, त्यानंतर कृष्ण कुंतीला अभिवादन करून व प्रदक्षिणा घालून सिंहासारख्या सहज गतीनें निघाला. त्यानें भीष्मादि कुरुश्रेष्ठांना निरोप दिला, कर्णाला आपल्या रथांत घेतलें, आणि सात्यकीसह प्रयाण केलें.

याप्रमाणें श्रीकृष्ण निघून गेला असतां ते सर्व कौरव एकत्र जमले व केशवानें जें परम अद्भुत आश्चर्य दाखविलें त्याविषयीं आपसांत चर्चा करूं लागले. ते म्हणाले—" खरोखर ही सर्व पृथ्वी मूढ झाली आहे. दुर्योधनाच्या बालिशतेमुळें ती मृत्युपाशांत सांपडली आहे. हें कांहीं बरें झालें नाहीं. आतां हें कौरवकुल जिवंत रहात नाहीं."

इकडे पुरुषोत्तम कर्णासह नगराबाहेर गेला व तेथें पुष्कळ वेळ त्यानें कर्णाला उपदेश केला. नंतर त्याला निरोप देऊन तो यादवनंदन मोठ्या वेगानें निघाला. दारुकानें प्रेरणा करतांच मन व वायु यांच्यासारखे महावेगवान् असलेले ते जातिवंत अश्व जणुकाय मार्गाचें प्राशन करितच चालले व उड्डाण करणाऱ्या श्येनपक्ष्याप्रमाणें अल्पावकाशांत त्या फार मोठ्या मार्गाचें आक्रमण करून शार्ङ्गधन्व्या श्रीकृष्णाला विराटाच्या उपलव्य नगरींत घेऊन आले. ५. ६. १३७.

---

## अध्याय १३८ वा.

[ १ भीष्म-द्रोणादिकांचा दुर्योधनाला शमाचा पुनः उपदेश. ]

( १ ) **वैशंपायन**—जनमेजया, कुंतीचें हें वचन ऐकून महारथ भीष्म-द्रोण शासनातीत असलेल्या दुर्योधनाला असें वचन बोलले—हे पुरुषश्रेष्ठा, कृष्णाच्या समीप कुंतीनें जें धर्मयुक्त, अर्थवत्, उग्र, पण उत्कृष्ट भाषण केलें, तें तूं ऐकलेंस ना ! ते कौंतेय वासुदेवाला संमत असलेलें तें सर्व घडवून आणतील. ते पांडव आपलें राज्य परत मिळविल्यावांचून कदापि शांत होणार नाहींत.

हे कौरवा, पार्थ धर्मपाशानें बद्ध झाले असतां तुम्हीं द्रौपदीला सभेंत आणून जे क्लेश दिलेत, ते त्यांनीं त्यावेळीं सहन केले. परंतु आतां कृतास्त्र झालेला अर्जुन, कृतनिश्चयी भीम, गांडीवासारखें श्रेष्ठ धनुष्य, अक्षय्य भाते, ध्वजानें युक्त असलेला दिव्य रथ, बल व तेज यांनीं युक्त असलेले नकुल-सहदेव आणि साह्यार्थ वासुदेव इतकी सामग्री असल्यावर युधिष्ठिर कदापि क्षमा करणार नाहीं.

हे महाबाहो, पूर्वीं बुद्धिमान् पार्थानें विराटनगरींतील युद्धांत सर्वांचा कसा पराजय केला, हें तूं प्रत्यक्ष पाहिलेंच आहेस. त्या वानरकेतु धनंजयानें रौद्र अस्त्र संपादन करून घोर कर्में करणाऱ्या निवातकवच दानवांना युद्धांत दग्ध करून टाकिलें. या कर्णप्रभृति कवच धारण करणाऱ्या रथ्यांना व तुलाहि घोषयात्रेच्या प्रसंगीं त्या सव्यसाचीनें सोडविलें. एवढेंच एक उदाहरण त्याच्या पराक्रमाचें अनुमान करण्यास पुरें आहे.

हे भरतश्रेष्ठा, भ्रात्यांसह पांडवांशीं शम करून मृत्यूच्या दाढेंत गेलेल्या या सर्व पृथ्वीचें रक्षण कर. धर्मराज तुझा ज्येष्ठ भ्राता आहे. तो धर्मशील, वात्सल्यपूर्ण, मधुर भाषण करणारा, आणि विद्वान् आहे. यास्तव तूं मनांतील सर्व किल्बिष टाकून त्याच्याकडे जा. शरासन दूर सारून, भ्रुकुटी सरळ करून प्रसन्न मुखानें तुज श्रीमानाला पांडवांसह पाहिलें म्हणजे आमच्या कुलाची शांति होईल. त्या धर्मराजाकडे अमात्यांसह जाऊन त्याला आलिंगन दे व पूर्वीप्रमाणें त्याला अभिवादन कर. तो कुंतीपुत्र युधिष्ठिर वंदन करणाऱ्या तुझा आपल्या दोन्ही हातांनीं स्वीकार करो.

सिंहासारखे स्कंध असलेला बलाढ्य भीम तुला आपल्या दोन्ही बाहूंनीं आलिंगन देवो. शंखासारखी ज्याची मान आहे, तो कमलनेत्र धनंजय तुला अभिवादन करो. नरश्रेष्ठ माद्रेय या लोकीं अप्रतिम रूपवान् आहेत. ते दोघे तुझें गुरुवत् पूजन करण्यासाठीं तुला सामोरे येवोत. तुमचें सख्य झालेलें पाहून दाशार्हप्रमुख नृपति आनंदाश्रु ढाळोत. तूं मान सोडून भ्रात्यांसह शम कर व त्यांच्यासह समग्र पृथ्वीचें राज्य कर, युद्धार्थ जमलेले सर्व राजे परस्परांना आलिंगन देऊन मोठ्या संतोषानें परत जावोत. आम्हां सुहृदांचा हा सदुपदेश ऐक व युद्धाचा आग्रह सोड.

हे राजेंद्रा, या युद्धामध्यें क्षत्रियांचा निश्चित विनाश दिसत आहे. सर्व ग्रह प्रतिकुल दिसत आहेत. पशु-पक्षी दारुण ध्वनि करीत आहेत, क्षत्रियांचा नाश

दर्शविणारे विविध उत्पात दृष्टीं पडत आहेत. विशेषतः आमच्या गृहामध्यें दुश्चिन्हें होत आहेत. प्रदीप्त उल्का तुझ्या सैन्याला पीडा देत आहेत. अश्वादि वाहनें उत्साहशून्य होऊन अश्रु ढाळीत आहेत. गृध्रपक्षी तुझ्या सैन्याभोंवतीं घिरव्या घालीत आहेत. ही नगरी व राजमंदिर पूर्वींप्रमाणें प्रसन्न दिसत नाहीं. भालू अमंगल शब्द करीत प्रदीप्त दिशेकडे जात आहेत.

तस्मात् हे महाबाहो, तुझें हित चिंतिणाऱ्या आमचें व तुझ्या माता-पितरांचें वचन ऐक. युद्ध किंवा शम हीं दोन्ही तुझ्यावर अवलंबून आहेत. सुहृदांच्या वचनांप्रमाणें तूं जर वागला नाहींस, तर पार्थाच्या बाणानें पीडित झालेलें स्वसैन्य पाहून पश्चात्ताप पावशील. माझें हें भाषण आज जरी तूं विपरीत मानीत असलास, तरी जेव्हां रणामध्यें तेजस्वी भीमाचा भयंकर सिंहनाद ऐकशील व गांडीव धनुष्याचा घोर टणत्कार तुझ्या कानीं पडेल, तेव्हां तुला माझ्या या शब्दांचें स्मरण होईल ५. ६. १३८.

---

## अध्याय १३९ वा.

[ १ भीष्म व द्रोण यांचा दुर्योधनाला पृथक् उपदेश. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, भीष्म व द्रोण यांचें हें भाषण ऐकून दुर्योधन खिन्न झाला, त्यानें अधोमुख होऊन दृष्टि तिर्यक् केली, कपाळाला आंठ्या घातल्या व कांहीं उत्तर दिलें नाहीं. तेव्हां त्याला विमनस्क झालेलें पाहून त्या दोघां पुरुषश्रेष्ठांनीं परस्परांकडे पाहिलें व पुनः दुर्योधनाला असें म्हटलें—

**भीष्म**—अरे अरे, ते पार्थ शुश्रूषु, असूया न करणारे, ब्राह्मणभक्त व सत्यवादी आहेत. अशा महात्म्यांशीं आम्हीं युद्ध करावें, याहून अधिक दुखःकर दुसरें काय आहे !

**द्रोण**—माझ्या अश्वत्थामा पुत्रावर माझें जितकें प्रेम आहे, त्याहून अधिक धनंजयावर आहे. तो कपिध्वज नम्र व माझा अतिशय बहुमान करणारा आहे. अशा त्या पुत्राहूनहि अधिक प्रिय असलेल्या धनंजयाशीं क्षत्रधर्माला अनुसरून युद्ध करण्याचा प्रसंग मजवर येणार आहे. धिक्कार असो या क्षत्रजीविकेला ! या लोकीं सव्यसाचीसारखा अन्य धनुर्धर नाहीं. माझ्या अनुग्रहानें हा बीभत्सु इतर सर्व धनुर्धरांहून श्रेष्ठ झाला आहे.

हे दुर्योधना, तुझ्यासारखा जो मित्रद्रोही, दुष्ट स्वभावाचा, नास्तिक, कुटिल व शठ असतो, त्याचा यज्ञमंडपांत गेलेल्या मूर्खांप्रमाणें सज्जनांमध्यें सत्कार होत नाहीं. पापात्म्याचें पापापासून निवारण केलें, तरीहि तो पापच इच्छितो आणि पुण्यात्म्याला पापाची प्रेरणा केली तरीहि तो शुभाचीच इच्छा करितो.[1] हे भरतश्रेष्ठा, तूं पांडवांशीं जरी मिथ्याचरण केलें आहेस, तरी ते तुझ्याशीं सौजन्यानें वागत असतात. पण तुझे हे द्वेषादि दोष वैराला कारण होत आहेत.

कुरुवृद्ध भीष्मानें तुला शमाचा उपदेश केला, मीं तेंच सांगत आहें, विदुरानें विविध प्रकारें सांगितलें आणि वासुदेवानेंहि आपली पराकाष्ठा केली. पण त्यांत तूं आपलें श्रेय मानीत नाहींस. 'माझ्याजवळ विपुल बल आहे' या अभिमानानें तूं सुसरी, नक्र, मकर यांनीं युक्त असलेल्या वर्षाकालांतील प्रचंड गंगाप्रवाहाला तरून जाण्याची इच्छा करीत आहेस. दुसऱ्याचें वस्त्र परिधान करून तें जसें आपलेंच समजावें, किंवा एखाद्यानें काढून ठेवलेली पुष्पमाला जशी घेऊन ती धारण करावी, तसें तूं युधिष्ठिराचें राज्य घेऊन लोभानें तें स्वतःचेंच मानीत आहेस.

बा धार्तराष्ट्रा, आयुधांनीं युक्त असलेले चार भ्राते व द्रौपदी यांनीं परिवेष्टित असलेला युधिष्ठिर वनस्थ जरी असला तरी कोणता राज्यस्थ क्षत्रिय त्याला जिंकूं शकेल! ज्याच्या आज्ञेंत सर्व नृपति किंकरांप्रमाणें स्थित आहेत, त्या कुबेराशींहि युद्धाचा प्रसंग आला असतां धर्मराज आपल्या तेजानें विराजमान झाला. ज्या पांडवांनीं कुबेराच्या सदनांत जाऊन तेथून विपुल रत्नसंचय आणला, ते पुरुषश्रेष्ठ विस्तीर्ण राज्याचें आक्रमण करून आज तुझ्यापाशीं आपलें राज्य परत मागत आहेत. पांडवांनीं दानें दिलीं आहेत. यज्ञ केले आहेत. ब्राह्मणांना धनांनीं तृप्त केलें आहे.

बा दुर्योधना, आतां आम्हां दोघांचें आयुष्य संपत आलें आहे. आम्ही कृतकार्य झालों आहों. आम्हांला या जगांत फार दिवस काढावयाचे नाहींत. परंतु तूं मात्र पांडवांशीं युद्ध करून आपले मित्र, धन, राज्य व सुख यांना मुकशील आणि महत्संकटांत सांपडशील.

---

१ वार्यमाणोऽपि पापेभ्यः पापात्मा पापमिच्छति ।
चोद्यमानोऽपि पापेन शुभात्मा शुभमिच्छति ॥

घोर तपाचें व्रत आचरणारी, सत्यवादिनी देवी द्रौपदी ज्याच्या विजयाची इच्छा करीत आहे, त्या पांडवाला तूं कसा जिंकशील ! ज्याचा मंत्री जनार्दन व भ्राता धनुर्धरांतील श्रेष्ठ धनंजय आहे, त्या युधिष्ठिराला तूं कसा जिंकणार !! जितेंद्रिय व धृतिमान् ब्राह्मण ज्याचे साह्यकर्ते आहेत, त्या उग्र तप करणाऱ्या वीराला जिंकण्यास तूं कसा समर्थ होशील !!!

सुहृद् संकटार्णवांत बुडत असतां त्यांच्या कल्याणाची इच्छा करणाऱ्या सुहृदांचें जें कर्तव्य असतें, तेंच मी तुला पुनः पुनः सांगत आहें. यास्तव त्या वीरांशीं युद्ध करण्याचा आग्रह पुरे कर. कुरुकुलाच्या वृद्धीसाठीं शम कर. आपले पुत्र, अमात्य व बल यांसह पराभवाला प्राप्त होऊं नको. ५. १. १३९.

---

## अध्याय १४० वा.

[ १ धृतराष्ट्राचा संजयाला प्रश्न. २ वासुदेवानें कर्णाला केलेल्या उपदेशाचें सविस्तर वर्णन. ]

( १ ) धृतराष्ट्र—हे संजया, राजपुत्र व भृत्य यांनीं परिवेष्टित झालेला मधुसूदन कर्णाला आपल्या रथांत घेऊन निघून गेला. त्या परवीरहा गोविंदानें सूतपुत्र कर्णाला कोणतें युक्तियुक्त सान्त्व वचन सांगितलें ! वर्षाकालीन जलयुक्त ॰ घाच्या गंभीर ध्वनीप्रमाणें ज्याचा स्वर आहे, तो कृष्ण राधेयाला कोणत मृदु किंवा तीक्ष्ण वचन बोलला, तें मला सविस्तर सांग.

संजय—हे भारता, मधुसूदन कर्णाला क्रमानें जीं मृदु, तीक्ष्ण, प्रिय, धर्मयुक्त, सत्य, हित आणि हृदयंगम वचनें बोलला, तीं मी तुला सविस्तर सांगतों, ऐक.

(२) वासुदेव—हे राधेया, तूं वेदपारग ब्राह्मणांची उपासना केली आहेस. मनांत असूया न ठेवतां तूं नियतचित्त होऊन तत्त्वार्थ समजून घेतला आहेस. सनातन वेदवाद तूंच जाणतोस आणि सूक्ष्म धर्मशास्त्रावर तुझी पूर्ण निष्ठा आहे. हे कर्णा, कन्येला कानीन व सहोढ असे दोन प्रकारचे पुत्र होतात. कौमार्यावस्थेंत झालेला पुत्र कानीन व विवाह संस्कारानंतर उत्पन्न झालेला पुत्र सहोढ होय. त्या कन्येचा ज्या पुरुषांशीं विवाह होतो, त्याचेच ते पुत्र मानले जातात. शास्त्रवेत्ते जन त्या कन्येच्या पतीलाच त्या पुत्रांचा पिता म्हणतात. यास्तव हे कर्णा, तुझा जन्म अशाप्रकारें झालेला असल्यामुळें तूंहि

धर्मतः पांडूचाच पुत्र आहेस. सूर्याचा किंवा अधिरथाचा नाहींस. धर्मशास्त्राच्या या निश्चयाप्रमाणें तूं राजा होशील. यास्तव माझ्याबरोबर पांडवांकडे चल.

हे पुरुषश्रेष्ठा, तुझ्या पितृपक्षाकडे पार्थ व मातृपक्षाकडे वृष्णि आहेत. या दोन्ही पक्षांना तूं मान्य कर. आज माझ्याबरोबर तूं जर पांडवांकडे आलास, तर युधिष्ठिराच्या पूर्वी उत्पन्न झालेल्या तुज कौंतेयाचा ते पांडव स्वीकार करतील. ते पांची भ्राते तुझ्या चरणांना वंदन करतील. त्याचप्रमाणें द्रौपदीचे पांच पुत्र, अपराजित सौभद्र, सर्व अंधक, वृष्णि आणि पांडवपक्षाला साह्य करण्यासाठीं जमलेले राजे व राजपुत्र तुझ्या चरणांवर मस्तक ठेवतील. राजे आणि राजकन्या सुवर्ण व रौप्य पात्रांतून व मृण्मय कुंभांतून पवित्र जल आणून व विविध रत्नें, ओषधि, बीजें आणि लता ही सर्व सामग्री घेऊन तुला राज्याभिषेक करतील. शिवाय पांच पांडव इतर भ्रात्यांप्रमाणेंच तुलाहि सहावा मानून द्रौपदीहि यथाकालीं तुला प्राप्त होईल. शुद्धात्मा श्रेष्ठ धौम्यऋषि तुझ्यासाठीं अग्नींत आहुत्या देईल. ब्रह्मकर्मांत स्थित असलेला पांडवांचा पुरोहित व चारी वेद जाणणारे इतर ब्राह्मण आज तुला अभिषेक करोत. त्याचप्रमाणें पुरुषश्रेष्ठ पांच पांडव भ्राते, द्रौपदीचे पांच पुत्र, पांचाल, चेदि आणि मी असे सर्व मिळून तुला साम्राज्याभिषेक करूं. तीक्ष्ण व्रत धारण करणारा धर्मात्मा युधिष्ठिर तुझा युवराज होवो व हातांत श्वेत व्यजन घेऊन तुझ्या रथांत पृष्ठभागीं आरूढ होवो. तुज अभिषिक्त सम्राटाच्या मस्तकावर महाबलाढ्य भीमसेन शुभ्र छत्र धारण करो. शेकडों घुंगुरमालांचा निर्घोष करणाऱ्या, व्याघ्रचर्मानें मढविलेल्या व श्वेत अश्व जोडलेल्या तुझ्या श्रेष्ठ रथाला अर्जुन स्वतः चालवील. अभिमन्यु नित्य तुझ्या संनिध राहील. नकुल, सहदेव, पांच द्रौपदेय, पंचाल व महारथ शिखंडि तुझे अनुचर होतील. सर्व अंधक व वृष्णि यांसह मीहि तुला अनुसरेन. दाशार्हांसह दाशार्ण तुझे अनुयायी होतील.

यास्तव हे महाबाहो, जप, होम आणि विविध प्रकारचें मंगल यांनीं युक्त होऊन तूं आपल्या पांडव भ्रात्यांसह राज्योपभोग घे. कुंतलांसह द्रविड, आंध्र, तालचर, चूचुप, इत्यादि देशांतील राजे तुझे पुरोगम होतील ( म्ह. तुझ्या पुढें चालतील. ) सूत आणि मागध अनेक प्रकारच्या स्तवनांनीं तुझी स्तुति करतील, आणि पांच पांडुपुत्र तुज वसुषेणाच्या विजयाची घोषणा करतील.

तस्मात् हे कुंतीपुत्रा, नक्षत्रांनीं परिवेष्टित, असलेल्या चंद्राप्रमाणें तूं राज्याचें पालन कर आणि कुंतीला आनंद होऊं दे. हे कर्णा, याप्रमाणें पांडवांशीं भ्रातृप्रेम जोड, आपल्या मित्रांना संतुष्ट कर व शत्रूंना व्यथित होऊं दे. ५. ६. १४०

---

## अध्याय १४१ वा.

[ १ कर्णाचें भगवानाला उत्तर. २ यज्ञाचें रूपक. ]

( १ ) कर्ण—हे केशवा, सर्वांच्या कल्याणाची इच्छा करणाऱ्या तूं प्रेमानें, स्नेहानें व सौहृदानें मला हा उपदेश करीत आहेस, यांत संशय नाहीं. धर्मशास्त्राच्या नियमानें मी धर्मतः पांडूचा पुत्र आहें, असें जें तूं म्हणत आहेस, तें मी जाणतों. कुंतीनें कौमार्यावस्थेंत सूर्यापासून गर्भ धारण केला आणि मी उत्पन्न झाल्यावर आदित्याच्या वचनावरून तिनें माझा त्याग केला. अशाप्रकारें जन्म पावलेला मी धर्मतः पांडूचें अपत्य होतों, हें मला मान्य आहे. परंतु कुंतीनें जो माझा त्याग केला तें योग्य केलें नाहीं.

हे मधुसूदना, त्यावेळीं अधिरथ सूतानें मला पहातांच आपल्या घरीं नेलें आणि प्रेमानें राधेच्या स्वाधीन केलें. मला पाहून राधेला पान्हा फुटला व तिनें माझें पोषण केलें. माझें बालपणांतील मलविसर्जनादि कार्य तिनेंच केलें. जिनें इतक्या स्नेहानें माझें लालन-पालन केलें, तिच्याशीं धर्म आणि अधर्म यांच्या शास्त्रश्रवणांत सतत तत्पर असलेल्या माझ्यासारख्यानें कृतघ्न होऊन तिच्या जीविकेचा अपहार कसा करावा !

त्याचप्रमाणें अधिरथ मला स्वतःचा पुत्र समजत आहे आणि मीहि त्याच्या सतत प्रेमामुळें त्याला पिता मानीत आहें. हे माधवा, त्यानें पुत्रलोभानें प्रेरित होऊन शास्त्रदृष्टीनें माझें विधियुक्त जातकर्मादि करविलें आणि द्विजांकडून माझें ' वसुषेण ' असें नांव ठेवविलें. मीं यौवनावस्थेला प्राप्त होतांच त्याच्याच अनुग्रहानें अनेक रूपसंपन्न भार्यांचें पाणिग्रहण केलें. त्यांच्या ठिकाणीं मला पुत्र-पौत्रादिकहिं झाले आहेत. त्या स्त्रियांच्या ठिकाणीं माझें हृदय आतां कामसंबंधानें आसक्त झालें आहे. यास्तव हे गोविंदा, मला कोणीं समग्र पृथ्वीचें राज्य किंवा सुवर्णाच्या राशी जरी दिल्या, तरी त्यांच्या लोभानें, हर्षानें किंवा भयानें मी त्यांच्याशीं मिथ्याचरण करणार नाहीं.

त्याचप्रमाणें हे कृष्णा, धृतराष्ट्राच्या कुलांत दुर्योधनाच्या आश्रयानें मीं तेरा वर्षें निष्कंटक राज्याचा उपभोग घेतला. मीं सूतांच्या समुदायांसह अनेक वेळां विविध यज्ञ केले. सूतांचे कुलधर्म आचरिले आणि सूतकुलांतील कन्यांशीं विवाहसंबंध केले. असें असतां मी आतां त्यांचा त्याग करून पांडवकुलांत कसा जाऊं !

हे वार्ष्णेया, माझ्या मैत्रीच्या बलावरच दुर्योधन शस्त्र उगारून पांडवांशीं युद्धाला उद्युक्त झाला आहे. हे अच्युता, रणांमध्यें सव्यसाची अर्जुनाशीं द्वैरथ युद्ध करण्यासाठीं कौरवांनीं मला त्याचा प्रतियोद्धा योजून ठेविलें आहे. तस्मात् मी वध किंवा बंधन यांच्या भयानें किंवा लोभानें धीमान् दुर्योधनाची ती योजना व्यर्थ होऊं देणार नाहीं. शिवाय आम्हीं दोघांनीं परस्परांच्या वधाची प्रतिज्ञा केलेली आहे, तेव्हां मी जर सव्यसाचीबरोबर द्वैरथ युद्धाला सज्ज झालों नाहीं, तर त्यांत मी व पार्थ या दोघांचीहि अपकीर्ति होईल.

हे मधुसूदना, तूं माझ्या हितासाठींच पांडवांना माझा स्वीकार करावयास सांगशील व ते पांडुपुत्र तुझ्या आज्ञेंत असल्यामुळें तुझ्या शब्दाप्रमाणें वागतील, यांत संशय नाहीं. परंतु हे कृष्णा, मी कुंतीचा पुत्र आहें, याविषयीं आपलें दोघांचें झालेलें भाषण युधिष्ठिरापासून गुप्त ठेव. यांतच सर्व हित आहे, असें मी मानितों. कारण ‘ मी कुंतीचा ज्येष्ठ पुत्र आहें ’ हें जर जितेंद्रिय धर्मात्म्या युधिष्ठिराला कळलें, तर तो राज्याचें ग्रहण करणार नाहीं. शिवाय मला तरी एवढें मोठें राज्य घेऊन काय करावयाचें आहे ! मी तें विस्तीर्ण राज्य दुर्योधनालाच अर्पण करणार आणि अधार्मिक दुर्योधनाचें राज्य लोकांच्या नाशाला कारण होणारें आहे.

हे मुकुंदा, ज्याचा नेता हृषीकेश व योद्धा धनंजय आहे, तो धर्मराज युधिष्ठिर शाश्वत राजा होवो. महारथ भीम, नकुल, सहदेव, द्रौपदेय, धृष्टद्युम्न, पांचाल्य, सात्यकि, चैद्य, चेकितान, शिखंडी, ताम्रवर्ण केकय भ्राते, इंद्रधनुष्यासारखा तेजस्वी उदार कुंतिभोज, भीमसेनाचा मातुल श्येनजित्, विराटाचा पुत्र शंख आणि हे जनार्दना, अक्षय निधितुल्य असलेला तूं, असे अप्रतिम वीर ज्याच्या पक्षांत आहेत, त्या धर्मराजाला सर्व पृथ्वी व राष्ट्र वश होईल, यांत संशय नाहीं.

हे कृष्णा, हा सर्व क्षत्रियसमुदाय जेव्हां एकत्र जमला, तेव्हांच सर्व राजांनीं ‘ पृथ्वीचें उज्ज्वल राज्य युधिष्ठिराला प्राप्त झालें ’ असें मानिलें.

(२) हे वार्ष्णेया, धार्तराष्ट्राचा हा शस्त्रयज्ञच होईल. हे जनार्दना, या यज्ञाचा 'वेत्ता—उपद्रष्टा' तूंच होशील व या क्रतूंतील आध्वर्यव-यज्ञनेतृत्वहि तुझ्याकडेच येईल. कपिध्वज बीभत्सु 'होता' होईल. गांडीव धनुष्य 'स्रुक्' आणि पुरुषांचा पराक्रम 'आज्य' होईल. सव्यसाचीनें प्रयुक्त केलेलीं ऐंद्र, पाशुपत, ब्राह्म, व स्थूणाकर्ण हीं अस्त्रें 'मंत्र' होतील. पराक्रमांत पितृतुल्य किंबहुना त्याहूनहि अधिकच असलेला सौभद्र यज्ञांतील गीत व स्तोत्र योग्यप्रकारें गाऊन 'उद्गाता' होईल. रणांगणांत आपल्या सिंहनादानें गजांच्या सैन्यालाहि भयभीत करणारा बलाढ्य भीमसेन 'प्रस्तोता' होईल आणि जप व होम यांनीं युक्त असलेला राजा युधिष्ठिर या रणयज्ञांतील शाश्वत ब्रह्मत्व स्वीकारील.

हे मधुसूदना, शंख, पखवाज, भेरि, दुंदुभि, गंभीर सिंहनाद, हा घोर निर्घोष या शस्त्रयज्ञांतील कालाचा आवाहन कर्ता होईल. यशस्वी नकुल-सहदेव या रणयज्ञांतील क्षत्रियरूपी पशुमारण कर्म करणारे 'शामित्र' होतील. चित्र-विचित्र ध्वजांनीं युक्त असलेल्या विमल रथपंक्ति पशु बांधण्याचे यूप होतील. कर्णी, नालीक, नाराच, वत्सदन्त हे बाण 'उपबृंहण', तोमर हे सोमकलश म्ह० सोमरसग्रहण करण्याचीं पात्रें व धनुष्यें हीं 'पवित्रें' म्ह० सोमाच्या शोधनाचीं साधनें, तलवारी हींच या यज्ञांतील कपालें आणि मस्तकें हाच पुरोडाश होईल.

---

१ लौकिक यज्ञामध्यें उपद्रष्टा निराळा व अध्वर्यु निराळा, ते दोघे एक नसतात असें दिसतें. पण या शस्त्रयज्ञांत तूंच ईश्वररूपानें कर्ता व ब्रह्मरूपानें साक्षी आहेस. गीतस्तोत्र, म्हणजे उच्चस्वरानें गायलेल्या मंत्रानें साध्य होणारी स्तुति. हें उद्गात्याचें कर्म आहे. या रूपकांत यज्ञांतील होता म्ह० मंत्रांनीं देवतांचें आह्वान करणारा, स्रुक् म्ह० हवि अग्नीमध्यें अर्पण करण्याचें काष्ठाचें साधन, आज्य म्ह० घृत, हविर्द्रव्य, अर्जुनाचीं ऐंद्र, पाशुपत, ब्राह्म व स्थूणाकर्ण हीं अस्त्रें हेंच अर्जुनानें प्रयुक्त केलेले मंत्र. सौभद्र उद्गाता, भीम प्रस्तोता, धर्मात्मा युधिष्ठिर ब्रह्मा, वाद्यादिकांचे ध्वनि हा सुब्रह्मण्य म्ह० युद्धयज्ञांत भोक्त्या कालाचें आवाहन करणारा, नकुल-सहदेव हेंच शामित्र म्ह० क्षत्रिय पशूंचें मारणकर्म. रथपंक्ति हेच कल्माषदंड म्ह० चित्रध्वज आणि कर्णिप्रभृति वत्सदंतान्त बाण हेंच उपबृंहण म्ह० अध्वर्यूच्या सोमाहुति प्रक्षेपकालीं 'चमसाध्वर्यु' नांवाचे साह्यकर्ते. अशा प्रकारचें हें रूपक केलें आहे.

या युद्धांमध्यें रुधिर हवि होईल. शक्ति व गदा अग्नीच्या सभोंवार आहुतींच्या रक्षणार्थ ठेवलेलीं काष्ठें होतील. शारद्वत, द्रोण व कृप यांचे शिष्य 'सदस्य' होतील. अर्जुन, द्रोण, अश्वत्थामा व इतर महारथि यांनीं सोडलेले बाण 'परिस्तोम' होतील. सात्यकि 'प्रतिप्रास्थानिक' कर्म करील. दुर्योधन यज्ञदीक्षा घेणारा 'दीक्षित' व प्रचंड सेना त्याची पत्नी होईल. या अतिरात्र यज्ञांत घटोत्कच रात्रीच्या वेळीं शामित्र कर्म करील. वैतानिक म्ह० श्रौत-यज्ञांमध्यें कर्मरूपीद्वारानें पावकाग्नीपासून उत्पन्न झालेला प्रतापवान् धृष्टद्युम्न या यज्ञांतील 'दक्षिणा' होईल.

(पांडवांविषयीं माझ्या मनांत स्नेहभाव आहे, परंतु मला तो व्यक्त करतां येत नाहीं, असें दर्शविण्यासाठीं कर्ण पुढें म्हणाला—) हे कृष्णा, मी आजपर्यंत पांडवांना जीं कटु वचनें बोललों, तीं केवल दुर्योधनाचें प्रिय करण्यासाठींच होतीं. त्या अकार्याविषयीं माझ्या मनाला अतिशय खेद वाटत आहे. सव्यसाचीनें माझा वध केलेला तूं जेव्हां पहाशील, तेव्हां यज्ञानंतरच्या 'चयनाला' आरंभ होईल. घनगंभीर सिंहनाद करणारा भीमसेन जेव्हां दुःशासनाचें रक्त प्राशन करील, तेव्हां 'सुत्या' म्हणजे यज्ञांतील 'सोमसवन' होईल. धृष्टद्युम्न व शिखंडि हे पांचालराजपुत्र जेव्हां द्रोण व भीष्म यांचा समरांगणांत पराभव करतील, तेव्हां यज्ञावसान होईल. महाबलाढ्य भीमसेन जेव्हां दुर्योधनाचा प्राण घेईल, तेव्हां यज्ञसमाप्ति होईल आणि श्वान, गृध्र व कुररी यांनीं व्याप्त झालेल्या त्या रण-भूमीमध्यें ज्यांचे पति, पुत्र व स्वामी हत झाले आहेत, त्या धृतराष्ट्राच्या स्नुषा व प्रस्नुषा एकत्र जमून गांधारीसह दुःखाश्रूंनीं आपले देह भिजवून टाकतील, तेव्हां या रणयज्ञांतील 'अवभृत स्नान' होईल.

हे मधुसूदना, तुज यज्ञपुरुषाच्या प्रेमामुळें विद्यावृद्ध व वयोवृद्ध क्षत्रिय युद्धावांचून मृत्यू न पावोत. त्रैलोक्यांतील अतिशय पवित्र अशा कुरुक्षेत्रांत हें समृद्ध क्षत्रियमंडल युद्ध करून शस्त्रानें निधन पावो. हे वार्ष्णेया, तुला इष्ट असलेलेंच घडवून आण आणि या सर्व क्षत्रियांना स्वर्गप्राप्ति होईल, असें कर. त्यामुळें जोंपर्यंत या पृथ्वीतलावर नद्या व पर्वत आहेत, तोंपर्यंत ही शुभ-कीर्ति अक्षय राहील व संग्रामांत स्वपराक्रमानें प्राप्त झालेला जय किंवा मृत्यु हेंच क्षत्रियांचें धन आहे. यास्तव असें व्यक्त करणारें हें भारतीय युद्ध ब्राह्मण कथन करतील. हे केशवा, धनंजयाला युद्धार्थ मजकडे घेऊन ये आणि माझा जन्मवृत्तान्त युधिष्ठिरापासून गुप्त ठेव. ५. ६. १४१.

## अध्याय १४२ वा.

[१ भगवानानें केलेलें पांडवांच्या निश्चित जयाचें वर्णन. २ या युद्धांत उत्तम गति मिळेल असा राजांना संदेश. ]

(१) **संजय—राजा, कर्णाचें हें वचन ऐकून परवीरहा केशव स्मितपूर्वक जणुकाय हंसतच असें वचन बोलला—**

**भगवान्—हे कर्णा, हा राज्यलोभाचा उपाय जर तुला संमत नसेल आणि मी देत असलेल्या या पृथ्वीचें राज्य करण्याची जर तुझी इच्छा नसेल, तर पांडवांचा जय निश्चित आहे, यांत संशय नाहीं. उग्र वानरराजानें युक्त असलेला पांडवांचा जयध्वज उभारलेला दिसत आहे. विश्वकर्म्यानें निर्माण केलेली ही दिव्य मायाच जणुकाय या इंद्रधनुष्यतुल्य ध्वजरूपानें भासत आहे. हीं भयानक दिव्य व जयसूचक भूतें सर्वत्र दिसत आहेत. धनंजयानें उभारलेला हा श्रेष्ठ ध्वज अग्नितुल्य आहे. तो ध्वज एक योजन उंच असूनहि पर्वत किंवा वृक्ष यांच्या योगानें अडकून रहात नाहीं.**

**हे राधेया, ज्याचे अश्व शुभ्र आहेत व ज्याचा सारथि कृष्ण आहे असा धनंजय संग्रामांत जेव्हां ऐन्द्र, आग्नेय व मारुत या अस्त्रांचा प्रयोग करीत असलेला तूं पहाशील व विजेच्या कडकडाटाप्रमाणें गांडीव धनुष्याचा निर्घोष ऐकशील, तेव्हां त्रेता, कृत किंवा द्वापर यांतील कोणताहि पुरुषार्थ तुझ्या हातून होणार नाहीं.**

**तूं जेव्हां जप व होम यांचें अनुष्ठान करणाऱ्या दुर्धर्ष युधिष्ठिराला रणांगणांत स्वतःच्या महासैन्याचें रक्षण करीत असलेलें व शत्रुसैन्याला आदित्याप्रमाणें ताप देत असलेलें पहाशील, तेव्हां तुमचा कोणताच पुरुषार्थ साधणार नाहीं.**

---

१ त्रेतायुगांत सर्व कृतकृत्य असतात. त्यांतील कोणीहि मानव धर्म, अर्थ व काम यांची इच्छा करीत नाहीं. त्रेतायुगांत मानव धर्मप्राधान्यानें अर्थ-कामांची इच्छा करितात. पण द्वापरांत धर्म व काम यांस प्रधान मानून लोक धर्माला त्यांचें अंग समजतात. त्यामुळें अर्जुनाला पाहिल्यावर तुझा मोक्षापासून भ्रंश होईल, असें ' न कृतं ' शब्दानें सांगितलें आहे. 'न त्रेता' या वाक्यानें धर्मापासून भ्रंश सांगितला व दुर्योधनादिकांचा तो पूर्वीच झाला आहे. 'द्वापरं न भविता' यानें दुर्योधनादिकांचे अर्थ व कामहि नाहींसे होतील, कारण त्यांना युद्धांत अवश्य यमलोक प्राप्त होणार आहे.

मत्त मातंग आपल्या प्रतिस्पर्धी मातंगावर जसा प्राणांतक प्रहार करितो, तसा महाबलाढ्य भीमसेन संग्रामांत दुःशासनाचें रक्त प्राशन करून नृत्य करीत असलेला जेव्हां पहाल, तेव्हां पूर्वोक्त पुरुषार्थ तुम्हांला साधणार नाहीं.

ज्यावेळीं युद्धार्थ धांवून येणारा भीष्म, द्रोण, कृप, राजा सुयोधन व सैंधव जयद्रथ यांचें सव्यसाची अर्जुनानें मोठ्या त्वरेनें निवारण केलें आहे, असें पहाशील, तसेंच महाबलाढ्य माद्रीपुत्र शत्रूंच्या रथांना भग्न करीत आहेत व त्या घनघोर शस्त्रसंग्रामांत दोन मत्त गजांप्रमाणें धार्तराष्ट्राच्या सैन्याला क्षुब्ध करीत आहेत, असें जेव्हां तूं पहाशील, तेव्हां त्रेता-द्वापरादि पुरुषार्थ तुझ्या-कडून होणार नाहीं.

( २ ) हे कर्णा, तूं येथून परत गेल्यानंतर भीष्म, द्रोण व कृप, यांना माझा असा संदेश कथन कर—"हा कार्तिकमास सौम्य आहे. म्ह० आकाश अभ्ररहित असल्यामुळें रात्री आह्लादकारक शुभ्र चांदण्यानें युक्त असतात. पृथ्वीवर सर्वत्र ओषधि-वनस्पति पसरल्या असून फलांची समृद्धि झालेली असते. मक्षिका कमी होतात, चिखल नाहींसा होतो, जल मधुर व विपुल असतें आणि अतिशय उष्ण नसलेला हा शिशिर ऋतु सुखावह होतो. आज-पासून सातव्या दिवशीं अमावास्या आहे. तिला इंद्रदेवतेची अमावास्या म्हणतात. त्या दिवशीं तुम्ही सर्व एकत्र जमून युद्धाला सज्ज व्हा.

त्याचप्रमाणें हे राधेया, तेथें युद्धासाठीं जे राजे जमले आहेत, त्या सर्वांना म्हणावें कीं, तुमच्या इच्छेप्रमाणें मी सर्व घडवून आणीन. दुर्योधनाला अनु-सरणारे सर्व राजे व राजपुत्र युद्धांत शस्त्रानें मरण पावून श्रेष्ठ गतीला प्राप्त होतील." ५. ६. १४२.

---

## अध्याय १४३ वा.

[ १ कर्णानें केलेलें दुश्चिह्नांचें वर्णन. २ पांडवांच्या विजयाचा निश्चय. ३ कर्णाचें स्वप्नकथन. ४ कर्णाचें स्वस्थानीं प्रयाण. ]

( १ ) संजय—राजा, केशवाचें राज्यलोभांत प्रयुक्त करणारें तें शुभ वचन ऐकून कर्णानें मधुसूदनाचा सत्कार केला व तो राधेय कृष्णाला असें वचन बोलला—हे महाबाहो, तूं सर्व जाणत असतां मला या मोहांत पाडण्याची कां इच्छा करीत आहेस ! या पृथ्वीचा पूर्णपणें विनाश उपस्थित झाला आहे,

हें तुला ठाऊक आहे. त्याला शकुनि, दुःशासन, दुर्योधन व मी केवल निमित्त-मात्र होणार आहोंत. हे कृष्णा, पांडव-कौरवांचें हें घोर महायुद्ध होणार आहे, यांत संशय नाहीं. त्या घोर युद्धांत रक्ताचा चिखल होईल व दुर्योधनाला अनुसरणारे राजे आणि राजपुत्र त्या रणांत शस्त्राग्नीनें दग्ध होऊन यमलोकीं जातील.

हे वार्ष्णेया, भयंकर स्वप्नें पडत आहेत. घोर दुश्चिन्हें व दारुण उत्पात होत आहेत. हीं विविध व रोमांच उत्पन्न करणारीं चिन्हें धार्तराष्ट्राचा पराजय व युधिष्ठिराचा जय सूचवीत आहेत. महातेजस्वी उग्र शनैश्वर रोहिणी नक्षत्राला पीडा देत आहे, त्यावरून पृथ्वीतलावर प्राण्यांना अधिक पीडा होणार आहे असें व्यक्त होत आहे. मंगळ ज्येष्ठा नक्षत्राला प्राप्त न होतां वक्र होत आहे आणि असें जेव्हां होतें, त्यावेळीं ज्येष्ठ राजाचे सर्व मित्र नाश पावतात. त्याचप्रमाणें तो मंगळ अनुराधेकडे येण्याची इच्छा करीत आहे. त्यामुळें तो दुर्योधनाच्या सर्व मित्रांचा नाश सुचवितो.

खरोखर, हे मधुसूदना, कौरवांपुढें फार मोठें भय उद्भवलें आहे. ज्योतिः-शास्त्रप्रसिद्ध महापाताख्य ग्रह चित्रानक्षत्राला पीडा देऊन क्षत्रियजातीचा नाश सुचवीत आहे. चंद्रावरील चिह्न निवृत्त झालें आहे व चंद्र कलाहीन दिसत आहे आणि राहु सूर्याला ग्रासीत आहे. यावरून चंद्रवंशी व सूर्यवंशी क्षत्रियांचा क्षय सूचित होतो. आकाशांतून गर्जना व कंप उत्पन्न करीत उल्कापात होत आहे.

मत्तगज चीत्कार करीत आहेत व अश्व अश्रू ढाळीत आहेत. ते तृण व जल यांचाहि स्वीकार करीत नाहींत. अशा प्रकारचीं दुश्चिन्हें होऊं लागलीं असतां महद्भय उपस्थित होत असतें, असें म्हणतात. प्राण्यांचा नाश सुच-विणारीं हीं दारुण चिन्हें आहेत. हे केशवा, कौरवसैन्यांतील सर्व गज, अश्व व मनुष्यें अल्पाहार करूनहि विपुल मलोत्सर्ग करीत आहेत. हें पराभवाचें चिह्न आहे, असें विद्वानांचें म्हणणें आहे.

( २ ) हे माधवा, याच्या उलट पांडवाच्या पक्षांमध्यें सर्व जयाचीं चिन्हें होत आहेत. त्यांच्या सैन्यांतील गज-अश्वादि वहानें प्रसन्न आहेत, असें म्हण-तात. मृग उजव्या बाजूनें प्रदक्षिणा घालीत आहेत, हें त्यांच्या जयाचें सूचक आहे. परंतु दुर्योधनाला मात्र सर्व मृग व पशुपक्षी डावी घालीत असून त्याचा पराजय व्यक्त करणारी आकाशवाणी ऐकूं येत आहे. शुभशकुन सुचविणारे

मयूर, हंस, सारस, चातक, जीवंजीवक आणि चकोरादि पक्ष्यांचे संघ पांडवांना अनुसरत आहेत. उलटपक्षीं गृध्र, कंक, काक, श्येन, वृक, राक्षस व मक्षिकांचे थवे कौरवांच्या मागें धांवत आहेत. कौरवसेनेंत भेरी वाजवूनहि त्यांतून शब्द उमटत नाहीं, परंतु पांडवसैन्यांत न वाजवितांच वाद्यांचा निर्घोष होत आहे. कौरवसैन्यानें जेथें तळ दिला आहे, तेथील जलाशयांतून वृषभांच्या गर्जनेसारखा ध्वनि निघत आहे, हें पराभवाचें लक्षण आहे.

हे माधवा, इंद्र रक्त-मांसाची वृष्टि करीत आहे. त्याचप्रमाणें आकाशांत विस्तीर्ण तटांनीं युक्त असलेलें तेजस्वी गंधर्वनगर दिसत आहे. तें सुंदर तोरणांनीं शोभणारें कृष्णवर्ण विस्तीर्ण नगर सूर्याला आच्छादित करून स्थित असलेलें भासत आहे. उदय, अस्त व संध्या या तीन्ही कालीं महद्भय सुचविणाऱ्या भालु घोर शब्द करीत असतात. हेंहि पराजयाचेंच चिह्न आहे. एक पंख, एक नेत्र व एक चरण यांनीं युक्त असलेल्या पाकोळ्या मल-मूत्रादिकांचा उत्सर्ग करीत आहेत. हें बीभत्स लक्षण पराभव सूचित करितें. ज्यांची मान कृष्णवर्ण आहे व चरण रक्तवर्ण आहेत, असे भयानक पक्षी सायंकालीं कौरव-सैन्याच्या अभिमुख येत असतात.

हे मधुसूदना, हा दुर्योधन प्रथम ब्राह्मणांचा, नंतर गुरुजनांचा व भक्तिमान् सेवकांचा ज्याअर्थीं द्वेष करितो, त्याअर्थीं त्याचा पराभव निश्चित आहे. पूर्व दिशा आरक्त, दक्षिण दिशा शस्त्राच्या वर्णासारखी प्रकाशमान, पश्चिम अपक्क मृत्तिका पात्रासारखी आणि उत्तर शंखाच्या वर्णाची असावी असे दिशांचे वण वर्णिले आहेत. परंतु दुर्योधनाच्या या सर्व दिशा प्रदीप्त दिसत आहेत. हा उत्पात फार मोठें भय दर्शवीत आहे.

( ३ ) हे अच्युता, मीं स्वप्नांत सहस्र स्तम्भांनीं युक्त असलेल्या प्रासादावर भ्रात्यांसह युधिष्ठिर आरोहण करीत आहे असें पाहिलें. त्या पांची भ्रात्यांनीं शुभ्र वस्त्रें परिधान केलीं होतीं, मस्तकांवर शुभ्र शिरस्त्राणें धारण केलीं होतीं व ते पांची पांडव शुभ्र आसनावर बसले होते. हे जनार्दना, तुझें आसनहि मला शुभ्रच दिसलें. ही सर्व पृथ्वी रक्तानें व प्राण्यांच्या आंतड्यांनीं परिवेष्टित झालेली मीं पाहिली. तेथें पडलेल्या अस्थींच्या राशीवर अमित ओजस्वी युधिष्ठिर चढला. हृष्ट झालेल्या त्यानें सुवर्णपात्रांतून घृतयुक्त पायस सेवन केलें आणि मृत्तिका भक्षण केली, असें माझ्या दृष्टीं पडलें. यावरून युधिष्ठिर तूं दिलेल्या या समग्र पृथ्वीचा उपभोग घेईल, हें व्यक्त होत आहे.

त्याचप्रमाणें भयंकर कर्में करणारा वृकोदर हातांत गदा घेऊन पर्वतशिखरावर चढला व तो नरव्याघ्र या पृथ्वीला जणुकाय ग्रासीत असल्याप्रमाणें भासला. यावरून तो महाबाहु आम्हां सर्वांचा त्या महायुद्धांत नाश करील हें स्पष्ट दिसत आहे. हे हृषीकेशा, जेथें धर्म तेथें जय असतो, हें मला ठाऊक आहे.

हे कृष्णा, परम कांतीनें देदीप्यमान होणारा तो गांडीवधारी धनंजय तुझ्यासह शुभ्र गजावर आरूढ झालेला मीं पाहिला. या स्वप्नांतील दृश्यावरून तुम्ही या महारणांत दुर्योधन ज्यांचा प्रमुख आहे, अशा सर्व नृपालांचा वध कराल, यांत संशय नाहीं.

तसेच मौक्तिकमाला धारण केल्यामुळ ज्यांचे कंठ शुभ्र दिसत आहेत, असे नकुल, सहदेव व महारथ सात्यकि शुभ्र हीरकांचीं बाहुभूषणें घालून उत्तम शिबिकेंत आरूढ झालेले मीं पाहिले. त्यांचें तें वाहन मनुष्यें वाहून नेत होतीं. या तिघांच्याहि मस्तकावर शुभ्र वस्त्रांचें छत्र मला दिसलें. त्यांनीं शुभ्र वस्त्रें व शुभ्रच शिरस्त्राणें धारण केलीं होतीं.

हे जनार्दना, याच्या उलट कौरवसेनेंत अश्वत्थामा, कृप, सात्वत कृतवर्मा आणि सर्व पार्थिव तांबडीं शिरस्त्राणें धारण केलेले दिसले. महारथ भीष्म-द्रोण कधीं माझ्यासह तर कधीं दुर्योधनासह उंट जोडलेल्या रथांतून दक्षिण दिशेकडे जात असलेले मी स्वप्नांत पहातों. यावरून आम्ही सर्व लवकरच यमसदनाला जाऊं हे स्पष्ट सूचित होत आहे. हे सर्व राजे, सगळे क्षत्रिय व मी असे गांडीवाग्नींत प्रवेश करूं, याविषयीं मला मुळींच संशय नाहीं.

कृष्ण—हे कर्णा, ज्याअर्थी माझ्या वचनाचा तुझें अंतःकरण स्वीकार करीत नाहीं, त्याअर्थी या वसुंधरेचा विनाश उपस्थित झाला आहे, यांत संशय नाहीं. बा राधेया, सर्वांचा विनाशकाल प्राप्त झाला म्हणजे न्यायसदृश वाटणारा अन्याय हृदयांतून कदापि बाहेर पडत नसतो.

कर्ण—हे कृष्णा, क्षत्रिय वीरांचा नाश करणाऱ्या या महारणांतून पार पडून जिवंत राहिलेले आम्ही तुला पाहूं काय ! अथवा हे अच्युता, स्वर्गांतच आमची निश्चयानें गांठ पडेल. तेथें तुझ्यासह आम्ही सर्व एकत्र जमूं.

( ४ ) संजय—राजा, असें बोलून कर्णानें माधवाला गाढ आलिंगन दिलें आणि केशवानें अनुज्ञा दिली असतां तो रथांतून खालीं उतरला. नंतर

ज्याचें मन खिन्न झालें आहे असा तो राधेय स्वतःच्या सुवर्णभूषित रथांत बसून आम्हांसह परत फिरला. सात्यकीसह केशवहि सारथ्याला 'सत्वर चल, चल' असें पुनः पुनः म्हणत शीघ्र गतीनें उपप्लव्य नगरीकडे निघून गेला. ५.६.१४३.

## अध्याय १४४ वा.

[ १ विदुरानें कुंतीला कथन केलेला दुर्योधनाचा युद्धनिश्चय. २ कुंतीचा खेद व कर्णाला त्याचा जन्मवृत्तान्त सांगण्याचा संकल्प. ३ गंगातीरावर जप करणाऱ्या कर्णापाशीं कुंतीचें गमन. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा जनमेजया, शमाचा उपदेश विफल होऊन कृष्ण कौरवांकडून पांडवांकडे परत गेला असतां विदुर पृथेकडे आला व खिन्न होऊन हळुहळू असें वचन बोलला—' हे पुत्रवति, माझें मत युद्धाच्या विरुद्ध आहे, हें तुला ठाऊकच आहे. मी एवढा आक्रोश करून सांगत असतां सुयोधन माझें सांगणें ऐकत नाहीं. परंतु यांत कौरवांचाच नाश होणार आहे. चेदि, पांचाल, केकय, यांच्यासारखे नृपाल युधिष्ठिराच्या पक्षाला मिळाले आहेत. भीमार्जुन, दोघे माद्रेय, सात्यकि व कृष्ण हे श्रेष्ठ योद्धे त्याचे साह्यकर्ते आहेत. हे सर्व वीर उपप्लव्य नगरींत जमले आहेत, तरी युधिष्ठिर बलवान् असूनहि ज्ञातिबांधवांवरील स्नेहामुळें दुर्बलासारखा धर्माचीच आकांक्षा करीत आहे.

हा वयोवृद्ध राजा धृतराष्ट्रहि शांत होत नाहीं. पुत्रमदानें मत्त होऊन तो अधर्माच्या मार्गानेंच जात आहे. जयद्रथ, कर्ण, दुशासन व शकुनि यांच्या दुर्बुद्धीनें तो वारंवार भेद पावतो.

चवदा वर्षांनंतर 'तुमचें राज्य तुम्हांला परत मिळेल,' अशी प्रतिज्ञा करून आतां त्यांच्या राज्याच्या अपहार करणें हा धर्मच आहे, असें तो समजतो. पण सर्व कुलाचा नाश होणें हेंच त्याचें फल त्याला प्राप्त होईल. कारण ज्यांना अधर्मकृत वैर हाच धर्म वाटतो, त्यांचा तो विकृतधर्म, त्यांचा समूळ नाश केल्यावांचून रहात नाहीं. कौरव पाखंड्याप्रमाणें अधर्मालाच धर्म मानूं लागले असतां कोणाला बरें खेद होणार नाहीं !

आतां श्रीकृष्ण शम न करतां परत गेला आहे. त्यानें हा वृत्तान्त कथन करतांच पांडव युद्धाला सज्ज होतील आणि कौरवांचा हा दुराग्रह वीरांच्या नाशाला कारण होईल. या विचारानें मला रात्रंदिवस झोंपहि येत नाहीं.

विदुराचें हें हितबुद्धीनें केलेलें भाषण ऐकून कुंती दुःखार्त झाली. तिनें दीर्घ निश्वास सोडला व मनांत असा विचार केला—“ ज्या धनासाठीं हा महान् ज्ञातिवध होणार आहे, त्या अर्थाला धिक्कार असो. या युद्धांत सुहृदांचाहि पराभव होईल. एकत्र जमलेले पांडव, चेदि, पांचाल व यादव हे सर्व भारतवंशजांशीं युद्ध करतील, याहून अधिक दुःखकर तें काय आहे ! युद्धामध्यें मला निश्चित दोष दिसत आहे. युद्ध न केल्यास माझ्या पुत्रांचा पराभव झालेलाच आहे. परंतु कुलक्षयानें जय मिळविण्यापेक्षां निर्धन स्थितींत मरण आलेलें श्रेयस्कर होय; असें मला वाटतें. याचा विचार करूं लागलें असतां माझें अंतःकरण दुःखानें भरून येतें.

पितामह भीष्म, द्रोणाचार्य व कर्ण हे दुर्योधनाच्या पक्षांत असल्यामुळें ते माझें भय वाढवीत आहेत. कदाचित् द्रोणाचार्य आपल्या शिष्यांशीं युद्ध करणार नाहीं. शिवाय पितामह भीष्म पांडवांवर स्नेह कसा करणार नाहीं ! ( हे दोघेहि वृद्ध आचार्य पांडवांना अपाय करणार नाहींत. ) परंतु हा पापी कर्ण मात्र विपरीत भावनेनें मोहांत सांपडून दुर्मति दुर्योधनाला अनुसरतो व पांडवांचा सतत द्वेष करीत असतो. तो महाबलाढ्य कर्ण पांडवांना महत्संकटांत टाकण्यास सदा तत्पर असतो, ही गोष्ट माझें हृदय दग्ध करीत आहे.

मला असा एक विचार सुचला आहे. मी कर्णाकडे जातें व त्याला त्याच्या जन्माचा खरा प्रकार सांगून त्याचें मन प्रसन्न करून पांडवांकडे वळवितें. कर्णाला ‘ तूं माझा पुत्र आहेस ’ हें सांगतें. पूर्वीं मी माझ्या पितृगृहीं रहात असतां कुंतिभोज राजानें मला दुर्वास-ऋषीची परिचर्या करण्यास सांगितलें. तेव्हां माझ्या सेवेनें संतुष्ट झालेल्या त्या मुनीनें मला वर दिला. त्या मंत्रांत देवतांना आह्वान करण्याचें सामर्थ्य होतें. त्या वेळीं कौमार्यावस्थेंत असलेली मी पित्याच्या अंतःपुरांत रहात होतें.

तेव्हां स्त्रीस्वभावामुळें व बालभावानें मंत्राचें बलाबल व ब्राह्मणाच्या वाणीचें सामर्थ्य पहाण्याचा विचार वारंवार माझ्या मनांत येऊं लागला. परंतु मी सखीजनांनीं परिवेष्टित व विश्वासु धात्रीकडून सर्वदा रक्षित होतें. शिवाय ‘ पितृकुलाच्या कीर्तीचें रक्षण करणाऱ्या माझ्या हातून दोष घडूं नये, मी अपराधी न होतां मजकडून सुकृत कसें घडेल ! ’ असा विचार करीत मीं त्या दुर्वास ब्राह्मणाला मनानें नमस्कार केला व बालिशपणानें व कुतूहलबुद्धीनें

त्या मंत्रानें देवतेला बोलविण्याचें साहस केलें. तेव्हां साक्षात् आदित्य माझ्या समीप प्राप्त झाला. त्याच्यापासून मला कौमार्यावस्थेंतच गर्भ राहिला व तोच तूं माझा कानीन पुत्र आहेस.' हा त्याचा जन्मवृत्तान्त त्याला कळला असतां तो उदार मनाचा कर्ण आपल्या भ्रात्यांना हितावह असणारें माझें पथ्यकर वचन कसें ऐकणार नाहीं !''

याप्रमाणें कुंतीनें विचार केला व ती तें उत्तम कार्य पार पाडण्याचा निश्चय करून भागीरथी नदीकडे निघाली. त्या गंगातीरावर सत्यप्रतिज्ञ व दयाळु कर्णाचा वेदाध्ययनध्वनि पृथेनें ऐकला. त्यावेळीं तिचा तो पुत्र पूर्वेकडे मुख करून व हात वर करून सूर्याची उपासना करीत उभा होता. तेव्हां स्वकार्यासाठीं कुंती त्याचा जप समाप्त होण्याची वाट पहात त्याच्यामागें जाऊन उभी राहिली. सूर्याच्या प्रखर तापानें व्याकुल झालेली ती पांडूची राज्ञी कर्णाच्या उत्तरीय वस्त्राच्या छायेंत उभी राहिली असतां कमलमालेप्रमाणें म्लान दिसूं लागली. अपराह्णकालीं आपला जप पुरा करून कर्णानें मागें वळून पाहिलें तों कुंती त्याच्या दृष्टीं पडली. तेव्हां तो महातेजस्वी व धर्मधारण करणारांतील श्रेष्ठ वीर तिला अभिवादन करून हात जोडून उभा राहिला. कुंतीला पाहून तो मानी वैकर्तन विस्मित झाला व नम्रतेनें तिला असें वचन बोलला. ५. ६. १४४.

---

## अध्याय १४५ वा.

[ १ कर्णाचा कुंतीला आगमनाविषयीं प्रश्न. २ कुंतीनें त्याला कथन केलेलें त्याचें जन्मवृत्त व दुर्योधनाचा पक्ष सोडून पांडवांना मिळण्याविषयीं उपदेश. ]

( १ ) कर्ण—हे आर्ये, मी अधिरथाचा पुत्र कर्ण आहें. मी राधेय तुला वंदन करितों. तूं येथें कशासाठीं आली आहेस ! मी तुझें कोणतें कार्य करावें ? तें सांग.

(२) कुंती—हे वत्सा, तूं कौंतेय आहेस. राधेय नाहींस किंवा अधिरथ तुझा पिता नाहीं. तूं सूतकुलांत उत्पन्न झाला नाहींस. हें माझें वचन सत्य समज. तूं माझा कानीनपुत्र आहेस. माझे हे पांच पुत्र उत्पन्न होण्याच्या पूर्वींच कुंतीभोजराजाच्या भवनांत मीं कन्या असतांना तुला जन्म दिला. हे कर्णा, हा जो जगताला ताप देणारा प्रकाशमान आदित्य देव, तोच तुझा जनक आहे.

माझ्या पितृगृहीं तुज वीराचा जन्म झाला. त्यावेळीं देवगर्भासारखा तेजस्वी असलेला तूं दिव्य कवच-कुंडलांनीं युक्त होतास. हे दुर्धर्षा, याप्रमाणें मी तुझी जननी असून तूं पांडवांचा ज्येष्ठ भ्राता आहेस. परंतु तुला हा वृत्तान्त ठाऊक नसल्यामुळें आपल्या पांडवभ्रात्यांना न ओळखतां तूं धार्तराष्ट्रास अनुसरत आहेस. हें योग्य नव्हे. विशेषतः तुजसारख्या धर्मांशाला हें उचित नाहीं.

बा कर्णा, पुत्रानें पितरांना विशेषतः पुत्रावरच स्नेह करणाऱ्या मातेला संतुष्ट करणें, हेंच पुरुषांच्या धर्माचें फल आहे. असा शास्त्रज्ञांनीं धर्मनिश्चय केलेला आहे. पूर्वी अर्जुनानें स्वपराक्रमानें संपादन केलेलें सर्व ऐश्वर्य दुरात्म्या कौरवांनीं लोभानें व कपटानें हरण केलें, तें सर्व तूं त्यांच्यापासून परत मिळीव आणि युधिष्ठिराच्या समृद्ध राज्यवैभवाचा उपभोग घे. कर्ण व अर्जुन हे दोघे भ्रातृभावानें एकत्र झालेले पहातांच ते दुर्जन कौरव आतां नम्र होतील. बलराम-कृष्णाप्रमाणें तुम्हां दोघां कर्णार्जुनांचा स्नेह वृद्धि पावो. ज्यांचें मन परस्परांशीं स्नेह बद्ध झालें आहे, असे तुम्ही दोघे श्रेष्ठ वीर एकत्र झाल्यावर त्रैलोक्यांत तुम्हांला असाध्य असें काय आहे ! तूं सर्व गुणांनीं युक्त असून आपल्या श्रेष्ठ भ्रात्यामध्यें ज्येष्ठ आहेस.

पुत्रा, महायज्ञांमध्यें सर्व देवांनीं परिवेष्टित असलेला ब्रह्मदेव जसा यज्ञवेदींत शोभतो, तसा तूं पांच भ्रात्यांच्या परिवारांत खरोखर शोभशील. तूं वीर्यवान् पार्थ आहेस. यास्तव यापुढें ' सूतपुत्र ' म्हणवून घेऊं नको. ५. ६. १४५.

---

## अध्याय १४६ वा.

[ १ कुंतीवचनाचें सूर्यानें केलेलें समर्थन. २ कर्णानें केलेला कुंतीचा निषेध, कौरवपक्ष न सोडण्याचा निश्चय. ३ अर्जुनावांचून चारी पांडवांचा वध न करण्याचें आश्वासन. ]

( १ ) वैशंपायन—राजा, कुंतीचें हें भाषण संपत आहे, तोंच कर्णानें आकाशांतून देववाणी ऐकली. भास्करानें पितृभावानें आपल्या अनुल्लंघनीय व प्रेमळ वाणीनें त्याला अशी आज्ञा केली—" हे कर्णा, या पृथेनें तुला सांगितलेला वृत्तान्त सत्य आहे. तूं आपल्या मातेचें वचन मान्य कर. तिच्या सांगण्याप्रमाणें आचरण केल्यास त्यांत तुझें हित आहे."

याप्रमाणें मातेचें व साक्षात् भानूचें--आपल्या पित्याचें--वचन ऐकूनहि त्या सत्यप्रतिज्ञ कर्णाची बुद्धि चलित झाली नाहीं. तो कुंतीला दोष देत असें वचन बोलला—

( २ ) कर्ण—हे राजमाते, तूं मला जें कर्तव्य सांगत आहेस, तें मला मान्य होत नाहीं. तुझ्या आज्ञेप्रमाणें वागण्यांत धर्माचरण आहे असें मला वाटत नाहीं. हे माते, तूं मला जन्म दिला असशील, परंतु तुझ्या पापाचरणामुळें माझी फार मोठी हानि झाली आहे. जातिभ्रंश झाल्यामुळें माझें यश व कीर्ति यांचा विनाश झाला आहे. मी जरी क्षत्रियकुलांत उत्पन्न झालों असलों, तरी जन्मापासून क्षत्रियांना उचित असलेले माझे संस्कार झाले नाहींत.

आपला कानीनगर्भ लोकांत प्रकट होऊं नये, म्हणून स्वतःच्या सुखासाठीं तूं माझा त्याग केलास. त्यामुळें मला क्षत्रियोचित संस्कार घडले नाहींत. याहून अधिक अपकार तुझ्यावांचून अन्य कोणता शत्रु करील ! ( अर्थात् कोणीहि करणार नाहीं. ) जेव्हां संस्काराचा समय होता, तेव्हां मजवर दया न करतां माझा निर्दयपणानें त्याग केलास व आतां संस्काराचा काल निघून गेल्यावर स्वतःच्या कार्यासाठीं मला अशी प्रेरणा करीत आहेस !

यापूर्वीं तूं मातृस्नेहानें माझें कोणतें हित केलें आहेस ! किंवा मातेचें कर्तव्य बजाविलें आहेस ! आतां केवल स्वार्थबुद्धीनें वात्सल्य प्रकट करून मला 'वत्सा' म्हणून संबोधीत आहेस. त्या तुझें वचन ऐकण्यानें माझें कोणतें हित साधणार आहे ! तुझ्या आज्ञेप्रमाणें मी आज जर वागलों तर त्यांत माझें यश न होतां अपकीर्तिच होईल.

कृष्ण व धनंजय यांच्याशीं संग्राम करण्यास कोण व्यथित होणार नाहीं ? 'मी कृष्णार्जुनास भ्यालों व पांडवांना जाऊन मिळालों' असें कोण समजणार नाहीं ! मी जर आतां पांडवपक्षाचा आश्रय केला तर 'यापूर्वीं हा भ्रात्यांना ओळखीत नव्हता, आतां युद्धाची वेळ येऊन ठेपली तेव्हां याचा भ्रातृभाव प्रकट झाला' असें बोलून सर्व क्षत्रिय माझा उपहास करतील.

शिवाय आजपर्यंत धृतराष्ट्रपुत्रांनीं माझ्यासह सर्व ऐश्वर्य सुखानें भोगलें. मला सर्व इष्ट वस्तु देऊन माझा सत्कार केला. त्यांच्याशीं मी यावेळीं कृतघ्न कसा होऊं ! शत्रूशीं वैरबद्ध झाल्यापासून तर ते माझी नित्य उपासना करितात आणि इंद्राला नमस्कार करणाऱ्या अष्टावसूंप्रमाणें मला सर्वदा वंदन

करितात. माझ्या बलावरच ते स्वतः शत्रूला जिंकण्यास समर्थ मानीत आहेत. तेव्हां मी त्यांचा हा मनोरथ भग्न कसा करूं! हा दुस्तर संग्राम ते मला नौका कल्पून तरून जातील. परतीराला जाण्याची इच्छा करणाऱ्या त्यांना तीरावर न नेतां मी त्यांचा मध्येंच कसा त्याग करूं !

धार्तराष्ट्राच्या आश्रयानें उपजीविका करणाऱ्या वीरांच्या परीक्षेची हीच वेळ आहे. आजवर मीं कौरवांचें अन्न खाल्लें आहे. यास्तव आतां प्राणावर उदार होऊन त्यांच्या ऋणांतून मुक्त होणें, हेंच माझें कर्तव्य आहे. स्वामीनें भरण-पोषण करून ज्यांना कृतार्थ केलें आहे, असे जे सेवक संकटकाल प्राप्त झाला असतां त्याला अपकार करतात, किंवा त्याच्यापासून विमुख होतात, ते भर्त्याच्या अन्नाचा अपहार करणारे पापी होत. त्या स्वामीद्रोह करणाऱ्या पापाचरणी मनुष्यांना इह व पर हे दोन्ही लोक मिळत नाहींत.

यास्तव हे जननि, मी आपलें बल व शक्ति एकत्र करून धृतराष्ट्राच्या पुत्रांसाठीं तुझ्या पुत्रांशीं युद्ध करीन, हें मी तुला अगदीं सत्य सांगत आहें. तुझें वचन जरी मला हितकर असलें तरी मी त्याप्रमाणें वागणार नाहीं. कृतज्ञतेचें रक्षण करून सत्पुरुषाला उचित असेंच मी आचरण करीन. ज्याअर्थीं तूं मला जन्म दिला आहेस, त्याअर्थीं तुझा हा यत्न मी व्यर्थ होऊं देणार नाहीं. तुझे पुत्र वस्तुतः वधार्ह आहेत, मला त्यांचा संहार करतां येणें शक्य आहे, तरीहि मी संग्रामांत त्यांचा वध करणार नाहीं.

( ३ ) अर्जुनावांचून मी कोणाशींच युद्ध करणार नाहीं. युधिष्ठिर, भीमसेन व नकुल-सहदेव या चौघांच्या प्राणांना मी अपाय करणार नाहीं. युधिष्ठिराच्या सैन्यांत एकट्या अर्जुनाशीं युद्ध करीन. रणांमध्यें अर्जुनाला गतप्राण केल्यानेंच माझें जीवित सफल होईल व सव्यसाचीनें माझा प्राण घेतल्यास त्यांतहि माझी कीर्तिच होईल. हे यशस्विनि, आम्हां दोघांपैकीं कोणीहि एक मरण पावला तरी तुझे पांच पुत्र शिल्लक रहातातच. अर्जुन मृत झाला तर कर्णासह पांच पांडव रहातील. मी मरण पावलों तर अर्जुनासह पार्थ कायमच आहेत.

कर्णाचें हें भाषण ऐकून कुंती दुःखानें विह्वल झाली व थरथरां कांपूं लागली. तिनें आपल्या दृढनिश्चयी पुत्राला आलिंगन दिलें व धैर्यापासून न ढळणाऱ्या त्या कर्णाला म्हटलें—बा कर्णा, तुझा असा निश्चयच आहे, तर तसें होऊं दे. कौरवांचा नाश होणार आहे, हें यावरून स्पष्टच दिसत आहे. तुझ्या



**कुंती**—वत्सा कर्णा, तूं कौंतेय आहेस. राधेय नाहींस. अधिरथ तुझा पिताहि नव्हे. [ उद्योगपर्व अ. १४५, पृ. २९.

या भाषणानें तर दैवच बलवत्तर आहे असें म्हणावें लागतें. हे शूर पुत्रा, तूं संग्रामांत आपल्या चार भ्रात्यांना अपाय न करतां जीवंत सोडून देण्याचें जें मला अभय दिलें आहेस, त्या आपल्या प्रतिज्ञेचें पालन कर. आतां मी जातें. तुझें अनामय व स्वास्थ्य असो.

यावर कर्ण तिला 'ठीक आहे' असें बोलला आणि व तीं दोघें कर्ण व कुंती आपापल्या पृथक् मार्गानें निघून गेलीं. ५. ६. १४६.

---

## अध्याय १४७ वा.

[ १ श्रीकृष्णाचें पांडवांकडे प्रत्यागमन. २ कौरवसभेंतील वृत्तान्ताविषयीं युधिष्ठिराचा प्रश्न. ३ भीष्माचें पूर्ववृत्तकथन. ]

(१) वैशंपायन—राजा, इकडे श्रीकृष्णानें हस्तिनापुराहून उपप्लव्य नगरींत परत येऊन पांडवांना घडलेला सर्व वृत्तान्त सविस्तर निवेदन केला. पांडवांशीं दीर्घकाल संभाषण करून व पुनः संकेत करून तो शौरि विश्रांति घेण्यासाठीं स्वगृहीं गेला. तेव्हां विराटादि नृपालांस निरोप देऊन सूर्य अस्तास गेला असतां त्या पांची भ्रात्यांनीं संध्योपासना केली. श्रीकृष्णाचेंच चिंतन करणाऱ्या त्या पांडवांचें चित्त त्याच्याचकडे लागून राहिलें होतें. त्यांनीं दाशार्हाला बोलावून आणिलें व त्याच्याशीं पुनः संकेत आरंभिला.

( २ ) युधिष्ठिर—हे कृष्णा, तूं हस्तिनापुरांतील कौरवसभेंत गेल्यावर दुर्योधन तुला काय म्हणाला, तें आम्हांला सांग.

वासुदेव—हे पांडुपुत्रहो, मीं हस्तिनापुरीं जाऊन कौरवसभेंत दुर्योधनाला सत्य, हित व न्यायवचन सांगितलें, पण त्या दुर्मतीनें तें ऐकलें नाहीं.

युधिष्ठिर—हे हृषीकेशा, तो अमर्षी दुर्योधन उन्मार्गानें जाऊं लागला असतां कुरुवृद्ध पितामह त्याला काय म्हणाला ? द्रोणाचार्य, कृप, त्याचा पिता धृतराष्ट्र, माता गांधारी व आम्हां पुत्रांच्या क्लेशानें शोकसंतप्त होणारा आमचा पितृतुल्य कनिष्ठ पितृव्य धर्मवेत्ता विदुर हे सर्व त्या धार्तराष्ट्राला काय म्हणाले ? त्याचप्रमाणें सभेंत जमलेले सर्व नृपाल काय बोलले तें मला तत्त्वतः सांग. हे जनार्दना, भीष्म व धृतराष्ट्र यांचा हितोपदेश आणि तूं कौरवसभेंत माझ्यासाठीं जें शमाचें भाषण केलेंस तें त्या मंदमति दुर्योधनाला अप्रिय वाटलें. काम व लोभ यांनीं मोहित झालेल्या त्या पंडितमन्यानें तुझ्या वचनाचा

स्वीकार केला नाहीं. यास्तव हे गोविंदा, ते धार्तराष्ट्र काय बोलले तें ऐकण्याची माझी इच्छा आहे. आतां आमचा अधिक काल व्यतीत होणार नाहीं, असें कर. हे विभो, तूंच आमची गति आहेस, तूंच नाथ व गुरु आहेस.

वासुदेव—हे राजन्, कौरवसभेंत मी दुर्योधनाला काय बोललों तें ऐक. माझें भाषण ऐकून तो धृतराष्ट्राचा पुत्र हंसला. तें पाहून भीष्म क्रुद्ध झाला व त्याला असें म्हणाला—

( १ ) भीष्म—हे दुर्योधना, कुलाच्या हितासाठीं मी तुला जें सांगत आहें, त्याकडे लक्ष दे आणि तें माझें वचन ऐकून आपल्या कुलाचें हित कर. बा वत्सा, माझा पिता शंतनुराजा लोकप्रसिद्ध होता. त्याला मी एकुलता एकच ज्येष्ठ पुत्र होतों. तेव्हां त्याला आपल्याला दुसरा पुत्र कसा होईल, अशी चिंता वाटूं लागली. ‘ एक पुत्र म्हणजे अपुत्रच आहे ’ असें विद्वान् म्हणतात. यास्तव स्वकुलाचा विच्छेद न होतां त्याचें यश कसें पसरेल, या विषयीं तो विचार करूं लागला.

तेव्हां मीं त्याची मनीषा जाणली आणि सत्यवतीला आणून पित्याला तिचें समर्पण केलें. पित्याचा संतोष व कुलाचें रक्षण करण्यासाठीं दुष्कर प्रतिज्ञा केली. तेव्हांपासून मी राज्यहीन व ब्रह्मचारी राहिलों आहें, हें तुला चांगलें ठाऊक आहे. मी प्रतिज्ञेचें पालन करीत राहिलों आहें. सत्यवती व माझा पिता यांचें अपत्य जो धर्मात्मा विचित्रवीर्य तो माझा कनिष्ठ भ्राता होय. माझा पिता शंतनुराजा स्वर्गस्थ झाला असतां मीं विचित्रवीर्याला राज्याभिषेक करविला व मी त्या राजाचा भृत्य होऊन त्याच्या अनुचरासारखा वागूं लागलों. अनेक नृपालांच्या समुदायांना जिंकून मीं त्या माझ्या भ्रात्यासाठीं अनुरूप भार्या हरण करून आणल्या व त्या राजकन्यांचा राजाशीं विवाह करून दिला, हें तुम्हीं अनेकदां ऐकलेंच आहे. त्यानंतर मीं भार्गवरामाशीं द्वंद्वयुद्ध केलें. त्यावेळीं परशुरामाच्या भयानें प्रजाजनांनीं विचित्रवीर्याला नगरांतून दूर नेऊन ठेविलें.

नंतर स्त्रियांवर अतिशय आसक्त असलेला तो राजा राजयक्ष्म्यानें—क्षयरोगानें मरण पावला. याप्रमाणें राजा मृत झाला असतां राष्ट्र अराजक झालें. इंद्र पर्जन्यवृष्टि करिनासा झाला. तेव्हां क्षुधा व भय यांनीं पीडित झालेली प्रजा मजकडे धांवत आली.

प्रजा—हे शांतनुकुलवर्धना, तुझें कल्याण असो. पर्जन्याच्या अभावीं सर्व प्रजा क्षीण होत चालल्या आहेत, यास्तव तूं आमचा राजा हो आणि अनावृष्टयादिरूप अनर्थांचें निवारण कर. हे गांगेया, तुझे हे सर्व प्रजाजन दारुण व्याधींनीं पीडिले आहेत. त्यामुळें अल्प प्रजा अवशिष्ट राहिली आहे. तिचें रक्षण करणें, तुला उचित आहे. हे वीरा, तूं व्याधींचा परिहार कर व धर्मानें प्रजेचें पालन कर. तूं जिवंत असतां राष्ट्राचा विनाश होणें योग्य नव्हे.

भीष्म—हे दुर्योधना, याप्रमाणें प्रजेचा आक्रोश ऐकूनहि माझें मन क्षुब्ध झालें नाहीं. सद्वृत्ताचें स्मरण ठेवून मीं प्रतिज्ञेचें पालन केलें. त्यावेळीं सर्व पौरजन, माझी माता साध्वी सत्यवती, पुरोहित, आचार्य, बहुश्रुत ब्राह्मण व भृत्य या सर्वांनीं अतिशय शोकसंतप्त होऊन मला 'राजा हो' असें वारंवार सांगितलें.

ते म्हणाले—हे महामते, तुझ्या 'प्रतीप'-नामक पूर्वजानें रक्षण केलेलें हें राज्य आज तुला प्राप्त होऊन विनाश पावत आहे. यास्तव आमच्या हितासाठीं तूं आमचा राजा हो.

त्यांचें हें भाषण ऐकून मला अतिशय दुःख झालें. 'मीं पित्याच्या आदरासाठीं आजन्म अराजा व ब्रह्मचारी रहाण्याची प्रतिज्ञा केली आहे' असें त्यांस हात जोडून व्यथित अंतःकरणानें निवेदन केलें व कुलासाठीं आणि विशेषतः तुमच्या हितासाठीं मला राज्यधुरेवर नियुक्त करूं नका, अशी त्यांची पुनः पुनः प्रार्थना केली.

नंतर मी हात जोडून मातेला नम्रपणानें म्हणालों—हे माते, मला ही प्रतिज्ञा विशेषतः तुझ्याहितासाठींच करावी लागली, यास्तव तूं हा राज्यभार मजवर लादूं नको. हे आर्ये, मी शांतनूराजाचा पुत्र असून कौरवकुलाचें यश वाढविणारा आहें. मी आपली प्रतिज्ञा कदापि मिथ्या करणार नाहीं. तुझ्या कल्याणासाठीं मीं ही प्रतिज्ञा केली. मी तुझा दूत व दास होऊन तुझ्या सेवेंत तत्पर आहें, हें लक्षांत घे आणि मजवर प्रतिज्ञाभंगाचा प्रसंग आणूं नको.

दुर्योधना, याप्रमाणें माता आणि प्रजाजन यांचें मीं समाधान केलें. नंतर मातेसह मीं महामुनि व्यासाची प्रार्थना करून त्याला प्रसन्न केलें व त्या ऋषीनें माझ्या भ्रातृजायांच्या ठिकाणीं अपत्य उत्पन्न करण्याचा अनुग्रह केला.

त्यानंतर त्याच्या प्रसादानें तीन पुत्रांचा जन्म झाला. त्यांतील तुझा पिता जन्मांध निपजला, तेव्हां तो जरी ज्येष्ठ होता तरी नेत्रहीन असल्यामुळें धर्मतः राजा झाला नाहीं. त्याचा भ्राता महात्मा पांडु जगद्विख्यात राजा झाला. पांडव त्याचे पुत्र असल्यामुळें पितृराज्याचे न्यायतः व धर्मतः अधिकारी आहेत. यास्तव बा वत्सा, व्यर्थ कलह करूं नको. पांडवांचें अर्धें राज्य त्यांना परत दे.

मी जिवंत असतां, हें राज्य चालविण्यास कोणता पुरुष समर्थ आहे ! यास्तव माझी अवज्ञा करूं नको. मी तुमच्या शमाचीच सर्वदा इच्छा करीत आहें. हे पुत्रा, मला पांडव व कौरव सारखेच आहेत. मी तुम्हां दोघांत कांहींच भेदभाव पहात नाहीं. माझें हें वचन तुझा पिता, गांधारी व विदुर यांनाहि मान्य आहे. यास्तव वृद्धांचें वचन ऐक. माझ्या या वचनाविषयीं साशंक होऊं नको. तूं जर हें हितवचन ऐकलें नाहींस, तर आपला, पृथ्वीचा व सर्वस्वाचा नाश करून घेशील. ५. ६. १४७.

---

## अध्याय १४८ वा.

[ १ कौरवसभेंतील द्रोणाच्या भाषणाचें कथन. २ विदुरवचनाचा अनुवाद. ३ गांधारीचा पुत्राला उपदेश. ]

(१) **वासुदेव**—हे धर्मराजा, भीष्माचें हें भाषण पुरें होतांच त्या सभेंत नृपालांच्या समक्ष श्रेष्ठ वक्ता द्रोणाचार्य दुर्योधनाला असें वचन बोलला—"बा सुयोधना, तुझें कल्याण असो, ज्याप्रमाणें प्रतीपपुत्र शांतनुराजानें कुलाचें हित केलें, या देवव्रत भीष्मानें कुलासाठीं आपलें कर्तव्य पालन केलें, त्याचप्रमाणें सत्यप्रतिज्ञ व जितेंद्रिय पांडुराजाहि सदाचरणांत स्थित झाला. त्याचा ज्येष्ठ भ्राता धीमान् धृतराष्ट्र अंधत्वामुळें आणि कनिष्ठ भ्राता हीन योनित्वामुळें राज्याला अनधिकारी होते. तथापि त्या धर्मात्म्या कुरुराजानें आपलें राज्य 'ठेव' म्हणून भ्रात्यांच्या स्वाधीन केलें व धृतराष्ट्राची सिंहासनावर स्थापना करून तो उदार अंतःकरणाचा नृपाल आपल्या दोघी भार्यांसह वनांत निघून गेला.

तेव्हां राज्यावर स्थित असलेल्या धृतराष्ट्राहून निकृष्ट राहून विदुरानें त्याची नम्रतेनें सेवा केली. तो क्षत्ता एखाद्या दासाप्रमाणें धृतराष्ट्रावर व्याघ्राच्या

केसांची चवरी वारीत असे. त्यावेळीं सर्व प्रजाजनांनीं पांडुराजाप्रमाणेंच जनेश्वर धृतराष्ट्राचा यथाविधि स्वीकार केला. याप्रमाणें धृतराष्ट्र व विदुर यांच्या वर राज्यभार सोंपवून शत्रूंना ताप देणाऱ्या पांडुराजानें सर्व पृथ्वीवर संचार केला. त्यानें सत्यनिष्ठ विदुराला राज्यांतील द्रव्यसंचयाचें रक्षण, दान, भृत्यांचें अन्ववेक्षण आणि सर्वांचें भरण पोषण या कार्यांकडे नेमिलें. महातेजस्वी परपुरंजय भीष्मानें शत्रूशीं सन्धि-विग्रह व राजांच्या दानोपदानादि क्रियांची व्यवस्था ठेविली. महाबलाढ्य राजा धृतराष्ट्र अंधत्वामुळें केवळ सिंहासनावर बसून रहात असे आणि उदार अंतःकरणाचा विदुर सतत त्याच्या सेवेंत तत्पर रहात असे.

याप्रमाणें तुझे पितृ-पितामह एकमतानें वागत आले असतां, त्यांच्या कुळांत उत्पन्न झालेला तूं कुलामध्यें भेद करण्यास कसा प्रवृत्त होतोस ! हे दुर्योधना, पांडवांशीं सख्य कर व भ्रात्यांसह सर्व राज्योपभोग घे. मी तुला हें दीन होऊन किंवा द्रव्याच्या लोभानें सांगत नाहीं. कारण भीष्म माझें पोषण करण्यास समर्थ आहे. मी भीष्माकडून मिळणाऱ्या वृत्तीचीच इच्छा करीत आहें. हे राजश्रेष्ठा, तुझ्या अन्नावर मी वाढलों नाहीं व तुझ्याकडून उपजीविकेचें साधन मिळावें, अशीहि माझी अपेक्षा नाहीं. जेथें भीष्म तेथेंच द्रोण असेल. यास्तव भीष्म तुला जें सांगत आहे, त्याप्रमाणें वाग आणि पांडुपुत्रांना त्यांचा अर्धराज्यांश दे. पांडव व कौरव यांचा मी आचार्य असल्यामुळें तुम्हां दोघांकडे समभावानेंच पहातों. धनंजय तर मला माझ्या अश्वत्थाम्या-इतकाच प्रिय आहे. यापेक्षां अधिक बोलण्यांत काय अर्थ आहे ! जेथें धर्म तेथें जय, एवढेंच शेवटीं मी तुला सांगतों.

वासुदेव—हे महाराजा, अमित तेजस्वी द्रोणाचें हें भाषण ऐकून धर्मवेत्ता विदुर मागें वळून भीष्माच्या मुखाकडे पहात असें वचन बोलला—

( २ ) विदुर—हे देवव्रता, माझ्या या भाषणाकडे लक्ष दे. हें कौरवकुल एकदा नष्टप्राय झालें होतें. त्याचा तूंच पुनरुद्धार केलास व आतां कंठशोष करून सांगणाऱ्या माझ्या वचनाकडे असें दुर्लक्ष कां करितोस ! या भारतकुलाला कलंक लावणारा हा दुर्योधन असा कोण श्रेष्ठ आहे कीं, त्याच्या लोभानें आवृत्त झालेल्या बुद्धीला तूंहि अनुसरावेंस ! तो अनार्य वस्तुतः तुझ्यापुढें कःपदार्थ आहे. लोभानें त्याचें मन व्यापून गेलें आहे. त्यामुळें

तो अकृतज्ञ झाला आहे. तो मूढ धर्मार्थज्ञ पित्याच्या आज्ञेचें अतिक्रमण करीत आहे. परंतु दुर्योधनाच्या या दुष्कृतीमुळें हे सर्व कौरव नाश पावतील.

यास्तव हे महाराज, ज्या योगानें कौरवांचा विनाश होणार नाहीं, असेंच यावेळीं आचरण कर. हे महामते, पूर्वीं तूंच चित्राला स्थापन करणाऱ्या चित्रकाराप्रमाणें धृतराष्ट्राला व मला या राज्यावर स्थापिलेंस. तस्मात् आतां हा कुलक्षय समक्ष दिसत असतां त्याची उपेक्षा करूं नको. प्रजापति स्वतः प्रजा उत्पन्न करितो व संहारहि करितो. त्याप्रमाणें आपणच संरक्षण केलेल्या या कुरुकुलाच्या नाशाची उपेक्षा करूं नको. किंवा विनाशकाल प्राप्त झाल्यामुळें तुझी बुद्धीच जर आज नष्ट झाली असेल, तर धृतराष्ट्रासह मला घेऊन वनांत चल. म्हणजे द्रोण स्वतःच तुला अनुसरेल आणि तुम्हां वीरांवांचून स्वपक्ष हीन झाला असतां दुर्योधनाला पांडवांचें भय वाटेल.

हे राजश्रेष्ठा, तुझ्या मतीला जर भ्रम झाला नसेल तर त्या दुर्बुद्धि प्रज्ञाहीन दुर्योधनाचें निवारण करून त्याला बद्ध करून ठेव आणि पांडवांनीं संरक्षण केलेल्या या राज्याचें शासन कर. विलंब लावूं नको. हे कुरुसत्तमा, प्रसन्न हो आणि या कार्याला लाग. नाहीं तर कौरव, पांडव आणि अमित तेजस्वी राजे यांचा विनाश स्पष्ट दिसतच आहे.

असें बोलून तो विदुर दीन अंतःकरणानें स्वस्थ बसला आणि या प्राप्त अनर्थाचें चिंतन करीत पुनः पुनः दीर्घ निश्वास टाकूं लागला. नंतर सुबलराजकन्या गांधारी कुलनाशाच्या भीतीनें क्रुद्ध होऊन पापमति, नृशंस दुर्योधनाला सर्व राजांच्या समक्ष असें धर्मार्थयुक्त वचन बोलली—

( ३ ) गांधारी—हे पापी दुर्योधना, अमात्यांसह तुझे सर्व अपराध मी आतां सांगत्यें, ते या राजसभेंत असलेले नृपाल, ब्रह्मर्षि व इतर सभासद ऐकोत. पूर्वजांनीं उपभोग घेतलेलें हें कुरुराज्य क्रमानें पुत्रांना प्राप्त व्हावें, हा आमचा कुलधर्म आहे. त्या कुरुराज्याचा तूं आज निर्दयपणें विध्वंस करीत आहेस, अशा नृशंसकर्म करणाऱ्या तुज पाप्याला काय बोलावें !

आज बुद्धिमान् धृतराष्ट्र राज्यावर स्थित आहे. त्याचा दीर्घदर्शी अनुज विदुर विद्यमान आहे, त्यांचें अतिक्रमण करून तूं मोहानें राज्याची आकांक्षा कशी करितोस ! तुझा या राज्यावर काय अधिकार ! वस्तुतः पितामह भीष्म विद्यमान असेपर्यंत धृतराष्ट्र महाराज व धर्मज्ञ विदुरहि पराधीनच आहेत. गांगेयच

धर्मतः राज्याधिकारी आहे, परंतु त्या धर्मज्ञ महात्म्यानें आपली प्रतिज्ञा स्मरून राज्याची इच्छा केली नाहीं व तें पांडूला अर्पण केलें. यास्तव आतां या दुराधर्ष राज्याचे अधिकारी पांडुपुत्रच आहेत, इतर कोणीहि नाहींत. हें पितृ-पितामहांच्या परंपरेनें पुत्रांना प्राप्त होणारें समग्र राज्य पांडवांचेंच आहे. तें तुम्हीं अन्यायानें हिरावून घेणें योग्य नव्हे.

या समयीं महात्मा देवव्रत कुरुकुलांतील प्रमुख आहे. त्या सत्यसंध बुद्धि-मानाच्या सांगण्याप्रमाणें स्वधर्माचें पालन करणाऱ्या आम्ही या राजकार्यांचा नाश करूं नये. यास्तव पितामहाच्या अनुज्ञेनें धृतराष्ट्रमहाराज व विदुर जी आज्ञा करतील, त्याप्रमाणें सर्व सुहृदांनीं धर्माचा पुरस्कार करून वागावें. त्यांतच दीर्घकाल कल्याण आहे. हें कुरूंचें राज्य न्यायानें युधिष्ठिराकडे जातें, त्याचें तो धर्मपुत्र शासन करो. राजा धृतराष्ट्रानें या कार्याची प्रेरणा करावी व भीष्मानें त्याचा पुरस्कार करावा. ६. ५. १४८.

---

## अध्याय १४९ वा.

[ १ धृतराष्ट्रवचनाचें पांडवांना कथन. ]

( १ ) वासुदेव—हे युधिष्ठिरा, गांधारीनें असा हितोपदेश केला असतां त्या सर्व राजांच्या समक्ष धृतराष्ट्र पुत्राला असें वचन बोलला—

धृतराष्ट्र—वत्सा दुर्योधना, तुझें कल्याण असो. मी तुला आतां जें हित-वचन सांगत आहें, तें लक्षपूर्वक ऐक आणि तुला पित्याविषयीं जर कांहीं आदर वाटत असला, तर त्याप्रमाणें वाग. प्रजापति सोम या कुरुवंशाची वृद्धि कर-णारा मूळपुरुष आहे. नहुषपुत्र ययाति सोमापासून सहावा पुरुष झाला. त्या ययातीला राजर्षितुल्य पांच पुत्र झाले. त्यांतील ज्येष्ठ भ्राता यदु महातेजस्वी राजा झाला व सर्वांत कनिष्ठ भ्राता पुरु आमचा वंशकर पुरुष झाला. तो वृषपर्व्याची कन्या जी शर्मिष्ठा तिचा पुत्र होता. आणि यदु देवयानीचा पुत्र असल्यामुळें अमिततेजस्वी शुक्राचार्यांचा दौहित्र होता. हाच बलाढ्य व वीर्य-वान् राजा यादवांचा वंशकर पुरुष होय. त्याला आपल्या बलाचा गर्व झाला व तो मंदबुद्धि सर्व क्षत्रियांना तिरस्कृत करूं लागला. तो बल व दर्प यांनीं मोहित होऊन पित्याचीहि अवज्ञा करूं लागला. पिता व भ्राते यांचा अवमान करूं लागला. समुद्रवलयांकित पृथ्वीतलावर एकटा यदूच अतिशय बलाढ्य झाला आणि सर्व नृपालांना वश करून हस्तिनापुरांत राहूं लागला.

तेव्हां, हे गांधारीपुत्रा, त्याच्या पित्यानें परम क्रुद्ध होऊन पुत्राला शाप दिला आणि राज्यापासून दूर केलें. त्याला अनुसरणारे त्याचे जे इतर भ्राते बलानें दर्पयुक्त झाले होते, त्या सर्व पुत्रांनाहि ययाति राजानें क्रोधानें शाप दिले. त्याचा सर्वांत कनिष्ठ पुत्र पुरु त्याला अनुसरणारा व आज्ञेंत वागणारा होता. त्याची राज्यावर स्थापना केली. याप्रमाणें ज्येष्ठ पुत्राला राज्याभिषेक झालेला असूनहि उन्मत्तपणामुळें त्याला राज्य लाभलें नाहीं आणि वृद्धांची सेवा करणारा पुत्र कनिष्ठ असूनहि त्याला तें राज्य प्राप्त झालें.

त्याचप्रमाणें दुसरा एक पूर्ववृत्तान्त सांगतों, ऐक. माझ्या पित्याचा पितामह प्रतीपराजा त्रैलोक्यांत प्रसिद्ध होता. तो राजा धर्मानें राज्याचें शासन करीत असतां त्याला देवतुल्य तीन यशस्वी पुत्र झाले. त्यांतील देवापि हा ज्येष्ठ, त्याच्यानंतर बाल्हिक आणि तिसरा माझा पितामह बुद्धिमान् शांतनु होय. राजश्रेष्ठ देवापि महातेजस्वी असून धार्मिक, सत्यवादी व पितृसेवेंत दक्ष होता. परंतु तो कुष्ठरोगानें पीडीत होता. तो ज्येष्ठ राजपुत्र सर्व प्रजाजनांना संमत असून सर्व आबाल वृद्धांना प्रिय होता. साधूंनीं सत्कार केलेला तो उदार देवापि सत्यसंध असून सर्व भूतांच्या हितांत रत असे. त्याचप्रमाणें पिता व ब्राह्मण यांच्या आज्ञेंत रहात असे. महात्मा शांतनु व बाल्हिक, यांचा तो प्रिय भ्राता त्यांच्याशीं भ्रातृप्रेमानें वागत असे.

याप्रमाणें सुपुत्रांच्या सहवासांत रहाणाऱ्या प्रतीपराजाचा वृद्धापकाल प्राप्त झाला. तेव्हां त्यानें ज्येष्ठ पुत्राला राज्याभिषेक करविण्यासाठीं शास्त्रतः सर्व सिद्धता करविली. त्या विभूनें सर्व मंगल व शुभ साहित्य आणविलें. परंतु त्याच्या प्रजाजनांसह सर्व वृद्ध ब्राह्मणांनीं त्या नृपतीचें ज्येष्ठ पुत्राला राज्याभिषेक करण्यापासून निवारण केलें.

ते म्हणाले—हा राजपुत्र जरी धर्मज्ञ, सत्यनिष्ठ व प्रजाजनांना प्रिय आहे, तरी कुष्ठ रोगानें दूषित असल्यामुळें राज्याला योग्य नाहीं. ज्याच्या शरीरांत असें व्यंग आहे, अशा नृपतीचें देवता अभिनंदन करीत नाहींत.

असें बोलून ब्राह्मणांनीं त्या नृपश्रेष्ठाचा निषेध केला. तेव्हां आपल्या प्रिय पुत्राच्या राज्याभिषेकाला अशा प्रकारें प्रतिकार झालेला पाहून त्या प्रतीप नृपतीचा कंठ सद्गदित झाला, नेत्र अश्रूंनीं भरून आले व तो शोकाकुल झाला.

नृपश्रेष्ठाचें निवारण केलेलें पाहून देवापि वनांत निघून गेला. बाल्हिकानेंहि पिता, भ्राता व राज्य यांचा त्याग करून आपल्या समृद्ध मातुलकुलाचा

आश्रय केला. नंतर पिता मरण पावला असतां बाह्लिकानें ज्याला अनुज्ञा दिली आहे, असा लोकप्रसिद्ध शांतनु राजा झाला व राज्य चालवूं लागला.

हे पुत्रा, याच न्यायानें मी जरी ज्येष्ठ होतों, तरी नेत्रहीनत्वामुळें धर्मतः राज्याचा अधिकारी नव्हतों. पांडु कनिष्ठ असूनहि राज्य चालविण्यास समर्थ असल्यामुळें राजा झाला. तेव्हां त्याच्या मागें हें राज्य न्यायानें त्याच्या पुत्रांचें आहे. ज्या राज्यावर माझाच अधिकार नाहीं, त्या राज्याची तूं कशी इच्छा करितोस ! बा दुर्योधना, तूं राजपुत्र नाहींस, तेव्हां या राज्याचा स्वामीहि नाहींस. असें असतां परधनाचा अपहार करण्याची इच्छा कां करावीस !

महात्मा युधिष्ठिर राजपुत्र आहे. हें राज्य न्यायतः त्याचें आहे. तो महाभाग या कौरवकुलाचा भर्ता व प्रशास्ता आहे. तो सत्यप्रतिज्ञ पांडुपुत्र अप्रमत्त असून शास्त्राज्ञेंत स्थित आहे. त्यामुळें तो आप्त-बांधवांचा रक्षणकर्ता आहे. तो धर्मराज प्रजाजनांना प्रिय असून सर्व सुहृज्जनांवर दया करणारा, जितेंद्रिय व सज्जनांचें पोषण करणारा आहे. क्षमा, तितिक्षा, दम, आर्जव, सत्यव्रत, शास्त्राध्ययन दक्षता, भूतांवर अनुकंपा आणि अनुशासन हे समस्त राजगुण युधिष्ठिरामध्यें वसत आहेत.

त्याच्या उलट तूं राजपुत्र तर नाहींसच, पण अनार्यवृत्त आहेस. तूं लोभी असल्यामुळें सर्वदा आपल्या बांधवांविषयीं पापबुद्धि ठेवतोस. हे दुर्मते, हें दुसऱ्याचें राज्य क्रमानें तुझ्या हातीं आलें असतां तुला त्याचा अपहार कसा करतां येईल ! यास्तव, हा मोह दूर कर आणि वाहनें व परिवार यांसह पांडवांचें अर्धें राज्य त्यांना दे. हें सर्व जर मान्य करशील तरच तूं आपल्या अनुजांसह जिवंत रहाशील. ६. ५. १४९.

---

## अध्याय १५० वा.

[ १ कौरवसभेंतील वृत्तांत कथन. ]

( १ ) वासुदेव—युधिष्ठिरा, याप्रमाणें भीष्म, द्रोण, विदुर, गांधारी व धृतराष्ट्र यांनीं अनेक प्रकारें उपदेश केला, तरी त्या मंदबुद्धि दुर्योधनाला तो रुचला नाहीं. तो मूढ त्या सर्वांचा अवमान करून सभेंतून उठला व क्रोधानें नेत्र आरक्त करून निघून गेला. तेव्हां जीवावर उदार झालेले तत्पक्षीय राजे त्याला अनुसरले. ज्याची बुद्धि नष्ट झाली आहे, अशा त्या सुयोधनानें

त्या सर्व नृपतींना अशी आज्ञा केली—'आज पुष्यनक्षत्र आहे. यास्तव युद्धाची तयारी करून तुम्ही सर्व कुरुक्षेत्रांत एकत्र जमा.'

दुर्योधनानें पुनः पुनः केलेली ही आज्ञा ऐकून कालानेंच ज्यांना प्रेरणा केली आहे, असे ते सर्व भूपाल भीष्माला सेनापति करून हृष्ट मनानें ससैन्य कुरुक्षेत्राकडे निघाले. अकरा अक्षौहिणी सैन्य कौरवपक्षांत जमलें असून त्यांच्या अग्रभागीं पितामह भीष्म आपल्या उच्च ध्वजासह तालवृक्षासारखा शोभत आहे.

हे भारता, याप्रमाणें कौरवसभेंतील भीष्मादिकांचीं माझ्या समक्ष झालेलीं भाषणें आणि तेथें घडलेला समग्र वृत्तांत मीं तुला कथन केला आहे.

आतां तुला जें योग्य व प्राप्त कर्तव्य वाटेल तें कर. हे राजन्, तुमचें सख्य असावें, या कुलाचा भेद होऊं नये आणि प्रजेचा उत्कर्ष व्हावा, या सदिच्छेनें मीं दुर्योधनाशीं प्रथम शमाचें भाषण केलें; परंतु तो शमाला प्रवृत्त होत नाहीं, हें जेव्हां स्पष्ट दिसलें, तेव्हां मीं भेदाचें अवलंबन केलें. सुयोधन सामवचन स्वीकारीत नाहीं हें जेव्हां पाहिलें, तेव्हां कर्णाचा जन्म देव व मानुष अशा अलौकिक संयोगानें झाला आहे, हा वृत्तांत कर्णाशीं एकांतांत संभाषण करून त्याला मीं कथन केला व दुर्योधनाशीं भेद करून त्यानें पांडवपक्षाला मिळावें असा यत्न केला. तोहि व्यर्थ झाला.

हे विभो, विश्वरूपदर्शनासारखें अतिमानुष, दारुण व घोर कर्महि मीं त्यांना करून दाखविलें. तेथें जमलेल्या नृपालांची निर्भर्त्सना करून, दुर्योधनाला तृणवत् तुच्छ लेखून शकुनि व राधेय यांना भीति दाखविली. त्याचप्रमाणें कपटद्यूताबद्दल धृतराष्ट्राची निंदा करून तेथें जमलेल्या नृपतींच्या वाणीनें व संकेतानें दुर्योधनापासून भेद करण्याचा अनेकदा यत्न केला.

साम व भेद हे दोन्ही उपाय जेव्हां व्यर्थ झाले, तेव्हां मीं कुरुवंशाच्या हितासाठीं दानाचाहि प्रयोग करून पाहिला.

मीं त्यास म्हटलें—"कुरुवंशाचा भेद न होतां ते शूर पांडव कार्याकडे दृष्टि देऊन धृतराष्ट्र, भीष्म व विदुर यांचे दास होऊन रहातील. ते आपला

---

१ आश्विनी पौर्णिमेनंतर अष्टमीच्या दिवशीं पुष्य नक्षत्र येतें आणि पुढें सात दिवसांनीं अमावास्या येते. त्या अमावास्येस संग्रामाची योजना करावी असें शास्त्रवचन आहे.

सर्व मान सोडून देतील. धृतराष्ट्रादि तुला राज्य देवोत व पांडव निष्कांचन होवोत. ज्याप्रमाणें गांगेय व विदुर यांनीं तुला हितवचन सांगितलें आहे, त्याप्रमाणें केवल पांच ग्राम पांडवांना दे व सर्व राज्याचा तूं उपभोग घे."

याप्रमाणें मीं समग्र राज्यसमर्पणरूप दानाचाहि प्रयोग करून पाहिला, परंतु तो दुष्टात्मा सुईच्या अग्राइतकीहि भूमि देण्यास तयार झाला नाहीं. तेव्हां आतां साम, दान, व भेद हे तीन्ही उपाय निष्फल झाले असतां त्या पापात्म्यावर चौथ्या दंडाचाच प्रयोग केला पाहिजे. त्यावांचून मला अन्य उपाय दिसत नाहीं. असा हा कौरवसभेंतील सर्व वृत्तांत मीं तुला कथन केला आहे.

हे पांडवा, ते सर्व नराधिप नाश पावण्यासाठींच कुरुक्षेत्रांत गेले आहेत. क्षत्रियांच्या विनाशाला हेतु होणाऱ्या त्या सर्वांचा मृत्यु समीप आलेला आहे. ते युद्धावांचून तुला राज्य कदापि परत देणार नाहींत. ५. ६. १५०.

येथें सहावें भगवद्यानपर्व समाप्त झालें.

---

# सैन्यनिर्याणपर्व ७.



## अध्याय १५१ वा.

[ १ पांडवसैन्यांतील सेनापतीच्या योजनेविषयीं पांडव व कृष्ण यांचें मत. २ पांडवांचा सैन्यासह कुरुक्षेत्रांत प्रवेश. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, जनार्दनाचें हें वचन ऐकून त्याच्या समक्ष धर्मात्मा युधिष्ठिर भ्रात्यांना असें वचन बोलला—" हे नरश्रेष्ठहो, कौरवसभेंत जो वृत्तान्त घडला व श्रीकृष्ण जें वचन बोलला, तें सर्व तुम्ही लक्षपूर्वक ऐकलेंच आहे. तस्मात् आतां माझ्या विजयासाठीं जी सात अक्षौहिणी सेना जमली आहे, तिचा विभाग करा. त्या सैन्याचे जे प्रसिद्ध सात सेनापति आहेत त्यांचीं नांवें सांगतों, ऐका. द्रुपद, विराट, धृष्टद्युम्न, शिखंडि, सात्यकि, चेकितान आणि पराक्रमी भीमसेन हे सात वीर जीवावर उदार होऊन सैन्याचे प्रमुख झाले आहेत. हे सर्व वेदवेत्ते, शूर, सज्जनांचें व्रत आचरणारे, ह्रीमान्, नीतिमान्, युद्धविशारद, इष्वस्त्रकुशल व सर्व अस्त्रांनीं युद्ध करणारे आहेत.

यास्तव हे सहदेवा, या सातहि सैन्याचे विभाग जाणणारा असा सेनाध्यक्ष कोण नेमावा ! रणामध्यें अग्नितुल्य भीष्माच्या शरज्वाला सहन करील असा वीर कोण आहे, असें तुला वाटतें ! आमचा सेनापति कोणाला करावें ! याविषयीं तुझें मत सांग.

सहदेव—हे प्रभो, मत्स्यराज विराट बलाढ्य व कृतास्त्र आहे. त्याला सेनापति करावें, असें माझें मत आहे. तो धर्मज्ञ राजा आमच्या दुःखानें दुःखी होणारा असून आमचा राज्यांश परत मिळविण्यासाठीं युद्ध करील. तो पराक्रमी नृपाल संग्रामांत भीष्म व इतर महारथ यांना सहन करण्यास समर्थ आहे.

वैशंपायन—हे जनमेजया, सहदेवाच्या या भाषणानंतर नकुल असें वचन बोलला—" हे महाराज, आमचा श्वशुर द्रुपदराजा सेनानायक होण्यास सर्वथा योग्य आहे असें मला वाटतें. तो वयानें वृद्ध आहे. त्याचें शास्त्रज्ञान परिपक्व आहे, तो धैर्यानें युक्त असून त्याचें कुल व स्वजनसमूह हीं दोन्ही उच्च प्रतीचीं आहेत. तो श्रीमान् नृपति सर्वशास्त्रविशारद, ह्रीमान् व बलाढ्य आहे. तो भरद्वाजापासून अस्त्रविद्या शिकल्यामुळें शत्रूला अजिंक्य आहे. तो सत्यप्रतिज्ञ राजा महाबलाढ्य भीष्म-द्रोणांशीं नित्य स्पर्धा करीत असतो. राजसमूहाच्या अग्रभागीं सेनापति होण्यास तोच योग्य आहे. शेकडों शाखांनीं युक्त असलेल्या वृक्षाप्रमाणें तो पुत्र-पौत्रांच्या परिवारानें युक्त आहे.

त्या नृपश्रेष्ठानें द्रोणाचा विनाश करण्यासाठीं भार्येसह क्रोधानें घोर तप आचरिलें. तो समरांगणांत शोभणारा वीर आमच्यावर पितृवत् स्नेह करितो. तो दिव्यास्त्रवेत्ता राजा द्रोणाचा सखा होता. तो संग्रामांत चाल करून आलेल्या भीष्म-द्रोणांचा वेग सहन करील, असें माझें मत आहे."

दोघां माद्रीसुतांनीं याप्रमाणें स्वमत कथन केल्यावर इंद्रतुल्य असलेला इंद्रपुत्र सव्यसाची आपलें मत सांगूं लागला.

अर्जुन—हे धर्मराजा, द्रोणाच्या विनाशासाठींच ज्याचा जन्म झाला आहे, तो सत्यवादी जितेंद्रिय धृष्टद्युम्न भीष्माचे शर सहन करण्यास समर्थ आहे, असें मला वाटतें. तपःप्रभावानें व ऋषींच्या संतोषानें तो दिव्य पुरुष उत्पन्न झाला आहे. तो महाबाहु ज्वालेसारखा तेजस्वी आहे,

दिव्य अश्वांनीं युक्त असलेल्या रथासह तो धनुर्धर कवच व खड्ग यांनीं सज्ज होऊन यज्ञकुंडांतून उत्पन्न झाला. त्यावेळीं तो पराक्रमी वीर आपल्या रथ-घोषानें महामेघासारखी गर्जना करीतच यज्ञवेदींतून बाहेर आला.

त्या राजपुत्राचा देह, पराक्रम, वक्षःस्थल, भुज, स्कंध, बल व गर्जना हीं सर्व सिंहतुल्य सुदृढ आहेत. त्याचे नेत्र-पादादि सर्व अवयव सुंदर आहेत, मत्तगजाप्रमाणें तो सर्व शस्त्रांनीं अभेद्य आहे. हे राजन् , भीष्माचे बाण वज्र किंवा अशनि यांप्रमाणें दुःसह, मुख पसरलेल्या सर्पाप्रमाणें प्रदीप्त, यमदूतासारखे वेगवान् व अग्नीप्रमाणें प्रज्वलित आहेत. वज्राचेंहि चूर्ण करणाऱ्या त्या दारुण बाणांना केवल परशु-रामच सहन करूं शकला. त्या महाव्रताला धृष्टद्युम्नावांचून अन्य कोणी सहन करील, असें मला वाटत नाहीं. शरसंधानांत त्याचें हस्तलाघव विलक्षण असून तो विचित्र युद्ध करणारा आहे. अभेद्य कवच धारण करणारा तो वीर कळपांतील प्रमुख हत्तीप्रमाणें आमचा सेनापति होण्यास योग्य आहे.

भीमसेन—हे राजेंद्रा, हा द्रुपदात्मज शिखंडी भीष्माच्या वधासाठींच उत्पन्न झाला आहे, असें येथें जमलेले हे सर्व सिद्ध व ऋषि म्हणतात. संग्रा-मांत दिव्य अस्त्रें सोडीत असतां तो लोकांना महात्म्या रामासारखाच दिसेल. समरांगणांत शस्त्रांनीं सज्ज होऊन रथांत स्थित असलेल्या शिखंडीचा युद्धांत पराभव करील, असा मला एकहि योद्धा दिसत नाहीं. द्वैरथ युद्धांत महाव्रत भीष्माचा वध करणारा शिखंडीवांचून अन्य वीर नाहीं. यास्तव त्यालाच सेनापति नेमावें असें माझें मत आहे.

युधिष्ठिर—वत्सांनो, या जगताचें सारासार, बलाबल इत्यादि सर्व महात्म्या केशवाला ठाऊक आहे. यास्तव त्याचें मत मी ग्राह्य मानितों. हा दाशार्ह ज्याचें नांव सुचवील, तो कृतास्त्र असो किंवा नसो, वृद्ध असो किंवा तरुण असो, तो वीर आमचा सेनापति होवो. हा वार्ष्णेयच आमच्या विजयाचें किंवा पराजयाचें मूळ आहे. आमचे प्राण, राज्य, उत्कर्ष, अपकर्ष व सुख-दुःख हें सर्व याच्या स्वाधीन आहे. हाच धाता व विधाता असून याच्यामध्येंच सिद्धि प्रतिष्ठित आहे, यास्तव हा दाशार्ह कृष्ण सांगेल तोच आमचा सेनापति होईल.

हे वक्त्यांतील श्रेष्ठ कृष्णा, तुझें मत सत्वर सांग. रात्र समीप येत चालली आहे, तरी आपण सेनापति नेमून, अवशिष्ट राहिलेली रात्र संपतांच गंध-पुष्पांनीं

शस्त्रांचें पूजन करून व रक्षाबंधनादि स्वस्तिवाचन करवून तुझ्या वचनानुसार रणांगणाकडे जाऊं या.

वैशंपायन—राजा, बुद्धिमान् धर्मराजाचें तें भाषण ऐकून पुंडरीकाक्ष श्रीकृष्ण धनंजयाकडे पाहून म्हणाला—हे युधिष्ठिर महाराज, या सर्वांनीं ज्या वीरांचीं नांवें सुचविलीं, तीं मलाहि मान्य आहेत. ते भयंकर पराक्रमी योद्धे तुझ्या सैन्याचे नेते होण्यास योग्य आहेत. तुझ्या शत्रूचा पराभव करण्यास ते सर्वहि समर्थ आहेत. महायुद्धांत प्रत्यक्ष इंद्रालाहि ते भयभीत करतील, मग या लोभी व पापबुद्धि धार्तराष्ट्राची काय कथा!

हे महाबाहो, या युद्धांत शम व्हावा, म्हणून मींहि तुझें प्रिय करण्यासाठीं शक्य तेवढा यत्न केला. त्यामुळें आपण धर्माच्या ऋणांतून मुक्त झालों आहों. आपण आतां दोषदृष्टि लोकांच्या निंदेस पात्र होणार नाहीं. तो अनात्मज्ञ मंदमति दुर्योधन स्वतःला अस्त्रवेत्ता मानीत आहे. दुर्बल असूनहि बलाढ्य समजत आहे. यास्तव आतां सैन्य सज्ज करावें. ते पापात्मे वधार्ह आहेत. युद्धावांचून अन्य कोणत्याहि उपायानें ते साध्य होणें शक्य नाहीं.

धनुर्धर धनंजय, क्रुद्ध भीमसेन, यमधर्मासारखे माद्रेय, सात्यकीसह अमर्षी धृष्टद्युम्न, अभिमन्यु, द्रौपदेय, विराट, द्रुपद आणि अक्षौहिणी सैन्याचे अधिपति दुसरेहि अनेक भयंकर पराक्रमी अन्य नरश्रेष्ठ यांना पाहून ते धृतराष्ट्रपुत्र त्यांच्यासमोर उभे राहूं शकणार नाहींत. आमचें सैन्य निवडक असून तें अजिंक्य आहे. तें दुरासद सैन्य युद्धामध्यें कौरवसेनेचा संहार करील, यांत संशय नाहीं. यास्तव हे अरिंदमा, धृष्टद्युम्नच मला योग्य सेनापति वाटतो.

(२) वैशंपायन—राजा जनमेजया, कृष्णाचें हें भाषण ऐकून सर्व नृपति संतुष्ट झाले. त्यांनीं हृष्ट मनानें फार मोठा सिंहनाद केला. 'युद्धाला सज्ज व्हा, सज्ज व्हा,' असें म्हणत त्वरेनें धांवणाऱ्या सैन्याचा शब्द, घोड्यांचें खिंकाळणें, हत्तींचे चीत्कार, रथनेमींचा घोष, शंख, दुन्दुभि यांचा निस्वन सर्व बाजूंनीं प्रचंड निर्घोष झाला. त्या सर्व सैन्याचा समुदाय क्षुब्ध झालेल्या समुद्राप्रमाणें उग्र भासला. रथ, पायदळ व हत्ती इतस्ततः धावूं लागले. सैनिक परस्परांचीं नांवें घेऊन हांका मारूं लागले, योद्धे कवचें चढवून सज्ज झाले. त्यावेळीं तें सैन्य महा ऊर्मींनीं युक्त असलेल्या सागराप्रमाणें भयंकर दिसलें. ससैन्य पांडुपुत्र जात असतां त्यांची ती समन्ततः पसरलेली सेना महापुर आलेल्या गंगानदीप्रमाणें दुस्तर दिसली.

सैन्याच्या अग्रभागीं भीमसेन व कवचें धारण केलेले उभय माद्रीपुत्र चालले होते. सौभद्र, द्रौपदेय, व धृष्टद्युम्न त्यांच्या पार्श्वभागीं होते. पंचालासह प्रभद्रक भीमसेनाच्या संमुख होते. तें हर्षयुक्त सैन्य चाललें असतां, पर्वकाळीं होणाऱ्या समुद्राच्या निर्घोषाप्रमाणें त्याची प्रचंड गर्जना आकाशाला जाऊन भिडली. शत्रुसैन्याचें विदारण करणाऱ्या व सज्ज झालेल्या त्या प्रहृष्ट योद्धयांच्या मधून राजा युधिष्ठिर चालला होता.

त्या सैन्याबरोबर शकट, विक्रेयद्रव्यांसह व्यापारी, त्यांचे तंबु व विविध वाहनें होतीं. द्रव्याचा कोश, यन्त्रायुधें, शस्त्रवैद्य व रुग्णचिकित्सकहि होते. त्याचप्रमाणें कृश, दुर्बल व ज्यांचें बल अल्प आहे असेहि लोक होते.

पांचालराजकन्या सत्यवादिनी द्रौपदी दासदासींचा परिवार व स्त्रिया यांच्यासह उपप्लव्य नगरीस परत गेली. त्या पांडुपुत्रांनीं प्राकार व तट उभारून स्त्रिया व धन यांचें रक्षण केलें, ब्राह्मणांना भूमि व सुवर्ण यांचें दान दिलें आणि ब्राह्मणांनीं परिवेष्टित असलेले व ब्राह्मणाकडून स्तुति केले गेलेले ते पांडुपुत्र रत्नजडित रथांतून निघाले.

केकय राजे, धृष्टकेतु, काशीराजाचा पुत्र अभिभू, श्रेणिमान् वसुदान, अपराजित शिखंडी, हे सर्व हृष्ट व तुष्ट झालेले वीर कवचें चढवून व शस्त्रें घेऊन निघाले. ते सर्व अलंकृत असलेले राजे युधिष्ठिराला परिवेष्टित करून चालले होते. विराट, यज्ञसेनाचा पुत्र, सौमकि, सुधर्मा, कुंतिभोज, धृष्टद्युम्न व त्याचे पुत्र युधिष्ठिराच्या बाजूनें चालत होते. त्या सैन्यांत चाळीस हजार रथ, त्याच्या पांचपट अश्व, दसपट पायदळ आणि साठ हजार गज होते. अनाधृष्टि, चेकितान, धृष्टकेतु व सात्यकि हे सर्व वासुदेव आणि धनंजय यांना परिवेष्टित करून निघाले.

कुरुक्षेत्राच्या समीप आल्यावर व्यूह रचून उभे राहिलेले ते प्रहार करणारांतील श्रेष्ठ पांडव गर्जना करणाऱ्या वृषभाप्रमाणें भासले. त्या सर्वांनीं व विशेषतः वासुदेव-धनंजयांनीं कुरुक्षेत्रांत प्रवेश करतांच आपापले शंख वाजविले. त्यावेळीं विजेच्या कडकडासारखा पांचजन्याचा प्रचंड निर्घोष झाला. तो ध्वनि ऐकून सर्वतः सर्व सैन्य रोमांचित झालें. त्यावेळीं शंख व दुंदुभि यांच्या घोषानें संतुष्ट झालेल्या योद्धयांनीं केलेल्या प्रचंड सिंहनादानें पृथिवी, अंतरिक्ष व सागर हीं तीन्ही दुमदुमून गेलीं. ५. ७. १५१.

## अध्याय १५२ वा.

[ १ पांडवसैन्याच्या शिबिरांचें वर्णन. ]

( १ ) वैशंपायन—राजा, नंतर युधिष्ठिरानें जेथें विपुल धान्य, जल, तृण व इंधन आहे, अशा सम व स्निग्ध प्रदेशांत आपल्या सैन्याचा मुक्काम करविला. त्या कुंतीपुत्र युधिष्ठिरानें श्मशानें, देवालयें, महर्षींचे आश्रम, तीर्थें व अन्य देवस्थानें यांना वर्ज करून मनोरम वनश्रीनें युक्त, शुभ व पवित्र प्रदेशांत सैन्याचा निवास करविला. तेथें अश्वादि वहानांनीं विश्रांति घेतल्यानंतर सहस्रावधि नृपतींनीं परिवेष्टित असलेला तो पांडव मोठ्या सुखानें पुढें निघाला.

पार्थासह केशवानें कौरवांच्या शेंकडों सेनानायकांचा पराभव करून आसमंतांतील प्रदेशाचें आक्रमण केलें. पार्षत धृष्टद्युम्न, सात्यकि व युयुधान यांनीं शिबिराच्या भूमीचें माप घेतलें. नंतर केशवानें कुरुक्षेत्रांतील पवित्र हिरण्वतीनदीच्या तीरावरील सुंदर घाटासमीप येऊन रेती व चिखल यांनीं रहित, निर्मल व अगाध जलानें युक्त अशा प्रदेशाच्या सभोंवार सैन्याच्या संरक्षणार्थ खंदक खणविला आणि तेथें सैन्याचा तळ देवविला.

नंतर श्रीकृष्णानें महात्म्या पांडवांच्या शिबिरासारखींच इतर नृपालांचींहि शिबिरें निर्माण करविलीं. त्या शिबिरांचें काष्ठादि साहित्य अतिशय दृढ असल्यामुळें, तेथें शत्रूंचा प्रवेश होणें दुष्कर झालें होतें. तीं शिबिरें सहस्रावधि भक्ष्य-भोज्य पदार्थ व विपुल अन्नपान यांनीं युक्त होतीं. याप्रमाणें भूतलावर निर्माण केलेलीं तीं राजांचीं मूल्यवान् शिबिरें जणुकाय साक्षात् विमानेंच भासत होतीं. हे राजेंद्रा, तेथें शेकडों तज्ज्ञ शिल्पी वेतन देऊन ठेविले होते; सर्व उपकरणांसह शास्त्रविशारद व शल्यादि चिकित्सक असे अनेक वैद्य नियुक्त केले होते. असंख्य धनुष्यें, प्रत्यंचा, कवचें व शस्त्रें यांचा संग्रह केला होता. त्याचप्रमाणें मध, तूप व राळ यांच्या पर्वतप्राय राशी पडल्या होत्या. प्रत्येक शिबिरांत राजा युधिष्ठिरानें विपुल जल, तृण, काष्ठें व लोखंडी इंधनपात्रें ( शेगड्या ) यांचा पुरवठा करविला होता.

त्या सैन्यांत महायंत्रें ( तोफा ), बाण, तोमर, कुऱ्हाडी, धनुष्यें, कवचें, खड्ग व भाते इत्यादि आयुधांचा विपुल सांठा होता. शत्रूच्या हत्तींना स्पर्शानेंच वेध करणाऱ्या पोलादाच्या कांटेरी झुली हत्तींच्या अंगावर घातलेल्या होत्या. अशा पर्वतप्राय गजावर आरूढ झालेले सहस्रावधि योद्धे तेथें दिसत

होते. पांडवांनीं सैन्यासह तेथें तळ दिलेला ऐकून त्यांच्या विजयासाठीं विविधदेशांतून त्यांचे अनेक मित्र आले. ते सर्व पांडुपुत्रांचे सुहृद् आपापलें सैन्य व वहानें यांसह तेथें एकत्र जमले. त्यांत सोमपान करणारे, विपुल दक्षिणा देणारे व ब्रह्मचर्य पालन करणारे अनेक महीपाल होते. ५. ७. १५२

---

## अध्याय १५३ वा.

[ १ कौरवसैन्याची युद्धार्थ सज्जता. ]

( १ ) जनमेजय—हे भगवन्, वासुदेवानें ज्याचें पालन केलें आहे, असा युधिष्ठिर सैन्यासह युद्धाच्या इच्छेनें कुरुक्षेत्रांत आला आहे. त्याच्याबरोबर पुत्रासह विराट, द्रुपद, केकय, वृष्णि व इतर शेंकडों राजे युद्धार्थ आले आहेत. बारा आदित्यांनीं अभिरक्षित असलेल्या इंद्राप्रमाणें ते महारथ युधिष्ठिराचें रक्षण करीत आहेत, हें ऐकून दुर्योधनानें काय केलें ! तें सविस्तर ऐकण्याची माझी इच्छा आहे. पांडवांनीं कुरुक्षेत्रांतील त्या तुमुल संग्रामांत इंद्रासह देवांनाहि व्यथित केलें असतें. कारण पांडव, वासुदेव, विराट, द्रुपद, धृष्टद्युम्न, पांचाल, शिखंडी व युधामन्यु हे वीर देवांनाहि अजिंक्य होते. यास्तव हे तपोधना, कौरव आणि पांडव यांचा हा युद्धवृत्तान्त सविस्तर ऐकण्याची माझी इच्छा आहे. त्या दोन्ही पक्षांच्या हालचाली कशा झाल्या हें मला सांग.

वैशंपायन—राजा जनमेजया, दाशार्ह कृष्ण निघून गेला असतां दुर्योधनानें कर्ण, दुःशासन व शकुनि यांच्याशीं असा संकेत केला—

"हे वीरहो, हा अधोक्षज वासुदेव कृतार्थ न होतां पांडवांकडे परत गेला आहे. तो क्रुद्ध झालेला कृष्ण त्या पांडवांना क्षुब्ध करील, यांत संशय नाहीं. शिवाय माझें व पांडवांचें युद्ध व्हावें हें वासुदेवाला इष्टच आहे. भीमार्जुन दाशार्हाच्या आज्ञेंत स्थित आहेत व अजातशत्रु युधिष्ठिर भीमाच्या अधीन आहे.

मीं पूर्वी सर्व सहोदरांसह पांडवांशीं कपटाचरण केलें आहे. त्याचप्रमाणें विराट व द्रुपद यांच्याशींहि मीं वैर केलें आहे. यास्तव वासुदेवाच्या वश असलेले ते दोघे पांडवसैन्याचे सेनापति होतील. त्यामुळें अंगावर रोमांच आणणारें तुमुल युद्ध होणार आहे. तस्मात् तुम्ही युद्धाची सर्व तयारी सत्वर करा. उपेक्षा करूं नका. हे नरश्रेष्ठांनो, कुरुक्षेत्रांत विस्तृत व शत्रूंना दुरासद अशीं शिबिरें

निर्माण करा. जेथें आहारादि सामग्री आणण्या-नेण्याच्या मार्गांत शत्रूकडून उपसर्ग पोंचणार नाहीं, जेथें जल समीप आहे व जेथें भिन्न भिन्न प्रतीच्या लोकांस रहाण्यास योग्य असे विभाग केले आहेत अशीं शिबिरें स्थापन करा. विविध आयुधें, पताका, ध्वज यांनीं तीं शिबिरें युक्त करा. शिबिरांचे नगराच्या बाहेरील मार्ग सम करावा. उद्यां प्रातःकालीं कुरुक्षेत्रांत प्रयाण करावयाचें आहे, अशी घोषणा करा. उशीर लावूं नका."

राजाची ही आज्ञा ऐकून संतुष्ट झालेले ते महात्मे 'ठीक आहे' असें बोलून प्रभातीं निघण्यास सज्ज झाले. आपल्या श्रेष्ठ आसनावरून उठून त्यांनीं आपल्या सुवर्णाच्या बाहुभूषणांनीं अलंकृत केलेले, चंदनाची उटी लावलेले, परिघा-सारखे दीर्घ व पुष्ट दंड हळुहळू थोपटले. आपल्या कमलासारख्या हातांनीं शिरस्त्राणें बांधलीं. उत्तरीय वस्त्रें पांघरलीं, भूषणें धारण केलीं. रथिश्रेष्ठ रथारूढ झाले. अश्वसादि अश्वारूढ झाले व गजकोविद गजारूढ झाले. त्यांनीं सुवर्णाचीं चित्र-विचित्र कवचें धारण केलीं. ते सर्व प्रकारचीं विविध शस्त्रें घेऊन सज्ज झाले. ज्यावर सोनेरी चित्र-विचित्र नक्षीकाम केलें आहे, अशीं विविध शस्त्रें पदातींनीं धारण केलीं. त्या वेळीं युद्धोत्सुक झालेल्या त्या वीरांनीं गजबजलेली ती कौरवांची नगरी उत्सवासारखी शोभली. कुरुराजाचें तें प्रचंड सैन्य एखाद्या महासागरासारखें भासलें. जनसमुदाय त्या जलावरील आवर्त होते. रथ, गज, अश्व हे मासे होते. शंख व दुंदुभि यांचा निःस्वन हा समुद्राचा निर्घोष होता. द्रव्यसंग्रह हींच रत्नें, चित्र-विचित्र भूषणें व कवचें याच ऊर्मी, तेजस्वी शस्त्रें हा निर्मल फेन, प्रासाद हेच पर्वत, मार्ग व बाजार हे डोह होते. त्यांतील योद्ध्यांचा मुखचंद्र उदय पावल्यामुळें तो कुरुराजमहार्णव चंद्रोदयाच्या वेळीं क्षुब्ध होणाऱ्या समुद्राप्रमाणें शोभला. ५. ७. १५३.

---

## अध्याय १५४ वा.

[ १ युद्ध केल्यानें स्वधर्मापासून च्युत होईन अशी युधिष्ठिराची शंका. २ श्रीकृष्णानें केलेलें समाधान. ३ युद्धाचा कृतनिश्चय. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा जनमेजया, त्यानंतर वासुदेवाचे ते शब्द आठवून युधिष्ठिरानें वार्ष्णेयाला पुनः असा प्रश्न केला—" हे अच्युता, 'सुहृद्या अप्रा-

इतकीहि भूमि देणार नाहीं ' असें का तो मंदमति दुर्योधन बोलला ! यावरून युद्धाची वेळ येऊन ठेपली आहे, हें उघडच आहे. यावेळीं आम्हांला काय करणें उचित आहे ! आम्हीं काय केलें असतां स्वधर्मापासून च्युत होणार नाहीं ! हे वासुदेवा, दुर्योधन, कर्ण, शकुनि आणि भ्रात्यांसह मी या सर्वांचीं मतें तूं जाणतोस. विदुर व भीष्म या दोघांचें वचन तूं ऐकलेंच आहेस. कुंतीचा समग्र बुद्धिवाद तूं समक्षच ऐकून आला आहेस. यास्तव हे कृष्णा, या सवांचीं मतें क्षणभर बाजूला सारून व पुनः पुनः विचार करून तुला जें योग्य वाटत असेल, तें मला निःशंकपणें सांग. ''

धर्मराजाचें हें धर्मार्थयुक्त वचन ऐकून श्रीकृष्ण आपल्या मेघासारख्या गंभीर वाणीनें असें बोलला—

( २ ) कृष्ण—हे धर्मराजा, त्या धार्तराष्ट्राला मीं धर्मार्थयुक्त हित वचन सांगितलें, परंतु त्या कपटपटु कौरवाच्या मनावर तें ठसलें नाहीं. तो दुर्मति भीष्म किंवा विदुर यांतील कोणाचेंच ऐकत नाहीं. माझ्या भाषणाचा त्याच्यावर यत्किंचित्हि परिणाम झाला नाहीं. त्यानें त्या सर्वांचें अतिक्रमण केलें.

तो दुरात्मा धर्माची इच्छा करीत नाहीं, किंवा यशाची इच्छा करीत नाहीं कर्णाचा आश्रय करून तो ' स्वतः मीं जिंकलेंच आहें ' असें समजतो. त्या दुर्योधनानें मला बांधून ठेवण्याचीहि आज्ञा केली होती. परंतु त्या दुरात्म्याचा तो पापी निश्चय सफल झाला नाहीं. भीष्म किंवा द्रोण त्याच्या वचनाच्या विरुद्ध वागण्यास समर्थ नाहींत. एकट्या विदुरावांचून सर्व त्यालाच अनुसरतात.

हे युधिष्ठिरा, ते मूढ शकुनि, कर्ण व दुःशासनहि त्या अमर्षी मंदमतीजवळ तुझ्याविषयीं प्रतिकूल बोलत असतात. तो दुरात्मा दुर्योधन तुझ्याविषयीं काय काय बोलला, हें तुला सांगून काय करावयाचें आहे ? तो तुझ्याशीं युक्त वर्तन करीत नाहीं, एवढेंच मी तुला संक्षेपतः सांगतों. तुझ्या सैन्यांत असलेल्या या सर्व राजांमध्यें जें पाप व अकल्याण नाहीं, तें सर्व त्याच्यामध्यें स्थित आहे. आम्ही सर्वस्वत्यागानें कौरवांशीं संधि करूं इच्छीत नाहीं. आम्हीं राज्याची उपेक्षा करून केवल पांच ग्रामांची याचना केली, परंतु दुर्योधनानें तीहि मान्य केली नाहीं. यास्तव आतां युद्धच झालें पाहिजे.

( ३ ) वैशंपायन—हे भारता, वासुदेवाचें हें भाषण ऐकून ते सर्व राजे कांहीं न बोलतां धर्मराजाच्या मुखाकडे पाहूं लागले. तेव्हां त्यांचा अभिप्राय

लक्षांत घेऊन युधिष्ठिरानें भीमार्जुन व नकुल-सहदेव यांच्यासह युद्धाला सज्ज होण्याची आज्ञा केली. राजाची ती आज्ञा ऐकून सर्व सैनिक संतुष्ट झाले. पांडवांच्या सैन्यांत मोठा कोलाहल झाला.

त्यावेळीं अवध्य असलेल्या भीष्म-द्रोणादि गुरुजनांचा वध करावा लागणार, हें पाहून धर्मराज युधिष्ठिरानें दीर्घ निःश्वास सोडला व भीमसेन आणि अर्जुन यांना म्हटलें—" हे वीरांनो, द्यूतप्रसंगींच शत्रूचा वध करण्यास हा भीमसेन उद्युक्त झाला होता. परंतु आमच्या हातून भीष्मादि वृद्धांचा वध होऊं नये, ज्ञातीचा क्षय होऊं नये, म्हणून मीं वनवासाचें दुःख सहन केलें व अनेक क्लेश भोगले. या अनर्थाचा परिहार करण्यासाठीं आम्हीं त्यांना क्षमा केली. तरीहि माझा हा प्रयत्न व्यर्थ होऊन शेवटीं हा घोर युद्धरूप कलह उपस्थित व्हावयाचा तो झालाच.

हे सर्व कुरुश्रेष्ठ अवध्य आहेत व पार्थिव निरपराध आहेत, त्यांच्याशीं संग्राम कसा करावा ! वृद्ध गुरुजनांचा वध करून आमचा जय कसा होईल !"

धर्मराजाचें हें भाषण ऐकून परंतप सव्यसाचीनें त्याला वासुदेवानें सांगितलेलें वचन ऐकविलें. तो म्हणाला—" हे राजन्, देवकीनंदनानें कुंती व विदुर यांचे जे शब्द सांगितले, ते सर्व तूं समग्र ऐकलेच आहेस आणि तीं दोघेंहि कदापि अधर्म्य वचन बोलणार नाहींत, असें माझें निश्चित मत आहे. यास्तव हे कौंतेया, आतां युद्ध न करतां परत फिरणें योग्य नव्हे."

अर्जुनाचें हें वचन ऐकून कृष्णानें स्मित करून म्हटलें—" पार्थाचें सांगणें बरोबर आहे. तसेंच झालें पाहिजे."

तेव्हां पांडवांनीं युद्धाचा निश्चय करून सैनिकांसह ती रात्र सुखानें घालविली. ५. ७. १५४.

---

## अध्याय १५५ वा.

[ दुर्योधनाच्या सेनेचें वर्णन. २ सैनिक व सेनापति यांच्याशीं दुर्योधनाचें अनुकूल वर्तन. ]

( १ ) **वैशंपायन**—जनमेजया, ती रात्र निघून गेली असतां राजा दुर्योधनानें आपल्या अकरा अक्षौहिणी सैन्याचा विभाग केला. त्या सर्व सैन्या-

मध्यें जे नर, हत्ती, रथ व अश्व होते, त्यांतील श्रेष्ठांना अग्रभागीं, मध्यमांना मध्यभागीं व दुर्बलांना शेवटीं रहाण्याची आज्ञा केली. ते विचित्र सैनिक आपल्या तेजस्वी शरीरांनीं प्रदीप्त अग्नीप्रमाणें भासले. ते सर्वेहि वीर अनुकर्ष,[1] तूणीर,[2] वैरूथ,[3] तोमर,[4] उपासंग,[5] निषंग,[6] शक्ति,[7] ऋष्टि,[8] ध्वज, पताका, शरासन,[9] तोमर, विचित्ररज्जूंनीं युक्त असलेले पाश,[10] परिच्छेद, केशग्रहविक्षेप, तेल, गूळ, वाळू, विषारी सर्पयुक्त घट, राळ, घुंगुरु लावलेलीं शस्त्राग्रें, तरवारी, पट्टे, सुऱ्या, बंदुकीच्या गोळया, गोफणी, मेण, मुद्गर, कालदंड, विषतोमर, शूर्पपीठक, अंकुश, कांटेरी कवचें, गुप्तशस्त्रें, व्याघ्र व हत्ती यांच्या चर्मांचीं आच्छादनें, प्रास, कुऱ्हाडी, कुदळी, रेशीम, तूप, सुवर्णाचीं रत्नजडित चिलखतें, इत्यादि युद्धोपयोगी सामग्रीनें भूषित झाले होते.

त्यांच्या रथावर कुलीन व अश्वजातिज्ञ शूर सूत सारथ्यकर्मासाठीं नियुक्त केले होते. त्यांनीं आपल्या अंगावर कवचें चढविलीं असून त्या सर्वांनीं शस्त्रांतील कौशल्यहि संपादन केलें होतें. रथांना जोडलेल्या अश्वांच्या मस्तकादि स्थानीं अशुभ निवारक यंत्रें व औषधि वगैरे बांधल्या होत्या. कटिप्रभृति अंगें दृढबद्ध केलीं होतीं. अश्व, गज इत्यादिकांच्या मस्तकांवर घंटा, घुंगुरु इत्यादिकांच्या माला, मोत्यांचे गुच्छ, शौर्यसूचक बिरुदें व इतर आभरणें घातलीं होतीं. रथावर ध्वज व पताका बांधल्या होत्या. अश्वादि वहानांच्या मस्तकावर तुरे बांधले होते. वीरांच्या पाठीवर ढाली व पट्टे बांधले होते. सर्व वीरांच्या रथांना उत्तम प्रतीचे चार चार अश्व जोडले होते. प्रत्येक रथांत

---

१ युद्धाच्या गर्दीमध्यें एखादा रथावयव भग्न झाला असतां त्याच्या जागीं स्थापण्यासाठीं रथाच्या खालीं एक काष्ठ बांधलेलें असतें, त्याला अनुकर्ष म्हणतात. २ रथांतून वाहून नेण्यास योग्य असलेल्या फार मोठ्या बाणांच्या कोशास तूणीर म्हणतात. ३ रथाच्या रक्षणासाठीं त्यावरून घालण्याकरितां केलेल्या व्याघ्रादि चर्मांच्या वेष्टनाला वरूथ म्हणतात. ४ ज्याच्या अग्रभागीं तीक्ष्ण पातें लावलेलें आहे, असे हातानें फेकावयाचे दंड. ५ हत्ती, घोडे यांवरून वाहून नेण्यास योग्य असे बाणाचे भाते. ६ पायदळांतील मनुष्यानें वाहून नेण्यास योग्य असलेला बाणभाता. ७ शक्ति म्ह० लोहदंड. ८ ऋष्टि म्ह० अतिशय जड काष्ठदंड. ९ धनुष्यानें फेंकावयाचे मोठमोठे बाण. १० पाश म्ह० जवळ आलेल्या शत्रूच्या गळ्यांत अडकवावयाच्या दोऱ्या.

प्रास, ऋष्टि व शंभर शंभर धनुष्यें ठेविलीं होतीं. प्रत्येक रथाच्या दोन्ही बाजूस चक्ररक्षक उभे केले होते. तेहि रथ्यांतील श्रेष्ठ रथी व हयवेत्ते होते. त्यामुळें सुवर्णमालांनीं सर्वतः भूषित केलेले ते रथ सुरक्षित असलेल्या नगराप्रमाणें शत्रूंना दुर्धर्ष होते.

या रथांप्रमाणेंच गजांच्या मस्तकादि अवयवांनाहि घंटामाला, मौत्तिक गुच्छ, बिरुदें इत्यादिकांनीं भूषित केलें होतें. त्यामुळें सात पुरुष उंच असलेला प्रत्येक गज रत्नयुक्त पर्वतासारखाच दिसत होता. हे राजा, त्यांतील प्रत्येक हत्तीच्या मस्तकावर आठ वीर बसले होते. त्यांतील दोन अंकुशधर, दोन उत्तम धनुर्धर, दोन खड्गधर, एक शक्तिधर व एक त्रिशूलधर होता. त्यांतील अंकुशधर गजाचें नियमन करीत होते. धनुर्धर, दूरस्थ शत्रूवर, खड्गधर समीपस्थांवर, शक्तिधर व त्रिशूलधर मध्यस्थांवर प्रहार करण्यासाठीं सज्ज होते.

जनमेजया, महात्म्या दुर्योधनाचें तें सर्व सैन्य, मत्त गज व विविध आयुधें यांनीं व्याप्त झालें होतें. त्याचप्रमाणें सहस्रावधि अश्व कवचें घातलेल्या, व पताका धारण केलेल्या अलंकृत अश्वारोहांनीं युक्त होते. ते असंख्य अश्व शांत, सुशिक्षित, अश्वाभरणांनीं युक्त व अश्वारोहाच्या अधीन होते. दुर्योधनाच्या सेनेंतील पदातिहि विविध आकारांनीं युक्त, विचित्र कवचें व शस्त्रें धारण करणारे व सुवर्णमालांनीं भूषित झालेले होते. हे राजा, वर सांगितलेल्या सर्व सामग्रीनें युक्त असलेल्या एका रथाबरोबर दहा गज, शंभर अश्व व सहस्र पदाति होते.

कांहीं समूह असे होते. कांहीं समूहांमध्यें एक रथ त्याच्या सभोंवार पन्नास गज, पांच हजार अश्व व पस्तीस हजार पायदळ एवढा परिवार होता. सर्व सैन्यामध्यें जे प्रधान रथी होते, त्यांच्या रथांभोंवतीं दुसऱ्या पक्षांत सांगितल्याप्रमाणें गजादि होते आणि जे अप्रधान योद्धे होते, त्यांच्या रथासभोंवार पूर्वपक्षांत वर्णिल्याप्रमाणें गजादि होते. एक रथ, एक गज, तीन अश्व व पांच पुरुष एवढ्या समूहाला पत्ति असें म्हणतात. ही सैन्याची साधारण संख्या आदिपर्वांत सांगितली आहे. तिलाच अनुसरून येथें गज व रथ यांची जी संख्या सांगितली आहे ती उपलक्षणार्थ आहे. त्यामुळें पंचवीसशें मनुष्यें, पंधराशें अश्व, पन्नास गज व पन्नास रथ एवढ्या समूहाला सेना असें म्हणतात. याच्या दसपट सेनासमूहाला पृतना व दहा पृतनांना वाहिनी म्हणतात. पण

येथील सेना, वाहिनी, पृतना, ध्वजिनी, चमू, अक्षौहिणी व वरूथिनी हे सर्व पर्याय शब्द आहेत.

यांप्रमाणें बुद्धिमान् दुर्योधनानें आपल्या सैन्याची व्यूहरचना केली. दोन्ही सैन्यामध्यें मिळून अठरा अक्षौहिणी सैन्य होतें. त्यांतील पांडवांचें सात व कौरवांचें अकरा अक्षौहिणी होतें. पंचावन्न पुरुषांच्या समुदायाला पत्ति असें म्हणतात. तीन पत्तींचें एक सेनामुख होतें. त्यालाच गुल्म असेंहि नांव आहे. तीन गुल्मांचा एक गण म्हटला जातो. याप्रमाणें दुर्योधनाच्या सेनेंत युद्धोत्सुक, प्रहार करणारे सहस्रावधि गण होते. त्यामुळें त्याच्या सैन्यांतील पुरुषांची गणना करतां येत नव्हती. त्यांतील शूर व बुद्धिमान् पुरुष पाहून दुर्योधनानें त्यांना प्रत्येक अक्षौहिणीवर सेनापति नेमिलें.

नंतर दुर्योधनानें प्रत्येक अक्षौहिणीच्या श्रेष्ठ सेनानीस सन्मानपूर्वक बोलावून आणून त्यांच्याशीं प्रेमानें संभाषण केलें. कृप, द्रोण, शल्य, जयद्रथ, सुदक्षिण काम्बोज, कृतवर्मा, अश्वत्थामा, कर्ण, भूरिश्रवा, शकुनि व महाबलाढ्य बाल्हिक हे अकरा वीर अकरा अक्षौहिणीचे सेनापति होते. त्यांची नित्य वेळोवेळीं समक्ष भेट घेऊन दुर्योधन त्यांचा यथाविधि सत्कार करीत असे. याप्रमाणें ज्यांची उत्तम व्यवस्था ठेविली आहे असे ते सर्व राजे, सैनिक व त्यांचे अनुयायी विशेष प्रकारें नियत असून राजा दुर्योधनाचें प्रिय करण्यांत तत्पर होऊन राहिले होते. ५. ७. १५५.

---

## अध्याय १५६ वा.

[ १ भीष्माला सेनाध्यक्ष होण्याविषयीं दुर्योधनाची प्रार्थना. २ भीष्माचा अर्जुनप्रशंसापूर्वक स्वीकार. ३ भीष्मवधापर्यंत युद्ध न करण्याची कर्णाची प्रतिज्ञा, भीष्माला सैन्यापत्याचा अभिषेक. ४ कौरवांचें सेनेसह कुरुक्षेत्रीं प्रयाण. ]

( १ ) वैशंपायन—राजा, त्यानंतर सर्व महीपालांसह दुर्योधन हात जोडून भीष्माला असें वचन बोलला—" हे पितामह सेनाध्यक्षावांचून प्रचंड सेनाहि मुंग्यांच्या वारुळासारखी किंवा पर्णपुटासारखी क्षणांत विदीर्ण होते. त्याचप्रमाणें सैन्यामध्यें अनेक नेते उपयोगी नाहींत. कारण दोन व्यक्तींचें मत व शौर्य केव्हांहि समान असूं शकत नाहीं आणि सैन्याधिपति परस्परांशीं स्पर्धा करीत असतात. या विषयीं असा एक पुरातन इतिहास सांगत असतात.

हे महाप्राज्ञा, पूर्वी एकदा अतिशय बलाढ्य हैहयराजांशीं युद्ध करण्यास सर्व ब्राह्मण आपले दर्भांचे ध्वज उभारून आले. त्याचप्रमाणें वैश्य व शूद्रहि त्यांना अनुसरले. ते तीन वर्ण एकत्र होऊन त्यांचा एक पक्ष झाला व क्षत्रिय एकटेच दुसऱ्या पक्षांत राहिले. नंतर त्या दोन पक्षांचें वारंवार युद्ध झालें व ते तीन्ही वर्ण संख्येनें विपुल असूनहि प्रत्येक वेळीं एकट्या क्षत्रियांनींच त्यांना जिंकलें. तेव्हां त्या द्विजश्रेष्ठांनीं क्षत्रियांना त्यांच्या विजयाचें कारण विचारलें. त्यावेळीं त्या धर्मज्ञ क्षत्रियांनीं त्यांस असें यथार्थ कारण सांगितलें.

क्षत्रिय—आम्ही समरांगणांत एकाच बुद्धिमान् सेनापतीच्या आज्ञेनें चालतों आणि तुम्ही सर्व नेत्याच्या अभावीं स्वबुद्ध्यनुसार आपापल्या मता-प्रमाणें वागतां, त्यामुळें आम्ही विजयी होतों व तुमचा पराजय होतो.

क्षत्रियांचें हें वचन ऐकून ब्राह्मणांनीं नीतिज्ञ, कुशल व शूर अशा एका द्विजाला आपला सेनापति नेमिलें व क्षत्रियांना जिंकलें. याप्रमाणें जे योद्धे हितचिंतक, निष्पाप, शूर व कुशल असा सेनापति करितात, ते रणांमध्यें शत्रूंना जिंकतात.

हे पितामह, तूं शुक्राचार्यांच्या तुल्य आहेस, सर्वदा माझें हित चिंतीत असतोस. पित्याच्या वरानें कालालाहि अवध्य आहेस व धर्मात स्थित आहेस. यास्तव तूं आमचा सेनापति हो. किरणवान् ज्योतींमध्यें जसा आदित्य, वन-स्पतींत जसा चंद्र, यक्षांमध्यें जसा कुबेर, देवांमध्यें जसा इंद्र, पर्वतांत जसा मेरु, पक्ष्यांमध्यें जसा गरुड, देवांमध्यें जसा कार्तिकेय आणि वसूंमध्यें जसा अग्नि तसा कौरवांमध्यें तूं आहेस. इंद्रानें संरक्षिलेल्या देवाप्रमाणें तुझ्याकडून सुसंरक्षित असलेले आम्ही देवांनाहि अजिंक्य होऊं, यांत संशय नाहीं. देवांच्या अग्रभागीं जसा सेनानी स्कंद जातो, तसा तूं आमचा अग्रेसर हो. म्हणजे श्रेष्ठ वृषभाला अनुसरणाऱ्या बालवृषभाप्रमाणें आम्ही तुझ्या मागोमाग जाऊं.

(२) भीष्म—हे महाबाहो भारता, तू जें म्हणालास तें खरें आहे. परंतु मला जसे तुम्हीं तसेच पांडवहि आहेत. यास्तव हे नराधिपा, त्यांना श्रेय-स्कर असलेलें कर्तव्य मी त्यांनाहि सांगेन आणि माझ्या संकेताप्रमाणें तुझ्या अर्थासाठीं युद्ध करीन. एका कुंतीपुत्र धनंजयावांचून माझ्या तोडीचा एकहि

१ वयमेकस्य शृण्वाना महाबुद्धिमतो रणे ।
भवन्तस्तु पृथक्सर्वे स्वबुद्धिवशवर्तिनः ॥

योद्धा मला या पृथ्वीवर दिसत नाहीं. तो महाबुद्धिमान् अर्जुन अनेक प्रकारचीं दिव्य अस्त्रें जाणतो. परंतु तो पांडव माझ्याशीं कदापि उघडपणें युद्ध करणार नाहीं. मी केवल शस्त्रबलानेंच एका क्षणांत सुरासुर व राक्षस यांच्यासह हें जगत् निर्मनुष्य करून टाकीन.

तथापि हे जनाधिपा, मला पांडुपुत्रांचा नाश करितां येणें शक्य नाहीं. इतर दहा हजार योद्ध्यांचा मी शस्त्रानें प्रतिदिवशीं संहार करीन. याप्रमाणें मी इतर वीरांना यमलोकीं पाठवीन. परंतु त्यांनीं जर प्रथमच मजवर प्रहार केला नाहीं, तर मीहि त्यांच्यावर प्रहार करणार नाहीं.

या अटीवर मी तुझ्या इच्छेप्रमाणें सेनापति होईन. आतां दुसरीहि माझी इच्छा ऐक. हे पृथ्वीपाला, कर्णानें किंवा मीं यांतील कोणीं तरी एकानें प्रथम युद्ध करावें. एकाच वेळीं दोघांनीं युद्धाला उभें राहूं नये. कारण हा सूतपुत्र रणामध्यें माझ्याशीं नेहमीं स्पर्धा करीत असतो.

( ३ ) कर्ण—हे राजन्, हा गांगेय जिवंत असेपर्यंत मी कदापि युद्ध करणार नाहीं. हा भीष्म मारला गेला असतां मीं समरांगणांत धनंजयाशीं युद्ध करीन.

वैशंपायन—राजा जनमेजया, त्यानंतर धृतराष्ट्रपुत्रानें विपुल दक्षिणा देऊन भीष्माला यथाविधि सेनापति केलें. तेव्हां तो अभिषिक्त शांतनव फार शोभला. त्यावेळीं अव्यग्र वादकांनीं राजाज्ञेवरून सहस्रशः शंख व भेरी वाजविल्या. सिंहनाद झाले. अश्वादि विविध वाहनांनीं तुमुल शब्द केला. मेघांवांचूनच रक्त व चिखल यांची वृष्टि झाली. गजांच्या गर्जनांसारखे धरणीकंप झाले. हीं दुश्चिह्नें पाहून सर्व योद्धे मूर्छित झाले. आकाशवाणी व उल्कापात झाला. भालु भयंकर शब्द करूं लागल्या. हे राजा, दुर्योधनानें भीष्माला जेव्हां सैन्यापत्याचा अभिषेक केला, तेव्हां याप्रमाणें उग्र स्वरूपाचीं शेकडों दुश्चिह्नें झालीं.

(४)त्यावेळीं शत्रूंच्या सैन्याचा संहार करणाऱ्या भीष्माला सेनापति करून दुर्योधनानें ब्राह्मणांकडून अनर्थनिवारणार्थ स्वस्तिवाचन करविलें आणि श्रेष्ठ विप्रांना विपुल गायी व सुवर्ण यांचें दान दिलें व त्यांच्या मंगल जयाशीर्वादांचा स्वीकार केला. नंतर गांगेयाला पुढें करून सैनिकांनीं परिवेष्टित झालेला तो दुर्योधन भ्रात्यांसह निघाला आणि प्रचंड सेनेसह कुरुक्षेत्रांत गेला. तेथें कर्णासह त्या कौरवानें सर्व कुरुक्षेत्राचें आक्रमण केलें व त्यांतील सजल, तृण, काष्ठ व धान्य

यांनीं युक्त आणि रम्य असा समप्रदेश पाहून तेथें आपल्या शिबिरासाठीं जागा आंखविली व तत्काल शिबिर तयार करविलें. तें शिबिर हस्तिनापुराप्रमाणें शोभूं लागलें. ७. ५. १५६.

---

## अध्याय १५७ वा.

[ १ जनमेजयाचा प्रश्न. २ सात सेनापतींना अभिषेक व श्रीकृष्णाला सर्व सेनानींचा अधीप करण्याविषयीं युधिष्ठिराची आज्ञा. ३ बलरामाचें पांडवांकडे आगमन. त्याचा सत्कार व कौरवांची उपेक्षा करण्यास असमर्थ असलेल्या त्याचें तीर्थयात्रेस प्रयाण. ]

( १ ) **जनमेजय**—हे विप्रश्रेष्ठा, गंगापुत्र भीष्म बृहस्पतितुल्य बुद्धिमान्, पृथ्वीसारखा क्षमावान्, समुद्रासारखा गंभीर, हिमालयासारखा स्थिर, प्रजापतिसारखा उदार, भास्करासारखा तेजस्वी आणि महेंद्रासारखा आपल्या शरवृष्टींनीं शत्रूंचा नाश करणारा होता. तो भारतांचा पितामह सर्व भूपालांचा जणुकाय ध्वजच होता. अंगावर रोमांच आणणारा तो भयंकर रणयज्ञ प्रवृत्त झाला असतां त्या महात्म्यानें दीर्घकाल सैन्यापत्याची दीक्षा घेतली आहे, हें वर्तमान ऐकून शस्त्रधारण करणारांतील श्रेष्ठ युधिष्ठिर, भीमसेन, अर्जुन व कृष्ण काय म्हणाले तें मला सांग.

( २ ) **वैशंपायन**—राजा जनमेजया, आपद्धर्म जाणणारा व अर्थकुशल असा युधिष्ठिर सर्व भ्रात्यांना आणि शाश्वत वासुदेवाला एकत्र बोलावून सान्त्वपूर्वक असें निश्चित वचन बोलला—" हे वीरांनो, तुम्ही आपल्या सैन्यांत एकदा फिरून या व कवचें चढवून सज्ज व्हा. युद्धाच्या आरंभालाच तुमचा पितामहाशीं संग्राम होईल. यास्तव आपल्या सात सैन्यांवर कोण कोण अधिपति नेमावे, याचा तुम्ही विचार करा."

**कृष्ण**—हे भरतश्रेष्ठा, युद्धाचा काल उपस्थित झाला असतां, जसें भाषण करणें उचित आहे, तसेंच तूं बोललास. तुझें सांगणें मला मान्य आहे. त्याप्रमाणेंच सर्व व्यवस्था होऊं दे. तुझ्या साती सैन्यावर सेनापतींची योजना कर.

**वैशंपायन**—राजा, त्यानंतर युधिष्ठिरानें द्रुपद, विराट, सात्यकि, धृष्टद्युम्न, धृष्टकेतु, शिखंडी आणि मागध सहदेव या सात युद्धाभिकाङ्क्षी वीरांना बोलावून आणविलें व त्यांना सेनापतींचा यथाविधि अभिषेक केला. धृष्टद्युम्नाला त्या सर्व

महात्म्या सेनापतींचा अधिपति नेमलें. तो द्रुपदाचा पुत्र द्रोणाचा वध करण्यासाठींच प्रदीप्त अग्नींतून उत्पन्न झाला होता. धनंजयाला त्या सेनानींचाहि सेनाध्यक्ष केलें आणि श्रीमान् बुद्धिमान् जनार्दन अर्जुनाचा नेता व त्याच्या श्रेष्ठ अश्वांचें नियमन करणारा झाला.

( ३ ) याप्रमाणें क्षत्रियांचा क्षय करणारें तें युद्ध उपस्थित झालेलें पाहून बलरामानें पांडवांच्या भवनांत प्रवेश केला. तो हलधर अक्रूर, गद, सांब, रुक्मीणीचा पुत्र, आहुकसुत, चारुदेष्ण आणि व्याघ्रासारखे बलाढ्य असलेले वृष्णिवीर यांनीं परिवेष्टित असल्यामुळें मरुद्गणांनीं युक्त असलेल्या इंद्राप्रमाणें संरक्षित होता.

त्या कृष्णाग्रजानें रेशमी नील वस्त्र परिधान केलें होतें. तो कैलासशिखराप्रमाणें भव्य दिसत होता. त्याचे नेत्र आरक्त असून तो सिंहासारख्या लीलागतीनें चालत होता. श्रीमान् हलायुध येत आहे, असें पहातांच धर्मराज, केशव, चारी पांडव भ्राते व इतरहि जे भूपति तेथें जमले होते, ते सर्व उठून उभे राहिले व त्यांनीं त्यांच्या समीप आलेल्या त्या बलरामाचा सत्कार केला. नंतर युधिष्ठिरानें त्याचा हात धरून त्याला आंत आणलें. वासुदेवादिकांनीं त्याला अभिवादन केलें. बलरामानें विराट-द्रुपदादि वृद्धांना वंदन केलें. तो रेवतीपति युधिष्ठिरासह बसला असतां ते सर्व राजे त्याच्या सभोंवार बसले.

नंतर ते सर्व नृपति बसले असतां हलधरानें वासुदेवाकडे पाहून असें भाषण केलें—" हा क्षत्रियांचा क्षय करणारा, महा उग्र व दारुण संग्राम उपस्थित झाला आहे. दैवच तसें निश्चित आहे, त्याचें उल्लंघन करतां येणें शक्य नाहीं. तरीहि या युद्धांतून पार पडलेल्या तुम्हांला मी व्याधिरहित व क्षतरहित पाहीन, अशी माझी मति आहे. येथें युद्धार्थ जमलेलीं हीं सर्व क्षत्रियकुलें कालांनींच परिपक्क झालीं आहेत, यांत संशय नाहीं. ज्यामध्यें मांस व रक्त यांचा चिखल झाला आहे, असा हा घनघोर संग्राम होईल.

या वासुदेवाला मी एकांतांत वारंवार सांगत आलों आहें कीं, हे मधुसूदना, आपल्या संबंधि-बांधवांशीं तूं समवर्तन ठेव. पांडव जसे आपले आप्त आहेत, तसा दुर्योधनहि आहे. त्यालाहि आपण साहाय्य केलें पाहिजे.

परंतु हे युधिष्ठिरा, या मधुसूदनानें तुझ्यासाठीं माझें हें वचन ऐकलें नाहीं. त्यानें धनंजयाकडे पाहून तुम्हांलाच सर्वस्वीं वाहून घेतलें आहे. तेव्हां निःसं-

शय पांडवांचाच जय होणार, अशी माझी निश्चित मति आहे आणि वासुदेवाचा अभिनिवेशहि तसाच आहे.

हे भारता, मी वासुदेवावांचून या जीवलोकाला पहाण्यासहि समर्थ नाहीं. यास्तव मला केशवाच्या इच्छेप्रमाणेंच वागलें पाहिजे. परंतु गदायुद्धांत विशारद असलेले भीमसेन व दुर्योधन हे दोघेहि माझे शिष्य आहेत व त्या दोघांहि वीरांवर माझें सारखेंच प्रेम आहे. युद्धामध्यें माझ्या समक्ष कौरवांचा नाश होऊं लागला असतां मला त्याची उपेक्षा करतां येणें शक्य नाहीं. तस्मात् मी सरस्वती-नदीच्या तीरावरील तीर्थयात्रा करावयास जातों."

असें बोलून त्या बलरामानें पांडवांची अनुज्ञा घेतली व त्याला पोंचविण्यासाठीं मागोमाग चाललेल्या मधुसूदनाला परत फिरवून तो तीर्थयात्रेला निघून गेला. ५. ७. १५७.

---

## अध्याय १५८ वा.

[ १ पांडवांच्या साह्यार्थ रुक्मीचें आगमन. शार्ङ्गादि धनुष्यांचें वर्णन. २ रुक्मीचा वृत्तान्त. ३ त्याचें आत्मश्लाघायुक्त साह्याचें आश्वासन. ४ अर्जुनानें केलेला त्याचा निषेध. ५ रुक्मीचें दुर्योधनाकडे गमन. तेथून स्वनगरीस प्रयाण. ]

( १ ) वैशंपायन—राजा जनमेजया, याच वेळीं दक्षिणदेशाधिपति भोजकुलोपन्न महायशस्वी भीष्मकराजाचा दाही दिशांत प्रसिद्ध असलेला पुत्र रुक्मी पांडवांकडे आला. हा भीष्मकराजा इंद्राचा साक्षात् मित्र असून 'हिरण्यरोमा' या नांवानें प्रसिद्ध होता व त्याचा हा पुत्र सत्यसंकल्प, दृढनिश्चयी असून गंधमादन पर्वतावर राहाणाऱ्या 'द्रुम'-नामक किन्नरश्रेष्ठाचा शिष्य होता. त्याच्यापासून त्याला चतुष्पादयुक्त समग्र धनुर्वेद प्राप्त झाला होता. त्या महाबाहूनें श्रीकृष्णाचें शार्ङ्ग व अर्जुनाचें गांडीव या श्रेष्ठ तेजस्वी धनुष्यांच्या तुल्य इंद्राचें 'विजय'-संज्ञक दिव्य धनुष्य संपादन केलें होतें. शार्ङ्ग, गांडीव व विजय हीं तीनच देवांचीं दिव्य धनुष्यें आहेत. वरुणाचें गांडीव, इंद्राचें विजय, व विष्णूचें शार्ङ्ग धनुष्य आहे. तें शत्रुसैन्याला भयावह असलेलें तेजोमय दिव्य धनुष्य श्रीकृष्णानें धारण केलें. गांडीवधनुष्य खांडववनांत अर्जुनाला अग्नीपासून प्राप्त झालें आणि विजय धनुष्य महातेजस्वी रुक्मीला 'द्रुम'-गुरूपासून मिळालें आणि हृषीकेशानें मुरु-दैत्याचे पाश

तोडून, त्याचा वध करून नरकासुराला जिंकून व अदितीचीं मणिकुंडलें, विविध रत्नें, व सोळा सहस्र स्त्रिया यांचें जेव्हां हरण करून आणिलें तेव्हां त्याला श्रेष्ठ शार्ङ्गधनुष्याची प्राप्ति झाली.

( २ ) राजा, मेघासारखा प्रचंड ध्वनि करणारें तें विजय धनुष्य प्राप्त झालें असतां रुक्मी जणुंकाय सर्व जगताला भयभीत करीतच पांडवांकडे आला. पूर्वी वासुदेवानें केलेलें रुक्मिणीहरण सहन न होऊन स्वबाहुबलाच्या दर्पानें हा वीर ' मी जनार्दनाचा वध केल्यावांचून परत फिरणार नाहीं ' अशा प्रतिज्ञेनें चतुरंग सेनेसह त्याच्यावर चाल करून गेला होता. तेव्हां त्याची ती प्रचंड सेना विचित्र कवचें व विविध आयुधें धारण करून गंगेच्या प्रवाहा-प्रमाणें पसरली होती. ती अतिशय दूर अंतरावरील शत्रूला वेध करणाऱ्या शूर योद्ध्यांनीं युक्त होती आणि रुक्मीला स्वतःच्या बाहुबलाचा फार गर्व वाटत होता. परंतु योगीश्वर वार्ष्णेय प्रभूनें त्याचा पराभव केला. तेव्हां तो रुक्मी लज्जित झाला व कुंडिनापुरास परत गेला नाहीं.

जेथें कृष्णानें रणामध्यें त्याचा पराभव केला होता, तेथें त्यानें 'भोजकट'-नांवाचें उत्तम नगर वसविलें आणि गज, व अश्व यांनीं युक्त असलेली विपुल सेना त्याच्या सभोंवार ठेविली. त्यामुळें तें 'भोजकट'-नांवानें या पृथ्वीतलावर प्रसिद्ध झालें.

अशा प्रकारचा तो महापराक्रमी भोजराजा एक अक्षौहिणी सैन्य बरोबर घेऊन मोठ्या त्वरेनें पांडवांपाशीं आला. त्यानें धनुष्य, तलत्राण, खड्ग, भाते व कवच धारण केलें होतें, त्या वीरानें वासुदेवाचें प्रिय करण्यासाठीं आपल्या सूर्यासारख्या तेजस्वी ध्वजासह पांडवांच्या महाचमूंत प्रवेश केला, त्यावेळीं राजा युधिष्ठिरानें त्याला सामोरें जाऊन त्याचें स्वागत केलें. इतर पांडुपुत्रांनींहि त्याचा यथाविधि सत्कार करून त्याची प्रशंसा केली. तेव्हां त्यानें त्या सर्वांचा स्वीकार करून सैन्यासह विश्रांति घेतली.

( ३ ) नंतर सर्व वीरांच्या समक्ष तो पराक्रमी रुक्मी धनंजयाला असें वचन बोलला—" हे पांडवा, तुला जर या बलाढ्य शत्रूंशीं युद्ध करण्याची भीती वाटत असेल तर मी तुझ्या साह्यार्थ स्थित आहें. तुझ्या असह्य शत्रूंचा नाश करण्यास मी तुला रणांत साह्य करीन. इहलोकीं माझ्यासारखा पराक्रमी एकहि वीर सांपडणार नाहीं. हे पार्था, तूं रणांमध्यें माझ्याकडे शत्रुसेनेचा जो

भाग सोंपविशील, त्याचा मी संहार करीन. अथवा द्रोण व कृप या दोघां-तील एखादा वीर असो, भीष्म व कर्णहि असोत, किंवा हे सर्व नृपाल असोत त्या सर्वांचा युद्धांत वध करून मी ही पृथ्वी तुला प्राप्त करून देईन."

( ४ ) जनमेजया, सर्व पार्थिव व इतर वीर ऐकत असतां धर्मराज व केशव यांच्या संनिध रुक्मीनें असें आत्मश्लाघायुक्त भाषण केलें ! तेव्हां अर्जुनानें धर्मराज व वासुदेव यांच्याकडे साभिप्राय अवलोकन करून व स्नेहपूर्वक स्मित करून म्हटलें—"हे वीरा, मी कुरुकुलोत्पन्न असून विशेषतः पांडुराजाचा पुत्र आहें. द्रोणाचार्य माझा गुरु असून मी त्याचा प्रिय शिष्य आहें आणि वासु-देव माझा साह्यकर्ता आहे. असें असतां गांडीवधनुष्य धारण करणारा मी 'युद्धाला भीत आहें' असें म्हणेन तरी कसें ! घोषयात्रेच्या प्रसंगीं बलाढ्य गंधर्वांबरोबर मीं जेव्हां युद्ध केलें, त्यावेळीं मला साह्य करणारा कोणता मित्र समीप होता ! देव-दानवांनीं संकुल झालेल्या भयानक खांडववनांत मीं जेव्हां एकट्यानें युद्ध केलें तेव्हां मला कोणाचें साह्य होतें ! निवातकवच आणि कालकेय दैत्य यांच्याशीं झालेल्या युद्धांत मला कोण साह्यकर्ता होता ! त्याचप्रमाणें विराटनगरींत उत्तरगोग्रहण प्रसंगीं असंख्य कौरवांशीं केलेल्या युद्धांत मला साह्य करावयास कोण आलें होतें ! ( अर्थात् कोणीहि नाहीं. ) मीं रुद्र, इंद्र, कुबेर, यम, वरुण, अग्नि, कृप, द्रोण व माधव यांची युद्धा-साठीं आराधना केलेली आहे. गांडीवासारखें तेजस्वी, दृढ व दिव्य धनुष्य, धारण करीत आहें. अक्षय भाते आणि दिव्य अस्त्रें यांनीं संपन्न आहें. असें असतांना माझ्यासारखा योद्धा प्रत्यक्ष इंद्र जरी युद्धाला आला तरी 'मी भ्यालों' असें यशाची हानि करणारें वचन कसा बोलेल ! हे महा-बाहो, मी शत्रूला भीत नाहीं, किंवा मला कोणाच्या साह्याची अपेक्षाहि नाहीं. यास्तव तुझी इच्छा असेल तेथें तूं जा किंवा येथें रहा. तुला जें योग्य वाटेल तें कर."

( ५ ) अर्जुनाचें हें भाषण ऐकून रुक्मी आपली सागरासारखी प्रचंड सेना घेऊन दुर्योधनाकडे गेला व त्यालाहि त्यानें अशीच आपली साह्य करण्याची इच्छा दर्शविली. परंतु स्वतःच्या शौर्याचा अभिमान असलेल्या मानी दुर्यो-धनाला त्याची आत्मप्रौढी सहन झाली नाहीं. त्यानेंहि त्याचें साह्य घेण्याचें नाकारलें, तेव्हां तो आल्या मार्गानें निघून गेला.

हे महाराज, याप्रमाणें बलराम व रुक्मी हे दोघेच वीर त्या युद्धापासून पराङ्मुख झाले. वार्ष्णेय बलराम तीर्थयात्रेला गेला व भीमकराजाचा पुत्र रुक्मी परत फिरला. ते दोघे निघून गेले असतां पांडव पुढील संकेत करण्यासाठीं पुनः एकत्र बसले. त्यावेळीं भूपालांनीं व्यापलेली धर्मराजाची ती सभा नक्षत्रयुक्त चंद्रानें शोभणाऱ्या आकाशाप्रमाणें शोभली. ५. ७. १५८.

---

## अध्याय १५९ वा.

[ १ धृतराष्ट्राचा संजयाला प्रश्न. २ संजयाचें उत्तर. ]

जनमेजय—हे द्विजश्रेष्ठा, कालानेंच ज्यांना प्रेरणा केली आहे, त्या कौरवांनीं कुरुक्षेत्रांत व्यूह रचून सैन्य सज्ज केल्यावर पुढें काय केलें तें सांग.

( १ ) वैशंपायन—हे महाराज, याप्रमाणें दोन्ही सैन्यें व्यूह रचून युद्धार्थ सज्ज झालीं असतां धृतराष्ट्रानें संजयाला असा प्रश्न केला—

धृतराष्ट्र—हे संजया, ये आणि कौरव-पांडवांच्या शिबिरांतील सर्व वृत्तान्त मला सविस्तर कथन कर. खरोखर दैवच बलवत्तर असून पराक्रम व्यर्थ आहे, असें मी समजतों. या विषयीं तूं माझेंच उदाहरण घे. युद्ध सर्व कुलाचा क्षय करणारें आहे, हा युद्धदोष मी जाणतों. दुर्योधनाची बुद्धि धर्माकडे नसून तो कपटपटु आहे, हेंहि मला ठाऊक आहे. तथापि त्या कपटद्यूत खेळणाऱ्या पुत्राचें नियमन करण्यास व स्वतःचें हित साधण्यास मी समर्थ नाहीं. हे सर्व दोष पाहून त्यापासून निवृत्त व्हावें असें माझ्या बुद्धीला वाटतें, परंतु दुर्योधनाची भेट होतांच ती बुद्धि पुनः विपरीत होते. असें असल्यामुळें जें होणार असेल तें होईल. रणामध्यें देहत्याग करणें हाच क्षत्रियांचा पूज्य धर्म आहे.

( २ ) संजय—हे महाराज, तुझा हा प्रश्न युक्तच आहे. तूं म्हणतोस तेंच खरें, पण या अनर्थांचा सर्व दोष दुर्योधनावरच लादूं नको. तूं माझें भाषण लक्षपूर्वक ऐक. जो मनुष्य स्वतःच्या दुश्चरितानें अशुभाला प्राप्त होतो, त्यानें त्याचा दोष देव किंवा दैव यांच्यावर लादणें योग्य नव्हे. हे राजन्, जो पुरुष मनुष्यलोकामध्यें निंद्य आचरण करितो, तो सर्व लोकांना वध्य होतो. तुम्हीं अमात्यांसह पांडवांना कपटद्यूतानें जिंकून त्यांना तिरस्कृत केलेंत. परंतु पांडवांनीं तुझ्याकडे पाहून तें सर्व आजवर सहन केलें व शेवटीं ते समरांगणांत

आले आहेत. दोन्ही सैन्यें रणभूमीवर उपस्थित झालीं आहेत. समराच्या निमित्तानें अश्व, गज व अतिशय पराक्रमी राजे यांचा कसा संहार झाला, तो मी तुला सांगतों. सर्व लोकांचा क्षय करणाऱ्या या युद्धाचा वृत्तान्त स्थिर होऊन एकाग्रचित्तानें ऐक. पाप किंवा पुण्य यांतील कोणत्याच कर्मांचा कर्ता पुरुष नाहीं. मनुष्य परतंत्र आहे. कळसूत्री बाहुलीप्रमाणें त्याच्या हातून कर्म करविलें जातें. या विषयीं कोणी म्हणतात कीं, ईश्वराच्या प्रेरणेनें तीं होतात व कोणी मानतात कीं तीं यदृच्छेनें होतात. दुसरे कित्येक असें समजतात कीं पूर्वकर्मानुसार तीं घडून येतात. या कर्मांविषयीं अशीं हीं तीन प्रकारचीं भिन्न भिन्न मतें आहेत. तस्मात् तुजवर जरी हा अनर्थ ओढवला आहे, तरी स्थिर हो आणि शांत चित्तानें पुढील वृत्तान्त ऐक. ५. ७. १५९.

येथें सातवें सैन्यनिर्याणपर्व समाप्त झालें.

## उलूकदूतगमनपर्व ८.



### अध्याय १६० वा.

[ १ दुर्योधनाचा कर्णादिकांशीं संकेत. २ पांडवांकडे उलूकप्रेषण. ३ बिडालाख्यान. ४ दुर्योधनाचा कृष्णासह पांची पांडवांना उपहासपूर्वक संदेश. ५ सैन्यसागराचें रूपक. ]

( १ ) **संजय**—हे महाराज, महात्म्या पांडवांनीं हिरण्वती नदीच्या तीरावर तळ दिला असतां कौरवांनींहि आपलें शिबिर स्थापन केलें व दुर्योधनराजानें आपल्या सैन्यासह तेथेंच निवास केला. त्यानें नृपतींना बोलावून आणून सैन्याचे गुल्म त्यांच्या स्वाधीन केले व सैनिकांचें रक्षण करण्यास सांगितलें. नंतर त्या धार्तराष्ट्रानें कर्ण, दुःशासन व शकुनि यांना बोलावून आणून त्यांच्याशीं संकेत चालविला. त्या राजानें कर्ण, दुःशासन व शकुनि यांच्याशीं पृथक् पृथक् पुष्कळ विचार केला व 'उलूक'-नामक दूताला एकांतांत बोलावून आणून त्याला असें म्हटलें.

( २ ) **दुर्योधन**—हे द्यूतकार उलूका, सोमकांसह असलेल्या पांडवांकडे जा आणि वासुदेवाच्या समक्ष त्यांना माझा असा संदेश सांग. युधिष्ठिराला

म्हणावें कीं, अनेक वर्षांपासून घाटत असलेलें हें कौरव-पांडवांचें भयंकर युद्ध उपस्थित झालें आहे. ज्याचा अनुज वृथा गर्जना करीत आहे, अशा तुझी आत्मप्रशंसा संजयानें मला सांगितली. त्याचा काल आतां समीप आला आहे. तुम्हीं जी प्रतिज्ञा केलीत, ती सर्व आतां पूर्ण करून दाखवा.

सर्व सोमक व केकय भ्राते यांच्यासह बसलेल्या त्या ज्येष्ठ पांडवाला माझा असा निरोप सांग कीं, तूं स्वतःला मोठा धार्मिक म्हणवितोस, पण आतां तुझें मन या अधर्मांत कसें प्रवृत्त झालें! तूं सर्व भूतांना अभय देणारा आहेस असें मी समजत होतों, परंतु असा दयालु म्हणून प्रसिद्ध असलेला तूं तर एखाद्या निर्दयाप्रमाणें सर्व जगताच्या नाशाची इच्छा करीत आहेस!

हे भरतश्रेष्ठा, पूर्वीं देवतांनीं राज्य हरण केलें असतां प्रह्लादानें गायिलेला हा श्लोक श्रुत आहे.

हातांत पवित्र दर्भादि धारण करून ज्याचें धर्मचिह्न देवाच्या ध्वजाप्रमाणें सर्व लोकांत प्रसिद्ध असतें व ज्याचीं सर्व गुप्त पापें बाह्याचरणानें झांकलीं जातात, त्याला 'बैडालव्रत' असें म्हणतात. तें श्रेष्ठ आख्यान नारदानें माझ्या पित्याला सांगितलें होतें, तेंच मी तुला कथन करितों. ऐक.

( ३ ) नारद—हे राजन्, एक दुष्टबुद्धि मार्जार होता. तो एकदा आपला सर्व व्यापार सोडून गंगातीरावर हात वर करून उभा राहिला व सर्व प्राण्यांचा विश्वास संपादन करण्यासाठीं हिंसेपासून निवृत्त होऊन 'मी धर्माचरण करीत आहें' असें सर्व पशु-पक्ष्यांना सांगूं लागला. अशाप्रकारें बराच काल गेला असतां त्याच्यावर विश्वास ठेवून पक्षी त्याच्या भोंवतीं जमले व त्या मार्जाराची प्रशंसा करूं लागले, तेव्हां सर्व पक्ष्यांकडून सत्कार केला गेलेला तो पक्षिभक्षक मार्जार आपलें तप सफल झालें असें मानून स्वतःला कृतकार्य समजूं लागला.

त्यानंतर दीर्घ कालानें कांहीं मूषक त्या प्रदेशांत आले. तेव्हां हा व्रताचरण करणारा धार्मिक त्यांच्या दृष्टीं पडला. त्याला पाहून व त्याचें तें सर्व दांभिक आचरण अवलोकन करून त्या मूषकांनीं असा निश्चय केला "आपण सर्व विपुल आप्तांनीं युक्त आहोंत. आपल्याला पुष्कळ मित्र आहेत; पण, आपल्याला

---

१ यस्य धर्मध्वजो नित्यं सुराध्वज इवोच्छ्रितः।
प्रच्छन्नानि च पापानि बैडालं नाम तद्व्रतम्॥

मातुल नाहीं, यास्तव आपण या धार्मिक बोक्याला आपला मामा करूं या. तो आम्हां आबालवृद्धांचें सतत रक्षण करो."

असा संकेत करून ते सर्व मूषक त्या मांजराजवळ जाऊन असें म्हणाले— "हे तपस्वी मातुला, तुझ्या प्रसादानें आम्ही सर्वत्र सुखानें संचार करण्याची इच्छा करितों. अव्यग्र असलेल्या आमची तूंच गति आहेस. तूंच आमचा परम सुहृद् आहेस. आम्ही सर्व एकत्र जमून तुला शरण आलों आहों. हे महाप्राज्ञा, तूं नित्य धर्मपरायण असून धर्मांत स्थित आहेस. यास्तव देवांचें रक्षण करणाऱ्या इंद्राप्रमाणें तूं आमचें संरक्षण कर."

हे धृतराष्ट्रराजा, त्या सर्व मूषकांनीं अशी प्रार्थना केली असतां तो मूषकांचा अंतक त्या सर्वांना म्हणाला—"हे वत्सांनो, मला तुमचें रक्षण आणि तपश्चरण हीं दोन्हीं कार्यें एकाच वेळीं करतां येणें शक्य नाहीं. तथापि तुमच्या वचनाप्रमाणें मला तुमचें हित करणें अवश्य आहे. परंतु तुम्हींहि माझ्या सांगण्याप्रमाणें नित्य एक कार्य केलें पाहिजे. दृढ नियमांत स्थित असलेला मी तपानें श्रांत झालों आहें, मला चालण्याची शक्ति राहिली नाहीं. यास्तव बाबांनों, यापुढें तुम्ही मला येथून उचलून नदीतीरावर नित्य नेत जा."

तेव्हां त्या सर्व मूषकांनीं 'ठीक आहे' असें म्हटलें व आबालवृद्ध सर्व मूषकांना त्यांच्या संरक्षणार्थ मार्जाराच्या स्वाधीन केलें. त्यानंतर तो पापी दुष्टात्मा बोका नित्य त्या मूषकांना भक्षण करूं लागला आणि अल्पावधींतच पुष्ट, तेजस्वी व सुदृढ झाला. दिवसेंदिवस मूषकांचा समूह क्षीण होऊं लागला व मार्जार तेजोबलानें युक्त होऊन त्याची वृद्धि होऊं लागली. तें पाहून सर्व मूषक एकत्र जमून परस्परांस म्हणाले—"आपला हा मातुल नित्य पुष्ट होत चालला आहे, व आपला अतिशय क्षय होत आहे. ( याचें काय बरें कारण असावें ! )"

तेथें 'डिण्डिक'-नांवाचा एक अतिशय बुद्धिमान् मूषक होता, तो त्या मूषकांच्या समूहाला म्हणाला—"तुम्ही सर्व एकत्र जमून नदीतीरावरून परत फिरा व मी मातुलासह मागें रहातों. ( म्हणजे तो तेथें काय करीत असतो, हें आपल्याला कळेल. )"

त्याचें हें भाषण ऐकून त्या सर्व मूषकांनीं 'धन्य' धन्य' असें बोलून त्याचा सत्कार केला आणि डिण्डिकाच्या सांगण्याप्रमाणें वर्तन केलें. त्यांचा

हा संकेत माहित नसल्यामुळें मार्जारानें डिण्डिकालाच भक्षण केलें. तेव्हां ते सर्व मूषक पुनः एकत्र जमून विचार करूं लागले. त्यांच्यामध्यें 'कोलिक' नांवाचा एक अतिशय वृद्ध मूषक होता. तो त्या आपल्या ज्ञातिसमुदायांत असें वचन बोलला—" हा मातुल धर्माचरणी दिसत नाहीं. याचें मित्र नसणाऱ्या आम्हांशीं बाह्यतः मित्रवत् वर्तन हें कपट आहे. हा फलमूलाशन करणारा नाहीं. कारण याची विष्ठा लोमयुक्त असते. शिवाय याच्या सर्व गात्रांची वृद्धि होत असून मूषकसमूहाचा क्षय होत चालला आहे. अलीकडे सात आठ दिवसांपासून डिण्डिकहि कोठें दिसत नाहीं. "

त्याचें हें भाषण ऐकून ते सर्व मूषक तेथून पळून गेले व तो दुष्टात्मा मार्जारहि आल्या मार्गानें निघून गेला.

(४) दुर्योधन—उलूका, त्या युधिष्ठिराला म्हणावें कीं, हे दुष्टा, तूंहि असेंच वैडालव्रत आरंभिलें आहेस. तो मार्जार जसा मूषकामध्यें संचार करीत होता, तसा तूं सर्वदा आपल्या ज्ञातिबांधवांत धार्मिकाप्रमाणें वागत आहेस. तुझें भाषण एकप्रकारचें असतें व वर्तन त्याच्या विपरीत दिसून येतें. तुझें वेदाध्ययन व शांति हा लोकांना फसविण्यासाठीं केवल दंभ आहे. तुझें अजातशत्रुत्व हें ढोंग आहे. यास्तव हे राजा, हें कपटाचरण सोडून क्षत्र-धर्माचा आश्रय कर आणि सर्व विहित कार्यें कर. कारण तूं मोठा धर्मिष्ठ आहेस !

हे नरश्रेष्ठा, तूं बाहुबलानें पृथ्वी प्राप्त करून घे आणि ब्राह्मण व पितर यांना यथोचित दान दे. मातेच्या हितांत रत असलेला तूं अनेक वर्षें क्लेश भोगीत असलेल्या मातेच्या अश्रूंचें परिमार्जन कर आणि रणांत शत्रूंना जिंकून परम सन्मानालाच प्राप्त हो.

मोठ्या यत्नानें केवल पांच ग्रामांची याचना करणाऱ्या पांडवांना आम्हीं ते ग्रामहि नाकारले. कारण पांडवांना क्रुद्ध केल्यावांचून आम्ही त्यांच्याशीं समरांगणांत युद्ध कसें करूं शकलों असतों !

आम्हीं तुझ्यासाठीं दुष्टबुद्धि विदुराचा त्याग केला. हे कौंतेया, जातुगृहांत आम्हीं केलेल्या दाहांचें स्मरण कर व पुरुष हो. कौरवसभेंत येणाऱ्या कृष्णाला तूं जें म्हणालास कीं, हा मी शमाला व समरालाहि सज्ज आहें, त्या समराचा हा काल आतां प्राप्त झाला आहे. हे युधिष्ठिरा, एवढ्यासाठींच मीं हे सर्व प्रकार घडवून आणले. युद्धावांचून क्षत्रियाला दुसरा कोणता श्रेष्ठ लाभ आहे !

शिवाय तूं प्रसिद्ध क्षत्रिय कुलांत उत्पन्न झाला आहेस व भूलोकीं प्रसिद्ध आहेस, तूं द्रोण व कृप या दोघां आचार्यांपासून अस्त्रें संपादन केलीं आहेस. सत्कुल व बल यांत आपण दोघेहि समान आहों. वासुदेवाचा तुला आश्रय आहे. ( मग युद्धाला कां भितोस ! )

हे उलूका, पांडवांच्या समक्ष वासुदेवाला माझें असें वचन कथन कर— "कृष्णा, तूं स्वतःसाठीं व पांडवांसाठीं माझ्याशीं युद्ध कर. सभेमध्यें तूं मायेनें जें रूप प्रकट केलेंस, तें पुनः अर्जुनासह धारण करून मला युद्धांतून पळून जाण्यास लाव. इंद्रजाल, माया, कुहक इत्यादि सर्व भीषण दृश्य युद्धप्रसंगीं शस्त्रांनीं सज्ज झालेल्या योद्ध्यांना भयभीत न करतां उलट त्यांना क्रुद्ध करीत असतें. आम्हीहि मायेनें आकाशांत, पृथ्वींत किंवा रसातलांत प्रवेश करण्यास समर्थ आहों. आमच्या देहांत अनेकप्रकारचीं रूपें आम्हांलाहि दाखवितां येतात. असल्या भयप्रदर्शनादिरूप प्रकारानें स्वतःची कार्यसिद्धि जशी कदापि होत नसते, तसेंच त्यापासून शत्रूलाहि भय वाटत नसतें. ईश्वरच आम्हांला वश करण्यास समर्थ आहे. तुझे हे मायावी प्रकार आम्हांला वश करूं शकणार नाहींत.

हे वार्ष्णेया, 'धार्तराष्ट्रांचा रणांत वध करून मी पृथापुत्रांना हें श्रेष्ठ राज्य देईन' असें जें तूं म्हटलेंस, तें तुझें सर्व भाषण संजयानें मला सांगितलें आहे. 'माझ्यासह सव्यसाची पार्थाशीं तुमचें वैर आहे' असें जें तूं म्हटलें होतेंस, तें सत्य कर. तूं सत्यप्रतिज्ञ होऊन पांडवांसाठीं रणामध्यें येऊन युद्ध कर. आम्हांला आतां तुझा पराक्रम पाहूं दे. तूं आपला पुरुषार्थ प्रकट कर.

जो वीर शत्रूला ओळखून आपल्या बाहुबलाचा आश्रय करतो व शत्रूचा शोक वाढवितो तोच सुखानें जिवंत रहातो. हे कृष्णा, लोकांत तुझ्या महद्यशाची जी व्यर्थ प्रसिद्धि आहे, ती आज आम्हांला कळून येईल. श्मश्रुलत्वादि पुरुष-चिह्नांनीं युक्त असलेल्या दुर्बल वीरांतच तुझें शौर्य प्रसिद्ध आहे. कंसाचा भृत्य असलेल्या तुझ्याशीं विशेषतः मजसारख्या नृपतीनें युद्ध करणें कदापि युक्त नाहीं. ( पण मी हा तुझ्यावर अनुग्रहच करीत आहें. )"

हे उलूका, तसेंच त्या श्मश्रुशून्य, मूढ, खादाड व मूर्ख भीमसेनाला माझें असें वचन कथन कर—" हे पृथापुत्रा, तूं विराटनगरींत सूदकर्म करून 'बल्लव'

नांवानें जो प्रसिद्ध झालास, तो माझाच पराक्रम आहे. तूं पूर्वी कौरवसभेंत जी प्रतिज्ञा केली होतीस, ती आतां मिथ्या करूं नको. तुला शक्य असेल तर दुःशासनाचें रक्त पिऊन दाखीव. हे कौंतेया, तूं ' मी धार्तराष्ट्राचा समरांत वध करीन ' अशी जी वल्गना करीत असतोस, त्याचा समय आतां प्राप्त झाला आहे. तूं नेहमीं अन्न-पानादि व भोजन यांचाच पुरस्कार करावास. कोठें युद्ध व कोठें भोजन ! आतां युद्ध करून पुरुषार्थ प्रकट कर. हे वृकोदरा, तूं सभेमध्यें ज्या वल्गना केल्यास त्या व्यर्थ आहेत. रणामध्यें हत झालेला तूं गदेला आलिंगन देऊन रणभूमीवर शयन करशील."

उलूका, आतां नकुलाला माझा असा संदेश सांग—"हे माद्रीपुत्रा, तुझा युधिष्ठिरावर अनुराग असून माझ्याशीं द्वेष आहे. यास्तव आतां स्थिर होऊन युद्ध कर व आम्हांला तुझा पुरुषार्थ पाहूं दे. आम्हीं कृष्णेला दिलेल्या क्लेशांचा यथायोग्य विचार कर."

तसेंच तूं सर्व राजांच्या समक्ष सहदेवाला माझें असें वचन कळीव—" हे पांडुपुत्रा, आजपर्यंतच्या क्लेशांचें स्मरण कर व आतां रणांगणांत युद्धाला उभा रहा."

त्याचप्रमाणें विराट व द्रुपद या दोघांना माझा असा निरोप सांग—" हे वृद्धांनो, सृष्टिकर्त्या प्रजापतीनें प्रजा निर्माण केल्यापासून तुमच्यासारखे राजे व भृत्य यांचा योग जमला नव्हता. युधिष्ठिरासारखा भर्ता व तुमच्यासारखे महागुणवान् भृत्य आम्हीं यापूर्वी कोठेंहि पाहिले नाहींत ! हे मूढांनो, माझ्या सारख्या गुणवान् स्वामींवर तुम्ही संतुष्ट झालां नाहींत आणि युधिष्ठिरासारख्या गुणरहितावर प्रसन्न झालां आहांत. तुमच्यासारख्या दोघां श्रेष्ठ नरपतींनीं पांडवांच्या साह्यार्थ यावें हें अश्लाघ्य आहे. तथापि ज्याअर्थी तुम्ही एकत्र होऊन माझ्या वधार्थ सज्ज झालां आहांत त्याअर्थी स्वतःसाठीं व पांडवांच्या हितासाठीं माझ्याशीं युद्ध करा.

पांचाल्य धृष्टद्युम्नाला म्हणावें कीं, तूं जी द्रोणवधाची प्रतिज्ञा केली आहेस, ती पूर्ण करण्याचा काल आतां प्राप्त झाला आहे. समरांत द्रोणाची गांठ पडली म्हणजे तुला आपलें हित झालेलें कळून येईल. यास्तव तूं पांडवांसाठीं युद्ध करून गुरुहत्येचें हें पातक अवश्य संपादन कर. पण हें कर्म अतिशय दुष्कर आहे, हें लक्षांत ठेव. उलूका, शिखंडीला माझा असा निरोप सांग कीं, धनु-

धरेंतील श्रेष्ठ महाबाहु गांगेय तुला 'स्त्री' मानून तुझ्याशीं कदापि युद्ध करणार नाहीं. यास्तव तूं निर्भयपणें युद्धाला सज्ज हो. रणांगणांत येऊन आपलें शौर्य प्रकट कर व आम्हांला तुझा पुरुषार्थ पाहूं दे.

वैशंपायन—राजा, असें बोलून तो दुरात्मा दुर्योधन मोठ्यानें हंसला व पुनः उलूकाला असें म्हणाला—हे उलूका, वासुदेव ऐकत असतां, तूं धनंजयाला पुनः एकदा माझा संदेश कथन कर. त्याला म्हणावें कीं, हे पांडवा, एकतर आम्हांला जिंकून तूं या पृथ्वीचें राज्य कर. किंवा आम्हांकडून पराजित झालेला तूं रणांगणांत शयन कर. हे वीरा, तुमचें राज्यहरण, वनवास व आम्हीं द्रौपदीला दिलेले क्लेश यांचें स्मरण कर आणि आपला पुरुषार्थ दाखीव. ज्यासाठीं क्षत्रियस्त्री पुत्राला जन्म देते, त्या कार्याचा काल आतां समीप येऊन ठेपला आहे. यास्तव तूं आपलें बल, वीर्य, शौर्य, व श्रेष्ठ अस्त्रलाघव प्रकट करून युद्धांत पुरुषार्थ दाखीव. आपल्या क्रोधाची निष्कृति कर.

ज्याला दीर्घकाल क्लेश दिले आहेत, जो ऐश्वर्यापासून च्युत होऊन दीन झाला आहे, अशा कोणत्या पुरुषाचें हृदय क्रोधानें भग्न होणार नाहीं! परद्रव्याची इच्छा न करणाऱ्या कुलीन व शूर पुरुषाचें राज्य हरण केलें असतां, कोणाचा क्रोध प्रज्वलित होणार नाहीं!

तूं ज्या मोठमोठ्या वल्गना केल्यास, त्या सर्व आतां कृतीनें सत्य करून दाखीव. युद्ध केल्यावांचूनच आत्मप्रशंसा करणाऱ्याला सज्जन हीन पुरुष समजतात. तुझें राज्य व तुझी जीविका हीं दोन्ही शत्रूंच्या हातीं आहेत. त्यांचा तूं पुनः उद्धार करून स्वाधीन करून घे. राज्यप्राप्ति व स्वातंत्र्य हे दोन युद्धाचे हेतु आहेत. यास्तव युद्ध करून हे दोन्ही अर्थ संपादन कर. आम्हीं द्यूतांत तुमचा पराजय करून कृष्णेला सभेंत आणिलें. मानी पुरुषाला याचा क्रोध येणेंच शक्य आहे. तुम्ही बारा वर्षें गृह सोडून वनवासांत राहिलांत, एक वर्ष विराटाच्या घरीं दास्यभावांत काढलेंत. आम्हीं तुमच्या राज्याचें हरण केलें, वनवासाचें दुःख भोगावयास लाविलें आणि पांचालीला क्लेश दिले. या सर्वांचें स्मरण करून पुरुषार्थ प्रकट कर. शत्रूला बोलण्यास योग्य अशीं दुर्वचनें आम्हीं तुला ऐकविलीं, त्याचा तरी क्रोध व्यक्त कर. क्रोध हाच पुरुषार्थ आहे. हे पार्था, तुझा क्रोध, बल, वीर्य, ज्ञानयोग व अस्त्रलाघव या लोकीं सर्वांच्या दृष्टीं पडो. तूं युद्धाला सज्ज हो.

हे पांडवा, तुझेंच शस्त्रांचें मंत्रयुक्त पूजन झालें आहे, त्यामुळें तीं सर्व स्वच्छ झालीं आहेत. कुरुक्षेत्रांतील भूमि कर्दमरहित आहे, तुझे अश्व, भृत्य व योद्धे सदृढ झालेले आहेत. यास्तव आतां युद्धाला विलंब लावूं नको. केशवासह उद्यांच युद्धाला उभा रहा. भीष्माची युद्धांत गांठ पडण्यापूर्वीच तूं आत्मश्लाघा कां करीत आहेस! ज्याप्रमाणें एखाद्या दुर्बलानें गंधमादन पर्वतावर चढून जाण्याच्या वल्गना कराव्या, त्याप्रमाणेंच तूं आत्मप्रशंसा करीत आहेस. यास्तव व्यर्थ वल्गना न करितां पुरुषार्थ दाखीव.

सूतपुत्र कर्ण, अतिशय दुराधर्ष आहे, शल्य बलवानांतील श्रेष्ठ आहे आणि द्रोण इंद्राप्रमाणें युद्धामध्यें बलवानांहूनहि वरिष्ठ आहे. या सर्वांना जिंकल्यावांचून हे पार्था, तूं राज्याची इच्छा कशी करितोस!

हा द्रोणाचार्य वेद व धनुर्विद्या या दोहोंत प्रवीण आहे. तो युद्धामध्यें सैन्यांत अग्रभागीं स्थित होऊन संचार करूं लागला म्हणजे कोणाचीहि गणना करीत नाहीं. अशा महाद्युतिमान द्रोणाला जिंकण्याची तूं व्यर्थ आशा करीत आहेस! हे पार्था, वायूनें मेरुपर्वताचें उन्मूलन केलें आहे, असें कोणीं कधीं ऐकलें आहे का! वायु जर मेरूला वाहून नेईल, आकाश भूमीवर पडेल, युगाचें परिवर्तन होईल, तर तूं म्हणतोस त्याप्रमाणें घडून येईल. पार्थ किंवा दुसरा कोणता जीविताकांक्षी वीर या अरिंदमाला प्राप्त होऊन अक्षत शरीरानें घरीं परत जाईल! शस्त्रानें आमच्या वधाचें चिंतन करणारा कोणता मर्त्य रणांतून जिवंत सुटेल! देवांकडून सुसंरक्षित असलेल्या स्वर्गलोकांप्रमाणें नरेंद्रांनीं रक्षण केलेली व देवसेनेसारखी येथें जमलेली राजचमू जोंवर पाहिली नाहींस, तोंवरच कूपांतील मंडूकाप्रमाणें तूं वल्गना करीत आहेस.

हे मतिमंदा, माझ्या या सैन्यांत पूर्व, पश्चिम, दक्षिण व उत्तर या देशांतील नृपाल, काम्बोज, शक, खश, मत्स्यासह शाल्व, कुरुदेश, मध्यदेश, म्लेच्छ, पुलिंद, द्रविड, आन्ध्र, व कांच्य या देशांतील अधिपति आहेत. माझें हें बहुविध सैन्य गंगेच्या प्रचंड ओघाप्रमाणें दुस्तर व अपार पसरलें आहे. अशा या सैन्याच्या मध्यभागीं हत्तींच्या समुदायांत स्थित असलेल्या माझ्याशीं युद्धाची इच्छा करितोस काय!

हे पृथापुत्रा, तुझे अक्षय्य भाते, अग्नीनें दिलेला रथ व दिव्य ध्वज हें सर्व मीं पाहिलें आहे. त्यांचा काय प्रभाव आहे, तो आतां वल्गना न करतां

युद्धांतच दाखीव. व्यर्थ बडबड कां करतोस ! युद्धानें जी कार्यसिद्धि होत असते, ती आत्मश्लाघेनें होत नसते. हे धनंजया, लोकांमध्यें जर केवल आत्मप्रशंसेनें कार्य साध्य झालें असतें, तर सर्वच लोक कृतकार्य झाले असते. अकृतार्थ कोणीच राहिला नसता. कारण वल्गाना करण्यांत असमर्थ कोण आहे ! (कोणीच नाहीं. )

वासुदेव तुझा साह्यकर्ता आहे, हें मला माहित आहे. तुझें गांडिव धनुष्य चार हात लांब आहे हें मला ठाऊक आहे आणि तुझ्यासारखा अन्य योद्धा नाहीं, हेंहि मला अवगत आहे. परंतु हें सर्व जाणत असूनहि मीं तुमचें राज्य हरण केलें आहे. माया-इंद्रजालादि उपायांनीं मनुष्याला सिद्धि प्राप्त होत नसते, किंवा ‘ हा राजपुत्र आहे, म्हणून राज्यार्ह आहे ’ अशा वंशपरंपरेच्या धर्मानेंहि तें मिळत नसतें, तर तें शौर्यानेंच संपादन करावें लागतें. विधात्यालाच केवल संकल्पानें अनुकूल कार्यें करतां येतात. तीं मनुष्याला शक्य नाहींत.

हे फाल्गुना, तुम्हांला विलाप करीत बसवून मीं तेरा वर्षें राज्याचा उपभोग घेतला आणि आतां बांधवांसह तुझा वध करून पुढेंहि पृथ्वीचें राज्य करीन. आम्हीं तुला जेव्हां पणानें जिंकलें, तेव्हां तुझें गांडिव कोठें गेलें होतें आणि भीमसेनाचें बल कोठें लपलें होतें ! त्या वेळीं गदाधर भीमसेन किंवा गांडिव-धारी अर्जुन हे दोघेहि पांडवांना दास्यांतून मुक्त करूं शकले नाहींत. दास-त्वाला प्राप्त झालेल्या तुम्हांला अनिंद्य पांचालीनेंच सोडविलें ! तुम्ही नीच मनुष्याप्रमाणें आमच्या दासकर्मांत जेव्हां स्थित झालांत, तेव्हां आम्हीं तुम्हांला ‘ षंढतिल ’ म्ह० निर्बीज तिलाप्रमाणें पौरुषहीन म्हटलें, तें योग्यच होतें.

अज्ञातवासांत पार्थानें विराटनगरींत वेणी धारण केली व त्या राजाच्या पाकशाळेंत भीम पाकसिद्धि करण्यांत श्रांत झाला, हा माझाच पराक्रम आहे.

मीं तुम्हांला जसा दंड केला, तसाच पूर्वींपासून क्षत्रिय राजे पराजित झालेल्या क्षत्रियांना करीत आले आहेत. युधिष्ठिराला विराटाच्या सभेंत कंक-रूपानें अधिकारी केलें, भीमाला बल्लव व मल्ल व्हावें लागलें आणि अर्जुनाला बृहन्नलेचें रूप धारण करावें लागलें. हा दंडच होय. हे पार्था, तूं वेणी धारण करून क्लीबवेषानें विराटाच्या कन्यांना नृत्य शिकविलेंस, हाच ना तुझा पुरु-षार्थ !

तुझ्या किंवा वासुदेवाच्या भीतीनें मी राज्य परत देणार नाहीं. यास्तव केशवासह तूं युद्ध कर. इंद्रजालादि माया व भीषणा याला शस्त्रधारण केलेले वीर भीत नसतात. हजारों वासुदेव किंवा शेकडों अर्जुन येवोत, ते माझ्या अमोघ शस्त्राच्या स्पर्शानेंच दश-दिशांत पळून जातील. ये, भीष्माशीं युद्ध कर. युद्धामध्यें भीष्माच्या समीप जाणें म्हणजे मस्तकानें पर्वताचा भेद करण्यासारखेंच आहे. किंवा हा प्रचंड सैन्याचा सागर हातानें तरून जाण्या-सारखेंच हें दुष्कर कर्म आहे.

हे पांडवा, माझें हें विस्तीर्ण सैन्य म्हणजे एक महासागरच आहे. शारद्वत, कृप त्यांतील देवमासा आहे. विविंशति महा सर्प आहे. बृहद्बल मोठी वेला आहे. सोमदत्ति तिमिंगल आहे. युयुत्सु जल आहे. भगदत्त वावटळ आहे. भीष्म अमर्याद वेग आहे व द्रोण दुरासद ग्राह आहे. कर्ण व शल्य हे त्यांतील मासे व आवर्त आहेत. काम्बोज वडवानल आहे. दुःशासन त्याचा ओघ आहे. शल व शल्य हे मत्स्य आहेत. सुषेण व चित्रायुध, हे गज व नक्र आहेत. जयद्रथ पर्वत आहे, पुरुमित्र त्याचें गांभीर्य आहे. दुर्मर्षण उदक आहे आणि शकुनि प्रपात आहे. अक्षय्य शस्त्रांचा संग्रह हाच ओघ आहे.

या सेनासमुद्रांत प्रवेश करतांच केवल श्रमानेंच जेव्हां तुझी चेतना नष्ट होईल व तुझे सर्व बांधव हत होतील, तेव्हांच तुला पश्चात्ताप होईल. पापी मनुष्याचें मन जसें स्वर्गप्राप्तीपासून निवृत्त होतें, तसें तुझें मन तेव्हांच राज्य-प्राप्तीपासून परत फिरेल. यास्तव अतपस्वी माणसाला स्वर्ग जसा दुर्लभ आहे, तसेंच हें राज्य तुला दुष्प्राप्य आहे. यास्तव तूं स्वस्थ बैस. ५. ८. १६०.

---

## अध्याय १६१ वा.

[ १ उलूकाचें पांडवांकडे गमन व संदेशकथन. ]

( १ ) संजय—राजा धृतराष्ट्रा, त्यानंतर तो द्यूतकार शकुनीचा पुत्र उलूक पांडवांच्या सेनेचा जेथें निवास होता तेथें आला व पांडवांची भेट घेऊन सर्व पांडव एकत्र जमले असतां युधिष्ठिराला असें वचन बोलला—" हे धर्मज्ञा, दूताचें वचन संदेशाचा यथार्थ अनुवाद करणारें असतें, हें तुला चांगलें अवगत आहे, यास्तव दुर्योधनाचा निरोप मी तुला जशाच्या तसा सांगणार आहें. तो ऐकून तूं मजवर क्रुद्ध होऊं नको."

**युधिष्ठिर**—हे उलूका, तूं भिऊं नको. त्या अदूरदृष्टि व लोभी दुर्योधनाचें काय म्हणणें आहे, तें मला निर्भयपणें कथन कर.

**संजय**—राजा, तेव्हां उलूकानें सृंजय, मत्स्य, यशस्वी कृष्ण, पुत्रांसह द्रुपद, विराट आणि इतर भूपाल यांच्या समक्ष त्या तेजस्वी महात्म्या पांडवांना राजा दुर्योधनाचा संदेश अक्षरशः निवेदन केला. ५. ८. १६१.

---

## अध्याय १६२ वा.

[ १ क्रुद्ध झालेल्या पांडवांचें व कृष्णाचें दुर्योधनाला प्रत्युत्तर. २ दुसऱ्या दिवशीं युद्धाला सज्ज होण्याची आज्ञा. ]

( १ ) **संजय**—हे महाराज, याप्रमाणें उलूकानें दुर्योधनाचें यथार्थ वचन पुनः पुनः सांगितलें असतां त्याच्या त्या वाक्यरूपी शलाकेनें विद्ध झालेला अर्जुन सर्पाप्रमाणें क्रुद्ध झाला. पांडव पूर्वीच अतिशय संतप्त झाले होते, त्यांत उलूकानें तें उन्मत्तपणानें केलेलें भाषण ऐकून ते अधिकच क्रुद्ध झाले. ते आसनावरून उठले व हातवारे करीत सर्पाप्रमाणें क्रुद्ध होऊन परस्परांकडे पाहूं लागले. अधोमुख होऊन बसलेल्या भीमसेनाचे नेत्र रक्ताप्रमाणें तांबडे लाल झाले. त्यानें सर्पाप्रमाणें निश्वास टाकून केशवाकडे दृष्टिक्षेप केला.

तेव्हां क्रोधानें अतिशय आर्त झालेल्या भीमसेनाकडे पाहून दाशार्ह कृष्ण स्मितपूर्वक त्या द्यूतकाराला असें बोलला—"हे कैतव्या, सत्वर जा आणि सुयोधनाला सांग कीं, तुझें वचन आम्हीं ऐकलें, त्याचा अर्थ आम्हांला कळला. तुझ्या इच्छेप्रमाणें सर्व घडून येईल."

हे राजश्रेष्ठा, महाबाहु केशवानें असें बोलून पुनः महाप्राज्ञ युधिष्ठिराकडे पाहिलें. तेव्हां सर्व सृंजय, यशस्वी कृष्ण, पुत्रांसह द्रुपद, विराट आणि सर्व भूपाल यांच्या समक्ष उलूकानेंहि पुनः अर्जुनाला दुर्योधनाचें यथार्थ भाषण निवेदन केलें. कृष्णादि सर्वांनाहि दुर्योधनानें जो पृथक् पृथक् संदेश सांगितला होता, तोहि त्यानें अक्षरशः कथन केला. उलूकाचें तें दारुण व निंद्य वचन ऐकून पार्थ अतिशय क्षुब्ध झाला व त्यानें आपल्या ललाटावरून हात फिरविला. त्याची ती अवस्था पाहून सर्व सभा संतप्त झाली. महात्म्या पांडुपुत्राची व कृष्णा-

---

१. यापुढील समग्र अध्याय मागल्या अध्यायाचा श्लोकशः अनुवाद आहे. यास्तव पुनरुक्तीचा दोष टाळण्यासाठीं त्याचें भाषांतर दिलें नाहीं.

र्जुनांची निंदा त्यांना सहन झाली नाहीं. ते दारुण शब्द ऐकून सर्व पुरुषव्याघ्र क्रोधानें संतप्त झाले. धृष्टद्युम्न, शिखंडी, महारथ सात्यकि, पांच केकय भ्राते, घटोत्कच राक्षस, द्रौपदीचे पांच पुत्र, अभिमन्यु, धृष्टकेतु, महापराक्रमी भीमसेन आणि महारथ माद्रेय हे सर्व आरक्त नेत्र करून आपापल्या आसनावरून उठूं लागले. त्यांनीं आपले रक्तचंदनाची उटी लावलेले व अंगद-केयुरादि बाहुभूषणांनीं अलंकृत केलेले बाहु थोपटले. दांत-ओंठ खाल्ले व जिभल्या चाटल्या.

तेव्हां या बाह्य चिह्नांवरून त्यांचा आशय जाणणारा वृकोदर मोठ्या वेगानें आसनावरून उठला, क्रोधानें जणु काय प्रज्वलित होत त्यानें नेत्र वटारले, कडकडां दांत चावले, हातावर हात चोळले व उलूकाला असें उत्तर दिलें—
" हे मूर्खा, आम्हांला दुर्बल मानून प्रोत्साहनाला निमित्त होणारें दुर्योधनाचें जें वचन तूं सांगितलेंस तें आम्हीं ऐकलें. हे मंदमते, आतां मी सांगत असलेला हा दुरासद निरोप लक्षपूर्वक ऐक व सूतपुत्र व तुझा दुरात्मा पिता शकुनि ऐकत असतां सर्व क्षत्रियांच्या समक्ष दुर्योधनाला तो कथन कर. आम्ही ज्येष्ठ भ्रात्याच्या आज्ञेंत स्थित असल्यामुळें त्याचें प्रिय करण्यास नित्य तत्पर असतों. म्हणूनच तुझे सर्व दुराचार आम्हीं सहन केले. परंतु त्याचें तुला कांहींच महत्त्व वाटत नाहीं काय! धीमान् धर्मराजानें कुलाच्या हितासाठीं शमाच्या आकांक्षेनें हृषीकेशाला कौरवांकडे पाठविलें होतें.

परंतु कालानेंच प्रेरणा केल्यामुळें खरोखर तूं यमलोकीं जाण्याची इच्छा करीत आहेस. यास्तव ये; आमच्याशीं युद्ध करण्यास सज्ज हो आणि उद्यांच तें निश्चयानें होऊं दे. हे पाप्या, मींहि भ्रात्यांसह तुझा वध करण्याची प्रतिज्ञा केली आहे, ती पूर्ण होईल. त्याबद्दल विचार करण्याचें कारणच नाहीं. कदाचित् सागरहि आपल्या मर्यादेचें अतिक्रमण करील, पर्वत विदीर्ण होईल, परंतु मीं बोललेलें वाक्य कदापि वृथा होणार नाहीं.

हे दुर्बुद्धे, साक्षात् यम, कुबेर किंवा रुद्र जरी तुझ्या साह्यार्थ आले, तरी पांडव आपली प्रतिज्ञा शेवटास नेतील. मीं म्हटल्याप्रमाणें रणामध्यें दुःशासनाचें रक्त प्राशन करीन आणि त्या वेळीं जो कोणी योद्धा माझ्याशीं प्रतियुद्ध करण्यास येईल, तो भीष्माचा पुरस्कार करून जरी आला तरीहि त्याला मी यमसदनाला पाठवून देईन. क्षत्रियांच्या सभेंत मी जें वचन बोललों आहें, तें सर्व सत्य होईल. हें मी स्वतःची शपथ वाहून सांगतों."

भीमसेनाचें हें वचन ऐकून अमर्षी सहदेव क्रोधानें नेत्र आरक्त करून म्हणाला—"हे पाप्या, माझें हें वचन ऐक व सैनिकांमध्यें स्वतःला शूर मानणाऱ्या त्या गर्विष्ठ दुर्योधनाला तें तुझ्या पित्याच्या समक्ष कथन कर. हे दुरात्म्या दुर्योधना, धृतराष्ट्राचा तुझ्याशीं जर संबंध नसता, त्यानें तुझ्या बाल्यावस्थेंतच जर त्याग केला असता तर कुरूंच्या बरोबर आमचें वैर कधींहि झालें नसतें. परंतु लोकांचा व धृतराष्ट्राच्या कुलाचा नाश करण्यासाठीं तूं वैर पुरुष उत्पन्न झाला आहेस. तूं पापकर्म करणारा व कुलाचा घात करणारा आहेस. तुझा पिता शकुनि आमचें जन्मापासूनच अकल्याण करण्याची इच्छा करीत आहे. तो पातकी पुरुष नित्य क्रूर कर्मानें आमचें अहित करण्याचा यत्न करीत असतो. त्या वैराचा मी अंत करीन. मी युद्धामध्यें शकुनीच्या समक्ष प्रथम तुला मारून सर्व धनुर्धर पहात असतां शकुनीचा वध करीन."

भीम व सहदेव या दोघांचें हें भाषण ऐकून फाल्गुन हंसून म्हणाला—"हे भीमसेना, ज्यांनीं तुझ्याशीं वैर केलें आहे, ते आतां जिवंत रहात नाहींत. ते मंदमति जरी आपल्या घरांत सुखानें रहात असले, तरी मृत्युपाशांतच सांपडले आहेत. तथापि हे नरश्रेष्ठा, तूं उलूकाला कठोर वचन बोलूं नको. कारण स्वामीच्या भाषणाचा यथार्थ अनुवाद करणाऱ्या दूतांचा त्यांत काय अपराध आहे!"

भयंकर पराक्रम करणाऱ्या भीमाला असें बोलून अर्जुन धृष्टद्युम्नादि वीरांना म्हणाला—" त्या पापी धार्तराष्ट्राचा संदेश तुम्हीं ऐकलाच आहे. त्यानें विशेषतः वासुदेवाची व माझी निंदा केली. ती ऐकून आमच्या हिताची इच्छा करणारे तुम्ही सर्व क्षुब्ध झालां आहां. यास्तव आतां वासुदेवाच्या प्रभावानें व तुम्हां सर्वांच्या साह्यानें मी समग्र क्षत्रवृंदांशीं युद्ध करण्यास समर्थ आहें. मी त्यांची गणनाच करीत नाहीं. तुमची जर अनुमति असेल तर मी या संदेशाचें उत्तर पाठवितों. तें हा उलूक जाऊन दुर्योधनाला कथन करील. उलूका, त्या दुरात्म्याला म्हणावें कीं, तुझ्या या वल्गनेचें उत्तर उद्यां सैन्याच्या अग्रभागीं हें गांडीव धनुष्य तुला देईल. कारण केवल उत्तराला प्रत्युत्तर करणें हें क्लीबाचें काम आहे."

धनंजयाचें हें उत्तर देण्यांतील चातुर्य पाहून सर्व भूपति त्याची प्रशंसा करूं लागले. त्याच्या त्या अर्थपूर्ण संक्षिप्त वाक्यानें ते सर्व विस्मित झाले.

तेव्हां पार्थानें त्या सर्वांचें वय व अधिकार यांच्या अनुसार सान्त्वन केलें. नंतर त्यानें दुर्योधनाला कोणता संदेश पाठवावा तें धर्मराजाला सुचविलें. तो म्हणाला—" हे भरतश्रेष्ठा, स्वतःचाच अवमान करणारा राजा पार्थिवोत्तम होऊं शकत नाहीं. यास्तव तुझ्या आज्ञेंत स्थित असलेला मी या उलूकाबरोबर सामपूर्वक व उत्कृष्ट प्रत्युत्तर पाठवितों, तें तूं ऐक."

त्या वेळीं दुर्योधनाचें तें निर्भर्त्सनायुक्त वचन ऐकून त्याचे नेत्र क्रोधानें आरक्त झाले होते. सर्पाप्रमाणें दीर्घ निश्वास सोडून व ओंठ चावून त्यानें क्रोधानें हास्य केलें, जनार्दन व भ्राते यांच्याकडे पाहिलें आणि आपला पुष्ट दंड हातानें धरून त्या कैतव्याला म्हटलें—" हे उलूका, जा आणि त्या कृतघ्न, दुर्मति, कुलकलंक, वैर पुरुषाला माझा असा निरोप सांग—

त्याला म्हणावें कीं हे पाप्या, ठीक आहे, तूं जो बैडालव्रताचा दृष्टान्त देऊन पांडव ढोंगी आहेत असें म्हणतोस त्याचा आम्ही 'तुष्यतु दुर्जनः' या न्यायानें स्वीकार करितों. परंतु तूं मात्र स्वतः पराक्रम न दाखवितां भीष्मकर्णादिकांच्या बलावर आम्हांला युद्धाचें आह्वान करीत आहेस ! पण जो वीर स्वसामर्थ्यानें आपली प्रतिज्ञा पूर्ण करून निर्भयपणें युद्धाला उभा रहातो, तोच खरा क्षत्रिय होय. हे कुलाधमा, तूं क्षत्रिय कुलांत उत्पन्न झाला आहेस. यास्तव शूराप्रमाणें स्वबलावर आम्हांला युद्धाचें आह्वान कर. भीष्म-द्रोणादि मान्य व लक्ष्मणादि पुत्र या आबालवृद्धांना पुढें करून त्यांचा नाश करूं नको. स्वतःच्या व भृत्यांच्या बाहुबलाचा आश्रय करून पार्थांना रणांत आह्वान कर आणि सर्वथा क्षत्रिय हो. जो दुर्बल पुरुष दुसऱ्याच्या पुरुषार्थाचा आश्रय करून शत्रूंना युद्धार्थ हांक देतो, व स्वतः असमर्थ असतो, तो क्लीबच होय. अशाप्रकारचा तूं कर्णादिकांच्या बलावर स्वतःला बलाढ्य मानीत आहेस, पण स्वतः दुर्बल असतांना तूं आमच्यापुढें कसल्या गर्जना करितोस ! !

कृष्ण—हे दूता, माझाहि असा निरोप त्या दुर्योधनाला सांग कीं, हे दुर्मते, उद्यां या वेळीं तूं समरांगणांत उपस्थित हो. लपून बसूं नको. पुरुषार्थ प्रकट कर. हे मूढा, धनंजयाचें सारथ्य करण्याचा मीं त्याला वर दिला आहे,

---

१ जेथें प्रतिवाद्यानें स्वीकारलेला पक्ष दुष्ट असला तरी वादी त्याच्या संतोषासाठीं तो कबूल करितो व त्यावर दुसरें दूषण देतो, तेथें हा न्याय प्रवृत्त होतो.

त्यामुळें हा जनार्दन युद्ध करणार नाहीं. असें तूं समजत असशील व म्हणून तूं भीत नसशील, परंतु तसें मानूं नको.

मी जर क्षुब्ध झालों, तर तृणाला दग्ध करणाऱ्या अग्नीप्रमाणें एका क्षणांत सर्व पार्थिवांचा नाश करून टाकीन, परंतु अखेरच्या क्षणापर्यंत असा प्रसंग येऊं नये, अशी माझी इच्छा आहे. युधिष्ठिराच्या आज्ञेनें मी उद्यां महात्म्या जितेंद्रिय पार्थाचें सारथ्य करीन. त्या वेळीं तूं त्यैलोक्यांत उड्डाण केलेंस, किंवा पातालांत जाऊन दडलास तरी तूं जेथें जेथें जाशील तेथें तेथें उद्यां प्रभातकालीं अर्जुनाचा रथ तुझ्या दृष्टीं पडेल. भीमसेनाची जी प्रतिज्ञा तूं वृथा समजत आहेस, ती तो दुःशासनाचें रक्त प्राशन करून पूर्ण करील, हें लक्षांत ठेव. राजा युधिष्ठिर, भीमसेन, अर्जुन व उभय माद्रीपुत्र हे पांची भ्राते सर्वदा प्रतिकूल भाषण करणाऱ्या तुझी मुळींच गणना करीत नाहींत. हें तूं पकें समज. ५. ८. १६२.

---

## अध्याय १६३ वा.

[ १ अर्जुनादिकांचें दुर्योधनाला प्रत्युत्तर. २ पांडवांचें उत्तर ऐकून कौरवसेनेंत युद्धाची घोषणा. ]

( १ ) संजय—हे भरतश्रेष्ठा, दुर्योधनाचें तें निंद्य वचन ऐकून महा यशस्वी गुडाकेश अतिशय क्षुब्ध झाला होता. त्यानें आरक्त नेत्रांनीं उलूकाकडे पाहिलें. केशवाकडे अर्थपूर्ण दृष्टिक्षेप केला, आपला सुदृढ भुज हातानें धरून पुनः त्या दूताला म्हटलें—"हे कैतव्या, त्या दुष्ट धार्तराष्ट्राला म्हणावें कीं, जो मनुष्य स्वबलाचा आश्रय करून शत्रूंना आह्वान करितो आणि निर्भयपणें शत्रूंशीं युद्ध करितो, तोच 'पुरुष' म्हटला जातो. परंतु जो दुसऱ्याच्या पुरुषार्थाचा आश्रय करून शत्रूंना आह्वान करितो, त्याला क्षत्रबंधु म्हणतात म्ह० तो केवल जातिमात्र क्षत्रिय होय; कर्मानें क्षत्रिय नव्हे. त्याच्या दुर्बलतेमुळें लोकांत त्याला 'पुरुषाधम' म्हणतात.

हे मूढा, तूंहि असाच दुसऱ्याच्या पराक्रमावर स्वतःला समर्थ मानीत आहेस. तूं स्वतः हीन असून दुसऱ्याला तिरस्कृत करण्याची इच्छा करीत आहेस. सर्व राजांमध्यें जितेंद्रिय, हितेच्छु व महाप्राज्ञ बाह्लिक व भीष्म यांना मरणाची दीक्षा देऊन आत्मश्लाघा कसली करतोस! हे कुलकलंका, मीं तुझा

आशय कधींच जाणला आहे. पांडव वृद्ध भीष्मावर शस्त्र चालविणार नाहींत, त्या पितामहाचा वध करणें ते निंद्य मानतील, असें समजून त्यांच्या पराक्रमाचा आश्रय करून तूं या वल्गना चालविल्या आहेस, परंतु तुझा हा भ्रम आहे. मी सर्व धनुर्धरांच्या समक्ष प्रथम भीष्माचा वध करीन.

हे दूता, तूं येथून जाऊन सर्व भारतांना जमवून त्यांच्या समक्ष सुयोधनाला माझा असा निरोप सांग कीं, तुझा संदेश ऐकून सव्यसाची अर्जुनानें 'ठीक आहे' असें म्हटलें. आजची रात्र जाऊन उद्यांचा दिवस उगवतांच आपलें युद्ध सुरू होईल. सत्यप्रतिज्ञ व कोणालाहि न भिणाऱ्या भीष्मानें, कुरुसभेत कौरवांना संतोष देत असें म्हटलें होतें कीं, मी सृंजय व शाल्व यांच्या सैन्याचा संहार करीन. हा भार मीं स्वीकारला आहे. हें वचन तूं जसें आम्हांला सांगितलेंस, तसेंच उलट दुर्योधनाला माझें हें वचन ऐकीव. 'द्रोणाच्या साह्यावांचूनच मी या लोकाचा नाश करण्यास समर्थ आहें. तुला पांडवांचें मुळींच भय नाहीं, यास्तव तुला राज्य मिळालेंच आहे व पांडवांवर संकट ओढवलेंच आहे असें तूं समज.' या भीष्माच्या आश्वासनावरून तूं दर्पयुक्त झालास व त्यामुळें स्वतःवर ओढवणारा अनर्थहि तुला दिसेनासा झाला आहे. यास्तव मी तुझ्यासमक्ष प्रथम कुरुवृद्ध पितामहाचाच वध करीन.

उद्यां सूर्योदय होतांच सैन्यानें युक्त, ध्वजी व रथी अशा सत्यप्रतिज्ञ भीष्माचें तुम्ही रक्षण करा. कारण अनर्थांत बुडणाऱ्या तुम्हांला दीपवत् असलेल्या त्या पितामहाला मी बाणांनीं रथांतून खालीं पाडवीन. उद्यां प्रातःकालीं मीं पितामहाला शरजालानें व्यास केलें आहे असें जेव्हां दृष्टीं पडेल, तेव्हां दुर्योधनाला आपली आत्मश्लाघा किती सत्य आहे, हें कळून येईल!

सभेमध्यें क्रुद्ध भीमसेनानें त्या अधर्मज्ञ, नित्यवैरी, पापबुद्धि, क्रूर व अदूरदर्शी दुःशासनाचें रुधिर प्राशन करण्याची जी प्रतिज्ञा केली आहे, ती सत्य झाल्याचें लवकरच तूं पहाशील.

हे दुर्योधना, तूं स्वतःला श्रेष्ठ समजत आहेस. 'मी शत्रूचा पराभव करण्यास समर्थ आहें' असा तुला दर्प आहे. तूं क्रोधी असून कठोर भाषण करणारा आहेस. तूं स्नेहरहित व दुसऱ्याची अवज्ञा करणारा आहेस. 'मीच ज्ञाता, मीच शूर' असा तुला वृथा अभिमान आहे. तूं निर्दय व बीभत्स कर्म करणारा आहेस. कपटद्यूतादि धर्मविरुद्ध कर्में करण्यांत प्रवीण आहेस,

प्रतिज्ञेप्रमाणें आमचें राज्य परत न देऊन आपलें अधर्मत्वहि प्रकट केलें आहेस. युधिष्ठिराला ' बैडालव्रत धारण करणारा ' असें बोलून धार्मिकावर अधार्मिकत्वाचा आरोप केला आहेस. विदुरादिकांचा अवमान करून वृद्धांचें अतिक्रमण केलें आहेस. कर्णादिकांचा विजय होईल अशा निश्चयानें व स्वसैन्याच्या आधिक्यानें आम्हांला दूर करीत आहेस. परंतु या सर्व अन्यायाचें असह्य फल लवकरच तुला प्राप्त होईल.

हे मूढा, वासुदेव ज्याचा साह्यकर्ता आहे, असा मी युद्ध करीत असतां जीवित व राज्य यांची आशा तूं कोणत्या हेतूनें करीत आहेस, हेंच मला कळत नाहीं. भीष्म व द्रोण हे दोघे शांत झाले असतां व कर्णालाहि मी रणांत पाडलें असतां तूं राज्य, जीवित व पुत्र यांच्याविषयीं निराश होशील. हे सुयोधना, तूं भ्राते व पुत्र यांचें निधन जेव्हां ऐकशील व भीमसेनाकडून वधिला जाशील, तेव्हां तूं स्वतःचीं दुष्कृत्यें स्मरशील. हे कैतवा, मी तुला सत्य सांगत आहें कीं, हें सर्व निश्चयानें घडून येईल. याहून दुसरी प्रतिज्ञा मी जाणत नाहीं."

नंतर युधिष्ठिरानेंहि उलूकाला असें म्हटलें—" बा उलूका, दुर्योधनाला जाऊन माझा असा निरोप सांग कीं, तूं स्वतःच्या वर्तनावरून माझें आचरण ठरवीत आहेस; हें योग्य नाहीं. यांतील सत्य कोणतें व असत्य कोणतें या दोहोंतील अंतर मी चांगलें जाणतों. मी कधीं कीट, मुंगी यांच्या विषयींहि पाप विचार मनांत आणीत नाहीं, मग ज्ञातिवधाविषयीं काय सांगावें ! मीं त्याची कधीं इच्छाहि केली नाहीं.

अरे बाबा, तुझा नाश होऊं नये, एवढ्याच हेतूनें मीं पूर्वीं तुझ्यापाशीं केवल पांच गांवांची याचना केली. परंतु माझा हा आशय न जाणतां लोभानें युक्त असलेला तूं मूर्खाप्रमाणें आत्मश्लाघा करीत आहेस ! त्याचप्रमाणें वासुदेवाच्या हितवचनाचाहि तूं स्वीकार केला नाहींस. अधिक बोलण्यांत काय अर्थ आहे ! आतां आपल्या बांधवांसह युद्धाला सज्ज हो. हे दूता, माझें अप्रिय करणाऱ्या त्या कौरवाला म्हणावें कीं, तुझें वचन ऐकलें, त्याचा अर्थहि जाणला. तुझ्या इच्छेप्रमाणेंच सर्व घडून येईल."

त्यानंतर भीमसेनानें त्या धार्तराष्ट्राला पुनः असा निरोप सांगितला—" हे उलूका, त्या दुर्मति, पापी, शठ, कपटी व दुराचारी सुयोधनाला सांग कीं,

हे नराधमा, 'मीं एकतर हस्तिनापुरांत राहीन, किंवा गृध्राच्या उदरांत जाईन,' अशी प्रतिज्ञा पूर्वी सभेमध्यें केली होती. तें माझें वचन मी सत्य करीन, असें मी सत्याचीच शपथ घेऊन सांगत आहें. मी युद्धांत दुःशासनाचा वध करून त्याचें रक्त प्राशन करीन आणि तुझ्या सर्व सोदर भ्रात्यांचा संहार करून तुझ्या मांड्या भग्न करीन. हे दुर्योधना, सर्व धृतराष्ट्रपुत्रांचा मी साक्षात् मृत्यूच आहें, समजलास आणि अभिमन्यु या सर्व राजपुत्रांचा निःसंशय अंतकच आहे. माझ्या या कृतीनें मी तुला संतुष्ट करीन. आणखींहि सांगतों ऐक. सुयोधना, सर्व अनुजांसह तुझा वध करून धर्मराजाच्या समक्ष मी तुझ्या मस्तकावर पाय देईन."

हे महीपते, नंतर नकुलहि उठला व म्हणाला—"हे उलूका, त्या धृतराष्ट्रपुत्राला म्हणावें कीं, तुझा समग्र निरोप मीं जशाच्या तसा ऐकला. तूं मला जसा उपदेश केला आहेस, तसाच मी वागेन व तुझी सर्व इच्छा पूर्ण करीन."

सहदेवानेंहि असा अर्थयुक्त निरोप सांगितला–" हे महाराजा, आमचे क्लेश पाहून हृष्ट झालेला तूं आज आत्मश्लाघा करीत आहेस, परंतु लवकरच तुला आपले पुत्र व ज्ञातिबांधव यांच्यासह शोक करावा लागेल."

विराट व द्रुपद या दोघांनीं दुर्योधनाच्या 'तुमचें हें वर्तन अश्लाघ्य आहे' इत्यादि निर्भर्त्सनायुक्त वचनाला असें उत्तर दिलें—" सज्जनाच्या दासभावाला सर्वदा प्राप्त व्हावें अशी आम्ही निरंतर प्रार्थनाच करीत असतों. आम्ही दास आहों किंवा अदास आहों व तुझा पुरुषार्थ काय आहे, हें उद्यां समरांगणांत दिसून येईल."

शिखंडीनें उलूकाला असें सांगितलें—हे दूता, तुझ्या त्या सदैव पापामध्यें आसक्त असलेल्या राजाला सांग कीं, हे राजन्, उद्यां रणामध्यें माझें दारुण कर्म तुझ्या दृष्टीं पडेल. ज्याच्या बाहुबलाचा आश्रय करून तूं युद्धांत स्वतःचा विजय झालाच आहे, असें मानीत आहेस, त्या तुझ्या पितामहाला मी रथांतून खालीं पाडवीन. महात्म्या विधात्यानें ज्या मला भीष्मवधासाठींच उत्पन्न केलें आहे, तो मी सर्व धनुर्धरांच्या समक्ष भीष्माचा वध करीन.

धृष्टद्युम्नानें उलूकाला म्हटलें—त्या राजपुत्राला माझा असा निरोप सांग कीं, मी सर्व सैन्य व बांधव यांच्यासह द्रोणाला गतप्राण करीन. मी द्रोणाच्या वधानें पितृवैराची फेड अवश्य करीन. तें माझें श्रेष्ठ कर्तव्यच आहे. तें महत्कार्य मलाच केलें पाहिजे. माझ्यावांचून हें कर्म अन्य कोणीहि करूं शकणार नाहीं.

शेवटीं धर्मराज युधिष्ठिर करुणेनें त्याला पुनः असें बोलला—हे दूता, तुझ्या स्वामीला जाऊन सांग कीं, हे राजन्, मीं केव्हांहि ज्ञातिवधाची इच्छा केली नव्हती. पण हे दुर्बुद्धे, तुझ्याच दोषानें हा सर्व अनर्थ ओढवला आहे, हें स्पष्ट दिसत आहे. बा उलूका, आतां सत्वर जा, किंवा तुझी जर इच्छा असेल तर येथेंच रहा. आम्ही तुझे बांधवच आहों. तुझें कल्याण असो.

हे धृतराष्ट्रा, त्यानंतर धर्मपुत्र युधिष्ठिराची अनुज्ञा घेऊन उलूक जेथें राजा सुयोधन होता, तेथें गेला. त्या दूतानें अमर्षी दुर्योधनाजवळ जाऊन त्याला अर्जुनाचा संदेश जशाचा तसा कथन केला. त्याचप्रमाणें धर्मराजा, वासुदेव व भीमसेन यांचीं पुरुषार्थाचीं भाषणें, नकुल, सहदेव, विराट, द्रुपद, धृष्टद्युम्न, शिखंडी व केशवार्जुन यांनीं पुनः पुनः सांगितलेला संदेश त्यास अक्षरशः निवेदन केला. उलूकाचें सर्व भाषण ऐकून दुर्योधन, दुःशासन, कर्ण व शकुनि यांनीं 'उद्यां सूर्योदयाच्या पूर्वी राजसैन्य व सर्व मित्रांचें सैन्य युद्धार्थ सज्ज व्हावें' अशी आज्ञा केली.

( २ ) तेव्हां कर्णानें सर्व दूतांना रथ, उंट, घोड्या व महावेगवान् सदश्व यांवरून मोठ्या त्वरेनें जाऊन सैनिकांना हा संदेश कळविण्यास सांगितलें. कर्णाच्या आज्ञेनें त्या दूतांनीं समग्र सेनेंत संचार करून सूर्योदयापूर्वी सैन्य सज्ज करण्याच्या राजाज्ञेची घोषणा केली. ५. ८. १६३.

---

## अध्याय १६४ वा.

[ १ पांडवसैन्यांतील वीरांचें युद्धार्थ रणांगणांत गमन व विभाग योजना. ]

( १ ) संजय—राजा, त्यानंतर कुंतीपुत्र युधिष्ठिरानें उलूकाचें तें वचन ऐकून धृष्टद्युम्न जिचा नेता आहे अशी सेना रणांगणाकडे पाठविली. ती पदाति, रथ, अश्व व गज यांनीं युक्त असलेली चतुर्विध भयंकर सेना पृथ्वीप्रमाणें अकंप्य होती. अर्जुनासह भीमसेनादि महारथ तिचें रक्षण करीत होते. ती दुस्तर सेना सागराप्रमाणें गंभीर असून धृष्टद्युम्नाच्या आज्ञेंत स्थित होती. तिच्या अग्रभागीं द्रोणाची प्रतीक्षा करणारा, युद्धदुर्मद धृष्टद्युम्न होता. त्या धनुर्धरानें योद्ध्यांचें बलाबल व उत्साह पाहून 'तूं याच्याशीं प्रतियुद्ध कर, तूं त्याच्याशीं द्वंद्व युद्ध कर' अशा प्रकारें सर्व वीरांची योजना केली.

अर्जुन व कर्ण, भीम व दुर्योधन, धृष्टकेतु व शल्य, उत्तमौजा व कृप, नकुल व अश्वत्थामा, कृतवर्मा व शैब्य, युयुधान व जयद्रथ, शिखंडी व भीष्म सहदेव व शकुनि, चेकितान व शल, पांच द्रौपदेय व पांच त्रिगर्त, यांस धृष्टद्युम्नानें परस्परांचे प्रतियोद्धे नेमिले आणि अभिमन्यूकडे वृषसेन व इतर सर्व शत्रुपक्षांतील नृपति सोंपविले. कारण तो त्या सौभद्रेयाला रणांत पार्थाहूनहि अधिक समर्थ मानीत होता.

याप्रमाणें त्या सर्व योद्धयांचा पृथक् पृथक् व संघातानें विभाग करून, त्या अग्नितुल्य कांतिमान् धृष्टद्युम्नानें द्रोणाचार्य स्वतःचा भाग कल्पिला. याप्रमाणें त्या धनुर्धरश्रेष्ठ सेनापतींच्या अधिपतीनें योद्धयांची योजना करून पांडवांच्या सैन्याची यथाविधि व्यूहरचना केली. नंतर ज्यानें युद्धाचा कृतनिश्चय केला आहे, असा तो बुद्धिमान् सेनानायक पांडुपुत्रांच्या विजयासाठीं युद्धार्थ सज्ज होऊन समरांगणांत स्थित झाला. ५. ८. १६४.

येथें आठवें उलूकदूतगमनपर्व समाप्त झालें.

---

# रथातिरथसंख्यानपर्व ९.



## अध्याय १६५ वा.

[ १ धृतराष्ट्राचा प्रश्न. २ संजयाचें वृत्तकथन. ३ दुर्योधनाचा भीष्माला स्वतःच्या व शत्रूच्या बलाबलाचा प्रश्न. ४ त्याचें उत्तर. ]

( १ ) **धृतराष्ट्र**—हे संजया, फाल्गुनानें युद्धांत भीष्माचा वध करण्याची प्रतिज्ञा केली असतां माझ्या दुर्योधनादि मूढ पुत्रांनीं काय केलें ? खरोखर, वासुदेव ज्याचा साह्यकर्ता आहे, त्या दृढधनुष्य धारण करणाऱ्या पार्थानें रणांत पितृतुल्य गांगेयाचा वध केलाच आहे, असें मी समजतों. ज्या योद्धयांतील श्रेष्ठ भीष्माला अगाध ज्ञान आहे, तो हें पार्थवचन ऐकून काय म्हणाला ! त्या महाबुद्धिमान् पराक्रमी, रणधुरंधर शांतनवानें कौरवांच्या सैनापत्याला प्राप्त झाल्यावर काय केलें ! तें सर्व मला कथन कर.

**वैशंपायन**—राजा जनमेजया, धृतराष्ट्राचा हा प्रश्न ऐकून संजयानें अमित तेजस्वी भीष्माचें सर्व भाषण त्याला निवेदन केलें.

( २ ) संजय—हे राजन्, कौरवांचा सेनापति झाल्यानंतर भीष्म दुर्योधनाला संतोष देणारें असें वचन बोलला—" हे दुर्योधना, ज्याच्या हातांत शक्ति आहे अशा देवसेनानी कार्तिकेयाला नमस्कार करून मी आज तुझा सेनापति झालों आहें, यांत संशय नाहीं. मी विविध व्यूह व सेनेची व्यवस्था यांत अभिज्ञ आहें. त्याचप्रमाणें वेतन दिलेले सैनिक व मित्रत्वानें जमलेले सन्मान्य सैनिक यांच्याकडून कोणतीं कामें कशीं करवून घ्यावीं हें मी जाणतों. तसेंच सैन्याचें रणांगणांत प्रयाण व शत्रूंच्या अस्त्रांचा प्रतिकार याविषयींहि मला बृहस्पतीसारखेंच उत्तम ज्ञान आहे.

हे महाराज, देव, गंधर्व व मानुष यांच्या युद्धांची उत्कृष्ट व्यूहरचना मला अवगत आहे. यास्तव तूं निश्चिंत हो. मी तुझ्या सर्व सैन्याचें तत्त्वतः पालन करून शत्रूशीं यथाशास्त्र युद्ध करीन. हे राजन्, तूं आपला मनःसंताप सोडून दे व शांत हो."

( ३ ) दुर्योधन—हे गाङ्गेया, मला समस्त देव व असुर यांचेंहि भय वाटत नाहीं, हें मी तुला सत्य सांगतों. त्यांत आणखीं तुझ्यासारखा दुर्धर्ष सेनापति व युद्धाचें अभिनंदन करणारा पुरुषव्याघ्र द्रोण हे माझ्या पक्षांत असल्यावर काय सांगावें ! तुम्ही दोघे श्रेष्ठ प्रणेते युद्धांत स्थित असल्यावर माझा विजय होईल यांत संशयच नाहीं. मला देवांचें राज्यहि दुर्लभ नाहीं.

हे कुरुश्रेष्ठा, आपले व शत्रूंचे रथी व महारथी किती आहेत, त्याची संख्या ऐकण्याची माझी इच्छा आहे. स्वपर बलाबल जाणण्यांत, हे पितामह, तूं कुशल आहेस. यास्तव मी या सर्व पृथ्वीपालांसह तें श्रवण करण्याची इच्छा करितों. मला तें सर्व कथन कर.

( ४ ) भीष्म—हे राजेंद्रा, तुझ्या सैन्यांत जे रथी व अतिरथी आहेत, त्यांची संख्या मी तुला सांगतों ऐक. तुझ्या सेनेमध्यें सहस्रावधि, कोट्यवधि किंबहुना असंख्य रथी आहेत, त्यांतील प्रमुखांचें वर्णन मी क्रमानें करितों, तें ऐक. हे गांधारीपुत्रा, तूं आपल्या दुःशासनप्रभृति शंभर संमत भ्रात्यांसह सर्व रथांमध्यें श्रेष्ठ रथी आहेस. महारथी नाहींस. तुझे सर्व सहोदरहि तुझ्यासारखेच योद्धे आहेत. तुम्ही सर्व अस्त्रवेत्ते व छेद-भेदविशारद आहां. रथ व गज यांवर आरूढ होऊन गदा, प्रास; खड्ग व ढाल या आयुधांनीं युद्ध करण्यांत प्रवीण अहां. तुम्ही भार वहाण्यास समर्थ व कृतास्त्र

असून अस्त्रांचे प्रयोग-उपसंहार जाणणारे आहां. द्रोण व कृप यांचे शिष्य असलेले तुम्ही इष्वस्त्र जाणतां. हे सर्व धार्तराष्ट्र युद्धदुर्मद पांचलांना युद्धांत गतप्राण करितील. हे भरतश्रेष्ठा, या धृतराष्ट्रपुत्रांनीं मानी पांडवांशीं कपटाचरण केलें आहे.

मी तुझा सेनापति झालों आहें; यास्तव आतां पांडवांना कःपदार्थ मानून तुझ्या सर्व शत्रूंचा विध्वंस करीन. मी स्वतःच्या गुणांची प्रशंसा करीत नाहीं. तूं ते जाणतोस. हे राजा, भोज कृतवर्मा अतिरथ आहे. तो शस्त्रधारण करणारांतील श्रेष्ठ वीर रणांमध्यें तुझी अर्थसिद्धि करील, यांत संशय नाहीं. तो अनाधृष्य, दृढायुध, दूर असलेल्या लक्ष्याचा वेध करणारा योद्धा दानवांचा नाश करणाऱ्या महेंद्राप्रमाणें पांडवांच्या सेनेचा संहार करील.

मद्रराज शल्य अतिरथ आहे, असें मी समजतों. तो वीर स्वतःचे भागिनेय जे पांडव त्यांना सोडून आला आहे. तो प्रत्येक संग्रामांत वासुदेवाशीं स्पर्धा करीत असतो. यावरून तो अतिरथ असावा असें माझें मत आहे. तो धनुर्धर महारथ पांडवांशीं रणांगणांत युद्ध करील.

भूरिश्रवा कृतास्त्र असून तुझ्या हिताविषयीं तत्पर आहे. तो तुझा सुहृद् सागराच्या ऊर्मीप्रमाणें आपल्या बाणांनीं शत्रूंना वाहून नेईल. महारथांचा अधिपति सौमदत्ति अतिरथ आहे. तो शत्रूंच्या सैन्याचा फार मोठा क्षय करील.

हे महाराज, सिन्धुराज द्विरथ आहे. तो जयद्रथ समरांत आपला पराक्रम प्रकट करून युद्ध करील. हे राजन्, द्रौपदीहरणाच्या वेळीं पांडवांनीं त्याला जे क्लेश दिले, ते स्मरून तो युद्ध करील. त्या वेळीं जयद्रथानें दारुण तप करून पांडवांशीं युद्ध करण्यासाठीं दुर्लभ वर मिळविला आहे. पूर्वीचें वैर स्मरून तो रथिश्रेष्ठ आपल्या दुस्त्यज प्राणांवर उदार होऊन पांडवांशीं युद्ध करील. ५. ९. १६५.

---

## अध्याय १६६ वा.

[ १ भीष्मानें केलेली स्वसेनेंतील रथ-अतिरथांची गणना. ]

( १ ) भीष्म—हे कुरुनंदना, काम्बोज-देशाचा अधिपति सुदक्षिण राजा एक रथ आहे, असें मला वाटतें. तुझ्या अर्थसिद्धीची इच्छा करणारा तो समरांत

शत्रूबरोबर युद्ध करील. हे राजश्रेष्ठा, युद्धामध्यें हा रथसिंह तुझ्या हितासाठीं इंद्रतुल्य पराक्रम करीत असल्याचें कौरवांच्या दृष्टीं पडेल. याच्या रथसमूहामधील काम्बोज देशांतील तीव्र वेगानें प्रहार करणारे योद्धे टोळांच्या समूहाप्रमाणें शत्रूवर चाल करून जातील.

हे महाराज, नीलकवच धारण करणारा माहिष्मती निवासी नीलराजा रथ आहे. तो आपल्या रथसमुदायानें तुझ्या शत्रूचें कदन करील. पूर्वी सहदेवानें त्याच्याशीं वैर केलें आहे. यास्तव तो राजा तुझ्या अर्थासाठीं पांडवांशीं सतत युद्ध करील. अवंती देशांतील विन्द व अनुविंद हे श्रेष्ठ रथी सर्वांना संमत आहेत. ते दोघेहि युद्धांत दृढ पराक्रम करणारे आहेत. ते उभयतः पुरुषश्रेष्ठ आपल्या हातांतून सुटलेल्या गदा प्रास, असि, नाराच व तोमर यांच्या योगानें शत्रुसैन्याला दग्ध करतील. युद्धाची आकांक्षा करणारे ते दोघे कृतान्तासारखे महारथ समरांगणांत जणुकाय खेळतच असल्याप्रमाणें संचार करतील.

हे राजेंद्रा, पांच त्रिगर्त भ्राते श्रेष्ठ रथी आहेत, असें मी समजतों. विराटनगरींत पार्थांनीं त्यांच्याशीं वैर संपादन केलें आहे. यास्तव जिच्या ऊर्मि उंच उडत आहेत, अशा गंगेला क्षुब्ध करणाऱ्या मकराप्रमाणें ते वीर ज्यांचे ध्वज उंच उभारलेले आहेत अशा पांडवसैन्याला क्षुब्ध करतील. सत्यरथ ज्यांचा प्रमुख आहे, असे ते पांच रथी पूर्वीचें वैर स्मरून पार्थाशीं युद्ध करतील. दिग्विजय प्रसंगीं भीमसेनाच्या अनुजानें त्यांचें अप्रिय केलें आहे. यास्तव ते क्षत्रियांतील श्रेष्ठ व प्रचंड धनुष्यें धारण करणाऱ्या पार्थांच्या धुरंधर महारथांना युद्धांत गतप्राण करतील.

हे दुर्योधना, तुझा पुत्र लक्ष्मण व दुःशासनाचा पुत्र हे दोघेहि पुरुषश्रेष्ठ युद्धांतून पलायन करणारे नाहींत. ते तरुण राजपुत्र सुकुमार असूनहि श्रेष्ठ रथी आहेत. ते चपल, युद्धकुशल व सर्वशः सेनेचे प्रणेते आहेत. क्षत्रियधर्मांत रत असलेले ते दोघेहि श्रेष्ठ रथी महत्कर्म करतील.

हे नरश्रेष्ठा, दण्डधार हा रथी आहे. स्वसैन्याकडून पालन केला गेलेला तो योद्धा तुझ्यासाठीं युद्ध करील. त्याचप्रमाणें कोसलदेशाचा अधिपति रथिश्रेष्ठ बृहद्बल महावेगवान् व पराक्रमी आहे. तो रथी म्हणून मला संमत आहे. तो स्वबंधूंना हर्ष देत संग्रामांत युद्ध करील.

हे राजन्, शारद्वत कृप उग्रायुध असून धार्तराष्ट्रांच्या हितांत रत असतो. तो अतिरथ आपल्या प्रिय प्राणांचा त्याग करूनहि शत्रुसैन्याला दग्ध करील. गौतम महर्षींचा पुत्र शारद्वत आचार्य कार्तिकेयाप्रमाणें अजिंक्य आहे. तो शरस्तम्बापासून उत्पन्न झाला आहे. तो वीर विविध आयुधें व धनुष्यें यांनीं युक्त असलेल्या या विपुल सेनेला जणुकाय अग्नीप्रमाणें दग्ध करीत समरांगणांत संचार करील. ५. ९. १६६.

---

## अध्याय १६७ वा.

[ १ कौरवसेनेंतील विविध श्रेष्ठ योद्धयांचें वर्णन. ]

( १ ) भीष्म—हे नराधिपा, तुझा मातुल शकुनि एक रथी आहे ( द्विरथ नाहीं ). त्यानेंच मुख्यतः पांडवांशीं हें वैर प्रवृत्त केलें आहे. तो युद्ध करील, यांत संशय नाहीं. याचें सैन्य नानाविध आयुधांनीं युक्त असून वायूप्रमाणें वेगवान् आहे. समरांत शत्रूवर चाल करून जाणाऱ्या याची सेना दुर्धर्ष आहे.

द्रोणपुत्र अश्वत्थामा सर्व धनुर्धरांत श्रेष्ठ आहे. तो महारथ अस्त्रनिपुण असून समरांत विचित्र युद्ध करणारा आहे. गांडीवधारी अर्जुनाप्रमाणेंच याच्या भात्यांतून निघालेले बाण कोठेंहि आसक्त होत नाहींत. तो वीर केवल श्रेष्ठ रथी आहे, अशी त्याची गणना करतां येणार नाहीं. हा महारथ तिन्ही लोकांचा दाह करण्यास समर्थ आहे. तो आश्रमवासी ऋषींचा क्रोध व तेज यांनीं युक्त आहे. उदार बुद्धि द्रोणाच्या अनुग्रहानें त्या उदारधीला दिव्य अस्त्रांची प्राप्ति झाली आहे. परंतु त्याच्या ठिकाणीं एकच दोष आहे, त्यामुळें मी त्याला अतिरथ म्हणत नाहीं. त्या द्विजाला स्वतःचें जीवित अतिशय प्रिय असून तो सर्वदा आयुष्याची इच्छा करीत असतो. ( हाच एक त्याच्यामध्यें दोष आहे. ) दोन्ही सैन्यामध्यें त्याच्यासारखा एकहि योद्धा नाहीं. तो वीर एका रथानें देवांच्याहि सेनेचा संहार करील, त्याचा देह इतका सुदृढ आहे कीं, त्याच्या केवल तलघोषानें पर्वतांचाहि स्फोट होईल. त्याची द्युति दारुण असल्यामुळें त्याच्या गुणांची गणनाच करतां येत नाहीं. तो साक्षात् यमासारखा शत्रूला असह्य असलेला वीर कालाप्रमाणें समरांगणांत संचार करील. ज्याची मान सिंहासारखी आहे, असा तो महाद्युतिमान् योद्धा युगान्त अग्नीप्रमाणें क्रोधानें या भारतयुद्धाचा अवशेष शांत करील.

त्याचा महा तेजस्वी पिता जरी वृद्ध झाला आहे तरी तो तरुणाहूनहि अधिक आहे. तो रणांत महत्कर्म करील, याविषयीं मला संशय नाहीं. अस्त्र-वेगरूपवायूपासून उद्भवलेला व सेनाकक्षारूप इंधनानें प्रज्वलित झालेला त्याचा क्रोधाग्नि पांडुपुत्रांच्या सैन्याला रणांत दग्ध करील. तो नरश्रेष्ठ अतिरथांचाहि अतिरथ आहे. तो भरद्वाजपुत्र तुझ्या हितासाठीं उग्र कर्म करील. तो सर्व मूर्धाभिषिक्त राजांचा आचार्य व वृद्ध गुरु आहे. तो सृंजयांचा अंत करील.

परंतु त्याला धनंजय फार प्रिय आहे. तो अक्लिष्ट कर्में करणाऱ्या पार्थाचा कदापि वध करणार नाहीं. धनंजयानें स्वतःच्या गुणांनीं आचार्यांना प्रसन्न करून घेतलें आहे. अर्जुनाचे ते असंख्य गुण स्मरून तो भारद्वाज सर्वदा त्याची प्रशंसा करीत असतो व त्याला पुत्राहूनहि अधिक समजतो. तो प्रतापवान् आचार्य रणामध्यें दिव्य अस्त्रांनीं युक्त असलेल्या देव, गंधर्व व मनुष्य यांचा एका रथानें नाश करील.

हे राजन्, हा तुझा राजसिंह महारथ पौरव माझ्या मतें श्रेष्ठ रथी आहे. शत्रुसैन्यांतील वीरांच्या रथाचा नाश करणारा तो योद्धा आपल्या विपुल सैन्यानें प्रज्वलित होत तृणाला जाळणाऱ्या अग्नीप्रमाणें पांचालांना दग्ध करील.

हा राजपुत्र बृहद्बल सत्यश्रवा एकच अंशानें रथी आहे. तो तुझ्या शत्रुसैन्यांत कालाप्रमाणें संचार करील. याचे योद्धे विचित्र कवचें व आयुधें धारण करून रणांगणांत तुझ्या शत्रूंचा संहार करीत संचार करतील. कर्णपुत्र महारथ वृषसेन तुझ्या रथांतील प्रमुख आहे. तो बलवानांतील श्रेष्ठ योद्धा तुझ्या शत्रूच्या सैन्याचा नाश करील.

हे राजन्, जलसन्ध माधव महातेजस्वी आहे. तो गजावर आरूढ होऊन युद्ध करण्यांत प्रवीण आहे. तो महाबाहु रथयुद्धांतहि निपुण आहे. तो शत्रु-सेनेचा क्षय करीत तुझ्यासाठीं समरांत सैन्यासह प्राणत्यागहि करील. तो भयंकर व विचित्र युद्ध करणारा असल्यामुळें निर्भयपणें शत्रूंशीं युद्ध करील. युद्धपराङ्मुख न होणारा बाल्हीक अतिरथ आहे. युद्धांत तो शूर साक्षात् यमासारखा आहे. तो एकदा समरांगणांत गेला कीं, तेथून कदापि परत फिरत नाहीं. वायूप्रमाणें संचार करून तो रणांत शत्रूंचा वध करीत असतो.

हे महाराज, महारथ सत्यवान् तुझा सेनापति आहे. शत्रुसैन्याला ताप देणारा तो रथी रणांत अद्भुत कर्म करणारा आहे. तो युद्ध पाहून कधींहि

व्यथित होत नाहीं. किंवा युद्धाला कधींहि भीत नाहीं. त्याच्या रथपथांत आलेल्या शत्रूवर तो हंसतच झडप घालितो. हा शत्रूमध्यें फार मोठा पराक्रम करणारा असून त्याचें कर्म सत्पुरुषाला उचित असेंच असतें. हातघाईच्या युद्धांत तो श्रेष्ठ वीर तुझ्यासाठीं फार मोठें कर्म करील.

हे राजन्, राक्षसेंद्र अलम्बुष क्रूर कर्मे करणारा महारथ आहे. तो मायावी असून हिडिंब राक्षसाच्या वधाचें दृढ वैर स्मरणारा आहे. तो सर्व राक्षस-सैन्यांत श्रेष्ठ रथी आहे. तो युद्धांत निर्भयपणें संचार करील. प्राग्ज्योतिषाचा अधिपति प्रतापवान् भगदत्त वीर गजयुद्धकुशलांतहि श्रेष्ठ आहे व रथयुद्ध-विशारद आहे. पूर्वी धनंजयाशीं याचें पुष्कळ दिवस युद्ध चाललें होतें. ते दोघेहि जयाची आकांक्षा धरून युद्ध करीत होते. पण आपला मित्र जो इंद्र त्याला मान देऊन त्यानें महात्म्या पांडवांशीं मैत्री केली. ऐरावतावर आरूढ झालेला देवांचा इंद्र जसें युद्ध करितो, तसा हा गजयुद्धकुशल वीर संग्रामांत युद्ध करील. ५. ९. १६७.

---

## अध्याय १६८ वा.

[ १ भीष्मानें कर्णाची अर्धरथत्वानें केलेली गणना. २ जोंवर भीष्म युद्ध करीत आहे तोंवर युद्ध न करण्याची क्रुद्ध झालेल्या कर्णाची प्रतिज्ञा. ३ भीष्मानें केलेली त्याची निर्भर्त्सना व युद्धाचा उपदेश. ४ दुर्योधनाचें सान्त्ववचन. ]

**( १ ) भीष्म—**हे दुर्योधना, अचल व वृषक हे दोघे भ्राते दुराधर्ष, बलाढ्य व अतिशय क्रोधी आहेत. ते गांधार देशांतील प्रमुख राजपुत्र तरुण, दर्शनीय व प्रहार करण्यांत निपुण आहेत. ते उभयतां रथी तुझ्या शत्रूंचा विध्वंस करतील.

हे राजन्, तुझा हा आवडता मित्र, जो नित्य तुला पांडवांशीं वैर करण्यास उत्तेजन देत असतो, तो नीच वैकर्तन कर्णकठोर भाषण करण्यांत मोठा प्रवीण आहे. तो तुझा मंत्री, नेता किंबहुना बंधूच मानलेला राधेय कलहप्रिय व आत्मश्लाघा करणारा आहे. तो उच्छृंखल कर्ण अतिरथी तर नाहींच, पण माझ्या मतें केवळ रथीहि नाहीं. तो मूर्ख आपलें सहज कवच घालवून बसला आहे. नित्य निंदक असलेला तो दिव्य कवच-कुंडलांनीं वियुक्त झालेला असून त्याला परशुरामाचा शापहि आहे. सहज कवच-कुंडलांनीं

वियुक्त असलेल्या त्या कर्णाला मी अर्धरथ समजतों. फाल्गुनाची रणांत गांठ पडली असतां त्याच्या हातून हा सूतपुत्र जिवंत सुटणार नाहीं.

भीष्माचें हें भाषण ऐकून सर्व शस्त्रधारण करणारांतील श्रेष्ठ द्रोण पुनः असें बोलला—हे गांगेया, तूं म्हणतोस तें अगदीं खरें आहे. तुझें वचन केव्हांहि मिथ्या नसतें. हा निंदक व प्रमादी कर्ण प्रत्येक युद्धप्रसंगीं वृथा अभिमानानें वल्गना मात्र करितो, परंतु तो युद्धापासून विमुख झालेलाच दिसून येतो.

( २ ) भीष्म व द्रोण यांचीं हीं भाषणें ऐकून राधेय क्रोधानें डोळे वटारून, आपल्या कठोर वाणीनें प्रतोदाप्रमाणें भीष्माला पीडा देत असें म्हणाला— " हे पितामह, निरपराध असलेल्या मला तूं पावलोपावलीं केवल द्वेषामुळें वाक्शरानें असा यथेष्ट टोंचीत असतोस, पण मी दुर्योधनाकडे पाहून तें सर्व सहन करितों. तूं मला मंदमति व हीन पुरुष समजत आहेस आणि आज तर तूं मला निःसंशय अर्धरथ ठरविलेंस ! परंतु त्यामुळें ' ज्याअर्थी हा गांगेय असें म्हणत आहे, त्याअर्थी तें मिथ्या नाहीं ' असें सर्व जगत् मानील आणि तुझ्या या वाक्यामुळें सर्व लोक माझा अवमान करूं लागतील.

तूं कौरवांचें अहित करण्यांत सर्वदा तत्पर असतोस. पण आमच्या राजाला तें कळत नाहीं. श्रेष्ठ कर्म करणारे सर्व समान योग्यतेचे असे राजे एकत्र जमले असतां त्यांचा असा तेजोभंग कोण करील ! ज्याअर्थी तूं या युद्ध प्रसंगीं आमच्यामध्यें भेद करण्याची इच्छा करीत आहेस व माझ्या ठिकाणीं असलेले गुण सहन न होऊन माझा द्वेष करीत आहेस, त्याअर्थी तूं आमच्या पराजयाचीच इच्छा करीत आहेस, यांत संशय नाहीं.

हे कौरवा, केवल वय, पांढरे केस, वित्त किंवा आप्तांचा परिवार यांवरून क्षत्रियांच्या महारथत्वाची गणना करतां येणें शक्य नाहीं. क्षत्रियाचें ज्येष्ठत्व त्याच्या बलावरून, विप्राचें मंत्रावरून, वैश्यांचें धनावरून आणि शूद्राचें ज्येष्ठत्व वयाच्या आधिक्यावरून स्मृत आहे, हें तूं जाणतोस का ! तूं राग-द्वेषानें प्रयुक्त होऊन इच्छेस येईल तसें बोलत आहेस व मोहानें या वीरांचा रथी, अतिरथी असा भेद करीत आहेस.

हे महाबाहो दुर्योधना, हा सर्व प्रकार लक्षपूर्वक पहा आणि तुझें अशुभ करणाऱ्या या भीष्माचा त्याग कर. त्याचा आशय दुष्ट आहे. हे पुरुषव्याघ्रा, वंशपरंपरेनें सेवा करणारे भृत्यहि भेदानें पृथक् झाले असतां, त्यांना पुनः

एकत्र करणें दुष्कर असतें, मग एकाच्या कार्यासाठीं विविध देशांतून एकत्र जमलेल्या बहुविध सैनिकांचा भेद केल्यास काय सांगावें ! (त्यांच्याशीं पुनः सख्य करतां येणें कदापि शक्य नाहीं ) हा भीष्म आमचा प्रत्यक्ष तेजोभंग करीत आहे. त्यामुळें युद्धामध्यें योद्धयांत द्वैत उत्पन्न होईल.

रथी, अतिरथी यांच्या विषयीं ज्ञान कोठें व हा अल्पबुद्धि भीष्म कोठें ! हे भारता, मी एकटा पांडवांच्या सैन्याला आंवरून धरीन. मज अमोघबाणाला प्राप्त झालेले ते पंचालांसह पांडव व्याघ्रापासून दूर पळणाऱ्या वृषभांप्रमाणें दशदिशांत पळत सुटतील.

युद्ध कोठें, समरांगणांतील हातघाई कोठें, संकेतांतील सुवचनें कोठें आणि हा कालप्रेरित, मंदात्मा, मूर्ख जरठ कोठें ! कारण हा भीष्म युद्धामध्यें वृद्ध व मंत्रांत मूर्ख आहे. अर्थात् अशक्तपणामुळें युद्ध करण्यास अयोग्य व नष्टबुद्धित्वामुळें मंत्रांत अनधिकारी आहे, असें असतांहि हा एकटाच सगळ्या जगाशीं स्पर्धा करीत असतो. हा वृथाभिमानी असून स्वतःवांचून अन्य पुरुषाची गणनाच करीत नाहीं. वृद्धांचें वचन ऐकावें अशी शास्त्राज्ञा आहे. परंतु जे अतिवृद्ध असतात, त्यांचें म्हणणें ऐकूं नये, कारण ते पुनरपि बालच मानलेले आहेत आणि या भीष्माची स्थितिहि तीच झाली आहे.

हे राजश्रेष्ठा दुर्योधना, या महायुद्धांत मी एकटा पांडवसेनेचा संहार करीन. परंतु या भीष्माला तूं सेनापति केला आहेस त्यामुळें माझें सर्व यश त्याच्याकडे जाईल. 'तूं जर शत्रुसैन्याचा पराजय केलास, तर त्याचें यश भीष्माला कसें मिळेल ?' असें म्हणशील तर ऐक—समरांगणांत सर्व सैनिक योद्धे युद्ध करीत असतात, परंतु विजयाचें श्रेय मात्र सेनापतीला दिलें जातें. यास्तव हे राजन्, जोंवर भीष्म जिवंत आहे, तोंवर मी युद्ध करणार नाहीं. युद्धांत भीष्म पडला असतां मीं सर्व महारथांबरोबर युद्ध करीन.

( ३ ) भीष्म—हे सूतपुत्रा, हा सागरासारखा प्रचंड भार मीं मजवर घेतला आहे. हा धार्तराष्ट्राचा संग्राम कित्येक वर्षांपासून घाटत आहे. तो रोमांचित व संतप्त करणारा युद्धाचा काल आतां प्राप्त झाला आहे. या प्रसंगीं मला आपसांत भेद करावयाचा नाहीं, म्हणूनच तूं आज जिवंत राहिलास ! भेदाच्या भीतीनेंच मी तुझा वध करीत नाहीं, समजलास ! तूं कितीहि तरुण

असलास, तरी मी वृद्ध असूनहि तुझा युद्धाचा अभिमान तुझ्या जीवितासह हरण करीन. जामदग्न्य रामानें सोडलेलीं महास्त्रें ज्याला यत्किंचित्‌हि व्यथा देऊं शकलीं नाहींत त्या मला तूं काय करूं शकणार आहेस !

हे नीच कुलांगारा, सज्जन केव्हांहि आत्मबलाची प्रौढी गात नसतात किंवा स्वकर्मांची प्रशंसाहि करीत नसतात. तथापि संतप्त झालेला मी कांहीं पूर्ववृत्तान्त सांगतों, तो ऐक—

पूर्वी काशिराजकन्यांच्या स्वयंवरप्रसंगीं सर्व पार्थिव एकत्र जमले होते. त्या वेळीं मीं एका रथानें त्या सर्वांना जिंकून तीन्ही राजकन्यांचें हरण केलें. तुझ्यासारख्या व तुझ्याहूनहि विशेष अशा अनेक योद्ध्यांचा मीं एकट्यानें त्यांच्या सैन्यासह रणांगणांत पराभव केला आहे. तुझ्यासारख्या वैरपुरुषाला प्राप्त झाल्यामुळेंच कौरवांवर हा महान् अनर्थ ओढवला आहे. तुझ्या स्नेहामुळें हा विनाशकाल उपस्थित झाला आहे. यास्तव यत्न कर व पुरुषासारखा पराक्रम दाखीव. ज्या पार्थाशीं तूं स्पर्धा करीत आहेस, त्याच्याशीं समरांत युद्ध कर. हे दुर्मते, तुला या युद्धांतून जिवंत सुटून आल्याचें मला पाहूं दे.

( ४ ) त्यांचा हा कलह मिटविण्यासाठीं प्रतापी दुर्योधन राजा म्हणाला— हे पितामह, आपल्या पुढें फार मोठें कार्य उपस्थित झालें आहे. यास्तव मजकडे लक्ष द्या आणि ज्यांत माझें परम श्रेय असेल त्याचा एकाग्र चित्तानें विचार करा. तुम्ही दोघेहि माझें महत्कार्य करणारे आहां. यास्तव शांत व्हा. हे शांतनवा, शत्रुपक्षांतील अतिरथ व त्यांचे अधिपति कोण कोण आहेत ? पांडवांचें बलाबल काय आहे ? हें ऐकण्याची माझी इच्छा आहे. आजची रात्र उलटतांच प्रभातीं युद्धाला आरंभ होईल. यास्तव मला शत्रुसैन्यांतील योद्ध्यांची गणना सांगा. ५. ९. १६८.

---

१ भीष्म व द्रोण समर्थ असूनहि पांडवांचा वध करणार नाहींत. कर्णहि भीमादि चारी भ्रात्यांना मारण्यास समर्थ असूनहि तो कुंतीला दिलेल्या वरामुळें त्यांना गतप्राण करणार नाहीं आणि अर्जुन तर त्याला दुर्जेयच आहे.. यावरून अखेर पांडवांचाच जय होईल, हें या रथादि-गणनेचें तात्पर्य आहे.

## अध्याय १६९ वा.

[ १ पांडवभ्रात्यांतील रथातिरथ व त्यांचा पराक्रम यांचें वर्णन. ]

( १ ) भीष्म—हे नृपा, तुझ्या सेनेंतील रथ, अतिरथ व अर्धरथ यांचीं नांवें मीं तुला सांगितलीं. आतां पांडवांच्या योद्ध्यांचें वर्णन करितों तें ऐक. ज्याअर्थी तुला पांडवांचें बल जाणण्याचें कुतूहल वाटत आहे, त्याअर्थी या सर्व भूपालांसह त्यांची रथसंख्या ऐक.

हे राजन्, ज्येष्ठ पांडव युधिष्ठिर स्वतः श्रेष्ठ रथी आहे. तो अग्नीप्रमाणें रणांगणांत संचार करील, यांत संशय नाहीं. भीमसेन अष्टधा 'रथ' म्हणून मला संमत आहे. गदायुद्धांत त्याच्या सारखा दुसरा योद्धा नाहीं. शरक्षेप करण्यांतहि तो निष्णात आहे. त्याला दहासहस्र हत्तींचें बल आहे. तो अतिशय क्रोधी व तेजस्वी आहे. खरोखर तो मनुष्य नव्हे.

दोघे माद्रीपुत्र श्रेष्ठ रथी आहेत. ते रूपानें अश्विनिकुमारांसारखे असून अप्रतिम तेजस्वी आहेत. ते उभय पुरुषश्रेष्ठ तुम्हीं दिलेले असह्य क्लेश स्मरून सेनेच्या अग्रभागीं रुद्राप्रमाणें संचार करतील, यांत संशय नाहीं. ते सर्वहि महात्मे शालवृक्षासारखे उंच आहेत. अन्यपुरुषांहून त्यांचें प्रमाण वितभर अधिकच आहे. त्या महाबलाढ्य पांडुपुत्रांचें शरीर सिंहासारखें असून त्या सर्व तपस्व्यांनीं तीव्र ब्रह्मचर्य आचरिलें आहे. ते बुद्धिमान् व अकार्याविषयीं लज्जा बाळगणारे आहेत. व्याघ्रासारखे उत्कट बलवान् आहेत. ते सर्व भ्राते वेगामध्यें, प्रहार करण्यांत व शत्रूंचें मर्दन करण्यांत अतिमानुष आहेत. दिग्विजयप्रसंगीं त्या सर्वांनीं महीपालांना जिंकलें आहे.

हे कौरवा, त्या पांडुपुत्रांचीं आयुधें, गदा व बाण हीं कोणाहि पुरुषाला सहन होणार नाहींत. इतकेंच केवल नव्हे, तर धनंजयाच्या धनुष्यावर गुण चढविण्यास, भीमसेनाची प्रचंड गदा उचलण्यास, किंवा युद्धांत त्यांच्या शरांचा क्षेप करण्यास कोणीहि समर्थ नाहीं. बालपणापासूनच ते धांवण्याच्या वेगांत, लक्ष्याचा वेध करण्यांत, बाहुयुद्धांत, मर्मपीडन करण्यांत व भूमीवरील मुष्टियुद्धांत तुम्हां सर्व भ्रात्यांहून वरिष्ठ आहेत, हें तुला ठाऊकच आहे. ते सर्व बलोत्कट वीर तुझ्या सैन्याची गांठ पडतांच त्याचा निःसंशय विध्वंस करतील. यास्तव त्यांच्याशीं युद्धाचा प्रसंग आणूं नको. त्यांच्यांतील एकेकटा भ्राताच युद्धांत सर्व भूपालांचा संहार करील. हे राजेंद्रा, राजसूययज्ञाच्या वेळचा

प्रकार तूं प्रत्यक्ष पाहिलाच आहेस. तसाच प्रसंग आतां ओढवेल. तुम्ही द्रौपदीला दिलेले क्लेश व द्यूतप्रसंगीं तुम्हीं उच्चारलेलीं कठोर वचनें स्मरून ते पांडव रुद्राप्रमाणें संग्रामांत संचार करतील.

हे राजेंद्रा, ज्याचा साह्यकर्ता नारायण आहे त्या लोहिताक्ष धनंजयासारखा रथी दोन्ही सैन्यांत नाहीं. देव, मनुष्य, नाग, राक्षस व यक्ष यांतहि असा अप्रतिम योद्धा झालेला नाहीं मग मनुष्यांत कोठून होणार ! पार्थासारखा वीर पूर्वीं कधीं झाल्याचें मीं ऐकलें नाहीं व पुढें होणार नाहीं.

हे महाराज, धीमान् पार्थाचा रथ सज्ज आहे. वासुदेव त्याच्या अश्वांचें नियमन करीत आहे. धनंजय स्वतःच योद्धा आहे. तो दिव्य गांडीव धनुष्यानें युक्त असून त्याचे अश्व वायूसारखे वेगवान् आहेत. त्याचें दिव्य कवच अभेद्य आहे व भाते अक्षयय आहेत. माहेंद्र, रौद्र, कौबेर, याम्य आणि वारुण अशा प्रकारचा दिव्य अस्त्रसमुदाय पार्थाजवळ आहे. शिवाय त्यांच्या जवळ उग्र गदा, वज्र इत्यादि विविध उत्कृष्ट आयुधांचा संग्रह आहे. त्या वीरानें केवल एका रथानें हिरण्यपुरांत राहणाऱ्या सहस्रावधि दानवांना युद्धांत गतप्राण केलें. त्याच्या सारखा दुसरा कोणता रथी आहे !

हा सत्यपराक्रमी बलवान् महाबाहु स्वसैन्याचें रक्षण करून तुझ्या सेनेचा संहार करील. समरांत या धनंजयाच्या संमुख स्थित होण्यास एक मी किंवा आचार्य द्रोण हे दोघेच समर्थ आहों. या दोन्ही सैन्यांत तिसरा कोणीहि समर्थ नाहीं. हा पार्थ वर्षा-ऋतूंतील महावायूनें युक्त असलेल्या मेघवृष्टीप्रमाणें शरांचा वर्षाव करीत असतो. शिवाय वासुदेव त्याचा साह्यकर्ता असून तो पांडव तरुण आहे आणि मी व द्रोण असे आम्ही दोघेहि आतां वृद्ध झालों आहों.

**वैशंपायन**—भीष्माच्या मुखानें पांडवांचा पराक्रम ऐकून तेथें जमलेल्या सर्व राजांचा उत्साह मंदावला. पांडवांचें सामर्थ्य आपण जणुकाय प्रत्यक्षच पहात आहों, असा त्यांना भास झाला. त्यांचे सुवर्णाच्या बाहुभूषणांनीं अलंकृत व चंदनाच्या उटीनें युक्त असलेले पुष्ट बाहु निरुत्साहानें गलित झाले. ५. ९. १६९.

---

## अध्याय १७० वा.

[ १ पांडव सैन्यांतील रथ व अतिरथांची गणना. ]

( १ ) भीष्म—हे महाराज, पांची द्रौपदेय महारथ आहेत आणि विराटाचा पुत्र उत्तर श्रेष्ठ रथी आहे. महाबाहु अभिमन्यु अतिरथी आहे. तो शत्रूंचा नाश करणारा वीर अर्जुन व वासुदेव यांच्या तुल्य आहे. तो अस्त्रप्रयोगांत अतिशय चपल, विवेकी व दृढनिश्चयी असून विचित्रयोधी आहे. आपल्या पितरांना दिलेले क्लेश स्मरून तो वीर युद्धांत अद्भुत पराक्रम प्रकट करील.

मधुकुलोत्पन्न माधव सात्यकि अतिरथी आहे. तो वृष्णिवीरांतील श्रेष्ठ, अमर्षी, शूर व निर्भय आहे. उत्तमौजा व युधामन्यु हे दोघेहि पराक्रमी योद्धे उत्तम रथी आहेत. त्यांच्या सैन्यांत सहस्रावधि रथ, अश्व व गज आहेत. त्यांच्यासह ते वीर पांडुपुत्रांचें प्रिय करण्याच्या इच्छेनें स्वतःच्या प्राणावर उदार होऊन युद्ध करतील. हे राजन्, अग्नि व वायु यांप्रमाणें ते पांडवांसह परस्परांस आह्वान करून तुझ्या सैन्याशीं संग्राम करतील. वृद्ध विराट व द्रुपद हे दोघे महापराक्रमी महारथ समरांत अजेय आहेत. ते पुरुषश्रेष्ठ जरी वयोवृद्ध आहेत तरी क्षत्रधर्मांत परायण आहेत. ते दोघेहि वीरांच्या मार्गाला अनुसरून परम शक्तीनें युद्ध करतील. ते शौर्य व बल यांनीं युक्त असलेले भूपति पांडवांचे दृढ आप्तसंबंधी आहेत. ते सदाचारसंपन्न असून स्नेह व पराक्रम यांनीं बद्ध आहेत.

हे कुरुश्रेष्ठा, सर्व पराक्रमी पुरुष अनुकूल दैव प्राप्त झालें असतां शूर होतात व प्रतिकूल दैवानें भीरु होत असतात. हे दोघेहि पार्थिव दृढधन्वी असून मरणाला सज्ज झाले आहेत. ते आपल्या प्राणांचा त्याग करूनहि परम शक्तीनें संग्राम करितील.

ते दोघेहि आपापलें पृथक् पृथक् अक्षौहिणी सैन्य घेऊन दारुण युद्ध करतील. पांडवांशीं जडलेल्या आप्तसंबंधाचें रक्षण करण्यासाठीं ते दोघेहि अद्भुत संग्राम करतील. ते दोघेहि लोकप्रसिद्ध वीर आहेत. ते आपल्या देहांचा त्याग करून आपल्या प्रतिज्ञेचें रक्षण करण्यासाठीं संग्रामांत महत्कर्मे करून दाखवितील. ५. ९. १७०.

---

## अध्याय १७१ वा.

[ १ पांडवांकडील योद्धयांची गणना. ]

( १ ) भीष्म—भारता, पंचालराजाचा परपुरंजय पुत्र शिखण्डी हा पार्थाचा मुख्य रथी आहे, असें मी समजतों. तो वीर स्वतःवर पूर्वी आलेला स्त्रीत्वाचा दोष मिथ्या ठरवून पौरुष प्रकट करण्यासाठीं संग्रामांत पराक्रम गाजवील आणि तुझ्या सैन्यांत आपलें परम यश पसरवीत शत्रूकडील व्यूह रचून उभ्या असलेल्या सेनेचा नाश करून तिला दाही दिशांत पळवून लावील. याच्या पंचाल व प्रभद्रक नामक प्रचंड सेना आहेत. त्यांच्या रथसमुदायासह हा वीर महत्कर्म करील.

हे राजन्, सर्व पांडवसैन्याचा सेनानी धृष्टद्युम्न अतिरथ आहे. युगान्तसमयीं क्रुद्ध झालेल्या भगवान् पिनाकीप्रमाणें तो द्रोणाचा शिष्य संग्रामांत शत्रूंचा संहार करीत भयंकर युद्ध करील. रणप्रिय लोक असें सांगतात कीं, देवांच्या संग्रामांतील रथाप्रमाणें याचा प्रचंड रथसमुदाय सागराप्रमाणें विस्तीर्ण दिसत असतो.

हे राजेंद्रा, धृष्टद्युम्नाचा पुत्र क्षत्रधर्मा अल्पवयी आहे. बाल असल्यामुळें त्यानें अद्यापि युद्धकर्मांत फारसे परिश्रम केले नाहींत. यास्तव तो मला अर्धरथ संमत आहे. शिशुपालाचा पुत्र चेदिराज धृष्टकेतु हा महारथ आहे. पुत्रांसह शूर असलेला तो पांडवांचा आप्तसंबंधी असल्यामुळें महारथांना सुकर असेंच महत्कर्म करील.

क्षत्रधर्मांत रत असलेला परपुरंजय क्षत्रदेव पांडवपक्षांतील एक श्रेष्ठ रथी आहे. जयंत, अमितौजा व सत्यजित् हे सर्व पांचालश्रेष्ठ महात्मे महारथ आहेत. ते समरामध्यें क्षुब्ध झालेल्या हत्तीप्रमाणें युद्ध करितील. अज व भोज हे दोघेहि भयंकर पराक्रम करणारे महारथ आहेत. ते बलाढ्य व शूर योद्धे पांडवांच्या हितासाठीं आपली सर्व शक्ति खर्च करून युद्ध करतील.

हे धार्तराष्ट्रा, पांच केकय भ्राते विचित्र युद्ध करणारे, शीघ्रास्त्रसंपन्न व दृढविक्रम करणारे आहेत. रक्तवर्ण ध्वज असलेले ते सर्वहि समरकुशल योद्धे श्रेष्ठ रथी आहेत. काशिक, सुकुमार, नील, सूर्यदत्त, शंख व मदिराश्व हे सर्वहि सर्वास्त्रकुशल व योद्धयांच्या लक्षणांनीं युक्त आहेत. हे सर्व महात्मे उत्तम रथी म्हणून मला संमत आहेत.

हे महाराज, वार्धक्षेमि माझ्या मतें महारथ आहे. चित्रायुध राजा श्रेष्ठ रथी आहे. तो संग्रामांत शोभणारा वीर अर्जुनाचा भक्त आहे. चेकितान व सत्यधृति हे दोघे पांडवांकडील महारथ माझ्या मतानें उत्तम रथी आहेत. व्याघ्रदत्त व चंद्रसेन हेहि पांडवांचे श्रेष्ठ रथी आहेत. यांत संशय नाहीं.

सेनाबिंदु व क्रोधहंता हे दोघेहि वासुदेव किंवा भीमसेन यांच्या तुल्य आहेत. ते युद्धामध्यें पराक्रम करून तुझ्या सैनिकांबरोबर युद्ध करतील. तुला द्रोण, कृप किंवा मी जसा संमत आहे, तसाच तो समरश्लाघी श्रेष्ठ रथी आहे. काश्य परम शीघ्र गतीनें अस्त्रें सोडणारा आहे. तो श्लाघ्य नरश्रेष्ठ एक रथी आहे, असें मी समजतों. हा द्रुपदाचा तरुण पुत्र सत्यजित् महापराक्रमी असून युद्धांत अष्टवा रथी आहे. हा युद्धांत धृष्टद्युम्नाच्या समान प्रसिद्ध असून अतिरथत्वाला प्राप्त झाला आहे. पांडवांच्या यशाची उत्कट इच्छा करणारा तो युद्धांत श्रेष्ठ कर्म करील. पांडवांकडील महावीर्यवान् व शूर पाण्ड्य राजा महारथी आहे. तो रणधुरंधर पांडवांवर अनुरक्त आहे. तो दृढधन्वा, महेष्वास असून पांडवांचा महारथ आहे. श्रेणिमान् व वसुदान हे दोघे परपुरंजय राजे माझ्या मतें अतिरथ आहेत. ५. ९. १७१.

---

## अध्याय १७२ वा.

[ १ पांडवपक्षीय योद्ध्यांची गणना. २ शिखंडी व पांडव यांचा वध न करण्याची भीष्माची प्रतिज्ञा. ]

( १ ) भीष्म—महाराज, 'रोचमान' हा पांडवांकडील महारथ आहे. तो शत्रुसैन्यांत देवाप्रमाणें युद्ध करील. भीमसेनाचा मातुल महाबलाढ्य पुरुजित्कुंतिभोज राजा माझ्या मतानें अतिरथ आहे. हा पुरुषश्रेष्ठ चित्रयोधी, समर्थ व निपुण योद्धा आहे. इंद्र जसा दानवांशीं युद्ध करितो, तसा तो युद्धांत पराक्रम दाखवील. त्याचे सर्व योद्धे प्रसिद्ध व युद्धविशारद आहेत. पांडवांचें प्रिय व हित करण्यांत तत्पर असलेला तो वीर आपल्या भागिनेयासाठीं संग्रामांत फार मोठें कर्म करील.

हे राजा, भीमसेनाचा पुत्र राक्षसेश्वर घटोत्कच अतिशय मायावी आहे. तो अतिरथी आहे, असें मी मानतों. त्याच्या अधीन असलेले अनेक राक्षस त्याचे

सचिव आहेत. त्यांच्या साह्यानें तो युद्धप्रेमी वीर भयप्रद संग्राम करील. वासुदेव ज्यांचा अग्रणी आहे, असे हे व इतरहि अनेक देशांतील अधिपति पांडवांसाठीं जमले आहेत. हे राजन्, महात्म्या पांडवांचे रथ, अतिरथ व अर्धरथ असलेले वीर तुला मुख्यतः सांगितले आहेत. हे सर्व योद्धे महेंद्राप्रमाणें वीर किरीटीनें रक्षण केलेली ही युधिष्ठिराची प्रचंड सेना समरांगणांत नेतील.

हे वीरा, या मायावी व जयाची इच्छा करणाऱ्या योद्ध्यांशीं मी विजय किंवा निधन यांतील एकाच्या आकांक्षेनें युद्ध करीन. संध्यासमयीं क्षितिजावर शोभणाऱ्या सूर्य-चंद्रांप्रमाणें चक्रधर वासुदेव आणि गाण्डीवधारी पार्थ हे दोघे उत्तम रथी अग्नीनें दिलेल्या उत्कृष्ट रथावर आरूढ होऊन रणांगणांत एकत्र शोभतील. पांडुपुत्रांचे इतरहि जे ससैन्य रथिश्रेष्ठ असतील, त्या सर्वांशीं मी समरांगणांत युद्ध करीन.

( २ ) हे कौरवेश्वरा, याप्रमाणें उभय सैन्यांतील मुख्य मुख्य योद्धे, रथी, अतिरथी व इतरहि जे अर्धरथादि आहेत, त्यांचीं नांवें मीं तुला कथन केलीं. हे भारता, जोंवर माझी शक्ति कायम आहे, तोंवर वासुदेव, अर्जुन व इतरहि जे पार्थिव समरांगणांत येतील, त्या सर्वांचें मी युद्धांत निवारण करीन. परंतु पांचालराजपुत्र शिखंडीवर मात्र मी कदापि शस्त्र उचलणार नाहीं. तो महाबाहु शस्त्र उगारून जरी मजवर चालून आला तरी मी त्याच्याशीं प्रतियुद्ध करणार नाहीं. पित्याचें प्रिय करण्याच्या इच्छेनें मी प्राप्त झालेल्या राज्याचा त्याग करून ब्रह्मचर्यव्रतांत स्थित आहें. मीं चित्रांगदाला कौरवांच्या आधिपत्याचा अभिषेक करविला व कुमार विचित्रवीर्याला यौवराज्यावर स्थापिलें. हा वृत्तान्त लोकांत प्रसिद्धच आहे.

युद्धांत स्त्रीच्या संमुख जाण्यानें किंवा ही व्यक्ति पूर्वीं स्त्री होती, असें त्याच्या स्त्रीभावाच्या स्मरणानेंहि मनांत विकार उत्पन्न होत असतो, यास्तव मीं दृढब्रह्मचर्याचें पालन करून माझें देवव्रतत्व पृथ्वीवरील सर्व राजांमध्यें प्रकट केलें आहे. तस्मात् मी कोणाहि स्त्रीचा किंवा पूर्वीं स्त्री असून नंतर पुरुषत्वाला प्राप्त झालेल्या व्यक्तीचा वध करणार नाहीं, अशी माझी प्रतिज्ञा आहे आणि हे भारता, हा शिखंडी पूर्वीं स्त्री होता, हें तूं कदाचित् ऐकलेंहि असशील. पूर्वीं कन्या असून नंतर पुरुष झालेल्या त्याच्याशीं मी कदापि युद्ध करणार नाहीं. त्याच्यावांचून इतर जेवढे पार्थिव समरांगणांत जमतील,

त्या सर्वांचा मी संहार करीन. परंतु कुंतीपुत्रांचा मात्र वध करणार नाहीं. ५. ९. १७२.

येथें नववें रथातिरथसंख्यानपर्व समाप्त झालें.

---

# अम्बोपाख्यानपर्व १०.



## अध्याय १७३ वा.

[ १ शिखंडीचा वध न करण्याच्या कारणाविषयीं दुर्योधनाचा प्रश्न. २ भीष्मानें केलेली अंबोपाख्यानाची प्रस्तावना. भीष्माचें काशिराजाच्या नगरींत गमन. ३ तेथें जमलेल्या क्षत्रियांचा पराभव व तिन्ही राजकन्यांचें हरण. ]

( १ ) दुर्योधन—हे पितामह, 'मी सोमकांसह पांचालांचा वध करीन' असें तूं पूर्वीं म्हटलें होतेंस व आतां 'तो आततायी शिखण्डी शस्त्र उगारून संग्रामांत धांवून आलेला जरी मीं पाहिला, तरीहि त्याच्याशीं युद्ध करणार नाहीं' असें म्हणतोस, याचें कारण काय ! त्या पांचालाचा वध तूं कां करणार नाहींस ! तें मला सविस्तर कथन कर.

( २ ) भीष्म—हे दुर्योधना, युद्धांत शिखंडीला पुढें पहात असूनहि ज्या कारणासाठीं मी त्याचा वध करणार नाहीं, असें म्हणतों तें कारण तुला सांगतों, या सर्व वसुधाधिपांसह ती कथा लक्षपूर्वक ऐक. माझा लोकविश्रुत धर्मात्मा पिता महाराज शान्तनु योग्य कालीं मृत्युवश झाला. तेव्हां मीं प्रतिज्ञेचें पालन करून माझ्या चित्रांगद भ्रात्याला महाराज्यावर अभिषेक करविला. नंतर अल्पावधींतच तो मरण पावला असतां सत्यवतीच्या आज्ञेंत स्थित असलेल्या मीं विचित्रवीर्य राजा जरी माझा धर्मतः कनिष्ठभ्राता होता तरीहि त्याला यथाविधि राज्याभिषेक करविला. तो धर्मात्मा माझ्या आज्ञेंत स्थित होता. त्याचा मीहि कुलानें व शीलानें अनुरूप अशा कन्येशीं विवाह करून देण्याच्या विचारांत होतों.

हे महाराज, इतक्यांत काशिराजाच्या तीन कन्यांचा स्वयंवर होणार असल्याचें माझ्या कानीं आलें. अम्बा, अम्बिका व अम्बालिका या तिन्ही राजकन्या अप्रतिम स्वरूपानें युक्त होत्या. त्यांच्या स्वयंवरासाठीं पृथ्वीवरील सर्व

राजांना निमंत्रण केलें होतें. हे राजेंद्रा, त्या राजकन्यांमध्यें अम्बा ज्येष्ठ, अम्बिका मध्यम व अम्बालिका कनिष्ठ होती.

तेव्हां मी केवल एका रथानें काशिराजाच्या नगरीस गेलों व तेथें या उत्तम प्रकारें अलंकृत केलेल्या तिन्ही राजकन्या पाहिल्या. तेथें राजाच्या निमंत्रणावरून जमलेले सर्व पार्थिवहि माझ्या दृष्टीं पडले. त्यावेळीं 'स्वपराक्रम' हेंच त्या लावण्यवती कन्यांचें शुल्क आहे, असें मानून मीं त्या तिन्ही कन्यांना माझ्या रथांत घातलें व तेथें युद्धाला सज्ज झालेल्या सर्व नृपतींना पुनः पुनः आह्वान करीत म्हटलें—" मी शान्तनव भीष्म या कन्यांचें हरण करीत आहें. तुम्ही सर्व पार्थिव आपल्या परम शक्तीनें त्यांना सोडविण्याचा यत्न करा. तुमच्या समक्ष मी बलात्कारानें त्यांचें हरण करितों."

तेव्हां ते सर्व भूपति आपापलीं आयुधें उगारून मोठ्या त्वरेनें उठले व क्रुद्ध होऊन निघाले. त्यांनीं रथ सज्ज करण्याची सारथ्यांना प्रेरणा केली. रथी हत्तीसारख्या प्रचंड रथांतून निघाले, गजयोधी गजांवर व अश्वयोधी पुष्ट अश्वांवर आरूढ झाले. आयुधें उगारून ते सर्व महीपाल त्वरेनें निघाले व त्यांनीं त्यांच्या प्रचंड रथसंघानें मला सर्वतः वेढून टाकिलें.

( २ ) त्यावेळीं दानवांचा पराभव करणाऱ्या देवराज इंद्राप्रमाणें मी शरवर्षाव करून त्या सर्व नृपालांना जिंकलें. हे भरतश्रेष्ठा, मीं हंसतच त्यांचे सुवर्णभूषित विचित्र ध्वज दीस शरांनीं खालीं पाडविले. त्या युद्धांत एकेका बाणानेंच त्यांचीं वाहनें, अश्व, गज व सारथि यांना मीं भूमीवर पाडिलें. तेव्हां ज्यांचे रथ भग्न झाले आहेत, असे ते सर्व भग्नमनोरथ झालेले नृप माझें हस्तलाघव पाहून परत फिरले आणि मीहि त्या महिपालांना जिंकून हस्तिनापुरास परत आलों, सत्यवतीला तें कर्म कथन केलें आणि त्या कन्या तिच्या स्वाधीन करून 'माझ्या भ्रात्यासाठीं मीं यांना आणलें आहे' असें निवेदन केलें. ५. १०. १७३.

---

## अध्याय १७४ वा.

[ १ काशिराजकन्यांचें सत्यवतीला समर्पण. २ विचित्रवीर्याच्या विवाहाचा संकेत. अंबेचा शाल्वाला वरण्याचा निश्चय व तिनें भीष्माची केलेली प्रार्थना. ]

( १ ) भीष्म—भरतश्रेष्ठा, नंतर मीं माझी माता जी सत्यवती तिच्या समीप जाऊन तिच्या चरणांना वंदन केलें व त्या वीरमातेला म्हटलें—" हे

माते, मीं सर्व पार्थिवांना जिंकून बाहुबलाचें शुल्क देऊन विचित्रवीर्यासाठीं या काशिराजाच्या तीन कन्यांना हरण करून आणिलें आहे."

तेव्हां हृष्ट झालेल्या सत्यवतीनें माझ्या मस्तकाचें अवघ्राण केलें व अश्रुपूर्ण नयनांनीं म्हटलें—हे पुत्रा, तूं विजयी होऊन आलास ही मोठ्या आनंदाची गोष्ट आहे.

( २ ) त्यानंतर सत्यवतीच्या अनुमतीनें विवाहाची तयारी झाली असतां काशिराजाची ज्येष्ठ कन्या अंबा सलज्ज होऊन मला म्हणाली—" हे भीष्मा, तूं सर्वशास्त्रविशारद व धर्मज्ञ आहेस. माझें धर्म्य वचन ऐकून घे व मग तुला जें योग्य वाटेल तें कर. हे वीरा, मीं शाल्वराजाला पूर्वीच मनानें पति वरलें आहे आणि त्यानेंहि माझ्या पित्याच्या नकळत मला एकान्तांत पूर्वीच वरिलें आहे. असें असतांना तूं राजधर्माचें अतिक्रमण करून, अन्य वराची इच्छा करणाऱ्या मला आपल्या गृहांत कशी ठेवून घेतोस ! हे भीष्मा, तूं कौरवांच्या श्रेष्ठ कुलांत उत्पन्न झाला आहेस. यास्तव हें रहस्य जाणून व मनानें निश्चय करून तुला जें उचित दिसेल तें कर. तो शाल्वराजा निःसंशय माझी वाट पहात असेल, तस्मात् हे कुरुश्रेष्ठा, मला त्याच्याकडे जाण्याची अनुज्ञा दे. हे धर्मधारण करणारांतील श्रेष्ठ वीरा, कृपा कर, मजवर प्रसन्न हो. या पृथ्वीतलावर तूं सत्यप्रतिज्ञ आहेस असें आम्हीं ऐकलें आहे. ५. १०. १७४.

---

## अध्याय १७५ वा.

[ १ सर्वांच्या अनुमतीनें अंबेचें शाल्वाकडे प्रेषण. २ भीष्माच्या भीतीनें त्यानें तिचा केलेला परित्याग. ३ भीष्मच आपल्या दुःखाचें कारण आहे, असा तिचा निश्चय. ४ त्याच्या वधासाठीं तपश्चरणार्थ गमन. ५ तपोवनांत तापसाची भेट व तिनें त्याची केलेली प्रार्थना. ]

( १ ) भीष्म—नंतर मीं त्या काशिराजकन्येचा हा वृत्तान्त सत्यवती मातेला कळविला. त्याचप्रमाणें मंत्री, ऋत्विज व पुरोहित यांचेंहि मत घेतलें व त्या सर्वांच्या अनुमतीनें त्या अंबेला शाल्वराजाकडे पाठवून दिली. तिच्या संरक्षणार्थ वृद्ध ब्राह्मण व दासी यांचा परिवार दिला होता.

मार्गाचें आक्रमण करून ती राजकन्या शाल्वाकडे गेली व त्याला म्हणाली —" हे महामते, मी आपणाकरितां आल्यें आहें. तरी माझा स्वीकार व्हावा."

( २ ) तेव्हां शाल्वपति स्मित करून तिला म्हणाला—" हे भद्रे, जिला पूर्वीच दुसऱ्यानें जिंकलें आहे, अशा तुझा स्वीकार करण्यास मी केवल भार्यार्थी नाहीं. यास्तव हे वरवर्णिनि, तूं त्या भीष्माकडेच पुनः परत जा. त्या भीष्मानें तुला स्पर्श करून बलात्कारानें तुझें हरण केलें आहे. त्या तुझी मला मुळींच इच्छा नाहीं. भीष्मानें जेव्हां महायुद्धांत सर्व पृथ्वीपालांचा पराभव करून तुला जिंकून नेलें व हातानें धरून रथांत बसविलें त्यावेळीं तर तूं प्रसन्न दिसत होतीस ! दुसऱ्यानें जिंकलेल्या कन्येचें मी पाणिग्रहण करणार नाहीं. मी शास्त्र-वेत्ता असून दुसऱ्याला धर्माचा उपदेश करणारा आहें. माझ्यासारख्या नृपतीनें परक्याचा आश्रय केलेल्या स्त्रीचा परिग्रह कसा करावा ! यास्तव हे राजकन्ये, तुला इष्ट असेल तेथें तूं जा. व्यर्थ येथें कालक्षेप करूं नको. "

शाल्वाचें हें निष्ठुर भाषण ऐकून कामशरानें पीडित झालेली ती अम्बा म्हणाली—" हे महीपाला, असें बोलूं नको. तूं जें समजत आहेस, तें खरें नव्हे. भीष्माबरोबर मी स्वसंतोषानें गेलें नाहीं. त्यानें सर्व भूपालांना पळवून लावलें व रोदन करीत असलेल्या मला बलात्कारानें ओढून नेलें. त्यांत माझा काय बरें अपराध ! हे शाल्वराज, मज निर्दोष बालेवर प्रसन्न हो. मी तुजवर अनुरक्त आहें आणि भक्तांचा[१] त्याग करणें धर्मामध्यें प्रशस्य मानलेलें नाहीं. गांगेय युद्धांतून निवृत्त होतांच मीं त्याला पूर्ववृत्तान्त सांगून तुझ्याकडे येण्याची अनुज्ञा मागितली व त्यानेंहि ती तत्काल दिली, तेव्हां मी विलंब न लावतां तुझ्यापाशीं आल्यें.

हे राजेंद्रा, तो महाबाहु भीष्म स्वतःसाठीं माझी इच्छा करीत नाहीं. त्याचा हा सर्व प्रयत्न त्याच्या भ्रात्यासाठीं आहे. गांगेयानें अम्बिका व अम्बा-लिका या माझ्या दोघी भगिनींनाहि हरण करून नेलें व आपला कनिष्ठ भ्राता जो विचित्रवीर्य त्याला त्या अर्पण केल्या. हे शाल्वपते, मीं तुझ्यावांचून अन्य वराचें कधीं चिंतनहि केलेलें नाहीं. हें मी मस्तकाला स्पर्श करून सांगत्यें. हे पुरुषश्रेष्ठा, तुझ्यापुढें स्थित असलेल्या मला पूर्वी अन्य कोणाहि पुरुषानें वरलेलें नाहीं; हें मी तुला सत्य सांगत आहें. त्या सत्यानेंच मी स्वतःची शपथ वाहून सांगत्यें. हे विशालाक्षा, स्वतः होऊन तुझ्या समीप

---

१ भक्तानां हि परित्यागो न धर्मेषु प्रशस्यते ॥

आलेल्या या कन्येचा अंगीकार कर. मी निष्कलंक आहें व तुझ्या प्रसादाचीच इच्छा करीत आहें. यास्तव मजवर प्रसन्न हो.

याप्रमाणें त्या काशिराजकन्येनें नानाविध वचनांनीं शाल्वराजाची प्रार्थना केली, परंतु त्या राजानें तिच्या शब्दावर विश्वास ठेविला नाहीं. जीर्ण कात टाकून देणाऱ्या सर्पाप्रमाणें त्यानें त्या कन्येचा त्याग केला.

त्यावेळीं काशिपतीची ती ज्येष्ठ कन्या अतिशय क्रुद्ध झाली. तिचे नेत्र अश्रूंनीं भरून आले. सद्गदित कंठानें ती म्हणाली—"हे राजा, ज्याअर्थी माझें हें व्रत सत्य आहे, त्याअर्थीं तूं जिचा त्याग केला आहेस अशी मी जेथें जेथें जाईन, तेथें तेथें माझें रक्षण करणारे सज्जन असोत."

अशाप्रकारें करुण शब्दांनीं विलाप करणाऱ्या त्या राजकन्येची शाल्वाला दया आली नाहीं. त्यानें तिला पुनः पुनः 'जा, जा' असें म्हटलें. "हे सुंदरि, भीष्मानें तुला जिंकलें आहे. तेव्हां तूं त्याच्याकडेच जा. मला त्या भीष्माचें फार भय वाटतें." असें बोलून त्या अधर्मज्ञ शाल्वानें तिचा त्याग केला. तेव्हां टिटवीप्रमाणें आक्रोश करीत व अश्रु ढाळीत ती दीन राजकन्या त्याच्या नगरींतून परत फिरली.

( ३ ) हे दुर्योधना, नगरींतून बाहेर पडत असतां ती काशिराजाची दुहिता दुःखाकुल होऊन असा विचार करूं लागली—"माझ्यासारखी घोर संकटांत सांपडलेली स्त्री या पृथ्वीवर कोणी नसेल. अरे अरे, मी माझ्या बांधवापासून दूर झाल्यें, शाल्वानें माझा त्याग केला. बरें, हस्तिनापुरांत परत जावें, तर तेंहि शक्य नाहीं. कारण शाल्वाला वरण्यासाठीं मीच भीष्माची अनुज्ञा घेऊन निघाल्यें, ती आतां त्याच्याच आश्रयाला कशी जाऊं !

या सर्व अनर्थांचा दोष तरी मी कोणाला देऊं ! दुरासद भीष्माला कीं माझें स्वयंवर करणाऱ्या माझ्या मूढ पित्याला ! खरोखर मींच स्वतःच्या दोषानें ही आपत्ति ओढवून घेतली आहे. पूर्वी जेव्हां दारुण युद्ध प्रवृत्त झालें, तेव्हांच 'मीं शाल्वाला वरिलें आहे' असें सांगून भीष्माच्या रथांतून उडी टाकली नाहीं, ही मोठी चूक केली. आज त्या मूढपणाचेंच फल मला प्राप्त झालें आहे.

धिक्कार असो त्या भीष्माला व मलाहि. ज्यानें पुरुषाचा पराक्रम हेंच शुल्क लावून एखाद्या वेश्येप्रमाणें आपल्या कन्यांचा पण लावला, त्या माझ्या मंद-मति मूढ पित्यालाहि धिक्कार असो, त्या शाल्वराजालाहि धिक्कार असो आणि

ज्याच्या घटनेमुळें मजवर ही दुःसह आपत्ति ओढवली, त्या मला निर्माण करणाऱ्या विधात्यालाहि धिक्कार असो.

मानव आपल्याच कर्मांचें फल भोगीत असतात, हें जरी खरें आहे, तरी या संकटाला आरंभ भीष्मानें केला. तो शान्तनव माझ्या या सर्व आपत्तीचें मूळ आहे. तोच माझ्या दुःखाचें कारण आहे. यास्तव तपानें किंवा युद्धानें त्याचा सूड घेणें हें माझें आतां पहिलें कर्तव्य आहे. परंतु भीष्माला युद्धांत जिंकील असा कोणता बरें नृपति आहे!"

(४) याप्रमाणें मनांत विचार करीत व भाष्मा सूड घेण्याचा निश्चय करून ती भामिनी नगराच्या बाहेर गेली व तपोवनांत प्रवेश करून पुण्यशील महात्म्या तापसांच्या आश्रमांत आली. तापसांच्या परिवारांत तिनें ती रात्र घालविली. नंतर त्या राजकन्येनें आपला सर्व वृत्तान्त त्यांना कथन केला. भीष्मानें केलेलें हरण, शाल्वाकडे प्रेषण व शाल्वानें केलेला त्याग, हें सर्व सविस्तर वृत्त त्यांना निवेदन केलें.

त्या तापसांमध्यें तीव्रव्रत धारण करणारा एक श्रेष्ठ ब्राह्मण होता. तो श्रौत-स्मार्त कर्मांत निष्णात असल्यामुळें त्या तपोवृद्धाला शैखावत्य म्हणत असत. तो महातपस्वी शास्त्र व उपनिषदें यांत प्रवीण होता. त्या ब्रह्मवेत्त्या मुनीनें दुःखार्त व शोकविव्हल होऊन निश्वास सोडणाऱ्या त्या बालेस म्हटलें—" हे भद्रे, आम्हांला तुझा वृत्तान्त कळला. परंतु आम्ही आश्रमांत रहाणारे व तपश्चरण करणारे महात्मे आहोंत. अशा तपस्व्यांना काय करतां येणें शक्य आहे!"

(५) तेव्हां ती राजकन्या त्याला म्हणाली—हे भगवन्, मजवर एक अनुग्रह कर. मी परिव्राजिका होण्याची इच्छा करीत आहें. मी दुश्चर तप करीन. खरोखर, मीं पूर्वजन्मीं मूढ बुद्धीनें जीं कांहीं पापकर्में केलीं असतील, त्यांचेंच हें निश्चित फल मला प्राप्त झालें आहे. स्वजनाकडे परत जाण्याची माझी इच्छा नाहीं. शाल्वानें माझी निर्भर्त्सना केल्यामुळें मी अतिशय निरुत्साह झाल्यें आहें. यास्तव हे निष्पाप तापसहो, मला तपश्चरणाचा उपदेश करा. आपण सर्व देवतुल्य अहां, मजवर प्रसन्न व्हा.

त्या कन्येचा हा निश्चय ऐकून त्या मुनीनें लौकिक दृष्टान्त देऊन तिचें सान्त्वन केलें. 'प्रारब्धकर्म अपरिहार्य आहे. तें भोगलेंच पाहिजे, यास्तव

शान्त हो' असें शास्त्र व युक्ति यांच्या योगानें तिचें समाधान केलें व द्विजांसह तिला तिचें इष्ट कार्य करण्याचें आश्वासन दिलें. ५. १०. १७५.

## अध्याय १७६ वा.

[ १ तापसांचा राजकन्येला पितृगृहीं जाण्याचा उपदेश. २ होत्रवाहनराजाचें तेथें आगमन. ३ तो राजर्षि तिचा मातामह असल्याचें सांगून तिला परशुरामाकडे जाण्याचा उपदेश. ४ रामशिष्य अकृतव्रणाचें आगमन. ५ त्याला राजर्षीनें केलेलें वृत्तान्तकथन. ]

( १ ) भीष्म—त्यानंतर ते सर्व धर्माचरणी तापस त्या कन्येच्या कार्याविषयीं काय करावें याचा विचार करूं लागले. कांहीं तापस म्हणाले, तिला पित्याच्या घरीं नेऊन पोंचवावी. कित्येकांनीं कन्येचें हरण करणाऱ्या आमच्या पदरांत तिला घालण्याचा विचार केला. कोणी तिला शाल्वाकडे परत पाठविणें योग्य मानूं लागले. त्यावर दुसरे कित्येक म्हणाले कीं, त्या राजानेंच तिचा परित्याग केला असतां तिनें पुनः त्याच्याकडे जाणें उचित नाहीं.

याप्रमाणें त्यांचें जेव्हां एकमत होईना, तेव्हां ते सर्व व्रताचरणी तापस तिला पुनः म्हणाले—"हे भद्रे, हें सर्व खरें आहे, तरी तपस्वीजन काय करूं शकणार ! तुझी तपश्चर्या आतां पुरे कर आणि आमचें हितवचन ऐक. तुझें कल्याण असो. तूं आपल्या पित्याच्या घरीं जा. तो राजा आहे. तूं त्याच्या आश्रयाला गेलीस म्हणजे तो तुझा पिता तुझ्याविषयीं योग्य विचार करील. हे कल्याणि, तूं सर्व श्रेष्ठ गुणांनीं युक्त आहेस. तू आपल्या पितृगृहीं सुखानें रहाशील.

हे भामिनि, तुला पित्यावांचून अन्य कोणाचाहि आश्रय करणें योग्य नाहीं. कारण स्त्रियांना पति किंवा पिता यांवांचून अन्य गति नाहीं. अनुकूल परिस्थितींत पति व प्रतिकूल समयीं पिता हींच दोन स्त्रियांचीं आश्रयस्थानें आहेत. हें 'प्रव्रज्या'-व्रत अतिशय दुःखप्रद आहे. त्यांतहि तूं राजकन्या आहेस, स्वभावतःच सुकुमारी असून अद्यापि बाला आहेस. यास्तव तूं येथें रहाण्यानें ज दोष उद्भवण्याचा संभव आहे, ते तुझ्या पितृगृहीं उद्भवणार नाहींत. तूं तरुण आहेस. तुला पाहून येथील मुनि मोहित होतील व तूं आपल्या धर्मापासून च्युत होशील, असे अनेक दोष उत्पन्न होतील. यास्तव तूं आपल्या पितृगृहीं जावेंस हें बरें."

नंतर दुसरे कांहीं तापस त्या तपस्विनीला म्हणाले—" हे राजकन्ये, या निर्जन व गहन वनांत तुला एकटीला पाहून अनेक राजे तुझ्या परिग्रहाची प्रार्थना करितील. यास्तव ह्या तपश्चर्येचा विचार सोडून दे."

अम्बा—हे तापसहो, मीं आतां काशिनगरीस माझ्या पितृगृहीं परत जाणें कदापि शक्य नाहीं. कारण मी गेल्यें असतां सर्व बांधव माझा अपमान करतील. मी बाल्यावस्थेंत पितृगृहीं राहिल्यें आहें. परंतु आतां या उपहासास्पद अवस्थेंत मी तेथें जाणार नाहीं. तुमचें कल्याण असो. तुम्हां तापसांकडून संरक्षित असलेली मी येथेंच राहून तपाचें आचरण करीन. हे तापसश्रेष्ठहो, पुढल्याजन्मीं तरी असें दुर्भाग्य न येवो व माझ्या सुखाचा नाश न होवो म्हणून मी तपश्चर्या करीन.

( २ ) भीष्म—याप्रमाणें त्या सर्व विप्रांचा विचार चालला असतां राजर्षि होत्रवाहन त्या वनांत आला. तेव्हां त्या सर्व तापसांनीं त्याला उदक-आसनादि अर्पण करून त्याचें स्वागत केलें. त्याचा स्वीकार करून राजा आसनावर बसून विश्रांति घेत असतां त्याच्यासमक्ष त्या वनवासी मुनींनीं पुनः त्या कन्येशीं चर्चा आरंभिली.

तेव्हां अंबेचा सर्व वृत्तान्त श्रवण करून व ती काशिराजाची कन्या आहे, हें ऐकून तो राजर्षि उद्विग्न झाला. त्या दीन झालेल्या कन्येचें भाषण ऐकून व तिला पाहून महात्म्या होत्रवाहनाला तिची दया आली. तो महातपस्वी राजा तिचा पितामह होता. ही आपली दौहित्री आहे, हें जाणून तो कांपत असलेला वृद्ध राजर्षि उठला व त्यानें त्या कन्येला प्रेमानें आपल्या मांडीवर घेऊन तिला आश्वासन दिलें. नंतर तिच्यावरील संकटाचा समग्र वृत्तान्त तिला विचारला. तेव्हां तिनें सविस्तर वृत्त त्याला निवेदन केलें. तें ऐकून शोकाकुल झालेल्या महातपस्वी राजर्षीनें कांहीं कार्य मनांत योजिलें व त्या अतिशय दुःखार्त झालेल्या कन्येला म्हटलें—

( ३ ) " हे भद्रे, तूं पितृगृहीं जाऊं नको. मी तुझ्या मातेचा जनक आहें. मी तुझें दुःख दूर करीन. हे वत्से, ज्याअर्थीं तूं घोर तपश्चर्या करण्यास उद्युक्त झाली आहेस, त्याअर्थीं तुझें मन अतिशय दृढ आहे, हें व्यक्त होत आहे. यास्तव तूं माझ्या आज्ञेनें तपस्वी परशुरामाकडे जा व त्याला हा सर्व वृत्तान्त कथन कर. तो जामदग्न्य तुझ्या या फार मोठ्या दुःखशोकाचा परिहार करील. भीष्मानें जर

त्याचें वचन मान्य केलें नाहीं, तर तो भार्गवश्रेष्ठ त्या गांगेयाचा रणांत वध करील. यास्तव त्या कालाग्नितुल्य रामाकडे जा. तो तुला योग्य मार्ग दाखवील."

होत्रवाहनाचें हें भाषण ऐकून पुनः पुनः अश्रु ढाळणारी अंबा मधुर वाणीनें म्हणाली—" हे पितामह, तुह्मी आज्ञा शिरसा वंद्य मानून मी भार्गवरामाकडे जात्यें. परंतु तो लोकविश्रुत आर्य मला कोठें भेटेल व तो माझ्या या तीव्र दुःखाचा नाश कसा करील, हें त्याच्याकडे जाण्यापूर्वी जाणण्याची माझी इच्छा आहे."

होत्रवाहन—हे वत्से, तो सत्यसंध, महाबलाढ्य राम महावनांत तुझ्या दृष्टीं पडेल. तो गिरिश्रेष्ठ महेंद्रपर्वतावर नित्य उग्र तप आचरीत असतो. त्याच्या सभोंवार वेदवेत्ते ऋषि व गंधर्व-अप्सराहि रहातात. तेथें तूं जा व त्या दृढव्रत धारण करणाऱ्या तपोवृद्धाला शिरसा वंदन करून माझें नांव सांग आणि आपला सर्व वृत्तान्त कथन कर. तो राम माझा प्रिय मित्र व सुहृद् आहे. माझ्या आज्ञेनें तूं त्याच्याकडे गेली आहेस, हें कळलें असतां तुझें जें कांहीं इष्ट कार्य असेल, तें सर्व तो घडवून आणील. तो जमदग्नीचा पुत्र सर्व शस्त्रधारण करणारांतील श्रेष्ठ वीर आहे.

( ४ ) होत्रवाहन राजा त्या कन्येला असें सांगत आहे, तोंच भार्गवरामाचा प्रिय शिष्य अकृतव्रण तेथें प्राप्त झाला. त्याला पहातांच सहस्रावधि मुनींनीं त्याला उत्थापन देऊन त्याचा सत्कार केला. तेव्हां त्या वयोवृद्ध होत्रवाहन राजानें त्याला पाहून त्याचें आतिथ्य केलें व परस्परांनीं कुशलप्रश्नांनीं परस्परांचें आतिथ्य केलें.

नंतर ते सर्व वनवासी जन त्यांच्या सभोंवार बसले व संतुष्ट झालेले ते सर्व मोठ्या प्रीतीनें दिव्य व रम्य कथा सांगूं लागले. त्यांच्या कथा संपल्यावर महात्म्या होत्रवाहनानें अकृतव्रणाला विचारलें—हे अकृतव्रणा, महाप्रतापी श्रेष्ठ जामदग्न्य सांप्रत कोठें आहे! त्याची कोठें गांठ पडेल!

अकृतव्रण—हे प्रभो, 'राजर्षि सृंजय माझा प्रियसखा आहे' असें राम सतत तुझें स्मरण करून सांगत असतो. तो बहुतेक उद्यां प्रभातींच येथें येऊन पोंचेल असें मला वाटतें. तुझ्या दर्शनाच्या आकांक्षेनें येथें आलेल्या त्याला तूं भेटशील. पण हे राजर्षे, ही कन्या कोण! ती वनांत कां आली आहे? ही

कोणाची आहे? ही तुझी कोणी संबंधी आहे कीं काय हें सर्व जाणण्याची माझी इच्छा आहे.

(५) होत्रवाहन—हे अनघा, ही माझी दौहित्री असून काशिराजाची प्रिय कन्या आहे. ती आपल्या दोघी कनिष्ठ भगिनींसह स्वयंवराला उभी होती. ही काशिपतीची ज्येष्ठ कन्या 'अंबा'-नांवानें प्रसिद्ध आहे. अम्बिका व अम्बालिका या दोघी हिच्या कनिष्ठ भगिनी आहेत. या तिन्ही कन्यांच्या स्वयंवरार्थ काशिपुरींत अनेक पार्थिवश्रेष्ठ क्षत्रिय जमले होते. या कन्यांच्या निमित्तानें फार मोठा उत्सव चालला होता.

हे तपोधना, त्यावेळीं महावीर्यवान् शान्तनव भीष्म अकस्मात् तेथें गेला व त्या सर्व नृपालांचा पराभव करून त्या महा तेजस्वी गांगेयानें तिन्ही राजकन्यांचें हरण केलें. याप्रमाणें तेथें जमलेल्या नृपतींना जिंकून तो विशुद्धात्मा भीष्म त्या तिन्ही कन्यांसह आपल्या नगरीस आला व त्यानें त्या कन्यांना आपल्या सत्यवतीमातेच्या स्वाधीन करून तिच्या अनुमतीनें त्यांचा विचित्रवीर्य भ्रात्याशीं विवाह करून देण्याची आज्ञा केली.

नंतर विवाहाची सिद्धता झाली असतां विचित्रवीर्य अभ्यङ्गस्नान करून व पुष्पमालादि मंगल संस्कारांनीं युक्त होऊन आला. त्याला विवाहार्थ सज्ज झालेलें पाहून ही कन्या सर्व मंत्र्यांच्या समक्ष गाङ्गेयाला म्हणाली—" हे धर्मज्ञा, मीं शाल्वराजाला मनानें वरिलें आहे. यास्तव जिचें मन अन्य वराकडे गेलें आहे, त्या मला तूं आपल्या भ्रात्याला देणें योग्य नाहीं."

अंबेचें हें वचन ऐकून भीष्मानें आपले मंत्री व सत्यवतीमाता यांच्याशीं विचार केला व मातेच्या आज्ञेंत स्थित असलेल्या त्या उदारात्म्यानें सर्वांच्या अनुमतीनें त्या राजकन्येला शाल्वाकडे पाठवून दिलें. याप्रमाणें भीष्माच्या अनुज्ञेनें संतुष्ट झालेली ही कन्या मोठ्या हर्षानें सौभपति शाल्वाकडे गेली व योग्य समयीं त्याला असें म्हणाली—" हे राजश्रेष्ठा, भीष्मानें मला स्वसंतोषानें मुक्त केलें आहे. यास्तव तूं आतां माझें धर्मतः पाणिग्रहण कर. मीं तुला पूर्वींच मनानें वरिलें आहे."

परंतु शाल्वानें तिच्या वचनावर विश्वास ठेविला नाहीं. तिच्या चरित्राविषयीं साशंक झालेल्या त्या सौभपतीनें तिचा स्वीकार न करतां तिला घालवून दिलें. तेव्हांपासून अत्यंत शोकाकुल झालेली ही कन्या या तपोवनांत येऊन

तीव्र तपश्चर्येंत निमग्न होऊन राहिली आहे. मीं येथें आल्यानंतर तिच्या कुलाचें नांव ऐकून तिला ओळखिलें. हिच्या या सर्व दुःखाचें कारण भीष्मच आहे, असें ती समजत आहे.

अम्बा—हे भगवन्, हा पृथिवीपति सृंजय होत्रवाहन माझ्या मातेचा पिता आहे. त्या माझ्या पितामहानें जें सांगितलें, तें सर्व खरें आहे. हे तपोधना, अपमानाच्या भयानें व लज्जेनें मी पित्याच्या नगरीस परत जाण्यास समर्थ नाहीं. यास्तव भगवान् भार्गवराम मला जें कांहीं सांगेल, त्याप्रमाणें वागणें हेंच मी श्रेष्ठ कार्य समजत्यें. ५. १०. १७६.

---

## अध्याय १७७ वा.

[ १ अंबेचा अकृतव्रणाशीं संकेत. २ भीष्मच या दुःखाचें कारण आहे असा निश्चय. ३ होत्रवाहनाला भेटावयास रामाचें आगमन व त्याला भीष्मवधाची प्रार्थना. ]

( १ ) अकृतव्रण—हे वत्से, भीष्म व शाल्व हे दोघे तुझ्या या दुःखाचें निमित्त आहेत. त्या दोघां शत्रूंपैकीं कोणाचा नाश व्हावा अशी तुझी इच्छा आहे, तें मला सांग. हे भद्रे, शाल्वाला तुझें पाणिग्रहण करणें भाग पाडावें, अशी जर तुझी इच्छा असेल तर महात्मा राम तुझ्या हितेच्छेनें त्याला विवाहार्थ नियुक्त करील.

भीष्म सत्यप्रतिज्ञ आहे. तो कदापि विवाह करणार नाहीं. तथापि तुझ्या संतोषासाठीं त्याला जिंकणें शक्य आहे. त्याला युद्धांत जिंकलेलें पहाण्याची जर तुझी इच्छा असेल, तर राजर्षि सृंजयाचें व तुझें वचन मान्य करून तो भार्गव त्याप्रमाणें अवश्य करील. यास्तव तुझें इष्ट कार्य काय आहे याचा सत्वर विचार कर.

अम्बा—हे ब्रह्मन्, माझें मन शाल्वावर गेलें आहे, हें भीष्माला माहीत नव्हतें, त्यामुळें त्यानें हा प्रकार न जाणतां माझें हरण केलें. त्यांत त्याचा अपराध दिसत नाहीं. यास्तव तूंच याचा पूर्णपणें विचार करून काय तो निश्चय कर. भीष्माला रणांत जिंकून शिक्षा करावी किंवा शाल्वाला माझ्याशीं विवाहबद्ध होण्यास भाग पाडावें, याविषयीं तूंच योग्य निश्चय ठरवून

त्याप्रमाणें व्यवस्था कर. माझ्या दुःखाचें मूल काय आहे, तें मीं तुला जसेंच्या तसें निवेदन केलें आहे. आतां पुढील योजना करण्यास तूंच समर्थ आहेस.

(२) अकृतव्रण—भद्रे, तुझें हें भाषण योग्य आहे. तूं धर्म्य वचन बोललीस. माझें या संबंधीं मत ऐक. भीष्मानें जर तुला बलात्कारानें हस्तिनापुरास नेलें नसतें, तर परशुरामानें आज्ञा करतांच शाल्वानें ती शिरसा मान्य करून तुझें पाणिग्रहण केलें असतें. परंतु गांगेयानें तुला जिंकून नेल्यामुळें शाल्वाच्या मनांत तुझ्याविषयीं संशय उत्पन्न झाला आहे. शिवाय हे भीरु, भीष्म अतिशय मानी असून तो स्वतःला अजिंक्य समजत असतो. यास्तव भार्गवाकडून तूं त्याचेंच गर्वहरण करीव.

अम्बा—हे ब्रह्मन्, माझ्या मनांतहि हीच इच्छा आहे. या भीष्माचा रणांत नाश करवावा असें मला नित्य वाटत असतें. परंतु हे द्विजश्रेष्ठा, मला हें दुःख देण्याचा दोष भीष्म किंवा शाल्व या दोघांतील ज्याच्याकडे अधिक आहे, असें तुला वाटत असेल, त्याला शिक्षा कर.

भीष्म—हे भरतश्रेष्ठा, याप्रमाणें संभाषण करण्यांत त्यांचा तो दिवस व सुखद रात्र निघून गेली. त्यावेळीं शीतोष्णयुक्त सुखद वायु वहात होता. दुसऱ्या दिवशीं प्रातःकालीं आपल्या तेजानें देदीप्यमान होणारा परशुराम तेथें प्राप्त झाला. शिष्यांनीं परिवेष्टित असलेला तो जटा-वल्कलें धारण करणारा मुनि त्या राजर्षीच्या समीप आला. तो निष्पाप शूर भार्गवराम धनुष्य, बाण, खड्ग व परशु यांनीं शोभत होता.

(३) त्या महातपस्वी तापसाला पहातांच सृंजयराजा व ती तपस्विनी कन्या हीं दोघेंहि उठून उभीं राहिलीं. त्यांनीं अव्यग्र चित्तानें भार्गवाचें मधुपर्कानें यथाविधि पूजन केलें. तेव्हां त्यांच्याकडून यथान्याय सत्कार केला गेलेला तो राम सर्वांसह आसनावर बसला. नंतर होत्रवाहन व जामदग्न्य या उभयतांनीं आपला इतक्या दिवसांचा वृत्तान्त परस्परांस कथन केला. त्या संभाषणानंतर योग्य समय पाहून राजर्षि होत्रवाहन त्या महाबलाढ्य भृगुश्रेष्ठाला मधुर शब्दांनीं असें अर्थयुक्त वचन बोलला—"हे भार्गवा, ही काशिराजकन्या अम्बा माझी दौहित्री आहे. तिचें तुझ्यापाशीं कांहीं कार्य आहे. तूं कार्यविशारद आहेस. यास्तव तिच्याच मुखानें तें यथार्थ वृत्त ऐकून घे."

तें ऐकून राम म्हणाला—हे वत्से, तुला जें कांहीं सांगावयाचें असेल, तें मला अवश्य कथन कर.

तेव्हां अम्बेनें आपल्या कमलदलासारख्या हातांनीं त्या अग्नीप्रमाणें प्रज्वलित दिसणाऱ्या रामाच्या शुभ व श्रेष्ठ चरणांना स्पर्श करून वंदन केलें व ती त्याच्या समोर उभी राहून शोकाकुल होऊन रोदन करूं लागली. अश्रुयुक्त नेत्रांनीं ती राजकन्या शरण्य भृगुनंदनाला शरण गेली.

राम—हे नृपात्मजे, तूं जशी या सृंजयाची दौहित्री आहेस, तशीच माझीहि आहेस. तुझ्या मनांतील दुःख मला निःशंकपणें सांग. तुझा जो कांहीं इष्ट हेतु असेल तो मी पूर्ण करीन.

अम्बा—हे भगवन्, मी तुज महाव्रताला शरण आल्यें आहें. या घोर शोकपङ्कांत मग्न झालेल्या माझा उद्धार कर.

भीष्म—तिचें तें अप्रतिम रूप, शरीराची कांति व अतिशय सुकुमार देह पाहून राम चिंतातुर झाला. 'ही काय बरें सांगणार आहे, असा तो विचार करूं लागला. तिची ती शोकाकुल अवस्था पाहून त्याचें अंतःकरण द्रवलें. त्याला तिची दया आली व तिचें सान्त्वन करून त्यानें तिला पुनः 'आपलें कार्य सांग' असें म्हटलें. तेव्हां त्या सुहासिनीनें सर्व यथार्थ वृत्तान्त त्याला निवेदन केला.

तिचा सर्व वृत्तान्त ऐकल्यावर भार्गवानें त्या राजकन्येला आपण असा निश्चय केला आहे असें सांगितलें.

राम—हे राजनंदिनि, मी तुलाच कुरुश्रेष्ठ भीष्माकडे पाठवितों. तो नराधिप माझ्या सांगण्याप्रमाणें निश्चयानें वागेल. त्यानें जर माझी आज्ञा अमान्य केली तर मी माझ्या शस्त्रांच्या तेजानेंच त्याला अमात्यांसह रणामध्यें दग्ध करून टाकीन. किंवा त्याच्याकडे जाण्याची जर तुझी इच्छा नसेल तर मी वीर शाल्वालाच तुझ्याशीं विवाह करण्यास नियुक्त करीन.

अम्बा—हे भृगुनंदना, माझें मन पूर्वींच शाल्वराजावर जडलें आहे. हें वृत्त ऐकतां क्षणींच भीष्मानें मला त्याच्याकडे जाण्याची मोकळीक दिली. परंतु मीं त्या सौभराजाकडे जातांच माझ्या चारित्र्याविषयीं साशंक झालेल्या त्यानें माझा स्वीकार केला नाहीं. उलट दुरुक्तिपूर्वक मला तिरस्कृत केलें. यास्तव या

सर्व गोष्टींचा विचार करून तुला जें कांहीं योग्य दिसेल तसा निश्चय कर. परंतु हे विभो, माझें जर मत विचारशील तर हा महाव्रत भीष्मच माझ्यावरील या संकटाचें मूळ आहे, असें मी समजतें. कारण त्यानेंच आरंभीं बलात्कारानें माझें हरण केल्यामुळें हा सर्व अनर्थ ओढवला आहे. यास्तव हे महाबाहो, ज्याच्यामुळें मी या दुःखाला प्राप्त झालें, त्या भीष्माचा तूं वध कर. त्याचें अनिष्ट करण्याची माझी इच्छा आहे.

हे भार्गवा, ज्याअर्थी त्यानें माझें हरण केलें, त्याअर्थी तो लुब्ध आहे. विवाहाची इच्छा नसतांना कन्याहरण करणें यांत दोष आहे. त्या नीच भीष्मानें माझें हरण करून स्वतः माझा अंगीकार केला नाहीं, त्याला स्वतःच्या दुर्जयत्वाचा मोठा गर्व आहे. यास्तव त्याचा प्रतिघात करण्यास मी उद्युक्त झालें आहें. हे अनघा, ज्यावेळीं त्या गाङ्गेयानें माझें बलात्कारानें हरण केलें, त्याच वेळीं मनांत मीं त्याचा नाश करण्याचा संकल्प केला. तस्मात् हे महाबाहो, वृत्रासुराला गतप्राण करणाऱ्या इंद्राप्रमाणें तूं भीष्माचा वध कर आणि माझी एवढी मनीषा पूर्ण कर. ५. १०. १७७.

---

## अध्याय १७८ वा.

[ १ भीष्म व अंबा यांचा भीष्मवधाविषयीं संवाद. २ अकृतव्रणाचा भीष्माच्या नाशाविषयीं आग्रह. ३ परशुरामानें केलेली भीष्मवधाची प्रतिज्ञा व ऋषि आणि अंबा यांसह त्याचें भीष्माकडे गमन. ४ भीष्मास पाचारण, त्याला अंबेचें पाणिग्रहण करण्याची आज्ञा. ५ भीष्मानें नम्रपणें केलेला निषेध. ६ रामाचा आग्रह, उभयतांचा त्याविषयीं संवाद. ७ रामाचें युद्धार्थ आह्वान. ८ भीष्मानें केलेला त्याचा स्वीकार. ९ उभयतांचें कुरुक्षेत्रीं गमन. १० गंगेची मध्यस्थी. ]

(१) भीष्म—याप्रमाणें त्या काशिराजकन्येनें रोदन करीत 'भीष्माचा वध कर' अशी पुनः पुनः प्रेरणा केली असतां राम तिला म्हणाला—"हे राजकन्ये, तुझें म्हणणें योग्य आहे, परंतु ब्रह्मवेत्त्याच्या कार्यावांचून इतर कोणत्याहि प्रसंगीं हातांत शस्त्र धारण करावयाचें नाहीं' अशी माझी प्रतिज्ञा आहे. यास्तव मी यावांचून तुझें दुसरें कोणतें प्रिय करूं तें सांग. भीष्म व शाल्व हे दोघेहि माझ्या आज्ञेंत वागणारे आहेत. ते माझ्या वचनाचें उल्लंघन केव्हांहि करणार नाहींत. तस्मात् तूं जें कांहीं सांगशील, ती तुझी इच्छा मी पूर्ण करीन. परंतु



**परशुराम**—हे भीष्मा, ही राजकन्या अंबा आहे. माझ्या आज्ञेवरून तूं हिचें पाणिग्रहण कर.

[ अ. १७८, पृ. ११२

विप्रांच्या आज्ञेवांचून कदापि शस्त्रधारण करणार नाहीं, अशी प्रतिज्ञा केल्यामुळें मला भीष्माचा वध करतां येणार नाहीं.

अम्बा—हे प्रभो, कोणत्याहि उपायानें आपल्याला माझ्या दुःखाचें निवारण करावयाचें आहे व माझ्या या दुःखाचें कारण भीष्म आहे. यास्तव त्याचा वध करून माझें हें दुःख नाहींसें कर.

राम—हे काशिकन्ये, तूं पुनः विचार कर व हा आग्रह सोडून दे. तुला जर भीष्माची मानहानीच करावयाची असली तर तो सर्वांना वंद्य असलेला गाङ्गेय माझ्या आज्ञेवरून तुझ्या दोन्ही चरणांना शिरसा वंदनहि करील.

अम्बा—हे रामा, तुला जर माझें प्रिय करण्याची इच्छा असेल, तर तूं भीष्माचा युद्धांत वध कर. शिवाय तूं माझें प्रिय करण्याचें मला वचन दिलें आहेस, तें तुला सत्य करणेंच उचित आहे.

( २ ) भीष्म—हे राजन्, याप्रमाणें राम व अम्बा या दोघांचा चाललेला संवाद ऐकत अकृतव्रण इतका वेळ स्वस्थ बसला होता, तो परमधर्मात्मा म्हणाला—"हे महाबाहो, ही कन्या तुला शरण आली आहे. तिचा असा त्याग करणें तुला योग्य नाहीं. असुराप्रमाणें गर्जना करणाऱ्या भीष्माचा तूं रणांत वध कर. हे वीरा, तूं युद्धाचें आह्वान करतांच भीष्म रणांगणांत 'मी जिंकलों गेलों' असें तरी बोलेल किंवा तुझ्या आज्ञेप्रमाणें वागण्याचें कबूल तरी करील. त्यामुळें तूं या कन्येचें कार्य करून व आपलें वचन सत्य केलेंस असें होईल.

शिवाय हे भार्गवा, तूं सर्व क्षत्रियांना जिंकून सर्व ब्राह्मणांच्या समक्ष अशी प्रतिज्ञा केल्याचें मीं ऐकलें आहे कीं, कोणीहि ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य किंवा शूद्र ब्रह्मद्वेष्टा झाल्यास मी त्याचा युद्धांत वध करीन. त्याचप्रमाणें कोणीहि भयार्त संरक्षणासाठीं मला शरण आला असतां मी जिवंत असेपर्यंत त्या शरणार्थी जीवाचा त्याग करण्यास समर्थ नाहीं आणि जर कोणीं क्षत्रिय युद्धांत जमलेल्या सर्व वीरांना जिंकून स्वतः अजिंक्य म्हणून प्रकाशूं लागेल तर मी त्याचाहि रणांत वध करीन. अशा तुझ्या प्रतिज्ञा मला स्मरतात.

यास्तव हे विभो, तुझ्या शेवटच्या प्रतिज्ञेप्रमाणें तो कुरुकुलभूषण भीष्म समरांमध्यें सर्वदा विजयी असतो, त्याला संग्रामांत गांठून तूं त्याच्याशीं युद्ध कर."

म. भा. ६—८

( ३ ) राम—हे ऋषिश्रेष्ठा, मीं पूर्वी केलेली ही प्रतिज्ञा मला स्मरत आहे. परंतु मी प्रथम सामानेंच कार्य साधल्यास पहातों. या काशिराजकन्येचें हें मनोगत कार्य फार कठिण आहे. यास्तव त्या राजकन्येला बरोबर घेऊन मी स्वतःच भीष्माकडे जातों व त्याला सामोपचारानें सांगून पहातों. त्यानें जर ऐकलें तर ठीक आहे. पण त्या रणश्लाघी भीष्मानें जर माझें वचन मान्य केलें नाहीं, तर मी त्या अहंकारी कुरुपुंगवाचा निश्चयानें वध करीन. मीं सोडलेले बाण प्राण्यांच्या देहाला केवल वेधच करीत नाहींत, तर ते त्यांच्या प्राणांचें हरण करीत असतात, हें पूर्वी झालेल्या क्षत्रियसंग्रामांत तूं पाहिलेंच आहेस.

असें बोलून परशुरामानें त्या सर्व ब्रह्मवेत्त्यांसह भीष्माकडे जाण्याचा विचार केला व तो तेथून उठला. ते सर्व तापस तेथें राहून दुसऱ्या दिवशीं प्रातःकालीं आपलें जपजाप्य, होमहवन उरकून माझा वध करण्याच्या इच्छेनें त्या कन्येसह तेथून निघाले व तो सर्व ऋषींचा परिवार कुरुक्षेत्रीं येऊन पोंचला. तेथें महात्म्या भार्गवाला पुढें करून त्या सर्व तापसांनीं सरस्वतीनदीच्या तीरावर निवास केला.

( ४ ) याप्रमाणें तेथें वास्तव्य करून तिसऱ्या दिवशीं त्या महाव्रत रामानें मला असा संदेश पाठविला कीं, हे राजन्, मी येथें आलों आहें. यास्तव मला भेटून माझें प्रिय कर. तेव्हां देवतुल्य ऋत्विक्, पुरोहित व ब्राह्मण यांच्या परिवारासह गायीला पुढें करून मी तत्काल मोठ्या त्वरेनें त्या तेजोनिधि प्रभूच्या समीप गेलों व नगरीच्या सीमेवर असलेल्या त्याचें यथाविधि पूजन केलें.

मला पहातांच त्या प्रतापवान् जामदग्न्यानें कुशल प्रश्नपूर्वक माझें स्वागत केलें व माझ्या पूजेचा स्वीकार करून मला असा प्रश्न केला—

राम—हे भीष्मा, तूं या काशिराजकन्येला कोणत्या हेतूनें हरण करून आणिलें होतेंस व पुनः तिला परत पाठविलेंस! तूं जरी हें कृत्य बुद्धिपुरस्सर केलें नसलेंस, तरी तुझ्या या कृतीनें ही यशस्विनी धर्मापासून च्युत झाली आहे. तूं जिचें बलात्कारानें हरण केलेंस, तिचें पाणिग्रहण आतां दुसरा कोण करणार! तूं हरण करून नेल्यामुळेंच शाल्वानें तिचा स्वीकार केला नाहीं. यास्तव माझ्या आज्ञेवरून तूं तिचा परिग्रह कर. या राजकन्येचा असा अव-मान करणें तुला युक्त नाहीं. यास्तव हे अनघा, तूं माझ्या आज्ञेनें हिचा

स्वीकार कर. हे पुरुषश्रेष्ठा, ही राजपुत्री स्वर्गास पात्र होवो. राजांचा असा अवमान करणें तुला योग्य नाहीं.

असें बोलून परशुराम फार खिन्न झाला आहे, असें पाहून मी त्यास म्हणालों—' हे ब्रह्मन्, तुझें म्हणणें कळलें, परंतु मी आतां ही राजकन्या माझ्या भ्रात्याला कदापि अर्पण करणार नाहीं. कारण हे भार्गवा, ' मीं पूर्वीच शाल्वाला मनानें वरिलें आहे ' असें हिनेंच म्हटल्यावरून मीं तिला शाल्वाकडे जाण्याची अनुज्ञा दिली. हिला त्याच्या नगरीस पोंचतें केलें आणि तीहि स्वसंतोषानें त्याच्याकडे गेली. शिवाय मी भयानें, अनुकंपेनें, अर्थलोभानें किंवा कोणत्याहि कामनेनें क्षात्रधर्माचा त्याग करणार नाहीं, हें माझें अंगीकृत व्रत आहे.

माझें हें वचन ऐकतांच रामाचे नेत्र क्रोधानें व्याकुल झाले व तो मजकडे पाहून म्हणाला—" हे नरश्रेष्ठा, तूं जर माझें हें वचन मान्य केलें नाहींस, तर मी आज अमात्यासह तुला गतप्राण करीन."

( ५ ) भार्गवराम क्रोधाविष्ट होऊन पुनः पुनः जेव्हां असें बोलूं लागला, तेव्हां मीं नम्र व इष्ट अशा शब्दांनीं त्याची प्रार्थना केली. त्या ब्राह्मणश्रेष्ठाला शिरसा वंदन केलें, परंतु तो शांत झाला नाहीं. मीं त्याला म्हटलें—"हे महाबाहो, तूं आज कोणत्या हेतूनें मजबरोबर युद्धाची इच्छा करीत आहेस ! मी तुझा शिष्य आहें. तूंच मला बालवयांत चतुर्विध धनुर्वेदाचें शिक्षण दिलेंस व आतां माझ्याशींच युद्धाला कसा प्रवृत्त होतोस ! "

( ६ ) माझ्या या भाषणानें राम अधिकच संतप्त झाला. क्रोधानें नेत्र आरक्त करून तो म्हणाला—"हे भीष्मा, तूं मला गुरु समजतोस व माझें वचन मात्र मान्य करीत नाहींस ! हे कुरुनंदना, माझें प्रिय करण्यासाठीं या काशिराजकन्येचा तूं स्वीकार कर. तें जर तूं ऐकणार नाहींस तर तुला शान्ति मिळणें शक्य नाहीं. हे महाबाहो, या राजकन्येचा परिग्रह करून तूं आपल्या कुलाचें रक्षण कर. तूं हिचें हरण केल्यामुळें तिला आतां अन्य भर्ता मिळणें शक्य नाहीं. "

परपुरंजय रामानें असा आग्रह धरला असतां मी त्याला म्हणालों—" हे ब्रह्मर्षे, तूं व्यर्थ हे श्रम कशाला घेतोस ? कांहीं झालें तरी मी या कन्येचें

पुनर्ग्रहण कदापि करणार नाहीं. हे भगवन्, तूं माझा पुरातन गुरु आहेस, हें स्मरून मी तुझी प्रार्थना करितों कीं, मजवर प्रसन्न हो व हा आग्रह सोड. या राजकन्येचा मीं एकदा पूर्वीं त्याग केला आहे. तिचा पुनरपि स्वीकार कसा करूं !

हे विभो, जिचें मन अन्य वरावर आसक्त झालें आहे, अशा स्त्रीला तें जाणूनहि कोणता सुज्ञ पुरुष सर्पिणीप्रमाणें घरांत बाळगील ! स्त्रियांचा हा दोष मोठ्या अनर्थाला कारण होत असतो. हे महाव्रता, साक्षात् इंद्र जरी आला, तरी मी त्याच्या भयानेंहि माझ्या या दृढ व्रतापासून च्युत होणार नाहीं. यास्तव हे प्रभो, तूं मजवर प्रसन्न हो अथवा नको होऊं. तुला जें कांहीं करावयाचें असेल तें सत्वर कर. विलंब लावूं नको.

( ७ ) हे भृगुनंदना, पुराणांत महात्म्या मरुत्तानें गाईलेला असा एक श्लोक श्रुत आहे. ईस, कार्याकार्य न जाणणारा व अमार्गानें जाणारा प्रत्यक्ष गुरु जरी असला तरी त्याचा त्याग करावा. हे निष्पापा, तूं माझा गुरु आहेस, हें जाणून मीं मोठ्या प्रेमानें तुझा सन्मान केला. परंतु ज्याअर्थीं तूं स्वतःची गुरुवृत्ति जाणत नाहींस, त्याअर्थीं मला तुझ्याशीं युद्ध करणें प्राप्त आहे. गुरूशीं युद्ध करण्याची माझी इच्छा नाहीं. विशेषतः ब्राह्मण व त्यांतहि तपोवृद्ध अशा गुरूवर समरांत शस्त्र उगारूं नये, अशी माझी इच्छा असल्यामुळें मी तुझ्याशीं शांत चित्तानें वागलों व तुझें बोलणें सहन केलें.

क्षत्रियाप्रमाणें शस्त्र उगारून युद्धाला सज्ज होणाऱ्या व रणांगणांतून पलायन न करणाऱ्या क्रुद्ध ब्राह्मणाचा समरांत वध करणारास ब्रह्महत्येचा दोष लागत नाहीं, असा धर्मशास्त्रांत निश्चय केलेला आहे. हे तपोधना, मी क्षत्रिय आहें व क्षत्रधर्मात स्थित आहें. जो पुरुष प्रेमानें किंवा द्वेषानें जसा वागत असेल, त्याच्याशीं तसेंच प्रेमाचें किंवा द्वेषाचें आचरण करणारा मनुष्य अधर्माला प्राप्त होत नाहीं किंवा त्याचें कदापि अकल्याण होत नाहीं.

---

१ गुरोरप्यवलिप्तस्य कार्याकार्यमजानतः ।
उत्पथप्रतिपन्नस्य परित्यागो विधीयते ॥

२ यो यथा वर्तते यस्मिंस्तस्मिन्नेव प्रवर्तयन् ।
नाधर्मं समवाप्नोति न चाश्रेयश्च विन्दति ॥

यावर तूं कदाचित् असें म्हणशील कीं, मी तुला दारपरिग्रहासारख्या अर्थांमध्यें प्रवृत्त करून तुझ्याशीं प्रेमाचेंच वर्तन करीत आहें. तर त्याचें उत्तर ऐक—गुरुवचनावरून स्त्रीचें ग्रहण करणें हा अर्थ व पित्याच्या प्रीत्यर्थ स्वीकारलेलें ब्रह्मचर्यव्रत हा धर्म, यांतील कशाला अनुसरावें, असा संशय प्राप्त झाला असतां देशकालानुसार विवेक करण्यास कुशल असलेले पंडित गुरुवचनाच्याहि विरुद्ध वागून धर्माचें पालन करणेंच अधिक श्रेष्ठ मानीत असतात. कारण अर्थ संशयित असून धर्माचें अनुष्ठान सर्वदा अधिक श्रेयस्कर असतें.

(८) यास्तव ज्याअर्थीं तूं मला या संशयित असलेल्याहि अर्थामध्यें अन्यायानें प्रवृत्त करीत आहेस, त्याअर्थीं मी रणांगणांत तुझ्याशीं युद्ध करीन. हे भृगुनंदना, आज तूं माझें बाहुबल व अतिमानुष पराक्रम पहा. अशाप्रकारें दुराग्रह धरणाऱ्या तुझ्याशीं मला जें कांहीं करणें शक्य असेल तें मी कुरुक्षेत्रांत करून दाखवीन व तुझ्याशीं द्वंद्व युद्ध करीन.

हे महाद्युतिमान् रामा, माझ्याशीं द्वंद्वयुद्धाला सज्ज हो. त्या महारणांत माझ्या शेंकडों शरांनीं पीडित झालेला तूं गतप्राण होऊन पडशील व शस्त्रानें पवित्र केलेल्या वीरांच्या लोकांना प्राप्त होशील. यास्तव आतां तूं येथून परत फिर व कुरुक्षेत्रांत जा. तेथें मीहि तुझ्याशीं युद्ध करण्यासाठीं येतों.

हे भार्गवा, जेथें तूं पूर्वीं पित्यासाठीं शौच केलेंस, तेथें मीहि तुझा वध करून तुझें आशौच शौच पाळीन. कारण पित्याप्रमाणें गुरूच्या मरणाचेंहि आशौच प्राप्त होत असल्यामुळें त्या धारातीर्थांत रुधिराची अंजुलि देऊन सचैल स्नानादिकांनीं दहाव्या दिवशीं मी स्वतःची शुद्धि करून घेईन. तस्मात् हे युद्धदुर्मद ब्राह्मणश्रेष्ठा, तूं त्वरित रणक्षेत्रांत जा. तुझा पुरातन दर्प मी आज नाहींसा करीन.

हे भार्गवरामा, 'मीं एकट्यानें या लोकीं सर्व क्षत्रियांना जिंकलें' अशी जी तूं दीर्घकाल नेहमीं आत्मश्लाघा करीत असतोस, त्याचें उत्तर ऐक. त्यावेळीं भीष्म उत्पन्न झाला नव्हता, किंवा माझ्या सारखा दुसरा कोणी क्षत्रियहि निपजला नव्हता. तूं क्षत्रियांचा नाश केल्यावर क्षत्रियकुलांत क्षत्रतेजें उत्पन्न झालीं. अर्थात् तोंपर्यंत तृणवत् असलेल्या लोकांना तूं आपल्या तेजानें दग्ध करूं शकलास. परंतु आतां तुझा सर्व दर्प व काम यांचा समूल नाश करण्यास समर्थ असलेला हा भीष्म उत्पन्न झाला आहे. तो मी युद्धामध्यें तुझा गर्व नाहींसा करीन, यांत संशय नाहीं.

भीष्म—हे भारता, माझें हें भाषण ऐकून राम हंसून म्हणाला—हे भीष्मा, ठीक आहे. तूं माझ्याशीं समरांगणांत युद्ध करण्यास तयार आहेस, हें फार उत्तम झालें. मी तुझ्याशीं युद्ध करण्यासाठीं कुरुक्षेत्रांत जाईन व तेथें तुझ्या या भाषणाप्रमाणें सर्व करीन. हे गांगेया, त्या रणक्षेत्रांत माझ्या शेंकडों शरांनीं विद्ध होऊन गृध्र व काक यांच्या समुदायांच्या भक्ष्यस्थानीं पडलेल्या तुज दीनाला पाहून सिद्ध-चारणांनीं सेवन केलेली तुझी माता जाह्नवी आज रोदन करील. युद्धाविषयीं आतुर असलेल्या तुज मंदमतीला जिनें जन्म दिला, ती निष्पाप महाभागा भागीरथी देवी मीं तुझा वध केलेला पाहून व्यथित होवो. हे युद्धदुर्मद भीष्मा, ये, तुझी रथादि सर्व युद्धसामग्री घेऊन मजबरोबर चल.

असें बोलणाऱ्या त्या परपुरंजय रामाला मीं शिरसा वंदन करून 'ठीक आहे' असें म्हटलें. तेव्हां राम युद्धाच्या इच्छेनें कुरुक्षेत्रास निघून गेला आणि मीं नगरींत प्रवेश करून सत्यवतीला सर्व वृत्तान्त निवेदन केला. त्यावेळीं मातेनें माझें अभिनंदन करून स्वस्त्ययन केलें. मीं ब्राह्मणाकडून पुण्यकर स्वस्तिवाचन करविलें आणि युद्धाला निघालों.

(९) माझ्या उत्तम रौप्य रथाला शुभ्र अश्व जोडिले. तो व्याघ्रचर्मानें मढविलेला रथ सज्ज, सर्व शस्त्रें व इतर आयुधें यांनीं युक्त होता. मीं अश्वविद्यानिपुण, वीर व अनुभविक असा निष्णात सारथि नियुक्त केला. शोभिवंत व शुभ्र कवच धारण केलें व रथारूढ झालों. माझ्या भृत्यांनीं माझ्या मस्तकावर शुभ्र छत्र धारण केलें व ते श्वेत चवऱ्या वारूं लागले. मीहि सर्व शुभ्र वस्त्रें व अलंकार यांनीं भूषित होऊन सज्ज झालों व जयाशीर्वादांनीं स्तुति केला गेलेला मी हस्तिनापुरांतून निघून कुरुक्षेत्राच्या रणभूमीकडे जावयास निघालों. त्यावेळीं माझ्या सारथ्यानें चोदना करितांच मन व वायु यांच्या वेगानें अश्वांनीं मला कुरुक्षेत्रांत नेऊन सोडलें. मी कुरुक्षेत्रांत गेलों तों तो राम तेथें युद्धासाठीं सज्ज होऊन पूर्वींच माझी वाट पहात होता.

मी कुरुक्षेत्रांतील रणक्षेत्रांत अतितपस्वी रामाच्या समीप जाऊन उभा राहिलों व माझा श्रेष्ठ शंख वाजविला. तेव्हां हे राजन्, सर्व द्विज, वनांत रहाणारे तापस व इंद्रासह देवगण तें दिव्य युद्ध पहावयास जमले. सर्वतः दिव्य पुष्पांची वृष्टि झाली. दिव्य वाद्यें वाजूं लागलीं व आकाशांत मेघांचे समूह दिसूं लागले. भार्गवाचे अनुयायी सर्व तापस त्या रणक्षेत्राच्या सभोंवार प्रेक्षक म्हणून उभे राहिले.

( १० ) हे राजन्, त्यानंतर सर्व भूतांच्या हितांत तत्पर असलेली माझी माता देवी गङ्गा मानुष रूपानें प्रकट झाली व मला म्हणाली—" हे कुरुश्रेष्ठा, तूं हें काय करावयाचें मनांत आणिलें आहेस ! मी जामदग्न्य रामाकडे जातें व त्याची प्रार्थना करित्यें कीं, भीष्म तुझा शिष्य आहे, त्याच्याशीं युद्ध करूं नको. हे पुत्रा, तूं विप्राशीं असा आग्रह धरूं नको. भार्गवाशीं समरांत युद्ध करणें योग्य नव्हे. ज्याच्याशीं तूं युद्धाची इच्छा करीत आहेस, तो राम क्षत्रियांचा संहार करणारा असून हरतुल्य पराक्रमी आहे, हें तूं जाणत नाहींस काय ? " असें बोलून तिनें माझी निर्भर्त्सना केली.

तेव्हां मीं त्या देवीला हात जोडून अभिवादन केलें व त्या स्वयंवराचा सर्व वृत्तान्त निवेदन केला. त्याचप्रमाणें काशिराजकन्येचें सर्व पूर्ववृत्त व भार्गव-रामाची मीं अनेक प्रकारें केलेली प्रार्थना, हेंहि सर्व कथन केलें.

तें ऐकून ती माझी जननी महानदी त्या ऋषीजवळ गेली व माझ्यासाठीं रामाची क्षमा मागून म्हणाली—" हे भृगुश्रेष्ठा, भीष्म तुझा शिष्य आहे. त्याच्याशीं युद्ध करूं नको. "

अशी प्रार्थना करणाऱ्या तिला राम म्हणाला—तूं भीष्मालाच निवृत्त कर. तो माझी इच्छा पूर्ण करीत नाहीं, म्हणून मी त्याच्याशीं युद्धाला प्रवृत्त झालों आहें.

वैशंपायन—जनमेजया, तेव्हां गंगा पुत्रस्नेहानें पुनः भीष्माकडे आली व त्याला रामाचें इष्ट करण्यास सांगूं लागली. परंतु भीष्मानें तिचें वचन ऐकिलें नाहीं. त्याचे नेत्र क्रोधानें आरक्त दिसूं लागले. तेव्हां द्विजश्रेष्ठ महा-तपस्वी धर्मात्म्या भार्गवरामानें भीष्माला युद्धाचें आह्वान केलें. ५. १०.१७८.

---

## अध्याय १७९ वा.

[ १ रामाला वंदन करून भीष्माचा युद्धारंभ. २ सूर्यास्तापर्यंत उभयतांचें युद्ध. ]

( १ ) भीष्म—हे राजा, त्यावेळीं रणांगणांत स्थित असलेल्या त्या रामाला मीं हंसतच असें उत्तर दिलें—" हे वीरा, भूमीवर स्थित असलेल्या तुझ्याशीं रथारूढ असलेल्या माझी युद्ध करण्याची इच्छा नाहीं. यास्तव माझ्याशीं युद्ध करण्याची तुझी जर इच्छा असेल तर तूं प्रथम रथारूढ हो व कवच धारण कर.

तेव्हां त्या रणक्षेत्रांत रामानेंहि मला हंसूनच म्हटलें—" हे भीष्मा, ही पृथ्वीच माझा रथ आहे व चार वेद मला सदश्वाप्रमाणें वाहून नेणार आहेत. वायु माझा सारथि आहे आणि गायत्री, सावित्री व सरस्वती या तीन वेद-माता हेंच माझें कवच आहे, व तें मीं धारण केलें आहे. त्याच्याकडून संर-क्षित असलेला मी तुझ्याशीं समरांगणांत युद्ध करीन."

असें बोलून त्या सत्यपराक्रमी रामानें फार मोठ्या शरजालानें मला सर्वतः शरांनीं वेढून सोडिलें. त्यावेळीं तो जामदग्न्य राम श्रेष्ठ रथांत स्थित आहे, असें मीं पाहिलें. त्याचा तो रथ मनानेंच उत्पन्न केलेला असून नगरासारखा विस्तीर्ण व पुण्यावह होता. तो सर्व आयुधांनीं युक्त, तेजस्वी व त्याचें दर्शन एखाद्या अद्भुत वस्तूसारखें होतें. त्याला दिव्य अश्व जोडून सज्ज केलें होतें. तो सुवर्णानें भूषित केला होता. हे महाबाहो, ज्याच्या-वर चंद्र व सूर्य यांचीं चिह्नें काढलीं आहेत, अशा कवचानें तो रथ युक्त होता. त्या धनुर्धरानें आपल्या दोन्ही पार्श्वभागीं बाणांचे दोन भाते बांधले होते. हातांत गोधाङ्गुलित्राण घातलें होतें. त्यावेळीं युद्धाची इच्छा करणाऱ्या त्या रामाचें सारथ्य अकृतव्रणऋषीनें केलें. तो वेदवेत्ता मुनि भार्गवाचा अत्यंत प्रिय होता. युद्धामध्यें पुनः पुनः 'ये, ये' अशी गर्जना करणारा तो भार्गव मला युद्धाचें आह्वान करीत होता. त्यामुळें माझ्या मनाला फार संतोष वाटला. मीहि एकटाच सूर्याप्रमाणें उदय पावणाऱ्या व क्षत्रियांचा अंत करणाऱ्या, दुर्धर्ष व बलाढ्य अशा एकट्याच रामावर चालून गेलों आणि माझा रथ तीन बाणांच्या अंतरावर गेला असतां मीं अश्वांचें निवारण केलें, रथ थांबवून धरिला व रथांतून उतरून पायानेंच त्या ऋषिश्रेष्ठापाशीं गेलों आणि रामाला वंदन करून त्याचें यथाविधि पूजन केलें व म्हटलें—" हे रामा, मत्तुल्य किंवा मजहूनहि अधिक असलेल्या धर्मशील गुरूशीं मी समरांगणांत युद्ध करणार आहें. यास्तव हे विभो, मला जयाचा आशीर्वाद दे."

राम—हे महाबाहो, विशिष्टाशीं युद्ध करावें, हा धर्मच आहे. हे कुरुश्रेष्ठा, तूं जर अशाप्रकारें माझी अनुज्ञा घ्यावयास आला नसतास, तर मी तुला शाप दिला असता. यास्तव तूं धैर्याचें अवलंबन करून युद्ध कर. तुझ्या या आचर-णानें मी संतुष्ट झालों आहें. परंतु मी तुला जयाचा आशीर्वाद मात्र देणार नाहीं. कारण मी तुला जिंकण्यासाठीं येथें आलों आहें. यास्तव जा धर्म्य युद्ध कर.

( २ ) रामाचें हें वचन ऐकून मीं त्याला नमस्कार केला व त्वरेनें रथारूढ झालों. आणि रणामध्यें माझा सुवर्णानें अलंकृत केलेला शंख वाजविला, त्यानंतर परस्परांना जिंकण्याच्या इच्छेनें आम्हां दोघांचें पुष्कळ दिवस तुमुल युद्ध झालें. त्या युद्धांत प्रथम रामानें सहाशें नऊ कङ्कपत्रयुक्त नतपर्व शरांनीं मजवर प्रहार केला. चार बाणांनीं माझे अश्व व सारथि यांना विद्ध केलें. तेव्हां समरामध्यें सज्ज असलेल्या मीं त्याचें निवारण केलें आणि विशेषतः देव व ब्राह्मण यांना नमस्कार करून रणांत स्थित असलेल्या भार्गवाला स्मितपूर्वक असें म्हटलें—

भीष्म—हे ब्रह्मन्, आतांपर्यंत मीं तुझी अमर्याद आचार्यता मान्य केली. तुझ्या देहांत स्थित असलेले वेद, ब्राह्मण्य आणि तूं आचरिलेलें महत्तप, यांवर मी कदापि प्रहार करणार नाहीं. परंतु हे रामा, तूं ज्या क्षत्रधर्माचा आश्रय केला आहेस, त्यावर मी प्रहार करीन. ब्राह्मण शस्त्र उगारण्यास उद्युक्त झाला म्हणजे क्षत्रियत्वाला प्राप्त होतो. तूं क्षत्रियवृत्ति धारण केली आहेस, यास्तव आज माझ्या धनुष्याचा पराक्रम व माझें बाहुबल पहा. माझ्या या तीक्ष्ण धारेच्या बाणानें मी तुझ्या धनुष्याचा छेद करितों.

असें बोलून मीं तीक्ष्ण धारेचा भल्ल बाण सोडला व त्याच्या धनुष्याच्या कोटीचा छेद करून तें भूमीवर पाडविलें. त्याचप्रमाणें कंकपत्रयुक्त शेंकडों नतपर्व बाणांची मीं जामदग्न्याच्या रथावर वृष्टि केली. त्यावेळीं भार्गवाच्या शरीरांत रुतलेले ते बाण वायूनें हालल्यामुळें सर्पांसारखे भासले. क्षतांतून रक्तस्राव होऊं लागला. त्या रणांगणांत रामाचें सर्वांग क्षतानें व्याप्त झाल्यामुळें त्यांतून वहाणाऱ्या रक्तानें तो वृद्ध जामदग्न्य त्यावेळीं गेरूचा उत्सर्ग करणाऱ्या मेरु पर्वताप्रमाणें किंवा वसंत ऋतूंत रक्तवर्ण स्तवकानें मंडित असलेल्या अशोक वृक्षाप्रमाणें, अथवा प्रफुल्ल पलाशवृक्षाप्रमाणें शोभला.

त्यानंतर क्रोधाविष्ट झालेल्या रामानें दुसरें धनुष्य सज्ज केलें व सुवर्णपुंखयुक्त तीक्ष्ण बाणांचा मजवर वर्षाव केला. तेव्हां ते मर्मभेद करणारे महावेगवान् भयंकर बाण माझ्या शरीरांत शिरले व सर्प, अग्नि किंवा विष यांप्रमाणें त्यांनीं मला कंपित केलें. तथापि मीं कंपित झालेल्या माझ्या शरीराला युद्धांत स्थिर करून क्रोधानें अग्नि व सूर्य यांच्या तुल्य शेंकडों शरांनीं रामाला विद्ध केलें. माझे ते शर सर्पांसारखे प्राणहारक होते. याप्रमाणें तीक्ष्ण

शरांनीं पीडित झालेला राम अतिशय व्याकुल झाला. त्याची ती स्थिति पाहून माझ्या मनांत दया उत्पन्न झाली. मीं आपलें नियमन करून " या क्षत्र-धर्माला धिक्कार असो आणि या युद्धालाहि धिक्कार असो, " असें मनांत म्हटलें.

हे राजन्, मीं शोकाकुल होऊन पुनः पुनः म्हटलें, " अरे, अरे, क्षत्रधर्मात स्थित असलेल्या मीं हें केवढें मोठें पातक जोडलें ! हा धर्मात्मा ब्राह्मण माझा गुरु असून मीं त्याला शरांनीं विद्ध केलें. " राजा, त्यानंतर मीं पुनः जामदग्न्यावर प्रहार केला नाहीं. इतक्यांत दिवस मावळला, सहस्ररश्मि आदित्य पृथ्वीला ताप देऊन अस्तास गेला व त्यामुळें आमचें युद्धहि थांबलें. ५. १०. १७९.

---

## अध्याय १८० वा.

[ १ राम व भीष्म यांचें अस्त्रांनीं तुमुल युद्ध. ]

( १ ) भीष्म—हे विशांपते, त्यानंतर कुशल व संमत असलेल्या माझ्या सारथ्यानें स्वतःच्या व अश्वांच्या देहांत रुतलेलीं शल्यें काढून टाकिलीं. निर्मल जलाच्या स्नानानें त्यांचे क्लेश दूर केले; व रात्रभर विश्रांति घेऊन ते पूर्ववत् ताजेतवाने झाले असतां प्रातःकालीं सूर्योदय होतांच पुनः आमचें युद्ध प्रवृत्त झालें.

कवच धारण करून रथारूढ झालेल्या मला रणांगणांत येत असलेलें पाहतांच प्रतापवान् रामहि सज्ज झाला. तेव्हां युद्धाची आकांक्षा करणारा राम येत आहे, हें पाहून मी माझें श्रेष्ठ धनुष्य टाकून रथांतून एकाएकीं खालीं उतरलों आणि त्या भार्गवाला पूर्वीप्रमाणेंच अभिवादन करून पुनः रथावर चढलों. नंतर युद्धोत्सुक असलेला मी निर्भयपणें भार्गवाच्या संमुख जाऊन उभा राहिलों व फार मोठा शरवर्षाव करून त्याला आच्छादून टाकिलें. तेव्हां क्रुद्ध झालेल्या जामदग्न्यानेंहि मजवर तीक्ष्ण शरांची वृष्टि करून मला त्यांनीं व्याप्त केलें व मुख पसरलेल्या घोर सर्पांप्रमाणें जळजळीत बाण माझ्यावर सोडिले. तें पाहून मींहि सहस्रावधि तीक्ष्ण धारेचे भल्ल बाण सोडून रामाच्या बाणांचा अंतरिक्षांतच पुनः पुनः छेद केला.

त्यानंतर प्रतापवान् जामदग्न्यानें मजवर दिव्य अस्त्रांचा प्रयोग केला. तेव्हां त्याच्याहून अधिक सामर्थ्य प्रकट करण्याच्या इच्छेनें मीं अस्त्रांनींच त्याचा प्रतिषेध केला. त्यावेळीं स्वर्गामध्यें सर्व बाजूंनीं महान् नाद झाला. हे भारता, नंतर मीं जामदग्न्यावर वायव्यास्त्राचा प्रयोग केला, त्याचा त्यानें गुह्यकास्त्रानें प्रतिकार केला. मीं आग्नेयास्त्राचें अभिमंत्रण केलें असतां रामानें वारुणास्त्रानें त्याचें निवारण केलें. याप्रमाणें मीं रामाच्या दिव्य अस्त्रांचें निवारण केलें व दिव्यास्त्रवेत्त्या तेजस्वी रामानें माझ्या अस्त्रांचा प्रतिकार केला.

हे राजन्, या अस्त्रयुद्धानंतर रामानें मला डाव्या बाजूनें प्रदक्षिणा घातली आणि त्या क्रुद्ध झालेल्या प्रतापी द्विजश्रेष्ठानें माझ्या वक्षःस्थलावर वेध केला. तेव्हां मी वेदनेनें विव्हल होऊन रथांत बसलों. माझ्या सूतानें मी रामबाणानें विद्ध झालों आहें असें पहातांच माझा रथ तेथून दूर नेला. याप्रमाणें रामाच्या बाणानें पीडित होऊन मूर्च्छा व ग्लानि आलेल्या मला माझा सारथि रणांगणांतून नेत आहे, असें पाहतांच अकृतव्रणप्रभृति रामाचे अनुचर व काशिराजकन्या यांना अतिशय संतोष झाला व त्या सर्वांनीं हर्षानें सिंहनाद केला.

इतक्यांत मी सावध झालों व सूतानें मला रणांगणांतून दूर आणलें आहे, हें जाणून त्याला म्हणालों—" हे सूता, माझ्या वेदना आतां थांबल्या आहेत. यास्तव जेथें तो राम आहे तेथें मला घेऊन चल. मी आतां युद्धाला सज्ज आहें."

तेव्हां माझ्या सारथ्यानें वायूसारख्या वेगवान् व जणुं काय नृत्यच करणाऱ्या शोभिवंत अश्वांच्या योगानें माझा रथ रामाच्या समीप नेला. त्यावेळीं मला जिंकण्याच्या इच्छेनें क्षुब्ध झालेल्या रामावर क्षुब्ध झालेल्या मीं बाणांचा वर्षाव केला. तेव्हां रामानेंहि माझ्या एकेका बाणाचा तीन तीन बाणांनीं छेद करून त्या सहस्रावधि बाणांचे दोन दोन तुकडे करून टाकिले.

त्यानंतर पुनः मीं रामाचा वध करण्याच्या इच्छेनें कालोपम, तेजस्वी व दीप्त शर त्याच्यावर सोडिला. त्या बाणाच्या वेगानें अतिशय विह्वल झालेला राम मोहित होऊन भूमीवर पडला. याप्रमाणें रामानें भूतलाचा आश्रय केला असतां सूर्यपतनाप्रमाणें सर्व जगत् उद्विग्न होऊन हाहाकार करूं लागलें. त्यावेळीं ते सर्व तपोधन मुनि व काशिराजकन्या मोठ्या त्वरेनें जामदग्न्याच्या जवळ धांवून आली. त्यांनीं त्याला आलिंगन देऊन हळुच आश्वासन दिलें, हातांनीं शीतल जलाचें सिंचन केलें आणि जयाशीर्वाद दिले.

तेव्हां राम उठून उभा राहिला व धनुष्याला बाण जोडून असें विह्वल वाक्य बोलला—" हे भीष्मा, थांब, उभा रहा. आतां तुझें मरण ओढवलेंच आहे, असें समज."

असें बोलून रामानें एक तीक्ष्ण बाण सोडिला व माझ्या डाव्या कुशींत वेध केला. त्याच्या त्या वेगवान् बाणानें मी अतिशय विह्वल झालों व वृक्षाप्रमाणें कापूं लागलों. त्याच वेळीं क्रुद्ध रामानें शीघ्रास्त्रानें माझ्या अश्वांचा वध केला आणि मजवर शीघ्रगति पक्ष्मयुक्त बाणांनीं वृष्टि केली. तेव्हां मींहि शीघ्रास्त्रें सोडून त्यांचें निवारण केलें. त्यामुळें ते शर अंतरिक्षांतच परस्परांचा निरोध करीत स्थित झाले.

रामाच्या व माझ्या शरजालांनीं समग्र आकाश आवृत झालें, सूर्याचे किरणहि पृथ्वीवर येऊं शकले नाहींत. वायु मेघानें रुद्ध झाल्याप्रमाणें वाहि-नासा झाला. तेव्हां वायूचा प्रकंप, सूर्याचीं किरणें व शरांचा परस्परांवर होणारा आघात यांच्या योगानें अग्नि उत्पन्न झाला. सूर्याच्या प्रतापामुळें उत्पन्न झालेल्या तेजानें ते शर प्रदीप्त झाले व भस्म होऊन भूमीवर पडले.

त्यानंतर अतिशय संतप्त झालेल्या रामानें मजवर असंख्य शरांचा वर्षाव केला. तेव्हां मींहि सर्पासारख्या विषारी शरांनीं त्याच्या बाणांचा छेद करून ते सर्व वृक्षाप्रमाणें भूमीवर पाडविले.

हे भरतश्रेष्ठा, याप्रमाणें आम्हां उभयतांचें तुमुल युद्ध चाललें असतां संध्या-काळ झाली, तेव्हां त्या माझ्या गुरूनें युद्ध थांबविलें ५. १०. १८०

---

## अध्याय १८१ वा.

[ १ राम व भीष्म यांचें अस्त्र व शक्ति यांच्या योगानें दारुण युद्ध. ]

[ १ ) भीष्म—हे भरतसत्तमा, दुसऱ्या दिवशीं पुनः रामाशीं माझी समरांगणांत गांठ पडली व पुनः आमचें दारुण युद्ध जुंपलें. तो धर्मात्मा राम दिव्यास्त्रवेत्ता होता. त्या शूरानें अनेक प्रकारच्या दिव्य अस्त्रांची प्रतिदिवशीं योजना केली. आणि मींहि तशाच अस्त्रांनीं त्यांचा प्रतिकार केला. आपल्या दुस्त्यज्य अशा प्राणांचीहि पर्वा न करितां त्यावेळीं मीं तुमुल युद्ध केलें. रामाच्या विविध अस्त्रांचा मीं अस्त्रांनींच नाश केला आहे, असें पाहून प्राणांवर उदार

झालेला तो महातेजस्वी जामदग्न्य अतिशय क्रुद्ध झाला. त्या महात्म्या भार्गव-रामानें आपल्या दिव्य अस्त्रांचाहि निरोध झालेला पाहून अतिशय घोर शक्ति मजवर सोडिली. कालानें सोडलेल्या उल्केप्रमाणें असलेली ती प्रज्वलित शक्ति आपल्या तेजानें सर्व लोकांना व्यापून टाकीत होती. ती प्रलयकालीन सूर्या-प्रमाणें प्रदीप्त असलेली शक्ति मजकडे येत आहे, असें पहातांच मीं तीक्ष्ण बाणांनीं तिचे मार्गांतच तीन तुकडे करून भूमीवर पाडविली. तेव्हां सुगंधयुक्त पवित्र वायु वाहूं लागला.

याप्रमाणें मीं त्या शक्तीला छिन्नभिन्न केलेलें पाहून राम क्रोधानें संतप्त झाला. त्यानें मजवर एकामागून एक अशा बारा घोर शक्ति सोडल्या. हे भारता, त्या इतक्या वेगवान् व तेजस्वी होत्या कीं, मला त्यांच्या स्वरूपाचें वर्णन करतां येणें शक्य नाहीं. लोकक्षयाच्या वेळीं उदय पावणाऱ्या द्वादश आदित्यांप्रमाणें त्या नाना रूपें धारण करणाऱ्या शक्ति आपल्या उग्र तेजानें देदीप्यमान झाल्या होत्या. अग्नीच्या ज्वालांप्रमाणें सर्व दिशांत प्रज्वलित झालेल्या त्या शक्ति पाहून मी क्षणभर भ्रान्त झालों. इतक्यांत माझ्या सभोंवार शरांचें जाळें पसरलेलें मीं पाहिलें. तेव्हां मीं त्या शरजालाचा छेद करून द्वादश बाणांनीं त्या सर्व घोर-रूपी शक्तींचेहि तुकडे करून टाकिले.

त्यानंतर महात्म्या रामानें पुनरपि मजवर अनेक भयंकर शक्ति सोडिल्या. त्या सर्व विचित्र स्वरूपाच्या असून सुवर्णाच्या पट्टयांनीं बद्ध केलेल्या होत्या. त्या हेमदंडांनीं युक्त असून महोल्कांप्रमाणें प्रज्वलित झाल्या. हे नरेंद्रा, त्या उग्र शक्तींचेंहि मीं दृढ ढालीनें निवारण केलें व खड्गानें त्यांचा छेद करून त्यांस भूमीवर पाडविलें. नंतर रामाचा रथ, अश्व आणि सारथि यांच्यावर शरवृष्टि केली.

याप्रमाणें आपल्या सुवर्णचित्रयुक्त व कात टाकलेल्या सर्पाप्रमाणें तेजस्वी शक्तींना छिन्नभिन्न केलेलें पाहून तो कार्तवीर्याचा हंता महात्मा राम अति-शय क्रुद्ध झाला व त्यानें दिव्य अस्त्रांचा प्रयोग केला. तेव्हां टोळांच्या समूहा-प्रमाणें अग्नितुल्य दीप्त शरांचा सर्व बाजूनें मजवर वर्षाव झाला. त्या शरांनीं माझें सर्व शरीर आच्छादून टाकिलें. माझा रथ, अश्व, जूं व सारथि यांना व्यापिलें. रथाचा अक्ष त्या शरांनीं भग्न करून टाकिला.

त्याची ही बाणवृष्टि थांबली असतां मींहि माझ्या गुरूवर शरांचा वर्षाव केला. माझ्या तीक्ष्ण शरांनीं त्या ब्राह्मणाच्या शरीरावर असंख्य क्षतें पडून त्यांतून रक्ताचा प्रवाह वाहूं लागला. त्याचप्रमाणें रामाच्या बाणजालांनीं पीडित झालेला मीहि अतिशय विद्ध झालों. त्या दिवशींहि अपराह्णकालीं सूर्य अस्ताचलीं जातांच आम्ही युद्धापासून निवृत्त झालों. ५. १०. १८१.

---

## अध्याय १८२ वा.

[ १ भार्गवाच्या बाणानें भीष्माच्या सारथ्याचा वध. २ भीष्माची मूर्च्छा. अष्टावसूंनीं केलेलें त्याचें रक्षण. गंगेनें केलेलें अश्वांचें नियमन. ३ भीष्माच्या शरानें रामाची मूर्च्छा व दुश्चिन्हें. ४ रामानें योजलेला प्राणघातक शर. ५ ऋषींनीं केलेलें निवारण. ]

( १ ) भीष्म—हे राजेंद्रा, ती रात्र जाऊन सूर्योदय झाला असतां भार्गवाचें माझ्याशीं पुनः युद्ध सुरू झालें. तेव्हां प्रहार करणारांतील श्रेष्ठ रामानें अभ्रान्त रथांत स्थित होऊन पर्वतावरून होणाऱ्या मेघवृष्टीप्रमाणें मजवर शरजालांचा वर्षाव केला. त्या शरवृष्टीच्या प्रहारानें माझा सुहृद् सारथि पीडित होऊन रथावरून खालीं पडला. तें पाहून मला अतिशय विषाद झाला. रामाच्या शराघातानें तो सूत भूमीवर पडून मूर्च्छित झाला आणि रामबाणानें पीडित झालेल्या त्यानें तत्काल प्राण सोडिले. सारथि गतप्राण झालेला पाहून माझ्या मनाला मोठी उद्विग्नता आली व मी एक क्षणभरच भयभीत झालों.

( २ ) याप्रमाणें माझा सारथि मृत झाला असतां व मी प्रमत्तचित्त होऊन रामावर शर फेकीत असतां रामानें आपलें दृढ धनुष्य ओढून सारथ्याच्या विपत्तींत सांपडलेल्या मजवर एक मृत्युतुल्य बाण सोडला. तो रुधिरप्राशन करणारा बाण माझ्या वक्षःस्थलांत रुतला व माझ्यासह धरणीवर पडला. तें पाहून रामाला ' मी मृत होऊन पडलों ' असें वाटलें व त्यानें हर्षातिशयानें पुनः पुनः उच्च स्वरानें मेघासारखा सिंहनाद केला. याप्रमाणें मला पडलेलें पहातांच राम आनंदित झाला व आपल्या अनुयायांसह मोठमोठ्यानें गर्जना करूं लागला. तेव्हां माझ्या बाजूला स्थित असलेले कौरव व युद्ध पहाण्यास जमलेले प्रेक्षक जन अतिशय दुःखार्त होऊन माझ्या समीप आले.

हे राजसिंहा, मी भूमीवर पडलों असतां ब्राह्मणवेषधारी आठ वसू माझ्या दृष्टीं पडले. ते सर्व सूर्य व अग्नि यांच्यासारखे देदीप्यमान होते. त्यांनीं त्या रणांगणांतून मला उचलून आपल्या बाहूंमध्यें सांवरून धरिलें. ते विप्र माझें रक्षण करूं लागले असतां मी भूमीला स्पर्श न करितांच सुरक्षित राहिलों. बांधवाप्रमाणें त्या विप्रांनीं मला अंतरिक्षांत उचलून धरलें आणि निश्वास सोडणाऱ्या मजवर जलसिंचन करून ते मला म्हणाले—"भिऊं नको, भिऊं नको तुझें सर्व क्षेम असो. त्या ब्राह्मणांच्या या आश्वासनानें मी तृप्त झालों व तत्काल उठून उभा राहिलों. तेव्हां माझी श्रेष्ठ माता गंगा मानुषस्त्रीच्या रूपानें माझ्या रथावर स्थित असलेली मला दिसली. त्या महानदीनें हातांत रश्मी धरून माझ्या अश्वांचें नियमन केलें. मीं त्या माझ्या जननीच्या चरणांना शिरसा वंदन केलें व माझ्या पितरांच्या रथावर आरूढ झालों. त्या देवीनें रथासह माझें व इतर युद्धसामग्रीचें रक्षण केलें. तिला मी पुनः हात जोडून नमस्कार केला व निरोप दिला. तेव्हां ती अंतर्धान पावली.

( ३ ) हे भारता, नंतर वायूसारख्या वेगवान् अश्वांचें मीं स्वतः नियमन करून दिवस मावळला असतांहि युद्धाला पुनः प्रवृत्त झालों व एक महासामर्थ्यवान् बाण सोडला. त्या वेगवान् बाणानें रामाच्या हृदयावर प्रहार केला. तेव्हां बाणानें पीडित झालेला तो भार्गव हातांतील धनुष्य टाकून गुडघ्यावर पडला व मूर्छित झाला. सहस्रावधि सुवर्णांचें दान करणारा तो राम भूतलावर निश्चल पडला असतां आकाश मेघांनीं व्याप्त झालें व त्या मेघांनीं रुधिराची वृष्टि केली. शेंकडों उल्कांचा पात झाला. कंपयुक्त विजांचा कडकडाट झाला. प्रखर किरणांनीं युक्त असलेल्या सूर्याला राहूनें एकाएकीं ग्रासून टाकिलें. कठोर वायु वाहूं लागले. आणि पृथ्वी कापूं लागली. गृध्र, बलाका, कावळे, हर्षभरानें तेथें जमले. भालु घोर शब्द करीत प्रदीप्त दिशेकडे धांवूं लागल्या. वाजविल्यावांचून नगाऱ्यांतून भयंकर नाद निघूं लागला. महात्मा राम संज्ञाशून्य होऊन धरणीवर पडला असतां अशाप्रकारचीं भयंकर व घोर दुश्चिन्हें झालीं.

( ४ ) त्यानंतर राम सावध झाला व विह्वल झालेला तो वीर क्रोधसंतप्त होऊन उठून उभा राहिला. त्यानें आपलें अतिशय दृढ धनुष्य हातांत घेतलें व गन्धकाच्या रसाप्रमाणें असलेल्या त्या धनुष्यावर

एक भयंकर शर जोडिला. तो प्राणघातक बाण मजवर सोडणार, इतक्यांत दयालु महर्षीनीं त्याचें निवारण केलें. तेव्हां त्यांच्या वचनावरून त्या क्रुद्ध झालेल्या अमेयात्म्या भार्गवानें तो कालानलतुल्य बाण परत घेतला.

हे भारता, त्यावेळीं आकाश धूलीनें आच्छादित झालें होतें. मंत्रमय मरीचिमंडलानें युक्त असलेला रवि अस्ताचलास गेला, रात्र प्रवृत्त झाली, सुखकर वायु वाहूं लागला व आम्ही युद्धापासून निवृत्त झालों. याप्रमाणें नित्य सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंत आमचें दारुण युद्ध चालत होतें. असें तेवीस दिवस घनघोर युद्ध झालें. ५. १०. १८२.

---

## अध्याय १८३ वा.

[ १ भीष्माला स्वप्नांत अष्टावसूंचें दर्शन. २ रामावर प्रस्वापनास्त्र सोडून त्याला जिंकण्याचा उपदेश. ]

( १ ) भीष्म—हे राजेंद्रा, त्यानंतर मी रात्रीं देवता, पितर, ब्राह्मण निशाचर, भूतें व नृपाल या सर्वांना यथाविधि शिरसा प्रणाम करून एकांतामध्यें शय्येवर पडलों व मनांत विचार करूं लागलों कीं, जामदग्न्याशीं पुष्कळ दिवसांपासून माझें हें अतिशय दारुण युद्ध चाललें आहे, परंतु त्या महापराक्रमी बलाढ्य विप्राला जिंकण्यास मी समर्थ होत नाहीं. मला महाप्रतापी जामदग्न्याला जिंकतां येणें जर शक्य असेल तर प्रसन्न झालेल्या देवता मला दर्शन देवोत. राजा, मनांत असें चिंतन करून शरविद्ध झालेला मी क्षतयुक्त देहानें उजव्या कुशीवर निजलों व निद्रावश झालों. ती रात्र संपून प्रभात होण्याच्या सुमारास मीं एक स्वप्न पाहिलें. त्यांत पूर्वी मी रणांगणांत रथांतून पडलों असतां ज्या विप्रांनीं मला उचलून धरिलें होतें, व 'भिऊं नको' असें बोलून मला धीर दिला होता, त्यांचें दर्शन मला स्वप्नांत झालें.

( २ ) हे कुरुश्रेष्ठा, ते माझ्या सभोंवार उभे राहून काय म्हणाले, तें सांगतों ऐक—"हे गाङ्गेया, ऊठ, भिऊं नको. तुला यत्किंचित्‌हि भय नाहीं. आम्ही तुझें रक्षण करीत आहों. कारण तूं आमचें शरीरच आहेस. जामदग्न्य राम तुला युद्धामध्यें कदापि जिंकूं शकणार नाहीं. तूंच समरांत रामाचा पराभव करशील. हे भारता, विश्वकर्म्या प्रजापतीनें निर्माण केलेलें 'प्रस्वाप-' नामक अस्त्र आहे. त्याचें पृथ्वीवरील कोणाहि मानवाला ज्ञान नाहीं. प्रत्यक्ष परशुरामहि तें जाणत नाहीं.

पूर्वजन्मांत वसुभावांत असतांना तुला तें अवगत होतें. हे महाबाहो, तूं त्याचें स्मरण कर म्हणजे तें स्वतःच उपस्थित होईल. त्याचा तूं प्रयोग कर. त्या अस्त्राच्या योगानें तूं सर्व महाबलाढ्य योद्ध्यांचें शासन करशील. परंतु राम या अस्त्रानें मरणार नाहीं व त्यामुळें तुला गुरुहत्येचें पाप कधींहि लागणार नाहीं. हे मानदा, तुझ्या या अस्त्रयुक्त बाणानें पीडित झालेला राम मूर्छित होऊन निश्चेष्ट पडेल. याप्रमाणें तूं त्याला आपल्या प्रिय अस्त्रांनीं रणांत जिंकून पुनः उठवूं शकशील. तूं त्यांला हाक मारून पुनः उठीव. उद्यां प्रभातीं तूं रथारूढ होऊन याप्रमाणें कर. रणांमध्यें निश्चेष्ट होऊन पडणें व मृत होणें हीं दोन्ही आम्ही तुल्यच मानितों. हे पार्थिवा, भार्गवराम अमर आहे, तो कदापि मरण पावणार नाहीं. यास्तव तूं उपस्थित झालेल्या 'प्रस्वाप'-अस्त्राच्या प्रयोगानें त्याच्यावर जय मिळीव. असें बोलून ते सर्व द्विजोत्तम अंतर्धान पावले. त्या आठी जणांचीं रूपें तुल्य असून त्यांचीं शरीरें तेजस्वी होतीं. ५. १०. १८३.

---

## अध्याय १८४ वा.

[ १ तुमुल युद्ध, परस्पर ब्रह्मास्त्रांचा प्रयोग व प्रस्वापास्त्राच्या प्रयोगाचा विचार ]

भीष्म—हे भारता, ती रात्र संपल्यावर प्रातःकालीं मी जागा झालों आणि त्या स्वप्नाचें चिंतन केलें. त्यामुळें मला अतिशय हर्ष वाटला.

( १ ) त्यानंतर त्या दिवशींहि भार्गवाचें व माझें तुमुल युद्ध झालें. आमचा तो अद्भुत संग्राम पाहून सर्व भूतें रोमांचित झालीं. भार्गवानें मजवर बाणमय वृष्टि केली. मींहि शरजालानें तिचें निवारण केलें. तेव्हां तो महातपस्वी अतिशय क्रुद्ध झाला. माझें पूर्व दिवशींचें कृत्य स्मरून तो संतप्त झाला व त्या कोपानें त्यानें मजवर शक्ति सोडिली. ती यमदंडासारखी प्रकाशत असून तिचा स्पर्श वज्रासारखा कठोर होता. सर्व बाजूला आपल्या ज्वाळा पसरीत ती शक्ति अग्नीप्रमाणें प्रज्वलित दिसत होती. आकाशांतून तुटलेल्या नक्षत्राप्रमाणें ती शक्ति मोठ्या वेगानें येऊन माझ्या मानेंत शिरली. रामाच्या त्या घोर अस्त्रानें झालेल्या क्षतांतून रक्ताचा प्रवाह वाहूं लागला. त्यामुळें मी गेरूच्या पर्वताप्रमाणें रक्तानें सिक्त झालों.

त्यानंतर मी अतिशय क्रोधसंतप्त होऊन जामदग्न्यावर सर्पाच्या विषासारखा मृत्युतुल्य बाण सोडिला. त्या बाणानें त्या द्विजोत्तमाच्या ललाटावर वेध केला व तो त्यांत शिरला. यामुळें तो वीर शृङ्गयुक्त पर्वताप्रमाणें शोभला. त्यावेळीं तो द्विजश्रेष्ठ अतिशय क्षुब्ध झाला. त्यानें कालान्तकासारखा एक घोर शर धनुष्याला जोडून मजवर सोडिला. तो बाण सर्पाप्रमाणें जणुकाय सुस्कारे टाकीत माझ्या वक्षःस्थलांत शिरला. त्या वेगवान् शरानें विद्ध झालेला मी रक्तानें माखून भूमीवर पडलों व मूर्च्छित झालों. पण लगेच सावध होऊन मीं अशनीसारखी जळजळीत शक्ति धीमान् रामावर सोडिली. त्या निर्मळ शक्तीनें जामदग्न्याच्या वक्षःस्थलावर वेध केला असतां तो महाव्रत राम विह्वल होऊन थरथरां कांपूं लागला. तेव्हां त्याचा प्रिय सखा जो अकृतव्रण, त्यानें त्याला आलिंगन देऊन अनेक प्रकारच्या शुभ वाक्यांनीं सावध केलें.

त्यानंतर तो राम अधिकच संतप्त झाला व त्यानें मजवर श्रेष्ठ ब्रह्मास्त्र सोडिलें. तेव्हां मींहि उलट त्याच अस्त्राचा प्रयोग केला. तें अस्त्र युगान्ताप्रमाणें सर्व दिशांना दग्ध करूं लागलें. त्या दोन्ही सजातीय अस्त्रांचा अंतरिक्षांत समागम झाला, रामाकडे व मजकडे परत न फिरतां तीं दोन्ही अस्त्रें परस्परांवर आघात करीत राहिलीं. त्यामुळें आकाशांत सर्वत्र केवल तेजच प्रादुर्भूत झालें. सर्व भूतें व्याकुल झालीं. अस्त्रांच्या प्रखर तेजानें पीडित झालेले ऋषि, गंधर्व आणि देवता अतिशय त्रस्त झाल्या. पर्वत-वृक्षांसह पृथ्वी कांपूं लागली. संतप्त झालेले सर्व प्राणी अतिशय विषाद पावले. नभोमंडल प्रज्वलित होऊन दाही दिशांत धूम पसरला. आकाशचर पक्षी अंतरिक्षांत राहण्यास असमर्थ झाले. देव, दैत्य, राक्षस यांसह सर्व लोक हाहाकार करूं लागले.

त्यावेळीं हे भारता, त्या ब्रह्मवेत्त्यांच्या वचनावरून प्रस्वापास्त्र सोडण्याचा हाच अवसर आहे, असें जाणून तें सोडण्याची मी जों इच्छा करीत आहें तोंच त्या विचित्र अस्त्राची मला अकस्मात् स्फूर्ति झाली. ५-१०. १८४.

---

## अध्याय १८५ वा.

[ १ भीष्मानें नारदादिकांच्या वचनावरून केलेला अस्त्राचा प्रतिसंहार. २ जमदग्न्याच्या आज्ञेनें रामाचा शस्त्रन्यास. ३ वसूंच्या वचनावरून भीष्माचें रामाला अभिवादन. ]

( १ ) भीष्म—हे राजन्, इतक्यांत अंतरिक्षांतून 'हे भीष्मा, प्रस्वापास्त्र सोडूं नको' असा फार मोठा कोलाहल ध्वनि झाला. त्याकडे दुर्लक्ष करून मी त्या अस्त्राचा प्रयोग करणार इतक्यांत साक्षात् नारद माझ्यापुढें उपस्थित होऊन म्हणाला—"हे कुरुनंदना, हें प्रस्वाप अस्त्र भार्गवावर सोडूं नको. हे पहा, अंतरिक्षांत सर्व देवगण स्थित झाले आहेत व तुझें निवारण करीत आहेत, यास्तव तूं या अस्त्राचा प्रयोग करूं नको. राम तपस्वी, ब्राह्मणभक्त व ब्राह्मण आहे. तो तुझा गुरु आहे. यास्तव हे कौरव्या, त्याचा अवमान तूं कदापि करूं नको."

त्यानंतर मीं अंतरिक्षांत स्थित असलेल्या पूर्वींच्या आठ ब्रह्मवेत्त्यांस पाहिलें. ते मजकडे पाहून स्मितपूर्वक हळूच असें वचन बोलले—"हे भरतश्रेष्ठा, तुला नारदानें जसें सांगितलें, तसेंच कर. तेंच लोकांना परम श्रेयस्कर आहे."

( २ ) तेव्हां मीं त्या महत् स्वापास्त्राचा उपसंहार करून त्या युद्धांत ब्रह्मास्त्राचाहि यथाविधि उपसंहार केला. याप्रमाणें मीं तें घोर अस्त्र मागें घेतलेलें पाहून राम हृष्ट झाला व 'भीष्मानें अतिमंदबुद्धि असलेल्या मला जिंकलें आहे,' असें वाक्य अकस्मात् बोलला. इतक्यांत जामदग्न्यानें आपला पिता व पितामह यांस पाहिलें, ते सर्व त्याच्या सभोंवार उभे राहून केव्हांहि दीन न होणाऱ्या भार्गवाला सान्त्वपूर्वक असें वचन बोलले—

पितर—बा वत्सा, पुनः असें साहस कधीं करूं नको. विशेषतः भीष्मासारख्या क्षत्रियाशीं युद्ध करण्यास तूं कदापि सज्ज होऊं नको. हे भृगुनंदना, युद्ध करणें हा क्षत्रियांचा धर्म आहे व स्वाध्याय, तप आणि व्रताचरण हें ब्राह्मणांचें श्रेष्ठ धन आहे. पूर्वीं पितृवधाच्या निमित्तानें तूं शस्त्र धारण केलेंस तेव्हां आम्हीं तुला हेंच सांगितलें होतें, तरी तूं पुनः हें अति उग्र अकार्य केलेंसच.

हे भार्गवा, झालें तितकें पुरें आहे. भीष्माशीं तुझा हा संग्राम पुरे झाला. आतां त्यापासून निवृत्त हो व रणांगणांतून परत फिर. हे दुर्धर्षा, हें युद्ध

सोडून दे व तपश्चर्या कर. सर्व देवांनीं या शान्तनव भीष्माचें निवारण केलें आहे.

" हे गांगेया, या रणापासून निवृत्त हो, भार्गवराम तुझा गुरु आहे, त्याच्याशीं युद्ध करूं नको. हे पुत्रा, रणामध्यें तूं रामाला जिंकणें योग्य नाहीं. युद्धामध्यें तूं रामाचा मान ठेव. त्याचा पराभव करूं नको. " असें पुनः पुनः बोलून ते सर्व देव त्या गांगेयाला प्रसन्न करीत आहेत.

हे भार्गवा, आम्ही तुझे पितर तुझे गुरु आहों, म्हणून तुला या संग्रामापासून परावृत्त करीत आहों. वत्सा, तूं जिवंत राहिलास हें मोठें भाग्य होय. हा शान्तनूचा पुत्र सामान्य मानव नाहीं. तो गांगेय अष्टवसूंतील एक महा यशस्वी वसु आहे. त्याला जिंकतां येणें तुला कसें शक्य आहे ! तस्मात् या युद्धापासून निवृत्त हो. पांडवश्रेष्ठ अर्जुन इंद्राचा बलाढ्य पुत्र आहे. तो नर, प्रजापति, वीर, सनातन पूर्वदेव आहे. तो वीर्यवान् सव्यसाची म्हणून तिन्ही लोकांत प्रसिद्ध आहे. योग्य कालीं प्रजापतीनें अर्जुनाला त्याचा मृत्यु निश्चित केलें आहे. यास्तव तोच याचा योग्य वेळीं वध करील.

भीष्म—हे राजन्, पितरांचें हें वचन ऐकून राम त्यांना म्हणाला—मी युद्धापासून कदापि निवृत्त होणार नाहीं, हें माझें नियत व्रत आहे. मी या पूर्वी रणांगणांतून केव्हांहि परत फिरलों नाहीं. यास्तव हे पितरहो, तुमची जर इच्छा असली तर तुम्ही गांगेयालाच युद्धापासून निवृत्त करा. मी युद्धापासून निवृत्त होणार नाहीं.

तेव्हां ते सर्व ऋचीकप्रभृति मुनि नारदासह मजपाशीं येऊन म्हणाले— " बा वत्सा, या युद्धापासून तूं निवृत्त हो आणि या द्विजश्रेष्ठाचा मान ठेव."

परंतु त्यांच्या या विज्ञप्तीचा स्वीकार न करतां मीं क्षात्रधर्माच्या अभिमानानें त्यांना म्हटलें—" युद्धापासून कदापि विमुख व्हावयाचें नाहीं, असें माझें व्रत आहे. शरांचे आघात सोसून मी केव्हांहि पाठ दाखवून परत फिरणार नाहीं. मी लोभानें, दैन्यानें, भयानें किंवा अर्थलाभाच्या आशेनें या शाश्वत धर्माचा कदापि त्याग करणार नाहीं. हा माझा दृढ निश्चय आहे."

हे राजा, माझें हें वचन ऐकून ते सर्व नारदादि मुनि व माझी माता भागीरथी रणांगणाच्या मध्यभागीं आली. तथापि मी पूर्वीप्रमाणेंच दृढनिश्चयानें धनुष्य सज्ज करून युद्धाला उभा राहिलों. तेथून हललों

नाहीं. हें पाहून ते मुनि रामापाशीं जाऊन म्हणाले—" हे भार्गवा, ब्राह्मणांचें हृदय लोण्यासारखें मऊ असतें. यास्तव तूं शांत हो. हे द्विजश्रेष्ठा रामा, भार्गवा, या युद्धापासून निवृत्त हो. भीष्म तुला अवध्य आहे, व भीष्मालाहि तूं वध्य नाहींस. यास्तव आतां हें युद्ध पुरे कर. "

असें बोलून त्या सर्वांनीं तें रणांगण अडवून ठेविलें व पितरांनीं त्या भृगुनंदनाला शस्त्रन्यास करावयास लाविलें. त्यानंतर मीं पुनः त्या आठ ब्रह्मवेत्त्यांना पाहिलें. उदय पावलेल्या आठ ग्रहांप्रमाणें ते प्रकाशत होते. समरांगणांत अचल स्थित असलेल्या मला ते मोठ्या प्रेमानें म्हणाले—" हे महाबाहो, तूं गुरु भार्गवरामाकडे जा व त्याच्याशीं शम करून लोकांचें हित कर. "

तेव्हां त्या सुहृदांच्या वचनानें रामानें शस्त्रत्याग केलेला पाहून मींहि लोकांचें हित साधण्यासाठीं त्यांचें वचन मान्य केलें. व क्षतयुक्त शरीरानें रामाकडे जाऊन त्यांस वंदन केलें. तेव्हां महातपस्वी भार्गवराम प्रसन्न होऊन स्मितपूर्वक मला प्रेमानें म्हणाला—" हे भीष्मा, तूं धन्य आहेस. मी तुजवर प्रसन्न झालों आहें. या लोकीं तुझ्यासारखा क्षत्रिय नाहीं. भीष्मा, तूं आतां जा, या युद्धांत तूं मला अत्यंत संतोष दिलास."

त्यानंतर भार्गवानें माझ्या समक्ष अंबेला बोलावून आणिलें व त्या सर्व महात्म्यांच्या समुदायांत तो राम तिला असें दीन वचन बोलला. ५.१०.१८५.

---

## अध्याय १८६ वा.

[ १ रामाचा अंबेला भीष्माला शरण जाण्याविषयीं उपदेश. २ अंबेची भीष्मवधाविषयीं प्रतिज्ञा व तपश्चर्येसाठीं प्रयाण. ३ रामाचें महेंद्रपर्वतावर निवर्तन. ४ भीष्माचें स्वनगरीस गमन. ५ दारुण तप करणाऱ्या अंबेला गंगेचा शाप. तिच्या अर्धदेहाचें नदींत रूपांतर. ]

( १ ) राम—हे भद्रे, मीं या सर्व लोकांसमक्ष माझें सर्व सामर्थ्य खर्च करून यथाशक्ति युद्ध केलें. माझ्या सर्वश्रेष्ठ व उत्कृष्ट अस्त्रांचाहि मीं प्रयोग केला; परंतु मी सर्व शस्त्रधरांतील श्रेष्ठ भीष्माला जिंकण्यास समर्थ झालों नाहीं. माझी परम शक्ति व पराकाष्ठेचें बल एवढेंच आहे. याहून अधिक पुरुषार्थ प्रकट करण्यास मी समर्थ नाहीं. यास्तव मी तुझ्यासाठीं आणखी काय करावें? यापेक्षां मला अधिक कांहीं करतां येत नाहीं! यास्तव तुला इष्ट वाटेल

तेथें तूं जा. परंतु हे वत्से, माझ्या मतें तूं भीष्मालाच शरण जावेंस, हें बरें. त्याच्यावांचून तुला अन्य गति नाहीं. भीष्मानें महा-अस्त्रें सोडून मला जिंकलें आहे.

असें बोलून तो उदारचरित राम दीर्घ निश्वास सोडून स्तब्ध बसला.

( २ ) तेव्हां अंबा त्या भृगुनंदनाला म्हणाली—" हे भगवन्, तूं म्हणतोस तें खरें आहे. हा उदारबुद्धि भीष्म युद्धांत देवांनाहि अजिंक्य आहे. तूं माझ्या या कार्यासाठीं उत्साहपूर्वक आपल्या सर्व शक्तीचा उपयोग केलास, परंतु भीष्माचें रणांतील अनिवार्य बल व विविध अस्त्रें यांच्या योगानें त्याचा युद्धांत पराभव करतां येणें कोणालाहि शक्य नाहीं. तथापि हे द्विजश्रेष्ठा, मी पुनः त्या भीष्माकडे कदापि जाणार नाहीं. त्यापेक्षां ज्याच्या योगानें मला त्या भीष्माचा नाश करण्याचें सामर्थ्य प्राप्त होईल व मीच स्वतः समरांत त्याला मारण्यास समर्थ होईन, त्या मार्गाचें अवलंबन करीन. जेथें मला ही सिद्धि प्राप्त होईल तेथेंच मी आतां गमन करीन."

असें बोलून क्रोधानें आरक्त नेत्र करून ती कन्या माझ्या वधाचें चिंतन करीत तप करण्याच्या निश्चयानें तेथून तपोवनाकडे निघून गेली.

( ३ ) हे भारता, त्यानंतर तो भार्गवराम मला परत जाण्याची प्रेमानें अनुज्ञा देऊन आपल्या बरोबर आलेल्या सर्व मुनिगणांसह महेंद्रपर्वतावर निघून गेला.

( ४ ) त्याच्या मागून मीहि ब्राह्मण स्तुति करीत असतां रथावर चढलों व स्वनगरीला परत आलों. राजभवनांत प्रवेश करतांच प्रथम मीं हा सर्व वृत्तान्त सत्यवती मातेला निवेदन केला. तो ऐकून तिनें माझें अभिनंदन केलें.

त्यानंतर त्या काशीराज कन्येचें वास्तव्य कोठें आहे, ती काय करीत आहे, इत्यादि तिचा सर्व वृत्तान्त मला प्रत्यहीं कळावा, म्हणून मीं हेरांची योजना केली. ते दूत माझें प्रिय व हित करण्यांत तत्पर असल्यामुळें मला नित्य त्या राजकन्येचें वृत्त कथन करीत. हे कुरुनंदना, ती कन्या तपश्चर्या करण्यासाठीं वनांत गेल्याचें ऐकल्यापासून माझें मन अतिशय व्यथित व दीन झालें. माझें स्वास्थ्य नष्ट झालें. कारण, कोणीहि क्षत्रिय मला युद्धांत जिंकण्यास समर्थ नव्हता. तीक्ष्ण व्रत आचरणाऱ्या ब्रह्मवेत्त्या तपस्व्यांना मात्र मी अजिंक्य नव्हतों. त्यामुळें अंबेची तपश्चर्या ऐकून मी चिंतातुर झालों व मी तें नारदाला व व्यास-

प्रमाणें व्यासाला निवेदन केलें आणि याला काय उपाय योजावा, असें विचारलें. तेव्हां ते दोघे मला म्हणाले—" हे भीष्मा, तूं त्या काशिराजकन्येसाठीं कांहीं चिंता करूं नको. आपल्या प्रयत्नानें दैवाचें उल्लंघन करण्यास कोण समर्थ आहे ! "

त्यानंतर हे महाराज, त्या काशिराजकन्येनें आश्रममंडलांत प्रवेश केला व यमुनेच्या तीराचा आश्रय करून अतिमानुष तप आरंभिलें. ती तपस्विनी निराहार राहून कृश झाली. तिच्या केंसांच्या जटा झाल्या. शरीर रुक्ष झालें व ती धूळीनें मलीन दिसूं लागली. याप्रमाणें स्थाणूप्रमाणें एके स्थानीं स्थिर राहून सहा महिने तिनें केवल वायुभक्षण केलें. एक वर्ष जलांत निराहार राहून तप केलें. त्यानंतर वर्षभर वृक्षावरून पडलेलें जीर्ण पान खाऊन तप आचरिलें. जिचा कोप अतिशय तीव्र आहे, अशा अंबेनें पुढील वर्ष एका अंगठ्यावर उभें राहून घालविलें. ती अतिशय क्रोधी असल्यामुळें तिनें बारा वर्षें अशा प्रकारची तीव्र तपश्चर्या केली. तिच्या आप्तजनांनीं तिला या घोर तपापासून निवृत्त करण्याचा पुष्कळ यत्न केला, परंतु ती आपल्या या निश्चयापासून ढळली नाहीं.

त्यानंतर ती तपस्विनी सिद्ध-चारणांनीं सेवन केलेल्या वत्सभूमीकडे गेली. तेथें पुण्यशील महात्म्या तापसांचा आश्रम होता. त्या पुण्य प्रदेशांत येऊन ती काशिराजकन्या रात्रंदिवस पवित्र तीर्थामध्यें सतत स्नान करूं लागली. इच्छेस येईल तेथें संचार करणारी ती राजकन्या नंदाश्रमास गेली. तेथून तिनें पुण्यप्रद उलूकाश्रम, च्यवनभार्गवाचा आश्रम, ब्रह्मदेवाचें स्थान, प्रयाग, कुरुक्षेत्र, देवारण्य, भोगवती, कौशिकाश्रम, मांडव्य-ऋषीचा आश्रम, दिलीपाश्रम, रामह्रद, पैलगर्गाचा आश्रम, इत्यादि तीर्थक्षेत्रांत क्रमानें प्रयाण केलें व दुष्कर व्रत अंगीकारून या सर्व तीर्थांत स्नानें केलीं.

हे महाराज, त्यावेळीं जलांत स्थित असलेली माझी माता तिला म्हणाली— " हे भद्रे, तूं हें क्लेशकारक तप कां आचरीत आहेस, तें मला सत्य सांग."

तेव्हां ती अनिंद्य कुमारी हात जोडून गंगेला म्हणाली—" हे देवि, भीष्मानें युद्धामध्यें रामालाहि जिंकिलें आहे. तेव्हां शस्त्र उचलून सज्ज झालेल्या त्या वीराला जिंकण्यास कोणता महीपति समर्थ आहे ! यास्तव भीष्माच्या नाशासाठीं मी हें अतिशय दारुण तप आचरीत आहें. भीष्माच्या वधासाठींच, त्याला मीं स्वतः युद्धांत मारावें, म्हणून या पृथ्वीवर संचार करीत आहें. हे देवि, माझ्या या व्रताचें हेंच परम फल आहे."

(५) तें ऐकून सागराकडे गमन करणारी गंगा तिला म्हणाली—"हे काशि-राजकन्ये, तुझ्या या व्रताचा हेतु सरळ नाहीं. या कुटिल उद्देशानें आच-रिलेलें तप तुला फलप्रद होणार नाहीं. तूं ज्याअर्थीं भीष्मवधार्थ हें व्रत आचरीत आहेस, त्याअर्थीं व्रताचरण करीत असतांना तुझा जर देहपात झाला, तर तूं वर्षाऋतूंत वक्रगतीनें वहाणारी क्षुद्र नदी होशील. केवल वर्षाकालींच वहाणाऱ्या व आठ महिने अदृश्य होणाऱ्या त्या नदीला तीर्थ समजलें जाणार नाहीं. तिच्या पात्रांत घोर मकर वास करतील."

असें बोलून माझी माता स्मितपूर्वक अंतर्धान पावली. नंतर त्या काशि-राजकन्येनें अधिकच उग्र तपश्चर्या आरंभिली. ती केव्हां आठ आठ महिने, तर केव्हां केव्हां दहा दहा महिने उदकहि प्राशन न करितां वत्सभूमींत राहूं लागली. याप्रमाणें व्रताचरण करीत तीर्थांच्या लोभानें इतस्ततः धावणाऱ्या तिचें देहावसान झालें. तेव्हां गंगेच्या वचनाप्रमाणें ती वर्षाऋतूंत दुस्तर होणारी, ग्राहयुक्त, वक्र गतीनें वहाणारी 'अंबा'नामक क्षुद्र नदी झाली. परंतु उग्र तपाच्या प्रभावानें ती कन्या वत्सभूमींत अर्ध्या देहानें नदी झाली व अर्धदेहानें वत्सभूमींतच तपश्चर्या करूं लागली. ५. १०. १८६.

---

## अध्याय १८७ वा.

[ १ अंबेची भीष्मवधाची प्रतिज्ञा. २ महादेवाचें दर्शन व वरप्राप्ति. ३ अंबे-चा अग्निप्रवेश. ]

( १ ) भीष्म—हे तात, त्यानंतर पूर्वजन्माच्या स्मृतीमुळें तपाचा निश्चय केलेल्या त्या कन्येला पाहून तेथील सर्व तापस तिच्या समीप येऊन तिला म्हणाले—" हे भद्रे, तूं हें उग्र तप आचरून काय करणार आहेस ? "

तेव्हां त्या तपोवृद्ध ऋषींना ती कन्या म्हणाली—" हे तापसहो, भीष्मानें माझी वंचना केल्यामुळें मी पतिसुखापासून भ्रंश पावल्यें आहें. यास्तव त्याच्या वधासाठीं मीं ही दीक्षा घेतली आहे. उत्तम लोकप्राप्तीसाठीं नव्हे. मीं तुम्हांला जें सांगितलें तोच माझा मनांतील संकल्प आहे. मी या स्त्रीभा-वास अतिशय कंटाळलें आहें. मीं पुंस्त्व संपादन करण्याचा निश्चय केला आहे. ज्याच्यामुळें मला हें अशा प्रकारचें शाश्वत दुःख प्राप्त झालें, त्या भीष्माचा

जेव्हां वध करीन तेव्हांच मी शांत होईन. यास्तव तुम्ही माझें या घोर संकल्पा-पासून पुनः निवारण करूं नका.

( २ ) त्यानंतर हे राजन्, त्या सर्व महर्षींमध्येंच शूलपाणि उमापतीनें आपल्या स्वरूपानें त्या तापसीला दर्शन दिलें. त्यावेळीं तिनें माझ्या पराजयाचा वर मागून घेतला. तेव्हां देवानें 'ठीक आहे, तूं भीष्माचा वध करशील,' असा त्या मनस्विनीला वर दिला.

पण त्यावर ती कन्या रुद्राला म्हणाली—"हे उमापते, मी स्त्री आहें. तेव्हां मज स्त्रीला युद्धांत जय मिळणें कसें शक्य आहे! मी स्त्रीभावाला फार कंटाळलें आहें. माझें मन या स्त्रीभावानें अत्यंत उद्विग्न झालें आहे आणि हे भूतेशा, तूं तर भीष्माच्या पराजयाचा वर मला दिला आहेस. यास्तव तो जशा प्रकारें सत्य होईल, तसें कर. शान्तनव भीष्माला युद्धामध्यें मी गतप्राण करीन असें घडवून आण.

तेव्हां त्या कन्येला वृषध्वज महादेव म्हणाला—"हे भद्रे, माझी वाणी कदापि असत्य बोलत नसते. ती सत्यच होईल. तूं अन्य देह धारण केलास तरी तुला पूर्वजन्मांतील स्मरण राहील व पुरुषत्वाला प्राप्त होऊन रणामध्यें भीष्माचा वध करशील. द्रुपदाच्या कुलांत उत्पन्न होऊन ज्याचीं अस्त्रें शीघ्र आहेत, असा तूं विचित्र युद्ध करणारा व प्रसिद्ध महारथ होशील. जन्मतांच तूं स्त्री असलीस तरी कांहीं काल गेल्यावर कांहीं प्रसंगानें तुला पुरुषत्वाची प्राप्ति होईल."

( ३ ) इतकें बोलून तो वृषभध्वज महादेव ते सर्व विप्र पहात असतां तेथेंच अंतर्धान पावला. त्यानंतर त्या अनिंद्य कन्येनें त्या सर्व महर्षींच्या समक्ष त्या वनांतील काष्ठें जमा करून फार मोठी चिता रचिली आणि अग्नि पेटवून दिला. तो अग्नि प्रदीप्त झाला असतां त्या काशीराजाच्या ज्येष्ठ कन्येनें क्रोध-संतप्त मनानें 'भीष्माच्या वधासाठीं मी प्राणत्याग करीत आहें' असें बोलून यमुनानदीच्या तीरावर अग्निप्रवेश केला. ५. १०. १८७.

## अध्याय १८८ वा.

[१ भीष्मवधासाठीं पुत्रेच्छेनें तप करणाऱ्या द्रुपदाला शंकराचा वर. २ कन्येचा जन्म झाला असतां द्रुपदाला पुत्रजन्माचें कथन.]

(१) दुर्योधन—हे युद्धांत श्रेष्ठ असलेल्या पितामहा, पूर्वी शिखंडी कन्या असून पुढें पुरुष कशी झाली, तें वृत्त मला सांग.

भीष्म—हे राजेंद्रा, द्रुपद महीपतीची आवडती महिषी पुत्ररहित होती. इतक्यांत द्रुपदराजानें आमच्या वधाचा निश्चय करून घोर तप आचरिलें व अपत्यासाठीं शंकराची आराधना करून त्याला प्रसन्न करून घेतलें आणि असा वर मागून घेतला—" हे भगवन्, मला कन्येवांचून आणखीं पुत्रहि व्हावा असा वर द्यावा. भीष्माचा प्रतिकार करण्याच्या इच्छेनें मी पुत्राची इच्छा करीत आहें."

द्रुपदाची ही प्रार्थना ऐकून महादेवानें म्हटलें—" हे राजा, तुला प्रथम कन्या होऊन तीच पुढें पुत्रत्वाला प्राप्त होईल. हे महीपाला, तूं आतां या तपश्चर्येपासून निवृत्त हो व परत जा. माझें हें वचन कदापि अन्यथा होणार नाहीं."

तेव्हां द्रुपदराजा आपल्या नगरीला परत जाऊन भार्येला म्हणाला—" मीं मोठ्या यत्नानें तपश्चर्या करून महादेवाची आराधना केली, तेव्हां त्या शम्भूनें प्रसन्न होऊन 'तुला प्रथम कन्या होईल व तीच पुढें पुरुष होईल' असा वर दिला. मीं पुनः पुनः प्रार्थना केली असतां 'मी जसें बोललों तसेंच होईल. भवितव्य असेंच आहे. तें अन्यथा होणें शक्य नाहीं' असें शिवानें सांगितलें." त्यानंतर ती महिषी ऋतुस्नात झाली असतां द्रुपदापासून तिला गर्भ राहिला. हा वृत्तान्त नारदानें मला सांगितला. पार्षत द्रुपदानें पुत्रस्नेहानें आपल्या भार्येचे सर्व मनोरथ पूर्ण केले.

(२) हे नराधिपा, योग्य काळीं द्रुपदाची ती प्रिय राज्ञी प्रसूत होऊन तिनें अत्यंत रूपवती कन्येला जन्म दिला. पण पुत्ररहित असलेल्या राजाला 'पुत्र झाला' असें राणीनें सर्व राज्यांत प्रसिद्ध केलें. द्रुपदाच्या महिषीनें मोठ्या यत्नानें आपल्या या गुप्तसंकेताचें रक्षण केलें. त्यामुळें पार्षत द्रुपदावांचून नगरांत अन्य कोणालाहि हें रहस्य कळलें नाहीं.

द्रुपदराजानें अच्युत महादेवाच्या वचनावर श्रद्धा ठेवून त्या कन्येला पुत्रच मानिलें आणि तिचे जातकर्मादि सर्व संस्कार पुत्राप्रमाणें करविले व त्या कन्येचें 'शिखंडी' असें पुरुषवाचक नांव ठेविलें.

हे राजन्, हा प्रकार दूतांच्या द्वारा फक्त मला एकट्यालाच काय तो कळला होता. शिवाय नारदाचें वचन, शंकराचा वर आणि अंबेची तपश्चर्या यांवरूनहि मीं तो जाणला होता. मजवांचून इतर कोणालाहि त्याची वार्ता नव्हती. ५. १०. १८८.

---

## अध्याय १८९ वा.

[ १ दाशार्णाधिपतीच्या कन्येशीं द्रुपदपुत्राचा विवाह. २ आपली वंचना झाल्याचें जाणून वधूच्या पित्याचा क्रोध, द्रुपदाकडे दूतप्रेषण. ]

( १ ) भीष्म—हे राजेंद्रा, त्यानंतर द्रुपदराजानें आपल्या त्या कन्येला लेखन, शिल्पकला, इत्यादि सर्व प्रकारचें शिक्षण दिलें. तिनें द्रोणाचार्यांचें शिष्यत्व पत्करून धनुर्विद्या व शस्त्रास्त्रविद्या संपादन केली. कांहीं कालानें तिची माता पुत्राप्रमाणें तिचा विवाह करण्याविषयीं राजाला प्रेरणा करूं लागली. पण त्या कन्येला यौवनावस्था प्राप्त झाल्यामुळें तिच्या शरीराचा विकास तिचें स्त्रीत्व दर्शवूं लागला. तें पाहून द्रुपदराजा चिंतातुर झाला व आपल्या भार्येशीं असा विचार करूं लागला.

द्रुपद—ही माझी कन्या आतां तारुण्याला प्राप्त झाल्यामुळें ती माझी चिंता वाढवीत आहे. मीं शूलपाणीच्या वचनावर विश्वास ठेवून तिचें स्त्रीत्व गुप्त ठेविलें आहे.

राज्ञी—हे महाराज, देवाधिदेवाचें तें वचन कदापि मिथ्या होणार नाहीं. त्रैलोक्याचा कर्ता वृथा वचन कसें बोलेल! यास्तव हे राजन्, आपल्याला माझें सांगणें जर रुचत असेल, तर मी काय सांगतें, तें ऐका व मग आपल्याला योग्य वाटेल तें करा. योग्य वधू पाहून हिचा पुत्राप्रमाणें यथाविधि विवाह करा. शंकराचें वचन सत्य होईल, यांत संशय नाहीं. त्याविषयीं माझी निश्चित मति आहे.

भीष्म—हे राजा, त्यानंतर त्या राजदंपतीनें त्या कार्याचा निश्चय केला व दाशार्णाधिपतीच्या कन्येला आपली स्नुषा करण्याचें योजिलें. द्रुपदराजानें सर्व

नृपाळांच्या कुल-शीलाचा विचार करून दाशार्णकाच्या कन्येशीं शिखंडीसाठीं मागणी केली. दाशार्णक या नांवानें प्रसिद्ध असलेल्या नृपतींतील हिरण्यवर्मा महीपालानें आपली कन्या शिखंडीला अर्पण केली. तो हिरण्यवर्मा दाशार्णांतील दुर्धर्ष राजा होता. त्या महाबलाढ्य राजापाशीं फार मोठें सैन्य असल्यामुळें तो सर्वांना अजिंक्य होता.

हे राजश्रेष्ठा, याप्रमाणें त्या राजकन्येचा विवाह झाल्यावर शिखंडी व त्याची भार्या हीं दोघेंहि यौवनारूढ झालीं. तेव्हां शिखंडीनें आपल्या नववधूसह काम्पिल्य नगरीस प्रयाण केलें. तेथें कांहीं काल एकत्र राहिल्यावर त्या कन्येला ' आपला पति पुरुष नसून आपल्यासारखीच एक स्त्री आहे ' हें कळून आलें. तेव्हां ती हिरण्यवर्मा राजाची कन्या शिखंडीचें खरें स्वरूप ओळखून अतिशय लज्जित झाली व तिनें पितृगृहांतून आपल्याबरोबर आलेल्या आपल्या प्रिय सख्या व विश्वासु दासी यांना हा वृत्तान्त निवेदन केला. तें ऐकून त्या अत्यंत खिन्न झाल्या व दाशार्णराजाला हा वृत्तान्त कळविण्यासाठीं त्यांनीं दासींना त्याच्याकडे पाठवून दिलें. त्या दासींनीं हा सर्व प्रकार राजाला कथन केला. तेव्हां आपली अशी वंचना केलेली पाहून तो पार्थिव अतिशय क्रुद्ध झाला.

( २ ) हे महाराज, इकडे शिखंडीला जरी स्वतःचें स्त्रीत्व रुचत नव्हतें, तरी तो बाह्यतः अतिशय आनंदांत असल्याचें दाखवीत असे व त्या राजकुळांत पुरुषाप्रमाणेंच विहार करीत असे. त्यानंतर कांहीं काल लोटल्यावर पुनः हीच वार्ता हिरण्यवर्म्याच्या कानीं गेली, तेव्हां तो रोषानें आर्त झाला व अतिशय क्रुद्ध होऊन त्यानें द्रुपदाकडे दूत पाठविला. तो हिरण्यवर्म राजाचा दूत द्रुपदाकडे आला व एकट्या त्याला एकान्तांत नेऊन गुप्तपणें म्हणाला—"हे राजन्, तुझ्याकडून वंचना केला गेल्यामुळें त्या पराभवानें दाशार्णराजा अतिशय क्रुद्ध झाला आहे. त्यानें तुला असा संदेश सांगितला आहे कीं, हे नृपते, तूं माझा अवमान करीत आहेस, हें तुझें दुर्मन्त्रित आहे. तूं मोहानें आपल्या कन्येसाठीं माझ्या कन्येची याचना केलीस. पण हे दुर्मते, आतां तुला त्या वंचनेचें फल प्राप्त होईल. तुझे अमात्य व आप्तजन यांसह मी तुझा उच्छेद करीन. यास्तव सज्ज हो. ५. १०. १८९.

---

## अध्याय १९० वा.

[ १ दाशार्णराजाचा सैन्यासह द्रुपदावर चाल करून जाण्याचा संकेत. २ द्रुपदानें स्वतःचें निर्दोषत्व प्रस्थापित करण्यासाठीं राज्ञीला दिलेला दोष. ]

( १ ) भीष्म—हे नृपते, दूताच्या मुखानें हें वचन ऐकून चोरलेल्या वस्तूसह हातांत धरलेल्या चोराप्रमाणें द्रुपदाची स्थिति झाली. त्याला कांहीं उत्तर देतां येईना. त्यानें दाशार्णराजाकडे आपले मधुर भाषण करणारे दूत पाठविले व 'ही वार्ता सत्य नव्हे' असें सांगून आपल्या संबंधीराजाला प्रसन्न करण्याचा फार मोठा यत्न केला.

परंतु त्या राजानें पुनः चौकशी केली व सत्य काय आहे, तें समजून घेतलें. पण दासींच्या मुखांनीं 'पांचालपुत्र ही कन्या आहे' अशी निश्चित बातमी पुनः त्याला कळली, तेव्हां आपल्या कन्येची झालेली वंचना पाहून क्रोधसंतप्त झालेल्या त्या राजानें आपल्या अतिशय बलाढ्य मित्रांना बोलावून आणिलें आणि दासींच्या मुखांनीं ऐकलेली आपल्या कन्येची वंचना त्यांना निवेदन केली. नंतर त्या सर्व पराक्रमी नृपतींचीं सैन्यें एकत्र जमवून द्रुपद राजावर चाल करून जाण्याचें त्यानें मनांत आणिलें व ते राजे आणि आपले मंत्री यांच्याशीं संकेत करून पांचाल राजपुत्र खरोखरच 'कन्या' आहे असें सिद्ध झालें तर सर्वांनीं मिळून द्रुपदराजाला बद्ध करून आपल्या नगरींत आणावें, शिखंडीसह त्याचा वध करावा व त्याच्या राज्यावर अन्य भूपालाची स्थापना करावी असा संकेत केला.

हिरण्यवर्मा असा संकेत करीत आहे, तोंच त्यानें द्रुपदाकडे शोधासाठीं पाठविलेला दूत परत आला व त्यानें हा वृत्तान्त खरा आहे, असें राजाला कथन केलें. तें ऐकून संतप्त झालेल्या राजानें 'मी तुझा वध करण्यास येत आहें. स्थिर रहा' असा निरोप द्रुपदाकडे परत पाठविला.

( २ ) भीष्म—दुर्योधना, द्रुपदराजा स्वभावतःच भित्रा व त्यांत यावेळीं सदोष होता. त्यामुळें तो नराधिप अतिशय भ्याला. त्यानें दूतांची समजूत घालून त्यांना दाशार्णाधिपाकडे रवाना केलें व शोकानें देहभान विसरलेला तो राजा आपल्या राज्ञीपाशीं आला. त्यावेळीं तो पांचालराजा अतिशय भयभीत झाला. त्याचें हृदय शोकानें संतप्त झालें. तो एकान्तामध्यें शिखंडीच्या मातेला असें वचन बोलला—"हिरण्यवर्मा नृपति फार मोठ्या सैन्यासह मजवर चाल करून येत

आहे. मी तर किंकर्तव्यतामूढ झालों आहें. आतां आपण या कन्येच्या पुरुषत्वासाठीं काय करावें !

त्या दाशार्णाधिपाला तुझा हा पुत्र शिखंडी पुरुष नसून ती कन्याच आहे, अशी दृढ शंका आलेली आहे व 'द्रुपदराजानें माझी वंचना केली' अशा समजुतीनें तो राजा आपले मित्र व सैन्य यांसह मजवर चाल करून माझा विध्वंस करण्याची इच्छा करीत आहे.

हे देवि, यांतील खरा प्रकार आहे तरी काय ! ही खरीच बाला आहे किंवा पुत्र आहे ! हें सर्व ऐकून माझेंहि मन साशंक झालें आहे. यास्तव वस्तुस्थिति काय आहे, ती मला यथार्थ सांग. म्हणजे त्याप्रमाणें मला पुढील योजना करण्यास ठीक पडेल. याप्रसंगीं शिखंडी, तूं आणि मी असे तिघेंहि मोठ्या संकटांत सांपडलों आहों. यास्तव त्यांतून सुटण्याचा कांहीं उपाय तूं मला सुचीव म्हणजे मी तत्काल त्याप्रमाणें आचरण करीन.

भार्या शिक्षेला पात्र नाहीं, हें जाणून लोकांत स्वतःचें निर्दोषत्व प्रस्थापित करून भार्येच्याच ठिकाणीं सर्व दोष आहे असें प्रसिद्ध करण्यासाठीं द्रुपद पुढें म्हणाला—प्रिये, तूं शिखंडीकरितां मला असें फसविलें आहेस, त्याचप्रमाणें हे शिखंडिनि, तूंहि भिऊं नको. तूं जरी कन्या असून 'पुत्रच' आहें असें भासवून माझी वंचना केली आहेस, तरीहि मी तुझें भरण-पोषण करीन. तसेंच हे राज्ञि, तूंहि भिऊं नको. मी तुमचा वध करणार नाहीं. या अपत्याचे पुत्राप्रमाणें सर्व संस्कार करून जरी मी वंचित झालों आहें, तरी मी तुजवर अनुकंपाच करीन.

हे महाभागे, त्या दाशार्णक महीपतीची मजकडून वंचना झाली आहे. यास्तव त्याला काय उपाय करावा तो मला सत्वर सांग. म्हणजे मी तसें तत्काल करतों.

याप्रमाणें द्रुपदराजा खरा प्रकार जाणत असतांहि शत्रूंना दाखविण्यासाठीं असें बोलला. तेव्हां ती राज्ञी द्रुपदाला उघडपणें असें म्हणाली. ५. १०. १९०.

---

## अध्याय १९१ वा.

[ १ द्रुपदाची चिंता व नगराच्या रक्षणाची योजना. २ पितरांना दुःखी पाहून शिखंडीचा वनप्रवेश व तपश्चर्या. ३ स्थूणाकर्णाचो त्याला इष्ट वर देण्याची प्रतिज्ञा. ४ शिखंडीची वर-याचना. ]

( १ ) भीष्म—हे नराधिपा, त्यानंतर शिखंडीच्या मातेनें शिखंडिनी कन्या असल्याचा सत्य वृत्तान्त आपल्या भर्त्याला निवेदन केला. ती म्हणाली— "हे राजन्, ही कन्या जन्म पावली असतां पुत्रहीन असलेल्या मीं सपत्नींच्या भयानें 'तो पुत्रच आहे,' असें सांगितलें आणि हे नरश्रेष्ठा, त्यावेळीं तूंहि माझ्या या वचनाला संमति देऊन या कन्येचे जातकर्मादि सर्व संस्कार पुत्राप्रमाणें केलेस. दाशार्णाधिपाच्या कन्येशीं तिचा विवाह करून दिलास आणि मींहि 'प्रथम कन्या असलेलें हें अपत्य नंतर पुरुषत्वाला प्राप्त होईल' हें महादेवाचें वचन कदापि असत्य होणार नाहीं, या दृढ विश्वासानें या सर्व गोष्टींची उपेक्षा केली."

राजा, राज्ञीचें हें वचन ऐकून यज्ञसेन द्रुपदानें आपल्या मंत्र्यांना हा सर्व यथार्थ वृत्तान्त निवेदन केला आणि प्रजेच्या रक्षणासाठीं काय उपाय योजावा याचा त्यांच्याशीं संकेत केला. 'मीं दाशार्णक राजाशीं जो संबंध केला आहे तो यथार्थ आहे. त्याची वंचना केलेली नाहीं.' असें त्यानें आपल्या कृतीचें समर्थन केलें. पण आपण त्या राजाची वंचना केली आहे, हें तो मनांत जाणत होता. म्हणून तो स्वतःच आपल्याशीं विचार करीत बसला व त्यानें कर्तव्याचा निश्चय केला.

राजा, द्रुपदाचें तें नगर आपत्कालीं स्वभावतः सुरक्षित होतें. ती नगरी सर्वतः भूषविलेली होती. यास्तव राजानें तिचें आपल्या सैनिकांकडून रक्षण करविलें. पण दाशार्णपतीशीं असा विरोध उत्पन्न झाला असतां तो द्रुपदराजा आपल्या राज्ञीसह परम चिंतातुर झाला. या आप्तांबरोबर माझें हें महायुद्ध कशानें बरें टळेल! याचा तो मनांत विचार करूं लागला व या संकटनिवारणासाठींच त्यानें देवतांचें आराधन आरंभिलें.

याप्रमाणें तो राजा देवतार्चनांत तत्पर झालेला आहे, असें पाहून त्याची राज्ञी त्याला म्हणाली—"सज्जनांनीं सुखाच्या प्रसंगींहि देवतांचें अर्चन करावें, मग दुःखार्णवाला प्राप्त झालें असतां तें करावेंच, हें काय सांगावें! अशावेळीं तर तें

प्राप्त कर्तव्यच आहे, तस्मात् तूं देवताराधनासाठीं ब्राह्मणांचें पूजन कर. विपुल दक्षिणा देऊन सर्व देवतांचें अर्चन करणें, हेंच यावेळीं श्रेयस्कर आहे. दाशार्णाधिपानें परत फिरावें म्हणून अग्नींत आहुत्या दे आणि युद्धावांचूनच तो निवृत्त होवो, असें मनांत चिंतन कर. देवतांच्या प्रसादानें हें सर्व घडून येईल.

हे प्रभो, आपल्या नगरीचा विनाश होऊं नये म्हणून तिच्या संरक्षणासाठीं तूं मंत्र्यांसह जो संकेत केला आहेस, तोच आचरणांत आण. मंत्र्यांकडून नगरीचें रक्षण करीव व तूं स्वतः देवतांच्या आराधनेमध्यें तत्पर हो.

कारण पुरुषप्रयत्नानें दैव तत्काल सिद्ध होतें. परंतु दैवाच्या विरुद्ध जर मनुष्याचा प्रयत्न होत असला तर त्यांच्या परस्पर विरोधी प्रयत्नानें कदापि फलसिद्धि होत नाहीं. यास्तव हे विशाम्पते, तूं सचिवांच्या द्वारा नगररक्षण करवून इष्टप्राप्तीसाठीं दैवताचें आराधन कर."[1]

( २ ) याप्रमाणें तीं उभयतां शोकपरायण होऊन परस्परांशीं असें संभाषण करीत आहेत, असें पाहून ती कन्या शिखंडिनी अतिशय लज्जित झाली. त्या तपस्विनीनें असा विचार केला कीं, हीं दोघें माझ्यामुळें इतकीं दुःखमग्न झालीं आहेत. यास्तव आपणच प्राणत्याग करावा व त्यांना या आपत्तींतून मुक्त करावें. असा विचार करून ती कन्या अतिशय शोकाकुल झाली. तिनें जीविताचा नाश करण्याचा निश्चय केला व गृहत्याग करून निर्जन वनांत प्रयाण केलें.

हे राजन्, 'स्थूणाकर्ण' नामक बुद्धिमान् यक्ष त्या वनाचें रक्षण करीत असल्यामुळें त्याच्या भीतीनें त्या वनांतील लोक तें वन सोडून निघून गेले होते. तेथें त्या स्थूणाकर्ण यक्षाचें एक सुंदर भवन होतें. त्याला चुन्याचा सर्वतः लेप केला होता. त्यामुळें तें भवन पांढरें शुभ्र दिसत होतें. त्या भवनांत वाळयाच्या धुराचा वास सर्वत्र पसरला होता. त्या भवनाचें बहिर्द्वार व त्याच्या सभोंवार असलेला प्राकार–तट हीं दोन्ही फार उंच होतीं.

( ३ ) हे राजा, त्या द्रुपदात्मजेनें त्या प्रासादांत प्रवेश केला व पुष्कळ दिवस अन्नत्याग करून शरीराचें शोषण आरंभिलें. तेव्हां तिच्याविषयीं दयेनें

[1] दैवं हि मानुषोपेतं भृशं सिद्ध्यति पार्थिव ।
परस्परविरोधाद्धि सिद्धिरस्ति न चैतयोः ॥

प्रेरित होऊन स्थूणा यक्षानें तिला दर्शन दिलें व म्हटलें—" हे नृपात्मजे, तूं हें असें तीव्र व्रत कशासाठीं आरंभिलें आहेस, तें मला सांग. मी तुझी इच्छा सत्वर पूर्ण करीन."

तें ऐकून ती राजकन्या ' माझी इच्छा पूर्ण करणें अशक्य आहे ' असें पुनः पुनः म्हणाली. तेव्हां गुह्यक तिला म्हणाला—" हे राजकन्ये, मी तुझें कार्य तत्काल करीन. कारण मी धनेश्वर कुबेराचा अनुचर असून वर देण्यास समर्थ आहें. यास्तव मी अदेय वस्तुहि देईन, तुला काय अपेक्षित आहे, तें मला सांग."

तेव्हां हे भारता, शिखंडीनें त्या यक्षप्रधान स्थूणाकर्णाला सर्व वृत्तान्त सविस्तर कथन केला व तो त्याला असें वचन बोलला—

( ४ ) शिखंडी—हे यक्षा, माझा पिता पुत्ररहित आहे. तो आतां लवकरच विनाश पावेल व त्यामुळें आमच्या कुलाचा क्षय होईल. दाशार्णाधिपति क्रुद्ध होऊन माझ्या पित्यावर चालून येत आहे. तो महाबलाढ्य व अतिशय उत्साही आहे. त्याचें बल सहन करण्यास माझा पिता समर्थ नाहीं. यास्तव माझ्या माता-पित्यांचें रक्षण कर. तूं माझें दुःख दूर करण्याची प्रतिज्ञा केली आहेस. यास्तव हे महायक्षा, मजवर प्रसन्न हो आणि जोंवर तो हिरण्यवर्मा चाल करून आला नाहीं, तोंवर तुझ्या प्रसादानें माझें स्त्रीत्व दूर होऊन मला अनिंद्य पुरुषत्वाची प्राप्ति होऊं दे. ५. १०. १९१.

---

## अध्याय १९२ वा.

[ १ यक्षाच्या संकल्पानेंच शिखंडीला पुरुषत्वप्राप्ति. २ शिखंडी पुरुष आहे, असा परीक्षापूर्वक निश्चय करून दाशार्णाधिपाचें स्वदेशीं गमन. ३ कुबेराचें आगमन, त्याचा यक्षाला शाप. ४ पूर्वी स्त्री असलेल्या शिखंडीवर मी शस्त्र उचलणार नाहीं, अशी भीष्माची प्रतिज्ञा. ]

( १ ) भीष्म—हे भरतश्रेष्ठा, स्थूणाकर्ण गुह्यक शिखंडीची ती विज्ञप्ति ऐकून दैवानेंच हतबुद्धि झाला. शिवाय माझ्या दुःखाला कारण होणारें भवितव्यहि तसेंच होतें. त्यामुळें तो यक्ष मनांत विचार करून तिला म्हणाला—"हे भद्रे, मी प्रतिज्ञेप्रमाणें तुझी इच्छा पूण करीन. पण त्याविषयीं माझा एक नियम तूं ऐक. माझें हें पुरुषत्व मी तुला कांहीं कालपर्यंत देतों. तुझ्यावरील संकट निवारण होऊन

तुझें कार्य झालें, म्हणजे तूं येथें परत येऊन आपलें स्त्रीत्व पुनः स्वीकारलें पाहिजेस. ‘योग्य कालीं मी परत येईन’ असें मला सत्यवचन दे. मी स्वेच्छेनें गमन करणारा आकाशगामी यक्ष आहें. मी केवल संकल्पानेंच सिद्धि देण्यास समर्थ आहें. यास्तव माझ्या प्रसादानें तूं आपल्या बांधवांचें आणि नगरीचें शत्रूपासून रक्षण कर. तोंपर्यंत मी तुझें स्त्रीत्व धारण करीन. पण ‘मी हें सर्व तुझ्या सांगण्याप्रमाणें करीन’ अशी सत्यप्रतिज्ञा कर. म्हणजे मग मी तुझें प्रिय करीन.”

शिखंडी—हे सुव्रता, तुझें पुंस्त्व मी कांहीं काल स्वीकारतों व तूं कांहीं काल माझें स्त्रीत्व धारण कर. हेमवर्मा दाशार्ण परत गेला म्हणजे मी कन्या होईन व तूं पुरुष होशील.

भीष्म—हे राजा, नंतर त्या दोघांनीं परस्परांची प्रतिज्ञा मान्य करून कांहींहि पीडा होणार नाहीं, अशाप्रकारें आपल्या स्वरूपांत बदल केला. स्थूणाकर्णानें स्त्रीत्वाचा स्वीकार केला व शिखंडीला यक्षाच्या दिव्य पुरुषत्वाची प्राप्ति झाली.

याप्रमाणें पांचाल्य शिखंडी पुरुषत्वाला प्राप्त झाला असतां हृष्ट चित्तानें आपल्या नगरींत प्रवेश करून पित्यापाशीं गेला व त्यानें घडलेला सर्व यथार्थ वृत्तान्त त्याला निवेदन केला. तो ऐकून द्रुपदराजाला परम हर्ष झाला व राणी-सह त्याला महेश्वराच्या वचनाचें स्मरण झालें. त्या पांचालराजानें तत्काल दशा-र्णाधिपाला ‘माझा पुत्र पुरुष आहे, या माझ्या वचनावर पूर्ण विश्वास ठेव’ असा निरोप पाठविला.

द्रुपदाचा हा निरोप ऐकून दुःख व शोक यांनीं व्याकुल झालेला तो दशा-र्णाधिपति मोठ्या त्वरेनें पांचाल राजाकडे निघून आला. द्रुपदाच्या काम्पिल्य नगरीच्या समीप येऊन पोंचल्यावर त्यानें ब्रह्मवेत्त्यांतील एका श्रेष्ठ ब्राह्मणाला द्रुपदाकडे दूतभावानें पाठविलें. तो हिरण्यवर्मा म्हणाला—“हे ब्रह्मन्, त्या नृपाधम पांचालाला माझा असा निरोप सांग कीं, हे दुर्मते, ज्या अर्थी तूं माझी वंचना करून आपल्या कन्येशीं माझ्या कन्येचा विवाह लावलास, त्या अर्थीं त्या कपटाचरणाचें फल तूं आजच भोगशील, यांत संशय नाहीं.”

याप्रमाणें दाशार्ण नृपतीनें पाठविलेला तो ब्राह्मणदूत द्रुपदाच्या नगरींत प्रवेश करून राजाच्या समीप गेला, तेव्हां पांचालानें त्या पुरोहिताला गाय, अर्घ्य,

पाद्य इत्यादि अर्पण करून त्याचा सत्कार केला आणि शिखंडीची त्याच्याशीं भेट करवून दिली.

परंतु द्रुपदाच्या त्या पूजेचा व स्वागतपूर्ण वचनाचा अनादर करीत तो ब्राह्मण हिरण्यवर्म्याचें तें कठोर वचन राजाला सांगूं लागला. ब्राह्मण म्हणाला —" हे दुर्मते, माझ्या कन्येची वंचना करून तूं जें कपटाचरण केलें आहेस, त्या पातकाचें फल आज तुला प्राप्त होईल. रणांगणांत माझ्याशीं युद्ध करण्यास सज्ज हो. अमात्य, बांधव व पुत्र या सर्वांसह मी तुझा आज उच्छेद करीन, असा तुला वीर हिरण्यवर्म्यानें निरोप सांगितला आहे."

हे भरतश्रेष्ठा, त्या पुरोहितानें जरी याप्रमाणें मंत्रिमंडाळाच्या समक्ष त्या राजाचें अपमानकारक भाषण ऐकविलें, तरी द्रुपदराजा क्रुद्ध न होतां नम्रतेनें त्याला म्हणाला—" हे ब्रह्मन्, आपण जें आमच्या आप्ताचें वचन त्याच्या आज्ञेवरून मला कथन केलेंत, तें मीं ऐकलें. याचें उत्तर माझा दूतच जाऊन त्या राजाला कळवील."

त्यानंतर द्रुपदानें महात्म्या हिरण्यवर्म्याकडे वेदपारग ब्राह्मणाला पाठविलें. त्या दूतानें दशार्णाधिपाला द्रुपदाचा असा स्पष्ट निरोप सांगितला कीं, माझा पुत्र पुरुषच आहे. याचा निश्चय करण्यासाठीं आपण त्याची योग्यप्रकारें परीक्षाच करवावी. त्याच्यावर हा कोणीं तरी मिथ्या आरोप केला आहे. त्या मिथ्या प्रवादावर विश्वास ठेवणें योग्य नव्हे.

( २ ) हे कौरवेश्वरा, द्रुपदाचा हा निरोप ऐकून हिरण्यवर्मा पुनः विचारांत पडला. त्याचें चित्त साशंक झालें व शिखंडी खराच पुरुष आहे कीं स्त्री आहे, हें जाणण्यासाठीं त्यानें कांहीं सुस्वरूप वरिष्ठ स्त्रिया त्या राजपुत्राकडे पाठविल्या. त्या स्त्रिया त्याच्याकडे जाऊन कृतकृत्य होऊन परत आल्या व त्यांनीं मोठ्या प्रीतीनें महानुभाव दाशार्णराजाला शिखंडी पुरुष असल्याचें निवेदन केलें. याप्रमाणें राजपुत्राची परीक्षा करवून हृष्ट झालेल्या त्या राजानें अतिशय प्रेमानें द्रुपदाची भेट घेतली व आनंदानें तेथें कांहीं काल वास्तव्य केलें. संतुष्ट चित्त झालेल्या त्या राजानें शिखंडीला प्रीतिपूर्वक विपुल वित्त दिलें. त्याचप्रमाणें हत्ती, अश्व, गायी व अनेक दासीहि अर्पण केल्या.

त्यावेळीं द्रुपदानेंहि त्याचा प्रतिसत्कार केला. नंतर मनांतील सर्व किल्बिष नाहींसें झालें असतां आपल्या कन्येची निर्भर्त्सना करून तो दाशार्णाधिप प्रसन्न

मनानें आपल्या नगरीला निघून गेला. याप्रमाणें हेमवर्मा निःसंदेह चित्तानें परत गेला असतां शिखंडीला अतिशय संतोष झाला.

( २ ) इकडे नरवाहन कुबेर लोकसंचार करीत त्याचवेळीं स्थूणाकर्णाच्या त्या भुवनांत येऊन पोंचला व त्यानें त्या यक्षगृहांत प्रवेश केला. तें सुंदरगृह विचित्र मालांनीं अलंकृत केलेलें असून लाह्या व सुगंधी द्रव्यें यांनीं युक्त होतें. त्याचें छत चांदव्यांनीं भूषविलेलें होतें व धूपाच्या सुवासानें सुगंधित केलें होतें. ध्वज-पताका उभारिल्या होत्या. भक्ष्य, भोज्य, लेह्य व चोष्य पदार्थांची तेथें समृद्धि होती.

त्याचें तें स्थान अमूल्य रत्नें व सुवर्ण यांच्या मालांनीं सुशोभित केलें होतें. नानाप्रकारच्या पुष्पांनीं तें सुगंधित झालें होतें. चंदनादिकांचे सडे घालून भूमि सुवासयुक्त केलेली होती. याप्रमाणें त्याचें तें गृह उत्तमप्रकारें अलंकृत केलेलें पाहून तो यक्षपति तेथील अनुचरांस म्हणाला—“ अमितपराक्रमी स्थूणाकर्ण कोठें आहे ! त्याचें हें भुवन सुंदर भूषणांनीं सुशोभित केलें आहे. परंतु तो मंदमति आज माझ्या समीप कां येत नाहीं ! ज्याअर्थी तो मूढात्मा मला सामोरा आला नाहीं, त्याअर्थी तो फार मोठ्या दंडास पात्र आहे, असें मला वाटतें.”

यक्ष म्हणाले—हे राजन्, द्रुपदराजाची कन्या येथें आली होती, तिला कांहीं कारणास्तव स्थूणाकर्णानें आपलें पुरुषत्व देऊन तिचें स्त्रीत्व कांहीं काल स्वीकारलें आहे. त्यामुळें तो स्त्री होऊन घरांत बसला आहे. स्त्रीचें स्वरूप प्राप्त झाल्यामुळें तो लज्जेनें घरांतून बाहेर पडत नाहीं. या कारणानें आज स्थूणाकर्ण आपलें स्वागत करण्यासाठीं पुढें आला नाहीं. असा एकंदर वृत्तान्त आहे. तो ऐकून हे प्रभो, आपणास जें योग्य वाटेल तें करावें.

तें ऐकून कुबेर म्हणाला—“असें असेल तर माझें विमान येथेंच उभें राहूं द्या. प्रथम त्या स्थूणाकर्णाला माझ्या समीप घेऊन या. मी आज त्याचा निग्रह करणार आहें.”

हे राजेंद्रा, त्या नंतर अनुचरांनीं स्थूणाकर्णाला यक्षेंद्राची आज्ञा सांगितली, तेव्हां तो यक्ष स्त्रीरूप धारण केल्यामुळें अतिशय लज्जित होऊन धनदाच्या पुढें येऊन उभा राहिला. त्याला पाहतांच कुबेरानें क्रोधसंतप्त होऊन असा शाप दिला—“ हे गुह्यकहो, या पापात्म्याचें स्त्रीत्व असेंच राहो. ” नंतर तो वैश्र-

वण स्थूणाकर्णाकडे वळून म्हणाला—" हे पापकर्मन्, ज्याअर्थी तूं यक्षांचा अवमान करून शिखंडीला आपलें पुंस्त्वत्व अर्पण केलें आहेस व तिच्या स्त्रीत्वाचा स्वीकार केला आहेस, अर्थात् ज्या कार्यांत कोणी कधींहि प्रवृत्त होणार नाहीं, तें कार्य तूं केलें आहेस, त्याअर्थी आजपासून शिखंडीला नित्य पुरुषत्व प्राप्त होऊन तूं आजन्म स्त्रीच रहाशील."

महात्म्या यक्षेंद्राचें हें वचन ऐकून सर्व यक्षगणांनीं ' स्थूणाकर्णावर प्रसन्न व्हा, ' अशी पुनः पुनः प्रार्थना केली. तेव्हां यक्षपति शापाचा शेवट करण्याच्या इच्छेनें त्या अनुचरांना म्हणाला—" हे यक्षहो, शिखंडी मृत्यु पावला असतां या स्थूणाकर्णाला त्याचें पूर्वरूप प्राप्त होईल. यास्तव तो उदार मनाचा यक्ष उद्वेगरहित होवो."

भगवान् यक्षराजाचें हें वचन ऐकतांच त्या यक्षगणांनीं त्याचें पूजन व सत्कार केला. तेव्हां तो आपल्या परिवारासह आकाशमार्गानें निघून गेला.

इकडे स्थूणाकर्ण शापनिवृत्त होईपर्यंत त्या गृहांतच राहूं लागला. कांहीं कालानें शिखंडी आपल्या प्रतिज्ञेप्रमाणें त्या यक्षाकडे परत आला व म्हणाला—" हे भगवन्, मी आलों आहें."

राजपुत्र शिखंडी सरळपणानें आपली प्रतिज्ञा पाळून परत आला हें पाहून स्थूणाकर्णानें ' हे राजपुत्रा, तुला पाहून मला फार संतोष वाटत आहे ' असें पुनः पुनः बोलून घडलेला सर्व वृत्तान्त शिखंडीला निवेदन केला.

यक्ष—हे नृपात्मजा, तुझ्यासाठीं मला कुबेरानें हा शाप दिला आहे. यास्तव तूं आतां इष्ट स्थळीं जा व सुखानें लोकांत संचार कर. माझें दैवच असें असावें, असें मी समजतों. त्याचें अतिक्रमण करतां येणें शक्य नाहीं. माझें पुरुषत्व घेऊन तूं येथून गेलास व त्याचवेळीं कुबेराचें आगमन झालें आणि त्या निमित्तानें मला या शापाची प्राप्ति झाली. खरोखर हें सर्व विधिलिखितच असलें पाहिजे.

भीष्म—हे भारता, स्थूणाकर्णानें असें म्हटलें असतां शिखंडी परम हर्षानें आपल्या नगरीस परत आला. घडलेला हा वृत्तान्त ऐकून द्रुपदराजाला अतिशय आनंद झाला. त्यानें विविध मंगल पदार्थ, सुगंधित द्रव्यें व पुष्पमाला यांनीं देवतांची, ब्राह्मणांची व गांवांतील चवाठ्यावरील वृक्षांची महादक्षिणायुक्त पूजा केली. शिखंडीच्या या कृतार्थतेनें तो पांचालराजा आपल्या बांधवांसह अतिशय

संतुष्ट झाला व त्यानें पूर्वी स्त्री असलेल्या आपल्या शिखंडी पुत्राला द्रोणाचार्यांपाशीं शिक्षण घेण्यासाठीं पाठविलें. तो आचार्यांचा शिष्य होऊन राहिला. त्यानें धृष्टद्युम्न व तुम्ही कौरव-पांडव यांच्यासह चतुष्पाद म्ह० ग्रहण, धारण, प्रयोग व प्रतिकार या चार पादांनीं युक्त असलेला धनुर्वेद संपादन केला. मीं द्रुपदाच्या संनिध जड, अंध व बधिर यांच्या आकाराचे, त्यांचीं सोंगें घेतलेले जे हेर ठेविले होते, त्यांनीं मला हें सर्व वृत्त निवेदन केलें.

(४) याप्रमाणें हे राजन्, 'अंबा' या नांवानें प्रसिद्ध असलेली काशिपतीची ज्येष्ठ कन्या द्रुपदाच्या कुलांत उत्पन्न झाली व जन्मतः कन्या असलेली ती शिखंडिनी अशाप्रकारें पुढें पुरुषत्वाला प्राप्त होऊन आज श्रेष्ठ रथी पुत्र झाली आहे. युद्धाची इच्छा करणारा तो शिखंडी हातांत धनुष्यबाण घेऊन माझ्या पुढें आला असतां मी क्षणभरहि त्याच्याकडे पहाणार नाहीं, किंवा त्यानें जरी मजवर प्रहार केला, तरीहि मी उलट त्यावर बाण सोडणार नाहीं.

हे कौरवनंदना, स्त्री, पूर्वी स्त्री असलेला व स्त्रीचें नांव धारण करणारा किंवा स्त्रीचें स्वरूप धारण करणारा पुरुष, यांवर मी कदापि बाण सोडीत नाहीं. हें माझें व्रत समग्र पृथ्वीतलावर विश्रुत आहे. याच कारणास्तव मी शिखंडीचा वध करणार नाहीं. शिखंडीचा हा जन्मवृत्तान्त मीं तुला सांगितला आहे. त्या आततायीला मी समरामध्यें मारणार नाहीं. या भीष्मानें जर स्त्रीचा वध केला तर सज्जन त्याची निंदा करितील. यास्तव त्याला समरांगणांत स्थित असलेला पाहूनहि मी त्यावर शर सोडणार नाहीं.

वैशंपायन—भीष्माचें हें भाषण ऐकून दुर्योधनानें क्षणभर विचार केला व भीष्माचें स्त्रीशीं युद्ध न करण्याचें व्रत युक्त आहे, असें मानिलें. ५.१०.१९२.

---

## अध्याय १९३ वा.

[ १ शत्रूसेनेचा तुम्ही किती वेळांत संहार कराल असा दुर्योधनाचा प्रश्न. २ त्यास भीष्म-द्रोणादिकांचें उत्तर. ३ भीष्मानें केलेला कर्णाचा उपहास. ]

(१) संजय—हे राजा धृतराष्ट्रा, ती रात्र जाऊन दिवस उगवला असतां तुझ्या पुत्रानें सर्व सैन्याच्यामध्यें पितामहाला पुनः असा प्रश्न केला—"हे गाङ्गेया, पांडवांचें युद्धाला उद्युक्त झालेलें सैन्य विपुल योद्धे, गज व अश्व यांनीं युक्त आहे. तें महारथांनीं व्याप्त आहे. धृष्टद्युम्न ज्यांचा प्रमुख आहे, असे महाबलाढ्य व

प्रचंड धनुष्य धारण करणारे भीमार्जुनादि योद्धे, लोकपालांप्रमाणें आपल्या सैन्याचें रक्षण करीत आहेत. ही पांडवसेना दुराधर्ष, अजिंक्य व समुद्रासारखी दुस्तर आहे. देवांनाहि महायुद्धांत हा सेनासमुद्र क्षुब्ध करतां येणार नाहीं, इतका तो विस्तृत आहे. अशा या सैन्याचा क्षय आपण किती कालांत कराल ?

त्याचप्रमाणें हे महाद्युते, माझ्या सैन्यांत महेष्वास आचार्य, महाबलाढ्य कृप, समरश्लाघी कर्ण, किंवा द्विजश्रेष्ठ अश्वत्थामा हे सर्व दिव्यास्त्रवेत्ते आहेत. अशा प्रकारचे तुम्ही सर्व सामर्थ्यसंपन्न वीर माझ्या सैन्यांत आहां. यास्तव हें जाणण्याची माझ्या अंतःकरणांत नित्य उत्कंठा वाटत आहे. यास्तव हे महाबाहो, मला तें कथन कर.

( २ ) भीष्म—हे कुरुश्रेष्ठा, तूं जें शत्रूचें बलाबल विचारीत आहेस, तें तुला उचितच आहे. या समरांगणांत माझें युद्धांतील शस्त्रबल व माझ्या बाहूंची परम शक्ति किती व्यक्त होईल तें सांगतों, ऐक. मी सरल युद्ध करणारांशीं सरल व कपटयुद्ध करणारांशीं कपटानें युद्ध करीत असतों. याच पद्धतीनें मी पांडवांच्या सैन्याचा संहार करीन.

हे महाद्युते, प्रतिदिवशीं प्रातःकालीं आह्निक उरकून मी रणांगणांत जाईन व नित्य दहा सहस्र योद्धे व एक सहस्र रथी, हा एक दिवसाचा भाग कल्पून क्रमानें मी त्या सर्वांचा संहार करीन. युद्धाला सज्ज होऊन मी याप्रमाणें या महत्सैन्याचा नाश करीन. समरांत स्थित असलेल्या मीं जर शतसहस्र वीरांचा घात करणाऱ्या महान् अस्त्रांचा प्रयोग केला, तर एका महिन्यांत मी सर्व शत्रुसैन्याचा संहार करीन.

संजय—भीष्माचें हें वचन ऐकून राजा दुर्योधनानें श्रेष्ठ आङ्गिरस द्रोणाला प्रश्न केला कीं, हे आचार्य, आपण पांडुपुत्रांच्या सैन्याचा किती कालांत नाश कराल ?

दुर्योधनाचा हा प्रश्न ऐकून द्रोणाचार्य हंसून म्हणाले—हे महाबाहो, मी आतां वृद्ध झालों आहें. माझें सामर्थ्य आतां कमी झालें आहे. तरीहि मी भीष्माप्रमाणेंच एका महिन्यांत माझ्या शस्त्ररूपी अग्नीनें पांडवसेनेला दग्ध करीन. माझें परम बल, व पराकाष्ठेची शक्ति एवढीच आहे.

त्यानंतर शारद्वत कृप म्हणाला—मी दोन महिन्यांत शत्रुसैन्याचा क्षय करीन. नंतर अश्वत्थाम्यानें दहा दिवसांत पांडवसैन्याचा क्षय करण्याची प्रतिज्ञा केली आणि महास्त्रवेत्त्या कर्णानें तर पांच दिवसांत सर्व सैन्याचा संहार करण्याची आत्मप्रौढी गाईली.

( ३ ) सूतपुत्राचें हें वचन ऐकून गंगापुत्र मोठ्यानें हंसला आणि म्हणाला—हे राधेया, वासुदेव ज्याचा सारथि आहे, अशा रथावर आरूढ होऊन शंख, बाण व धनुष्य धारण करणारा अर्जुन जोंवर रणांत तुजवर धांवून आला नाहीं, तोंवरच तुझ्या या वल्गना आहेत. त्याची गांठ पडली म्हणजे तुला त्याचें सामर्थ्य कळेल. ५. १०. १९३.

---

## अध्याय १९४ वा.

[ १ युधिष्ठिराचा अर्जुनाला प्रश्न. २ पाशुपतास्त्रानें तीन्ही लोकांना जिंकण्यास समर्थ असूनहि त्याचा प्रयोग न करतां सरल युद्धानेंच जय मिळविण्याविषयीं अर्जुनाची प्रतिज्ञा. ]

( १ ) वैशंपायन—हे भरतश्रेष्ठा, कौरवांकडील ही वार्ता दूतमुखानें श्रवण केल्यावर युधिष्ठिर आपल्या सर्व भ्रात्यांना एकत्र जमवून त्यांना एकांतांत असें वचन बोलला—

युधिष्ठिर—धार्तराष्ट्राच्या सैन्यांत माझे जे दूत संचार करीत होते, त्यांनीं प्रातःकालीं मला असा वृत्तान्त कथन केला कीं, दुर्योधनानें भीष्माला 'तूं किती दिवसांत पांडवसैन्य नष्ट करशील' असा प्रश्न केला असतां त्या पितामहानें 'एका महिन्यांत असें उत्तर दिलें.' द्रोणाचार्यांनींहि तेवढाच काल सांगितला. कृपानें त्यांच्या दुप्पट काल सांगितल्याचें ऐकतों. महास्त्रवेत्त्या अश्वत्थाम्यानें दहा रात्रींत व दिव्यास्त्रवेत्त्या कर्णानें केवल पांच दिवसांत पांडवसेनेचा संहार करण्याची त्या कौरवसभेंत प्रतिज्ञा केली आहे. यास्तव हे अर्जुना, मीहि तुला विचारतों कीं, तूं शत्रुसैन्याचा किती कालांत क्षय करशील ?

( २ ) धर्मराजानें असा प्रश्न केला असतां धनंजयानें वासुदेवाकडे पाहून असें उत्तर दिलें—

अर्जुन—हे महाराज, कौरवांकडील हे महात्मे कृतास्त्र व विचित्र युद्ध करणारे आहेत. ते म्हणतात तेवढ्या कालांत पांडवसेनेचा संहार करतील, यांत

संशय नाहीं. तथापि हे राजा, तुझी चिंता दूर होवो. मी तुला सत्य कथन करितों कीं, वासुदेव माझा साह्यकर्ता असल्यावर मी केवळ एका रथानें सर्व देवांसह स्थावरान्त त्रैलोक्याचा व भूत, भविष्यत् आणि वर्तमान काळांतील सर्व भूतांचा एका निमिषांत नाश करण्यास समर्थ आहें. किराताच्या द्वंद्व-युद्धांत शंकरापासून मला जें घोर पाशुपतास्त्र प्राप्त झालें आहे, तें मजपाशीं उपस्थित आहे. हे राजन्, युगान्तकालीं सर्व प्राण्यांचा संहार करण्याकरितां पशुपति ज्या अस्त्राचा प्रयोग करितो, तें घोर अस्त्र मजपाशीं आहे.

पण हे पुरुषव्याघ्रा, भीष्म, द्रोण, कृप, अश्वत्थामा किंवा सूतपुत्र कर्ण यांतील एकालाहि तें अवगत नाहीं. तथापि या अनस्त्रवेत्त्यांवर त्या दिव्या-स्त्राचा प्रयोग करून रणांत त्यांचा वध करणें योग्य नव्हे. यास्तव मी सरळ युद्धानेंच शत्रूचा पराजय करीन. हे प्रभो, तुला साह्य करणारे हे सर्व भूपाल दिव्यास्त्रवेत्ते, विद्वान्, युद्धाची इच्छा करणारे व अजिंक्य आहेत. त्या सर्वांनीं वेदग्रहणाच्या शेवटीं भार्यापरिग्रह करून व यज्ञ करून अवभृतस्नान केलेलें आहे. शिखंडी, युयुधान, धृष्टद्युम्न, भीमसेन, नकुल, सहदेव, युधामन्यु, उत्तमौजा, युद्धांत भीष्म-द्रोणांच्या तुल्य असलेले विराट व द्रुपद, महाबाहु शङ्ख, महाबलाढ्य घटोत्कच, त्याचा पुत्र महापराक्रमी अंजनपर्वा, महाबाहु शैनेय, रणकोविद अभिमन्यु आणि पांच बलवान् द्रौपदेय हे पराक्रमी योद्धे समरांत देवांचाहि संहार करतील. ( मग कौरवांची काय कथा ! )

याशिवाय हे राजा, तूं स्वतःहि त्रैलोक्याचा नाश करण्यास समर्थ आहेस. तुझें तेज इंद्रतुल्य आहे. तूं ज्या पुरुषाकडे क्रोधानें पहाशील, तो तत्काल नाश पावेल, असें मी समजतों. ५. १०. १९४.

---

## अध्याय १९५ वा.

[ १ कौरवसेनेचें नगरांतून युद्धार्थ निर्गमन व शिबिरप्रवेश. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा जनमेजया, त्यानंतर दुसऱ्या दिवशीं प्रभात-कालीं ज्यांना दुर्योधनानें प्रेरणा केली आहे, असे सर्व राजे पांडवांवर चाल करून गेले. त्या आल्हादकारक प्रातःकालीं स्नान करून शुचिर्भूत झालेल्या त्या सर्व भूपालांनीं शुभ्र वस्त्रें परिधान केलीं. पुष्पमाळा धारण केल्या. ब्राह्मणांकडून

स्वस्तिवाचन करवून अग्नींत आहुत्या दिल्या. शस्त्रें व धृतराष्ट्राचे ध्वज धारण केले. ते सर्व पार्थिव ब्रह्मवेत्ते, शूर व सदाचरणी होते. संग्रामांत कुशल होते, दुर्योधनाच्या इच्छेप्रमाणें वागणारे ते महाबलाढ्य वीर युद्धांत शत्रूंना जिंकण्याची आकांक्षा करीत होते. ते सर्व एकाग्रमनानें परस्परांवर श्रद्धा ठेवीत होते. भारद्वाजाला पुढें करून ते सर्व आवन्त्य विंद-अनुविंद, केकय व बाह्लिक यांच्यासह निघाले.

अश्वत्थामा, शान्तनव भीष्म, सिंधुपति जयद्रथ, गांधारराजा शकुनि, दाक्षिणात्य, प्रतीच्य, प्राच्य व उदीच्य इत्यादि हे सर्व दिशांचे अधिपति; पर्वतावरील नृपेंद्र, शक, किरात, यवन, शिबि, वसाति हे सर्व महारथ आपापल्या सैन्यासह भीष्माला पुढें करून दुसरें पथक करून निघाले. त्यांच्या मागून सैन्यासह कृतवर्मा, महारथ त्रिगर्त शल, शल्य, भूरिश्रवा, कोसलाधिप, बृहद्रथ व धार्तराष्ट्र हे सर्व एकत्र जमून निघाले. ते सर्व दुर्योधनादि योद्धे सैन्यासह रणभूमीवर जमले असतां महाबलाढ्य धार्तराष्ट्रांनीं यथान्याय त्यांची भेट घेऊन त्यांचा सत्कार केला व ते कवचें धारण करून कुरुक्षेत्राच्या पश्चिम भागीं स्थित झाले.

हे भारता, दुर्योधनानें तेथें एक सुंदर व समृद्ध शिबिर निर्माण करविलें होतें. तें पाहून नगरांतील कुशल लोकांनाहि तें दुसरें हस्तिनापुरच आहे, असा भास झाला. त्या महीपतीनें तशाच प्रकारचीं सहस्रावधि शिबिरें इतर राजांसाठींहि तयार करविलीं. त्या शिबिरांनीं कुरुक्षेत्रांचा पांच योजनें प्रदेश व्यापिला होता. प्रत्येक शिबिरांत अनेक पथकांचा समावेश केलेला असून तेथें उत्तम भक्ष्य-भोज्य पदार्थांची समृद्धि होती. अशा प्रकारच्या त्या सुसंरक्षित शिबिरांत सर्व नृपालांनीं आपापल्या इच्छेप्रमाणें सैन्यासह तळ दिला. दुर्योधनानें ते सर्व नृपति, सैनिक, अश्वादि वाहनें, शिल्पी, सूत, मागध, बंदी, वणिक्, गणिका, दूत आणि प्रेक्षक या सर्वांच्या अन्न-पानादिकांची त्यांच्या योग्यतेप्रमाणें व्यवस्था करविली होती. ५. १०. १९५.

---

## अध्याय १९६ वा.

[ १ पांडवसेनेचें युद्धार्थ निर्गमन. २ युधिष्ठिरानें केलेला सेनेचा विभाग. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा, त्याचप्रमाणें कुंतीपुत्र युधिष्ठिरानेंहि धृष्टद्युम्नादि वीरांना युद्धार्थ निघण्याची आज्ञा केली. चेदि, काशि व करूषक या देशांतील

सैन्यांचा अधिपति दृढपराक्रमी, शत्रुनाशक धृष्टकेतु, विराट, द्रुपद, युयुधान, शिखंडी, महाधनुर्धर युधामन्यु व उत्तमौजा या सर्वांस निघण्याविषयीं सूचना दिली, तेव्हां विचित्र कवचें व तेजस्वी कुंडलें धारण केलेले आणि वीरश्रीनें युक्त असलेले ते सर्व वीर घृत घालून प्रज्वलित केलेल्या कुंडांतील देदीप्यमान अग्नी-प्रमाणें किंवा आकाशांतील उज्ज्वल ग्रहांप्रमाणें शोभले.

युधिष्ठिरानें त्या सर्व सज्ज झालेल्या वीरांचा सैनिकांसह यथायोग्य सत्कार करून त्यांना प्रयाणार्थ संमति दिली. अश्व-गजादि वाहनें, शिल्पावर निर्वाह करणारे लोक व सैन्यासह सर्व योद्धयांच्या अन्न-पानादिकांची व उत्तम भक्ष्य-भोज्य पदार्थांची व्यवस्था करण्यास सेवकांना आज्ञा केली.

( २ ) त्यानंतर अभिमन्यु, बृहन्त राजा व पांच द्रौपदेय यांना धृष्टद्युम्नाच्या नेतृत्वाखालीं पाठवून दिलें. भीम, युयुधान, धनंजय, यांना पृथक् सेनासमूहां-बरोबर पाठवून दिलें. हे राजा, ते वीर अंगावर कवचें चढवीत असतां, त्यांच्या शस्त्रांचा होणारा खणखणाट व ते हृष्ट झालेले योद्धे मोठ्या हर्षानें इतस्ततः धांवत असतां होणारा तुमुल शब्द स्वर्गाला जाऊन पोंचत होता.

सर्वांच्या शेवटीं इतर नृपति, विराट आणि द्रुपद यांच्यासह युधिष्ठिर निघाला. प्रचंड धनुष्यें धारण करणाऱ्या योद्धयांनीं युक्त असलेली ती सेना धृष्टद्युम्नाच्या नेतृत्वाखालीं चालली असतां गंगेच्या प्रवाहाप्रमाणेंच भासली.

हे राजा, पांडवांच्या सेनेचा विभाग कशा प्रकारचा आहे, हें कौरवपक्षाला कळल्यामुळें युधिष्ठिरानें पूर्वीची योजना बदलून पुनः नवीन विभाग केले. महाधनुर्धर अभिमन्यु, द्रौपदेय, नकुल, सहदेव, सर्व प्रभद्रक, दशसहस्र अश्व, दोन सहस्र गज, दशसहस्र पायदळ व पांचशें रथी यांचा पहिला विभाग करून भीमसेनाला त्याचें आधिपत्य दिलें. विराट, जयत्सेन, महारथ युधामन्यु व उत्तमौजा यांचा मध्यम विभाग केला. या विभागांतून महात्मे कृष्णार्जुन संचार करीत होते व योद्धयांना प्रोत्साहन देत होते. त्यामुळें ते वीर वीरश्रीनें प्रहार करण्यास उद्युक्त झाले. त्या विभागांत वीस हजार शूर अश्वसादी, पांच हजार गज असून रथसमुदायांनीं तर सर्व मार्ग व्यापून टाकला होता. धनुष्य, खड्ग व गदा धारण करणारे सहस्रावधि शूर पदाति पूर्वभागीं व पार्श्वभागीं स्थित होते. राजा युधिष्ठिर ज्या विभागांत होता, त्यांत सर्व प्रमुख नृपाल असून त्यांचा विस्तृत सेनासमुद्र दूरवर पसरला होता. त्या सैन्यांत सहस्रावधि गज, दश-सहस्र अश्वसमुदाय, असंख्य रथ व पदाति होते. आपल्या प्रचंड सैन्यासह

चेकितान व चेदींचा प्रणेता धृष्टकेतु याच विभागांत होता. वृष्णिश्रेष्ठ सात्यकि सहस्रावधि रथी योद्ध्यांना बरोबर घेऊन सैन्याचें नियमन करीत चालला होता. क्षत्रदेव व ब्रह्मदेव हे दोघे रथस्थ वीर सैन्याच्या पृष्ठभागाचें संरक्षण करीत होते.

सर्वांच्या मागून शकट, व्यापारी, वेश्या, युद्धोपयोगी वाहनें, सैनिकांचे स्त्रीपुत्रादिक, सहस्रावधि गज, अश्व, आणि युद्धाला निरुपयोगी असलेले, दुर्बल, पंगु इत्यादि लोक, व द्रव्यकोश, धान्यकोश, इत्यादिकांना वाहून नेणारे गज चालले होते. या सर्व परिवारासह राजा युधिष्ठिर हळुहळू मार्ग आक्रमीत होता. युद्धोत्सुक सौचिति, श्रेणिमान् व सामर्थ्यसंपन्न काश्यपुत्र वसुदान हे धर्मराजालाच अनुसरले.

त्याशिवाय वीस हजार रथ, त्यांचे अनुयायी, घुंगुरमालांनीं अलंकृत केलेले दहा कोटि अश्व; मेघांप्रमाणें विशाल, युद्धदुर्मद, जातिवंत, सुळ्यासारखे दीर्घदंत असलेले व मदोन्मत्त वीस हजार गज आणि सामान्य प्रतीचे सत्तर हजार गज, महात्म्या युधिष्ठिराच्या सैन्यांत होते. ते प्रचंड गज जात असतां त्यांच्या गंडस्थलांतून मदस्राव होत होता. त्यामुळें ते वृष्टि करणाऱ्या मेघांप्रमाणें दिसत होते. किंवा ते निर्झरांचा प्रवाह वहात असलेले पर्वतच चालले आहेत कीं काय असा भास होत असे. ते मदोन्मत्त प्रचंड गज युधिष्ठिराच्या मागून चालले होते. राजा, अशा प्रकारच्या बलाढ्य आणि प्रचंड सैन्याच्या साह्यानें कुंतीपुत्र युधिष्ठिरानें सुयोधनाशीं युद्ध केलें. याशिवाय त्या पांडवसैन्यांत सहस्रावधि योद्धे पृथक् पृथक् विभाग करून आपापल्या सैन्यासह चालले होते. ते सर्व सैनिक हर्षभरानें शेकडों भेरी, शंख व दुंदुभि यांच्या प्रचंड ध्वनीनें तो प्रदेश निनादित करीत होते. ५. १०. १९६.

( येथें दहावें अम्बोपाख्यान उपपर्व समाप्त झालें. )

येथें पांचवें उद्योगपर्व संपलें.

---

यापुढें सहावें भीष्मपर्व येईल, त्याचा हा पहिला श्लोक आहे—

जनमेजय उवाच—

कथं युयुधिरे वीराः कुरुपाण्डवसोमकाः।
पार्थिवाः सुमहात्मानो नानादेशसमागताः ॥

---

# श्रीमन्महाभारतार्थ

## ( महाभारताचें मराठी सुबोध भाषांतर. )



## ६ भीष्मपर्व.



### जम्बूखण्डविनिर्माणपर्व १.



नारायणं नमस्कृत्य नरं चैव नरोत्तमम् ।
देवीं सरस्वतीं चैव ततो जयमुदीरयेत् ॥

अध्याय १ ला.

[ १ जनमेजयाचा युद्धाविषयीं प्रश्न. २ वैशंपायनाचें उत्तर. ३ सैन्यशिक्षण. ]

अर्थ—अन्तर्यामी नारायणाला, नराला, पुरुषोत्तमाला व देवी सरस्वतीला नमस्कार, करून त्यानंतर 'जय'संज्ञक महाभारताचा पाठ किंवा प्रवचन करावें.

( १ ) जनमेजय—हे मुने, वीर कौरव, पांडव, सोमक आणि अत्यंत महात्मे व नाना देशांतून आलेले पृथ्वीपति, यांनीं परस्पर कसें युद्ध केलें ?

( २ ) वैशंपायन—हे भूपाला, तपश्चर्येचें पवित्र क्षेत्र असें जें कुरुक्षेत्र त्यांत वीर कौरव, पांडव व सोमक यांनीं कोणत्या प्रकारें युद्ध केलें, तें सांगतों ऐक. सोमकांसह पांडव व कौरव यांनीं प्रसिद्ध कुरुक्षेत्रांमध्यें प्रवेश केला, त्या महाबलाढ्यांनीं परस्परांस जिंकण्याच्या इच्छेनें आपापलीं शिबिरें स्थापिलीं व त्यांनीं धारातीर्थांतील सर्व प्रदेश सर्वतः व्यापून सोडिले. ते सर्व क्षत्रिय वेदाध्ययनसंपन्न, युद्धाचें अभिनंदन करणारे व जयाची आकांक्षा करणारे

---

१ या मंगलाचरणाचा सविस्तर अर्थ भाग १, पृ. १ वर पहा.

होते. ते सर्व रणभूमींत प्रवेश करून स्वसामर्थ्यानें युद्धास सज्ज झाले. राजा, पांडवपक्षांतील वीर, धृतराष्ट्रपुत्राच्या दुर्धर्ष सैन्याच्या संमुख येऊन आपल्या सर्व सैन्यासह कुरुक्षेत्राच्या पश्चिमभागांत उभे राहिले. त्यांनीं तेथें आपल्या सैन्याचा तळ दिला. कुंतीपुत्र युधिष्ठिरानें समंतपंचकाच्या बाहेर हजारों शिबिरें यथाविधि निर्माण करविलीं.

जनमेजया, त्यावेळीं सर्व पृथ्वी जणुकाय शून्य झाली होती. तिच्यामध्यें केवल बाल व वृद्ध अवशिष्ट राहिले होते. त्यावेळीं पृथ्वीवरील इतर प्रदेशीं अश्व, पुरुष, रथ व गज हे जणुकाय नाहींतच असा भास झाला. कारण हे राजा, सूर्य जंबूद्वीपाच्या जेवढ्या भागाला आपल्या किरणांनीं संतप्त करितो, तेवढ्या भागांतील सर्व सैन्य तेथें युद्धार्थ आलें होतें. कुरुक्षेत्र हा प्रदेश अनेक योजनें विस्तीर्ण आहे. पण त्या एकाच प्रदेशीं सर्व वर्णांचे लोक भिन्न भिन्न देश, नद्या, पर्वत व वनें यांचें उल्लंघन करून आले होते. त्यामुळें तें विस्तृत क्षेत्रहि भरून गेलें.

हे पुरुषश्रेष्ठा, राजा युधिष्ठिरानें आपल्या पक्षाला येऊन मिळालेल्या कैवर्त, म्लेच्छ, आंध्र, इत्यादि प्रत्यंतवासी वेदबाह्य वीरांसह सर्व योद्ध्यांना उत्तम भोज्य व भक्ष्य पदार्थ पुरविण्याची आज्ञा केली. कुंतीपुत्रानें त्या वीरांना रात्रीं सुखानें शयन करण्यासाठीं विविध शय्या तयार करविल्या. खरोखर तो पांडु-पुत्र मोठा ज्ञानी व दीर्घदर्शी होता.

इकडे युद्धकाल उपस्थित झाला असतां राजा दुर्योधनानेंहि आपल्या सैनि-कांचीं निरनिराळीं चिह्नें, संज्ञा व आभरणें यांची योजना केली. आपल्या वीरांनीं आपल्याच योद्ध्यांना मारूं नये, म्हणून सर्व योद्ध्यांचीं चिह्नें निश्चित करावीं, असें युद्धशास्त्रज्ञांनीं सांगितलें आहे. पार्थाच्या ध्वजाचें अग्र पाहून उदार धार्तराष्ट्रानें सर्व राजांसह पांडवांच्या संमुख आपला व्यूह रचिला. त्यावेळीं तो राजा दुर्योधन आपल्या भ्रात्यांनीं परिवेष्टित होत्साता सहस्र गजांच्या मध्यें स्थित होता. त्याच्या मस्तकावर शुभ्र छत्र धारण केलें होतें. राजा, अशा अवस्थेंत स्थित असलेल्या दुर्योधनाला पाहून त्या युद्धाचें अभि-नंदन करणारे पांचाल अतिशय हृष्ट झाले व त्यांनीं मोठ्या हर्षानें महाशंख व मधुर स्वरानें युक्त असलेले नगारे वाजविले. तेव्हां आपली सेना अतिशय संतुष्ट झाली आहे, असें पाहून पांडव व वीर्यवान् वासुदेव यांचेंहि चित्त अति-शय हृष्ट झालें.



**व्यास—**हे राजन्, तुझ्या या संजयाला मी दिव्यदृष्टि देतों. त्यामुळें तो सर्वज्ञ होईल व तुला युद्धाची सर्व वार्ता कथन करील. [ भीष्मपर्व अ. २, पृ. १६३.

एकाच रथावर स्थित असलेले पुरुषश्रेष्ठ वासुदेव व धनंजय, यांनीं हृष्ट होऊन एकाच वेळीं आपले दिव्य शंख वाजविले. तेव्हां हृषीकेशाचा पांचजन्य व धनंजयाचा देवदत्त, या दोन शंखांचा तो भयंकर ध्वनि ऐकून दुर्योधनाच्या सैन्यांतील योद्धे भयभीत झाले व शरीरधर्म करूं लागले. ज्याप्रमाणें सिंहनाद करणाऱ्या सिंहाची गर्जना ऐकून इतर मृग त्रस्त होतात, त्याप्रमाणें तें सैन्य कृष्णार्जुनांच्या दिव्य शंखांचा ध्वनि ऐकून त्रस्त झालें. भूमीवरील धूळ उधळली. सर्व प्रदेश धूलिमय झाल्यामुळें कांहीं दिसेनासें झालें. आदित्य जणुंकाय अस्तच पावला आहे, असा भास झाला. याप्रमाणें तें स्थान फार मोठ्या सैन्यानें व्याप्त झालें असतां मेघानें मांस-शोणिताची वृष्टि केली. सर्व दिशांतील सैन्यावर अशी रक्तवृष्टि होणें, हें एक आश्चर्यच आहे.

वाळूची वृष्टि करणारा वायु वेगानें वाहूं लागला. त्यामुळें त्या सर्व सैन्याला असह्य पीडा झाली. तथापि तीं दोन्हीं सैन्यें परस्पर युद्ध करण्यास अतिशय उत्सुक झालीं होतीं. त्यामुळें तें कुरुक्षेत्र क्षुब्ध झालेल्या सागरासारखें दिसूं लागलें. युगान्तसमयीं दोन सागरांचा जसा समागम व्हावा, त्याप्रमाणें त्या दोन्ही सैन्यांचा अद्भुत संगम झाला.

( २ ) कौरवांच्या सैन्यांतहि पृथ्वीवरील सर्व वीर एकत्र जमले होते. त्यामुळें सर्व पृथ्वी शून्यच झाली आहे कीं काय, असा भास झाला. हे राजा, याप्रमाणें कौरव, पांडव व सोमक यांनीं युद्धाचे धर्म व संकेत असे निश्चित केले. हें युद्ध संपल्यावर दोन्ही पक्षांतील लोकांची पूर्वीप्रमाणें परस्परांवर प्रीति रहावी. न्यायानें युद्ध करावें. समान योद्ध्यांशींच संग्राम करावा. केवल वाग्युद्धास प्रवृत्त झालेल्याशीं वाणीनेंच युद्ध करावें. सैन्यांतून बाहेर पडलेल्या योद्ध्यांना केव्हांहि मारूं नये. रथ्यानें रथ्याशीं, गजावर बसलेल्या वीरानें गजस्थाशीं, अश्वसादीनें अश्वारोहीशीं, व पदातीनें पदातीशीं युद्ध करावें. ज्याची जशी तयारी, इच्छा, उत्साह व बल असेल, त्याप्रमाणें त्याला सावध करून मग त्यावर प्रहार करावा. सावधान नसलेल्या किंवा विह्वल झालेल्या वीरावर प्रहार करूं नये. दुसऱ्या वीराशीं युद्ध करीत असलेला, शरण आलेला, विमुख झालेला, ज्याचीं शस्त्रें क्षीण झालीं आहेत व कवचरहित अशा योद्ध्याला केव्हांहि मारूं नये. सारथि, अश्व, शस्त्रें आणून देणारे व भेरी, शंख इत्यादि वाद्यें वाजविणारे यांवर केव्हांहि प्रहार करूं नये.

राजा, असे नियम करून कौरव, पांडव व सोमक परस्परांकडे पहात अतिशय विस्मित झाले. ते पुरुषश्रेष्ठ महात्मे स्व-स्वस्थानीं स्थिर होऊन सैनिकांसह अतिशय हृष्ट झाले. ६. १. १.

---

## अध्याय २ रा.

[ १ धृतराष्ट्राला युद्धदर्शनाविषयीं व्यासाचा प्रश्न. २ धृतराष्ट्राची प्रत्यक्ष युद्ध पहाण्याची अनिच्छा, पण तें सविस्तर ऐकण्याची मनीषा. ३ व्यासाचें संजयाला वरदान व दुश्चिह्नांचें वर्णन. ]

**वैशंपायन**—हे राजा, त्यानंतर कौरव व पांडव यांचीं पूर्वापर सागरांप्रमाणें पसरलेलीं तीं दोन्ही सैन्यें पाहून भगवान् व्यासमहर्षि राजा वैचित्रवीर्याकडे आला. तो सत्यवतीपुत्र व्यास सर्व वेदवेत्त्यांमध्यें श्रेष्ठ असून पुढें होणाऱ्या घोर संग्रामांतील कौरव व पांडव यांचा पितामह होता. तो भगवान् सर्व वस्तु बसल्या स्थानीं प्रत्यक्ष पहात असे आणि त्याला भूत, भविष्यत् व वर्तमान या तीन्ही कालांचें ज्ञान होतें. तो महात्मा आपल्या पुत्रांचा अन्याय पाहून शोक करणाऱ्या, आर्त झालेल्या व पुत्रांच्या अन्यायाचेंच चिंतन करणाऱ्या धृतराष्ट्रापाशीं येऊन एकांतांत असें रहस्य वचन बोलला—

( १ ) **व्यास**—हे राजा, तुझे पुत्र व हे सर्व इतर राजे यांचा काल फिरला आहे. ते या संग्रामांत एकमेकांपुढें येऊन परस्परांचा नाश करतील, पण हे भारता, कालक्रमाला ओळखून विपरीत काल ओढवल्यामुळेंच हे सर्व वीर नाश पावत आहेत; असें जाणून तूं आपल्या मनाला शोकसंतप्त होऊं देऊं नको. धारातीर्थीं मरण पावणाऱ्या त्या वीरांना पहाण्याची जर तुझी इच्छा असेल, तर मी तुला दृष्टि देतों. हे पुत्रा, तूं संग्रामांत जाऊन प्रत्यक्ष युद्ध पहा.

( २ ) **धृतराष्ट्र**—भगवन्, आपल्या ज्ञातीचा वध प्रत्यक्ष नेत्रांनीं पहावा, अशी माझी इच्छा नाहीं. पण आपल्या तेजानें या युद्धाचा सर्व वृत्तान्त मीं ऐकावा, अशी कृपा करावी.

( ३ ) **वैशंपायन**—राजा जनमेजया, धृतराष्ट्र साक्षात् संग्राम पहाण्याची इच्छा करीत नाहीं, तर त्याचा वृत्तान्त ऐकण्याचीच आकांक्षा करीत आहे, हें जाणून

इष्ट वर देण्यास समर्थ असलेल्या भगवान् व्यासानें संजयाला वर दिला. तो व्यास महर्षि धृतराष्ट्रास म्हणाला—"हे राजा, हा तुझा सूत संजय युद्धाचा सर्व वृत्तान्त तुला सांगेल. संग्रामांतील कोणत्याहि भागीं चाललेलें कोणत्याहि प्रकारचें युद्ध याला परोक्ष होणार नाहीं, तर प्रत्यक्ष दिसेल. याला मी दिव्यदृष्टि देत आहें. त्या दिव्यचक्षूनें युक्त झालेला हा संजय तुला युद्धाचा इत्थंभूत वृत्तान्त कथन करील. माझ्या या वरानें तो सर्वज्ञ होईल. प्रकट व अप्रकट, दिवसा किंवा रात्रीं घडलेलें सर्व वृत्त, फार काय पण वीरांनीं मनांत चिंतिलेलेंहि सर्व हा जाणील. या गावल्गणीला शस्त्रें तोडणार नाहींत. याला श्रमाची बाधा होणार नाहीं. हा साधु संजय माझ्या प्रसादानें या युद्धांतून जिवंत परत येईल. मी या कौरवांची व सर्व पांडवांची कीर्ति सर्व लोकांत प्रसिद्ध करीन. राजा, तूं शोक करूं नको. हे पुरुषश्रेष्ठा, सर्व क्षत्रियांचा नाश होणार, हें भवितव्य निश्चित आहे. यास्तव तूं शोक करूं नको. याचें नियमन करतां येणें शक्य नाहीं. कारण जिकडे धर्म तिकडेच जय रहातो.

**वैशंपायन**—जनमेजया, तो कौरवांचा प्रपितामह भगवान् व्यास धृतराष्ट्रास असें बोलून तो महात्मा पुनः म्हणाला—हे महाराज, या युद्धांत फार मोठा प्राणिक्षय होईल. कारण मला यावेळीं तशींच भयंकर दुश्चिह्नें दिसत आहेत. बकासह श्येन, गृध्र, काक व कंकपक्षी पर्वतांच्या व वृक्षांच्या शिखरांवर येऊन बसत आहेत व त्या ठिकाणीं ते आपला समूह करीत आहेत. पक्ष्यांना अतिशय आनंद झाला आहे. कारण हें घोर युद्ध आपल्या डोळ्यांसमोर होणार, असें त्यांना वाटत आहे. क्रव्याद (कच्चें मांस खाणारे पशुपक्षी) हत्ती व घोडे यांचें मांस भक्षण करतील. ते या कुरुक्षेत्राच्या सभोंवार त्याची वाट पहात बसले आहेत.

पुढील भय सुचविणारे हे उग्र कंकपक्षी कर्कश शब्द करीत कौरवपांडवांच्या सैन्यांतून दक्षिणदिशेकडे धांवत आहेत. हे भारता, मी नित्य पूर्व व पश्चिम संध्यासमयीं म्ह०सूर्याचा उदय व अस्त यावेळीं सूर्याला कबंधांनीं परिवेष्टित झालेला पहातों. संधिसमयीं सूर्याला परिघमंडलें परिवेष्टित करितात. ते परिघ तीन वर्णांनीं युक्त असतात. मध्यभागीं कृष्ण, बाहेर श्वेत व त्याच्याहि बाहेर त्याचा लोहित वर्ण असतो आणि त्यावेळीं विजाहि चमकत असतात. चंद्र, सूर्य व नक्षत्रें अहोरात्र एकसारखीं प्रकाशतात. क्षयतिथीचा सतत योग असून अमावास्येचा सूर्येंदुसंगम पापग्रहांनीं युक्त असलेला दिसतो. खरोखर

हीं सर्व भयसूचक चिह्नें आहेत. कार्तिकी पौर्णिमेचा चंद्र किती आह्लादकारक असावयाचा ! पण गेल्या पौर्णिमेस तो रक्तवर्ण आकाशांत अग्नीसारखा तांबडा लाल दिसत होता. यावरून ज्यांचे बाहू परिघासारखे आहेत, असे शूर राजे व राजपुत्र परस्परांच्या हातून मरण पावतील व भूमीवर शयन करतील, हें उघड दिसत आहे.

अंतरिक्षांत वराह व मार्जार यांचा कलह होत असलेला रोज रात्रीं ऐकूं येतो. त्यांच्या कलहाचा तो भयंकर शब्द ऐकून अंगावर रोमांच उभे रहातात. देवतांच्या प्रतिमा थरथरां कांपूं लागतात, मध्येंच हंसतात, तोंडानें रक्त ओकितात, घामानें डबडबतात व अकस्मात् भूमीवर पडतात.

राजा, कोणीं न वाजवितांच दुंदुभि वाजूं लागतात, घोडे जोडलेले नसतांच क्षत्रियांचे महारथ धांवूं लागतात. कोकिल, सुतार, चाष, कोंबडे, बदक, पोपट, सारस व मोर हे पक्षी कर्कश व भयप्रद शब्द करितात. गोमाशा जणुकाय शस्त्रग्रहण करूनच घोड्यांच्या मागें लागतात व त्यांना दंश करितात. अरुणोदयसमयीं वीर शस्त्रास्त्रसंपन्न होऊन अश्वावर आरूढ होतात व मोठमोठ्यानें आक्रोश करूं लागतात.

हे राजा, दोन्ही संध्यासमयीं दोन्ही दिशा प्रदीप्त झालेल्या दिसतात. पर्जन्य धूलि व मांस यांची वृष्टि करितो. अरुणोदयाच्या वेळीं टोळांचे समूह अंतरिक्षाला झांकून टाकितात. धृतराष्ट्रा, त्रिभुवनांत प्रसिद्ध व साधूंना संमत असलेली ही सप्तर्षि मंडलांतील अरुंधति वसिष्ठाला मागें टाकून पुढें गेलेली दिसते. हे राजा, शनैश्चर रोहिणीला पीडा देऊं लागला आहे. चंद्राचें स्वाभाविक चिह्न त्याच्यापासून व्यावृत्त झालें आहे, हल्लीं तें चंद्रामध्यें दिसत नाहीं. त्यावरून कुरुकुलावर महद्भय ओढवणार, असें स्पष्ट दिसतें. अंतरिक्षांत अभ्रें नसतांनाच मेघांची घोर गर्जना होत आहे. रोदन करणाऱ्या वाहनांचे अश्रुबिंदु भूमीवर टप् टप् पडत असलेले दिसतात. ६. १. २.

---

## अध्याय ३ रा.

[ १. पराजयसूचक दुश्चिन्हें व व्यासाचा उपदेश. २ तो ऐकून धृतराष्ट्राचें उत्तर, व्यासांचें पुनः हितवचन. ३ जयसूचक सुचिन्हें. ]

( १ ) **व्यास**—राजा धृतराष्ट्रा, मी तुला अगोदर पराजयसूचक चिह्नें सांगतों. हल्लीं तुमच्या पक्षांत तींच अधिक दिसत आहेत. गायींच्या ठिकाणीं

गर्दभ उत्पन्न होतात. पुत्र मातांशीं रत होत आहेत, वनांतील वृक्ष ऋतु नसतांनाच फल-पुष्पयुक्त झाले आहेत, वंध्या स्त्रिया गर्भ धारण करून भयंकर प्रजा प्रसवत आहेत. क्रव्यादादि मांसभक्षक पशु व पक्षी अविरोधानें एकत्र मांसभक्षण करीत आहेत. तीन शिंगें, चार डोळे, पांच पाय, दोन इंद्रियें, दोन मस्तकें, दोन पुच्छें व विकराल दाढा यांनीं युक्त असे पशु उत्पन्न होत आहेत. ते आपलीं भयंकर मुखें उघडून भयंकर शब्द करीत आहेत. तीन पायांचे मोर, चार दाढा आणि शिंगें यांनीं युक्त असे गरुडपक्षी व तसेच विचित्र प्राणी यांना ब्रह्मवादी ब्राह्मणांच्या स्त्रिया जन्म देत आहेत. घोडीला गोवत्स, कुत्रीला कोल्हे, करभाला कुत्रीं होत आहेत. पोपट अशुभ भाषण करूं लागले आहेत. कांहीं ठिकाणीं स्त्रियांना एकाच वेळीं चार-चार, पांच-पांच कन्या होत आहेत व त्या उत्पन्न होतांच नाचूं, गाऊं, हसूं लागतात. चांडालादि हीन जातींत उत्पन्न झालेले लंगडे, थोटे वगैरे शरीरावयवांनीं पंगु असलेले लोक पुढील महद्भय सूचवीत हंसत, गात व नाचत आहेत. ते सशस्त्र मूर्तींचीं चित्रें काढतात. लहान लहान मुलेंहि हातांत काठ्या घेऊन युद्धाच्या इच्छेनें एकमेकांवर धांवून जातात. तीं बालकें खेळांतील कृत्रिम नगरावर युद्धाच्या हौसेनें हल्ला करितात. मोठमोठ्या वृक्षांवर कुमुदें व लहान-मोठीं कमलें उत्पन्न होऊं लागलीं आहेत. भयंकर वावटळ सुटून सर्वत्र धूलि उडूं लागली आहे. उग्र वायूमुळें उडालेली धूलि केव्हांच शांत होत नाहीं. वारंवार भूकंप होत आहेत. राहु तुलाराशीस असलेल्या सूर्याला ग्रासूं पहात आहे. केतु चित्रा नक्षत्राचें अतिक्रमण करून गेला आहे. राहु व केतु हे उग्र ग्रह एका राशीला असल्यामुळें कौरवांचा नाश स्पष्ट दिसत आहे. महा घोर धूमकेतु पुष्य नक्षत्राचें आक्रमण करून राहिला आहे. त्यामुळें तो महाग्रह दोन्ही सैन्यांचा नाश करील. मंगळ वक्री होऊन मघांत व बृहस्पति श्रवणांत आला आहे. शनि पूर्वा-फाल्गुनीला पीडा देत आहे. शुक्र पूर्वाभाद्रपदांत चमकत असून तो आपल्या 'परिघ'-संज्ञक उपग्रहासह उत्तरा भाद्रपदांत जाण्याच्या मार्गांत आहे. धूमयुक्त अग्नीप्रमाणें दिसणारा दुसरा एक श्वेत ग्रह ' ज्येष्ठा '-नामक तेजस्वी नक्षत्राचें आक्रमण करीत आहे. दुष्ट ग्रह राहू चित्रा व स्वाति यांच्या मध्यें शिरून क्षुब्ध झाला आहे व तो वाममार्गानें जाऊन रोहिणीला पीडा देऊं लागला आहे. तो घोर ग्रह चंद्र व सूर्य या दोघांनाहि ग्रासण्याच्या बेतांत आहे. रक्तासारखा लाल दिसणारा मंगळ पुनः पुनः वक्री होऊन बृहस्पतीनें आक्रमिलेल्या श्रवण नक्ष-

ग्राला पूर्ण दृष्टीनें वेध करून राहिला आहे. एकाच वेळीं सर्व ऋतूंतील धान्यें पिकून पृथ्वी धान्यानें व्यापून गेली आहे. जवसांना पांच पांच कणसें आलीं असून साळीला तर शंभर शंभर लोंब्या लागल्या आहेत. ज्यांच्या दुधावर सर्व जगत् अवलंबून आहे, त्या धेनु वांसरांना सोडलें असतां दुधाच्या स्थानीं रक्ताचा स्राव करितात. धनुष्यांतून ज्वाला निघत आहेत. तलवारी प्रज्वलित होत आहेत. त्यावरून त्या शस्त्रांना हा उपस्थित झालेला संग्राम स्पष्ट कळला आहे, असें दिसतें. शस्त्रें, जल, कवचें व ध्वज यांची कांति अग्नीसारखी दिसत आहे. त्यामुळें त्या सर्वांचा महाक्षय होणार, यांत संशय नाहीं.

हे भारता, कौरवांसह पांडवांचा संग्राम सुरू झाला, म्हणजे पृथ्वीवर रक्ताच्या नद्या वहातील व त्या ध्वज याच क्षुद्र नौकांनीं व्याप्त होतील. पशु व पक्षी सर्व दिशांमध्यें तोंडें होरपळल्यामुळें ओरडत पळूं लागतील. ज्याला एक पंख, एक नेत्र व एकच पाय आहे, असा पक्षी रात्रीं आकाशांतून संचार करीत असतो व तो जणुकाय रक्त ओकीतच भयंकर शब्द करीत फिरतो. शस्त्रें आपोआप प्रदीप्त होतात. उत्कृष्ट सप्तर्षींची प्रभा लोपून जाते. वर्षभर एका राशींत राहणारे दोन्ही ग्रह शनि व बृहस्पति हे प्रज्वलित होऊन विशाखेच्या समीप स्थित आहेत. सूर्य व चंद्र अकालीं त्रयोदशीच्या दिवशीं राहूकडून ग्रासले जातात. पर्व नसतांनाच राहूच्या मुखांत पडणारे ते दोघे सूर्यचंद्र प्रजेचा क्षय इच्छित आहेत. धूलीचा वर्षाव होत असल्यामुळें सर्व दिशा शोभारहित झाल्या आहेत. भयंकर उत्पातमेघ रात्रीं रक्ताचा वर्षाव करीत असतात. राहु चित्रा नक्षत्रांत स्थित होऊन कृत्तिकेला पीडा देत आहे. धूमकेतूशीं संबद्ध असलेले महावायु वारंवार वाहूं लागले आहेत.

याप्रमाणें स्वाभाविक साम्यामध्यें स्थित न होतां विषम अवस्था उत्पन्न करणारे ते वायु प्रजेचें फार मोठें आक्रंदन सूचवीत आहेत. क्षत्रियांचे गजपति, अश्वपति व नरपति असे तीन वर्ग आहेत. त्यांतील प्रत्येकाला अनिष्ट असें एकेक नक्षत्र असून तें पापग्रहानें ग्रस्त झालें आहे. त्यामुळें लवकरच सर्व क्षत्रियांचा नाश होणार, यांत संशय नाहीं. गृध्रपक्षी त्या वीरांच्या मस्तकांवर येऊन बसतात व महद्भय सुचवितात. राजा, मीं आजपर्यंत प्रत्येक पंधरवडा चौदा, पंधरा, किंवा सोळा दिवसांचाहि पाहिला आहे. पण तेराव्या दिवशींच म्ह० त्रयोदशीला अमावास्या आलेली मीं कधीं पाहिली नव्हती.

चंद्र व सूर्य हे दोन्ही ग्रह तेराव्या दिवशींच राहूकडून ग्रासले गेलेले मी आतांच पहात आहें, त्यामुळें पर्वावांचून ग्रहण लागणें हा एक उत्पात असून त्यावरून ग्रस्त होणारे चंद्र व सूर्य प्रजेचा क्षय करतील. वद्य चतुर्दशीला मांसाची भयंकर वृष्टि झाली. राक्षसांनीं तोंड भरून रक्त प्राशन केलें, तरी त्यांची तृप्ति झाली नाहीं. महानद्या उलट वाहूं लागल्या. लहान लहान नद्यांतून जलाच्या स्थानीं रक्त वाहूं लागलें आहे. लहान लहान जलाशयांस फेंस आला आहे व ते कूपादि विविध जलाशय बैलासारखी गर्जना करीत आहेत. इंद्राच्या अशनीप्रमाणें प्रदीप्त झालेल्या उल्का मोठी गर्जना करून भूमीवर पडत आहेत. राजा, आजची एवढी रात्र उलटली कीं, उद्यांपासून तुमच्या अन्यायाचें फल तुम्हांला प्राप्त होऊं लागेल. चोहोंकडे अंधकार पसरल्यामुळें महर्षि हातांत मोठ-मोठ्या चुडी घेऊन बाहेर पडतात व एकमेकांस भेटून आतां लवकरच ही भूमि हजारों राजांचें रक्त प्राशन करील, असें बोलत असतात.

कैलास, मंदर, हिमालय इत्यादि पर्वत हजारों महाशब्द करीत आहेत. त्यामुळें त्यांचीं शिखरें मोठ्या वेगानें खालीं पडत आहेत. परस्पर पृथक् असलेले चार महासागर भूकंपाच्या वेगानें आपापल्या मर्यादा सोडून बाहेर उसळूं लागले आहेत व त्यामुळें सर्व प्रजा व पृथ्वी क्षुब्ध झाली आहे. क्षुद्र पाषाणांचा वर्षाव करणारे वायु ग्रामांतील जुनाट वृक्षांना मूळापासून उपटून पाडवीत आहेत. चैत्यवृक्ष छिन्नभिन्न होऊन घोर अशनींनीं समूल नष्ट होत आहेत. द्विजांनीं अग्नीमध्यें होम केला असतां अग्नीच्या निळ्या, तांबड्या व पिवळ्या रंगाच्या ज्वाला उद्भवत असून त्या अप्रदक्षिण फिरूं लागल्या आहेत. त्यापासून पवित्र सुगंध सुटावयाचा, पण त्या ऐवजीं सभोंवार दुष्ट गंध पसरत असतो व अग्नीमध्यें आहुतींचा प्रक्षेप केला असतां त्यांतून घोर शब्द उत्पन्न होतो. हे राजा, स्पर्श व गंध हे अगदीं विपरीत झाले आहेत. कांपणाऱ्या ध्वजांतून धूर निघत असतो. दुंदुभि व नगारे वाजूं लागले असतां त्यांतून ठिणग्या निघतात. फलपुष्पांनीं समृद्ध असलेल्या वृक्षांभोंवतीं कावळे डाव्या बाजूनें घिरट्या घालीत आहेत व कारणावांचून ' काव, काव ' असें ओरडत आहेत. सर्व पक्षी पक्का, पक्का, असा शब्द करीत असतात. त्याचा अर्थ ' ही सर्व प्रजा आतां पक्क होऊन मृत्यूच्या दारांत उभी आहे ' असा होतो. अश्व, हत्ती इत्यादि सर्व वहानें दीन झालेलीं दिसतात. या सर्व चिह्नांवरून पुढें फार मोठा क्षय होणार आहे, असें

स्पष्ट दिसतें. यास्तव ज्याप्रकारें सर्व प्रजेचा नाश होणार नाहीं, असें कांहीं प्राप्तकाल कर्तव्य तुला करतां आल्यास पहा.

( २ ) वैशंपायन—आपल्या पित्याचें हें वचन ऐकून धृतराष्ट्र म्हणाला— "हे मुने, या सर्व लोकांचें दैवच प्रतिकूल झालें आहे, असें मला वाटतें. या युद्धांत असंख्य लोकांचा क्षय होईल, यांत संशय नाहीं. पण हे वीर राजे, क्षत्रधर्मानें युद्ध करून संग्रामांत जर मरण पावले तर त्यांना केवल सुखाचीच प्राप्ति होईल. ते या महासंग्रामांत प्राणांचा त्याग करून या लोकीं कीर्ति मिळवितील व परलोकीं त्यांना दीर्घकाल महत्सुख प्राप्त होईल."

जनमेजया, धृतराष्ट्राचें हें वचन ऐकून व्यासमुनि 'ठीक आहे' असें बोलला व त्याच्याविषयीं कांहीं काल ध्यान करीत स्वस्थ बसला. कांहीं वेळ ध्यान करून तो पुनः त्याला म्हणाला—"हे पार्थिवेंद्रा, कालच प्रजेचा क्षय करितो व पुनः तिला उत्पन्न करितो. या सृष्टींत शाश्वत असें कांहीं नाहीं, हें खरें; पण तूं आपल्या ज्ञातीचे लोक, कुरु, संबंधी व सुहृद् यांना धर्म्यमार्ग दाखीव. त्यांचें निवारण करण्यास तूं समर्थ आहेस. आपल्या या ज्ञातीचा वध करणें, हें अतिशय क्षुद्र कार्य आहे. मला तें प्रिय नाहीं, यास्तव तूं तें करूं नको. हे राजा, कालच तुझ्या पुत्राच्या रूपानें उत्पन्न झाला आहे. वेदांमध्यें वध पूज्य मानलेला नाहीं. हिंसेला हितावह कोणीहि मानीत नाहीं. तूं कालाच्या प्रवाहानेंच अमार्गानें जाऊं लागला आहेस. हे राजा, तुजवर कोणतीच आपत्ति आलेली नसतांना तूं असा उन्मार्गगामी कां होतोस व या कुलाच्या आणि राजांच्या नाशाला कारण कां होतोस !

धृतराष्ट्रा, राज्यरूपानें तुजवर हा मोठा अनर्थच ओढवला आहे. तुझ्या धर्माचा लोप झाला आहे. अरे बाबा, तूं आपल्या पुत्रांना धर्म कोणता तें दाखीव. हे दुर्धर्ष राजा, ज्या राज्याच्या योगानें तूं अधर्माला प्राप्त होत आहेस, त्या राज्याचा तुला काय उपयोग ! त्यापेक्षां राज्याचा त्याग करून तूं आपला धर्म, यश व कीर्ति यांचें पालन कर, म्हणजे तुला स्वर्गाची प्राप्ति होईल. त्या पांडवांना राज्याची प्राप्ति होऊं दे आणि कौरव शांत होऊं देत."

जनमेजया, भगवान् व्यासाचें हें वचन धृतराष्ट्राला आवडलें नाहीं. त्यामुळें तो विप्रश्रेष्ठ असें बोलत असतांनाच अंबिकापुत्र धृतराष्ट्रानें त्याच्या वाक्याला मध्येंच प्रतिबंध करून म्हटलें—" मुने, आपण जसे ज्ञानी अहां, तसाच मीहि

विद्वान् आहें; आपल्या व शत्रूंच्या स्थितीचें व विनाशाचें तत्त्व मीहि जाणतों. माझ्या पुत्रांचा नाश होईल व पांडवांचा विजय होईल हेंहि मला ठाऊक आहे. परंतु हे तात, सर्व लोक स्वार्थासाठीं मोहित होत असतात व मीहि इतर लोकांसारखाच आहें, असें समजा. ज्यांचा प्रभाव अतुल आहे, अशा आपल्याला मी प्रसन्न करितों. आपणच आमची गति व आम्हांला सन्मार्गाचा उपदेश करणारे आहां. पण हे महर्षे, मी काय करूं! माझे पुत्र माझ्या अधीन नाहींत व मी धर्माचरण करण्यासहि समर्थ नाहीं. तूंच आमची धर्मप्रवृत्ति, यश, कीर्ति व वाक् आहेस. तूं कौरव व पांडव यांचा मान्य पितामहहि आहेस."

व्यास—हे विचित्रवीर्यपुत्रा, तुझ्या मनांत जो कांहीं संशय असेल तो तूं मला सांग. म्हणजे मी त्याचें निवारण करीन.

धृतराष्ट्र—हे भगवन्, संग्रामामध्यें ज्यांचा विजय व्हावयाचा असतो, त्यांच्या विजयाचीं सूचक चिह्नें कोणतीं होतात, तीं मला ऐकण्याची इच्छा आहे.

( ३ ) व्यास—हे धृतराष्ट्रा, स्थंडिलांतील अग्नि प्रसन्न कांतीनें युक्त असणें, त्यापासून धूम न निघणें, त्याच्या ज्वाला प्रदक्षिणावृत्ति व उंच निघणें, आहुतींचा पुण्यावह गंध सुटणें, हीं भावी विजयाचीं चिह्नें आहेत. ज्यांचा विजय व्हावयाचा असतो, त्यांचे शंख व मृदंग यांपासून गंभीर व फार मोठे ध्वनि निघतात. त्यांना सूर्य व चंद्र हे अतिशय शुद्ध किरणांनीं युक्त असलेले दिसतात. जे वीर युद्धासाठीं निघाले असतां त्यांच्या पाठीमागें कावळे 'काव काव' असा शब्द करीत त्यांना त्वरा करितात. त्यांच्या सिद्धीचें हें सूचक चिह्न आहे. पण याच्या उलट, जे निघाले असतां पुढून 'काव काव' असा शब्द करून त्यांच्या गमनाचा निषेध करितात, त्यांचा पराभव होतो.

राजहंस, शुक, क्रौंच, शतपत्र हे पक्षी जेव्हां शुभ शब्द करूं लागतात व संग्रामांतील सैनिकांना उजवी घालतात, तेव्हां त्यांचा विजय निश्चयानें होणार असें समजावें. ज्यांची सेना अलंकार, कवचें, ध्वज, सुखकर गर्जना, किंवा अश्वांचें खिंकाळणें, यांनीं शोभते व शत्रूंना दुष्प्रेक्ष्य होते, ते शत्रूंना जिंकतात. ज्या पक्षांतील योद्ध्यांचे शब्द हर्षानें युक्त असतात, ज्यांच्या कंठांतील पुष्पमाला सुकत नाहींत व धैर्य खचत नाहीं, ते रणोदधीला तरून जातात. ज्यानें

परसैन्यामध्यें प्रवेश केला असतां त्याला इष्ट शब्द ऐकूं येतात व प्रवेश करीत असतांना दक्षतायुक्त शब्द कानीं पडतात, ते विजयाख्य प्रयोजनाचा निश्चय करितात. याच्या उलट ज्यानें सैन्यांत प्रवेश केला असतां व प्रवेश करीत असतां अग्रभागीं 'युद्ध करूं नको, मरशील' अशा प्रकारचे निषेधवाचक शब्द ऐकूं येतात, त्याच्या पराभवाचें तें चिह्न आहे, असें जाणावें.

शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध हे पांची विषय अविकृत व शुभ असणें आणि योद्ध्यांचा सदा हर्ष, हें विजयाचें लक्षण आहे. अनुकूल वायु, अभ्रें, पक्षी, मेघ व इंद्रधनुष्य हीं सर्व विजयाचीं चिह्नें आहेत आणि प्रतिकूल वाय्वादिक हीं मुमुर्षूंचीं लक्षणें आहेत. हे राजा, सेना लहान असो किंवा मोठी असो, पण त्यांतील योद्ध्यांचा 'आम्ही जिंकूंच' असा निश्चय असतो व त्यांना युद्धाचा हर्ष होतो, हें एक जयलक्षण आहे. कारण सैन्यांतील एक जरी योद्धा भयभीत झाला तरी तो फार मोठ्या सैन्याच्या मनांत भय उत्पन्न करितो आणि सेना भीतीनें पराभूत झाली म्हणजे अतिशय शूर असलेले योद्धेहि पराभव पावतात.

हे राजा, जलाचा महावेग किंवा त्रस्त झालेले मृगगण यांना परतविणें जितकें कठिण आहे, तितकेंच किंबहुना त्यांहून अधिक पराभूत होऊन पळत असलेल्या महासैन्याला परतविणें कठिण आहे. अशा घोर प्रसंगीं महासेनेचें समाधान करणें अशक्य आहे. आपलें सैन्य पराभूत झालें, एवढ्याच कारणानें मोठ-मोठे शूरहि पराभूत होतात. भयभीत व पराभूत झालेल्या लोकांना पाहून इतरांचेंहि भय अधिक वाढतें.

हे राजा, पराभूत झालेली सेना एकाएकीं दशदिशांकडे पळूं लागते. मोठमोठ्या शूरांनाहि तिचें निवारण करून स्वस्थानीं स्थापितां येत नाहीं. यास्तव मेधावी राजानें फार मोठ्या चतुरंग सेनेचा सत्कार करून दक्षतेनें उपायपूर्वक विजयाचा यत्न करावा. शत्रूनें प्रार्थना करून किंवा दानानें तृप्त करून संपादन केलेला जो जय, तो लाभपूर्वक असल्यामुळें उत्तम होय. शत्रूमध्यें भेद उत्पन्न करून मिळविलेला जय मध्यम होय आणि हे राजा, युद्धानें मिळविलेला जय जघन्य होय. योद्ध्यांचा परस्पर संघर्ष हा महान् दोष आहे. त्यापासून परस्परांचा नाश होणें, हा पहिला अनर्थ ओढवतो. परस्परांचें बल जाणणारे, उत्साही, अनासक्त म्ह० स्त्री-पुत्रादिकांत आसक्ति न ठेवणारे असे

वीर आपल्या जयाविषयीं निश्चित असतात, प्रसंगीं पन्नास शूरहि फार मोठ्या सैन्याचें कर्दन करितात. फार काय पण प्राण गेला तरी युद्धापासून निवृत्त न होणारे पांच, सहा किंवा सात योद्धेहि जय मिळवितात. कारण विनतापुत्र गरुड पराक्रमाच्या वेळीं फार मोठ्या जनसमूहाची अपेक्षा करीत नाहीं. एका शूरालाहि फार मोठ्या सैन्याचा प्रतिकार किंवा नाश करतां येणें शक्य आहे, हें तो जाणतो.

हे राजा, तुझ्या पुत्राचें सैन्य अकरा अक्षौहिणी आहे, हें खरें. पण सर्वदा सैन्याच्या आधिक्यानेंच जय मिळत नसतो. संग्रामांतील जय अनिश्चित असतो. दैवाचें आनुकूल्य हाच विजयाचा परम आधार आहे. जे विजयी असतात, तेच संग्रामांत कृतकृत्य होतात. ६. १. ३.

---

## अध्याय ४ था.

[ १ कुरुक्षेत्र व युद्धार्थी राजे यांविषयीं धृतराष्ट्राचा प्रश्न. २ संजयानें केलेलें पृथ्वीचें वर्णन. ]

( १ ) वैशंपायन—राजा जनमेजया, धीमान् धृतराष्ट्राला याप्रमाणें हित-वचन सांगून व्यासमुनि निघून गेला व इकडे धृतराष्ट्र तें ऐकून त्याचेंच चिंतन करीत बसला. त्यानें मनांत घटकाभर विचार केला. पुनः पुनः दीर्घ निश्वास सोडिला व शुद्धचित्त संजयाला असा प्रश्न केला—

धृतराष्ट्र—हे संजया, हे सर्व युद्धाची आकांक्षा करणारे शूर महीपाल उच्च-नीच शस्त्रांनीं परस्परांवर प्रहार करीत आहेत. ते पार्थिव पृथ्वीला जिंकण्या-साठीं प्राणांवर उदार होऊन येथें जमले आहेत. ते शांत होत नाहींत, उलट यमलोकाची वृद्धीच करीत आहेत. पृथ्वीच्या ऐश्वर्याची इच्छा करणारे ते पर-स्परांस असह्य होत आहेत. हे संजया, ही भूमि बहुगुणांनीं युक्त असावी, असें मला वाटतें. यास्तव मला तिचें वर्णन करून सांग. त्याचप्रमाणें या कुरु-जांगलांत भिन्न भिन्न देशांतील जे कोट्यवधि किंबहुना असंख्य वीर जमले आहेत, त्यांचे देश व नगरें यांचें परिमाणहि तत्त्वतः ऐकण्याची माझी इच्छा आहे. हे सूता, अमित तेजस्वी व्यास विप्रर्षींच्या प्रभावानें तूं ज्ञानचक्षु व दिव्यबुद्धिरूपी प्रदीप यांनीं युक्त आहेस, तस्मात् मला हें सर्व सविस्तर कथन कर.

( २ ) धृतराष्ट्राचें हें वचन ऐकून संजय विनय प्रदर्शित करीत ' तुला उपदेश करण्याची वस्तुतः माझी योग्यता नाहीं. यास्तव राजा, भगवान् व्यासच तुला हा उपदेश करीत आहे, असें समज. ' हा आशय व्यक्त करण्यासाठीं म्हणाला—हे भरतश्रेष्ठा, तुला नमस्कार असो. मी तुला पृथ्वीचे सर्व गुण यथामति सांगतों. ते लक्षपूर्वक ऐक. राजा, दीपानें ज्याप्रमाणें अंधकाराचा नाश केला असतां घट दृष्टीं पडतो, त्याप्रमाणें धीवृत्तीनें अज्ञानतमाचा नाश झाला असतां चिदात्मरूप चक्षूनें सर्व प्रकाशित होतें. याच न्यायानें तूं जरी अंध असलास तरी ज्ञानचक्षूनें युक्त होऊन लक्ष देऊन ऐक.

हे राजा, या पृथ्वीतलावर चर–जंगम व स्थावर अशीं दोन प्रकारचीं भूतें आहेत. जंगम भूतांचीं पक्ष्यादि अण्डज, यूकादि स्वेदज व मनुष्य-पश्वादि जरायुज अशीं तीन उत्पत्तिस्थानें आहेत. सर्व जंगम प्राण्यांमध्यें जरायुज श्रेष्ठ आहेत. जरायुजांतील जे वरिष्ठ नानारूपधारी मानव आणि पशु, त्यांचे चौदा भेद आहेत. त्या चौदा भेदांमध्यें ज्यांच्यामध्यें यज्ञ प्रतिष्ठित आहे, असे त्रैवर्णिक मानव आणि गायी, अज इत्यादि पशु श्रेष्ठ आहेत. वर सांगितलेल्या या दोन प्रकारच्या जरायुजांतील ग्राम्य प्राण्यांत मनुष्य श्रेष्ठ व वनांतील प्राण्यांत सिंह वरिष्ठ आहे. हीं सर्व भूतें परस्परांवर उपजीविका करणारीं आहेत. स्थावरांतील उद्भिज्ज म्ह० भूमींतून उत्पन्न होणारे वृक्षादि पांच प्रकारचे आहेत. अश्वत्थादि वृक्ष, कुश-काशादि झुडपें, गुलाब, गुळवेलीसारख्या लता, केवल वर्षभरच जगणाऱ्या व भूमीवर पसरणाऱ्या भोंपळीसारख्या वल्लि, वेळू, ऊंस इत्यादि त्वकसार, या पांच तृणजाति सांगितल्या आहेत. हे वृक्ष नव्हेत. याप्रमाणें स्थावर व जंगम मिळून एकोणीस प्रकार आहेत. या सर्व सृष्ट वस्तूंना मूलभूत अशीं आकाशादि पंचमहाभूतें एकत्र केल्यानें त्या सर्वांची संख्या चोवीस होते. गायत्रीचींहि चोवीस अक्षरें असण्यांत हेंच रहस्य आहे. महाभूतें व प्राणी या दोहोंचाहि या चोवीस संख्येंत अंतर्भाव होतो. यास्तव कार्य-कारणात्मक ब्रह्मालाच गायत्री मानलें आहे. हे भरतश्रेष्ठा, जो मानव या सर्व गुणांनीं युक्त असलेल्या पवित्र गायत्रीला जाणतो, तो या लोकीं नाश पावत नाहीं.

हे नृपाला, सिंह, व्याघ्र, वराह, महिष, गज, आस्वलें आणि वानर हे सात वन्य पशु मानले आहेत आणि गाय, अज, मेंढी, मनुष्य, अश्व, खेचर व

गर्दभ या सात प्राण्यांना सज्जनांनीं गांवांतील पशु म्हटलें आहे. याप्रमाणें ग्राम व अरण्य यांत वास करणारे हे चौदा प्रकारचे पशु आहेत. ते सर्व भूमीवर उत्पन्न होतात व भूमीवरच नाश पावतात. तस्मात् भूमीच सर्व भूतांची प्रतिष्ठा आहे व तीच सनातन आहे. ज्याची ही पृथ्वी आहे, त्याचेंच हें सर्व स्थावर-जंगमासह जगत् आहे, अशी श्रुति आहे. यास्तव या भूमीच्या आधिपत्यासाठीं सर्व राजे परस्परांचा वध करीत असतात. ६. १. ४.

---

## अध्याय ५ वा.

[ १ पृथ्वीवरील नद्यादिकांच्या परिमाणाविषयीं धृतराष्ट्राचा प्रश्न. २ संजयानें केलेलें पंचमहाभूतांचें वर्णन. ३ सुदर्शनद्वीपाचें वर्णन. ]

**(१) धृतराष्ट्र—हे संजया, नद्या, पर्वत, भिन्न भिन्न देश व दुसरेहि जे पदार्थ भूमीचा आश्रय करून राहिले आहेत, त्यांचीं नांवें मला सांग. हे प्रमाणज्ञ सूता, पृथ्वीचें प्रमाण काय आहे, तेंहि मला कथन कर. तसेंच यालोकीं जीं प्रसिद्ध अरण्यें आहेत, त्यांचेंहि मला ज्ञान करून दे.**

---

१ 'पुरुषो ह वै नारायणोऽकामयतात्प्रतिष्ठेयं सर्वाणि भूतान्यहमेवेदं सर्वं स्यामिति स एतं पुरुषमेधं पञ्चरात्रयज्ञक्रतुमपश्यत्' अशी वाजसनेयक श्रुति आहे. तिच्यामध्यें 'नारायणाख्य' पुरुषानें मीं प्रतिष्ठित व्हावें, मींच हीं सर्व भूतें व्हावें, अशी कामना केली व तो स्वतःच या पुरुषमेधाला पंचरात्र क्रतु पहाता झाला, असें म्हटलें आहे. म्हणून ज्या सार्वभौम राजाला ही सर्व पृथ्वी प्राप्त होते, त्याला यज्ञद्वारा हें सर्व प्राप्त होतें. राजसूय यज्ञानें स्वाराज्यप्राप्ति व अश्वमेध यज्ञानें क्रममुक्ति मिळते.

२ आतां या पुढें भगवद्गीतोपदेश उपनिषद् सांगावयाचें आहे. त्याच्या अर्थज्ञानाचा अधिकार प्राप्त व्हावा, म्हणून श्रौत-स्मार्त कर्मांचें अनुष्ठेयत्व अन्य प्रकारें सांगून ज्यांना त्याचा अधिकार प्राप्त झाला आहे, म्ह० ज्यांना आत्मजिज्ञासा उत्पन्न झाली आहे, त्यांनाहि अति सूक्ष्म आत्मतत्त्वाचें ग्रहण करण्याची योग्यता प्राप्त व्हावी, म्हणून भगवानाच्या समग्र ब्रह्माण्डात्मक स्थूलरूपामध्यें चित्ताचा संयम करावा, असें सांगण्यासाठीं येथून पुढील आठ अध्यायांत भूवनकोशाचें वर्णन केलें आहे.

(२) संजय—हे महाराज, संक्षेपतः हीं पांच महाभूतें आहेत. पृथ्वीवर स्थित असलेलीं सर्व भूतें सम आहेत, असें विद्वान् सांगतात. आकाशादि सर्वांचें साक्षात् भगवान् हें उपादानकारण असल्यामुळें 'कुंडलकनक' न्यायानें ते सर्व भगवद्रूपच आहेत. पृथिव्यादि सर्व भूतें व पृथ्वीवर रहाणारे सर्व प्राणी, 'चैतन्य' या एका पदाचेच विकाररूप अर्थ आहेत, त्यामुळें तीं सर्व सम आहेत, विषम नाहींत. भूतांमध्यें जें विषमत्व भासतें, तें उपाधीच्या भेदामुळें भासतें. घट, कूप, इत्यादि उपाधींमध्यें असलेल्या आकाशाचा जसा स्वरूपभेद नाहीं, त्याप्रमाणेंच मशक, हत्ती इत्यादिकांच्या शरीरांत असलेल्या चैतन्यामध्येंहि स्वरूपतः विषमता नाहीं.

भूमि, आप, तेज, वायु व आकाश हीं पांच भूतें आकाशाच्या क्रमानें उत्तरोत्तर अधिक गुणांनीं युक्त आहेत. त्या सर्वांत भूमि प्रधान आहे. शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध हे भूमीचे गुण आहेत, असें तत्त्ववेत्त्या मुनींनीं सांगितलें आहे. हे राजन्, जलामध्यें चार गुण आहेत. त्यांत गंध हा गुण नाहीं. तेजामध्यें शब्द, स्पर्श व रूप असे तीन गुण रहातात. वायूमध्यें शब्द व स्पर्श हे दोन गुण व आकाशामध्यें केवल शब्द हा एकच गुण रहातो. पंचमहाभूतांमध्यें हे पांच गुण या क्रमानें रहातात व तेच सर्व लोकांमध्यें आहेत आणि सर्व भूतें या गुणांमध्येंच प्रतिष्ठित आहेत. म्ह० सर्व भूतें पंचमहाभूतात्मक आहेत व सर्व लोकांतील भोग्य वस्तु या पांच गुणांनीं युक्त आहेत. त्यामध्यें भोक्ते जीव प्रतिष्ठित असतात. ते चेतन भोक्ते देहेंद्रियादि भोग्य पदार्थांचे अधिष्ठाते होऊन शब्दादि भोग्यांचे भोग घेतात.

देहादि कार्यें वस्तुतः भोगाचीं उपकरणें आहेत, तथापि त्यांचा सुद्धां भोग्यामध्येंच अंतर्भाव होतो. त्यांना भोक्ता असें म्हणतां येत नाहीं. पण सुषुप्ति, मरण, मूर्च्छा व समाधि या कालीं भोक्ता व भोग्य यांचा जेव्हां समब्रह्मभाव सिद्ध होतो, तेव्हां ते परस्परांच्या ग्राह्य-ग्राहकभावाला प्राप्त होत नाहींत. व्यवहारदृष्ट्या भोक्ता व भोग्य हीं दोन्हीं जरी विद्यमान असलीं, तरी भोग्य भोक्त्यापाशीं जात नाहीं व भोक्ता नित्यज्ञानरूप जरी असला, तरी भोग्याचें ग्रहण करीत नाहीं. कारण भोगाचें आयतन, जें शरीरेंद्रियादि,

---

१ कुंडल म्ह० कानांतील एक सुवर्णालंकार. तो जरी आकारानें सुवर्णाहून भिन्न दिसत असला तरी सुवर्णमय असतो. यालाच 'कुंडलकनक'-न्याय म्हणतात.

त्याचा अभाव असतो. पण भोगप्रद कर्मांचा उद्भव झाला असतां जेव्हां तीं विषमभावास प्राप्त होतात; आपल्या स्वाभाविक साम्यापासून च्युत होतात, तेव्हां त्यांच्यामध्यें भोक्ते व भोग्य पदार्थ असा भेद उत्पन्न होतो आणि तीं आपल्या स्वरूपभूत देहांनीं भोग्याचें ग्रहण करितात आणि भोग्य विषय भोक्त्याच्या ठिकाणीं सूक्ष्म वासना उत्पन्न करितात.

हीं भूतें पृथिव्यादि क्रमानें नाश पावतात आणि आकाशादि क्रमानें उत्पन्न होतात. भूतांचा जो उत्पत्तिक्रम आहे, त्याच्या उलट त्यांचा नाशक्रम आहे. तीं सर्व अप्रमेय आहेत. कारण त्यांची इयत्ता निश्चित सांगतां येत नाहीं. भूतांचें हें जें अपरिमेयत्व तेंच त्यांचें ऐश्वर—ईश्वरसंबंधी रूप आहे.

त्याचें अपरिमेयत्व कसें म्हणून विचारशील तर सांगतों—सिद्ध ब्रह्माण्डाचा भेद करून जेथें जातात, तेथेंहि पांच भौक्तिक वासनामय व्यक्ति दिसतात. मनुष्य तर्कानें त्यांचीं परिमाणें निश्चित सांगतात. ते सूर्याची गति, देशभेद, दिनमानभेद, पादछायाभेद, इत्यादि चिह्नांवरून त्यांचीं प्रमाणें निश्चित करितात. या प्रमाणांप्रमाणेंच त्याच्या आकाराचीहि कल्पना करितात. कोणी भूम्यादि लोकांना कंदुकाकार मानतात, कोणी चौकोनी, त्रिकोनी, चक्राकार मानितात. तसाच त्याचा व्यास, परिघ, यांचीहि कल्पना करितात; पण वस्तुतः या सर्व कल्पनाच आहेत. म्हणून अचिंत्य भावाविषयीं कधीं कल्पना करूं नये. जे पदार्थ स्वभावतःच अचिंत्य असतात, ते केवल तर्कानें साधण्याचा यत्न करूं नये. प्रकृतीहून पर असणें हेंच अचिंत्यत्वाचें लक्षण आहे. हे राजा, आतां मी तुला सुदर्शनद्वीपाचें वर्णन सांगतों.

( ३ ) 'सुदर्शन'-नामक एक जंबूवृक्ष आहे. त्याच्या नांवानें चिह्नित असलेलें जें जंबूद्वीप त्यालाच 'सुदर्शन'-द्वीप असें म्हणतात. सर्व ब्रह्माण्ड हाच त्याचा अर्थ आहे. त्याचा आकार आणि परिमाण मी तुला सांगतों. तो ऐक, तो परमाणु मात्र आहे. म्ह० परिमाणतः तो दुर्लक्ष्य आहे. त्याला जर 'परिमंडल' असें म्हणावें तर तो कंदुकाकार आहे, असें त्याचें व्याख्यान करावें लागतें आणि हा भूलोक कंदुकाकार आहे, असें म्हटलें तर जे प्राणी कासवाच्या पाठीसारख्या कंदुकपृष्ठावर रहातात, त्यांचा बराच मोठा भाग जल, पशु, मनुष्य, इत्यादिकांच्या आश्रयाला योग्य आहे, असें म्हणावें लागतें. पण तसें मानिल्यास जे त्या कंदुकाकार भुवनकोशाच्या बाजूवर व खालीं रहातात, ते

स्वतः गुरुत्व या गुणांनीं युक्त असल्यामुळें खालीं पडतील. कारण त्यांना रहा-वयास कांहीं आश्रय नसतो, त्यामुळें तो सर्व भाग मनुष्य, पशु, जल इत्यादिकांनीं रहित होईल आणि त्यामुळें पशु, पक्षी, जल, मनुष्य इत्यादि पृथ्वीच्या आश्रयानें राहिले आहेत, अशी जी लोकदृष्टि आहे, तिच्याशीं विरोध येईल.

" अहोपण, पृथ्वीमध्यें अंतरिक्षांत स्थित होण्याची शक्ति आहे, असें दिगंबर जैनांवांचून सर्ववादी कल्पितात. त्याप्रमाणें आम्ही पृथ्वीमध्यें आकर्षणशक्ति आहे असें मानितों, त्यामुळें सर्व दिशांतील प्राणी पृथ्वी आपल्या पायांखालीं आहे व आकाश मस्तकावर आहे, असें समजतात." असें जर म्हणाल तर " लोकांच्या अनुभवाच्या विरुद्ध कल्पना करण्यापेक्षां या सृष्टीला सर्व प्राण्यांच्या अनुभवानें सिद्ध असलेलें स्वप्नादितुल्यत्व कां मानूं नये ?" ' स्वप्नादिकांप्रमाणें त्याचा बाध होत नाहीं, म्हणून तें खरें ' असें म्हणाल, तर ब्रह्मज्ञान होईपर्यंत त्याचा बाध होत नाहीं. म्हणजे अविवेकावस्थेंत तें खरें आहे, असें वाटतें. पण जागें होतांच जसा स्वप्नाचा बाध होतो, त्याप्रमाणें ब्रह्मज्ञान होतांच त्याचा बाध होतो. यास्तव या सुदर्शनद्वीपाचें परिमाण अचिंतनीय असून त्याचा आकारहि एखाद्या मोठ्या राष्ट्रासारखा आहे. तें सर्व प्राण्यांच्या अनुभवास येणाऱ्या महादेशासारखें आहे. त्यामुळें त्याचा आकार नदीजलानें आच्छादित, अभ्रासारख्या पर्वतांनीं व्याप्त, अनेकाकार नगरें व देश यांनीं युक्त, फल-पुष्पांनीं ओथंबलेल्या वृक्षांनीं सुशोभित, धन-धान्यांनीं संपन्न व क्षारसमुद्रांनीं परिवेष्टित आहे. ज्याप्रमाणें पुरुष आरशामध्यें आपलें मुख पहातो, त्याप्रमाणें अति सूक्ष्म असलेल्याहि या सुदर्शनद्वीपाला पुरुष चंद्राधिष्ठित मनामध्यें पहातो.

या ब्रह्माण्डाचें प्रमाण जर अतिशय मोठें असतें, तर एखाद्या पर्वताच्या गुहेंत एका कोपऱ्यांत बसलेला योगी आपल्या सूक्ष्म हृदयाकाशांत आरशांतील मुखाप्रमाणें त्याला कसा पाहूं शकला असता ! अतिशय अल्प प्रमाणानें युक्त असलेल्या मोहरी, खसखस इत्यादिकांत महाप्रमाणानें युक्त असलेल्या मेरु-पर्वतादिकांचा समावेश होऊं शकत नाहीं. त्याचप्रमाणें अतिसूक्ष्म हृदयाकाशांत महाप्रमाणानें युक्त असलेल्या प्रपंचाचा अंतर्भाव होणें शक्य नाहीं. यास्तव स्वप्नादिकांप्रमाणें प्रपंचाला अनिर्वचनीयत्व–मिथ्यात्व आहे, असेंच मानलें पाहिजे. त्या चंद्रमंडलाख्य मनामध्यें, त्याच्या एकदेशांत स्थूल-सूक्ष्मरूप संसाराख्य अश्वत्थ रहातो. अर्थात् हें सर्व मनोमात्र आहे व त्या मनाच्याच एकदेशांत परमात्मा वास करितो. तो मनाहूनहि वेगवान् असल्यामुळें त्याला

'शश '-ससा असें म्हटलें आहे. शश म्ह० उड्या मारीत वेगानें जाणारा. तो मनाला सर्वथा व्यापितो व सर्व ओषधींचें पोषण करितो. अर्थात् हा कार्य-कारणरूप प्रपंच, जीव व ईश्वर या तिहींची कल्पना या मनानेंच ब्रह्म या अधिष्ठानावर केलेली आहे.

आप म्ह० पंचभूतें व भूतांचीं कार्यें त्या पूर्वोक्त 'शश'संज्ञक ईश्वराहून भिन्न आहेत. सर्व कार्यांचा लय झाल्यावर अवशिष्ट रहाणारें जें कारण तेंहि कार्यांचें सूक्ष्मरूप आहे. म्हणून 'शश'संज्ञक परमात्मा त्याहून पृथक् आहे. आतां यापुढें मी त्याचेंच थोडक्यांत स्वरूप सांगतों तें ऐक. जीव ही वस्तु त्या चिद्धातूहून पृथक् नाहीं. व्यक्त व अव्यक्त अशा कार्य-कारणांहून पृथक् असलेलें जें शुद्ध ब्रह्म तोच हा प्रत्यगात्मा जीव आहे. त्या प्रत्यग्रूप परमेश्वराचाच मी आतां संक्षेपतः निर्देश करितों, तो ऐक. ६. १. ५.

---

## अध्याय ६ वा.

[ १ पृथ्वीवरील प्रमुख सात पर्वें व द्वीपें यांचें वर्णन. २ शशसंज्ञक पर-मात्म्याचें निरूपण. ]

( १ ) धृतराष्ट्र—हे बुद्धिमान् संजया, तूं यथाशास्त्र द्वीपाचें संक्षेपतः वर्णन केलेंस. तूं सर्वांचें तत्त्व जाणणारा आहेस. यास्तव त्याचा विस्तार मला सांग. तूं पूर्वीं पिप्पलसंज्ञक संसारवृक्ष व शशसंज्ञक परमात्मा यांचें स्वरूप सांगितलेंस, पण तें ऐकण्याचा माझा अधिकार नाहीं. यास्तव तूं मला अगोदर भगवानाचें स्थूलरूपच सांग. या शशलक्षण हृदयस्थ ब्रह्मामध्यें जो हा मायाकल्पित भूमीचा अवकाश दिसतो व व्यवहारदृष्ट्या जो सत्य असल्यासारखा भासतो त्याचें प्रमाण काय आहे, तें मला सांग.

संजय—राजा, तत्त्वज्ञ पुरुषानें प्रथम कारणाचेंच ज्ञान संपादन करावें, कारणवस्तूचें ज्ञान झालें, म्हणजे सर्वज्ञत्व प्राप्त होतें, हें वेदांत प्रसिद्ध आहे. तेव्हां तुला द्वीपाचें ज्ञान घेऊन काय करावयाचें ! कारण तें कार्यस्थानीं आहे.

धृतराष्ट्र—तूं मला अगोदर द्वीपाख्य कार्यच सांग, मग पिप्पलाख्य संसार व शशसंज्ञक परमात्मा, यांचें वर्णन मी ऐकेन. त्या कारणज्ञानाच्या पूर्वीं तूं मला त्याचें विस्ताररूप कार्यच सांग. मला ईश्वराची विभूति ऐकण्याचीच फार इच्छा आहे.

वैशंपायन—जनमेजया, राजानें असा विभूतिविस्तार सांगण्याविषयींच आग्रह केला असतां संजय असें म्हणाला—

(२) संजय—हे महाराज, हिमालय, हेमकूट, पर्वतश्रेष्ठ निषध, वैदूर्यरत्नमय नील, चंद्राप्रमाणें शुभ्रवर्ण असलेला श्वेतपर्वत व सर्व धातूंनीं चित्रित झालेला शृंगवान्, हे सहा वर्षपर्वत पूर्व-पश्चिम समुद्रांला स्पर्श करणारे असून ते पश्चिमेकडून पूर्वेकडे लांब पसरले आहेत. सिद्ध व चारण या पर्वतांचें सेवन करितात. या प्रत्येक पर्वतांतील अंतर अनेक योजनें विस्तीर्ण आहे. त्या पर्वतांच्या मध्यभागीं जे पवित्र देश आहेत त्यांना वर्ष ही संज्ञा आहे. हे राजा, त्या वर्षसंज्ञक पवित्र देशांत अनेक जातीचे प्राणी रहातात. आपलें हें भारतवर्ष आहे. त्याच्या सीमेवर हिमवान् पर्वत आहे. हेमकूटाच्या पलीकडे जो प्रदेश आहे, त्याला हरिवर्ष असें म्हणतात. नीलपर्वताच्या दक्षिणेस व निषधाच्या उत्तरेस 'माल्यवान्'-नांवाचा पर्वत पूर्व-पश्चिम पसरला आहे. त्याच्या पलीकडे गंधमादन पर्वत आहे. या दोन पर्वतांच्या मध्यभागीं वर्तुलाकार मेरु-संज्ञक सुवर्णपर्वत आहे. तो उदयकालीन सूर्याप्रमाणें किंवा धूमरहित अग्नीप्रमाणें शोभतो. तो चौऱ्यायशीं हजार योजनें उंच व खालीं भूमीमध्यें तितकींच योजनें खोल आहे. तो वर, खालीं व बाजूला असलेल्या सर्व लोकांस व्यापून रहातो. हे प्रभो, त्याच्या चार बाजूंस चार मोठीं द्वीपें स्थित आहेत. १ भद्राश्व, २ केतुमाल, ३ जम्बूद्वीप व ४ उत्तर कुरु, अशीं त्यांचीं नांवें आहेत. त्यांतील उत्तरकुरु हें द्वीप पुण्यजनांचें आश्रयस्थान आहे.

राजा, गरुडाचा सुमुख म्हणून एक प्रसिद्ध पुत्र आहे. त्या पक्ष्यानें मेरूवरील सुवर्णमय वायस पाहून आपल्या मनांत असा विचार केला कीं, ज्याअर्थीं हा मेरु आमच्यासारखे उत्तम, इतर मध्यम व वायसासारखे अधम अशा त्रिविध पक्ष्यांमध्यें कांहीं विशेष ठेवीत नाहीं, त्याअर्थीं मी त्याचा त्याग करितों.

हे महाराज, ज्योतींतील श्रेष्ठ आदित्य, चंद्रमा व नक्षत्रें यांच्यासह या मेरूला प्रदक्षिणा घालतो, त्याचप्रमाणें वायुहि त्याच्या भोंवतीं फिरत असतो. तो पर्वत दिव्य पुष्पें व फळें यांनीं युक्त असून सुवर्णांनीं अलंकृत केलेल्या भुवनांनीं व्याप्त आहे. त्या शैलावर सर्व देवगण व गंधर्व, असुर, राक्षस, अप्सरा व नाग यांच्या गणांसह सर्वदा क्रीडा करीत असतात. तेथें ब्रह्मा,

रुद्र आणि सुरेश्वर इंद्रहि एकत्र जमून अनेक दक्षिणायुक्त विविध यज्ञयाग करितात. नारद, तुम्बुरु, विश्वावसु, हाहा, हुहूः हे सर्व तेथें जमून देव-श्रेष्ठांची विविध स्तवनांनीं स्तुति करितात. हे राजा, तुझें कल्याण असो. महात्मे सप्तर्षि व प्रजापति कश्यप तेथें प्रत्येक पर्वकालीं जात असतात.

त्याच पर्वताच्या शिखरावर दैत्यांचा गुरु कविश्रेष्ठ शुक्र आनंदानें रहात असतो. हीं सर्व रत्नें आणि हे रत्नपर्वत त्याचेच आहेत. त्या शुक्रापासूनच भगवान् कुबेर संपत्तीचा एक चतुर्थांश भाग ग्रहण करितो आणि त्या धनाच्या षोडशभागाचाहि लेश मनुष्यांना प्राप्त होतो. त्या पर्वताच्या उत्तर बाजूला दिव्य कर्णिकारवन आहे. तें रम्य वन सर्व ऋतूंतील फुलांनीं युक्त असून पर्व-ताच्या शिलांमध्यें उद्भवलें आहे.

त्या पवित्र स्थलीं भूतभावन भगवान् पशुपति दिव्यभूतांनीं परिवेष्टित होऊन उमेसह क्रीडा करीत असतो. त्याच्या गळ्यांत कर्णिकार पुष्पांची पायापर्यंत रुळणारी माला शोभत असते. त्याचे तीन नेत्र जणुकाय उदय पावलेल्या तीन सूर्यांप्रमाणें प्रकाशतात. त्या महेश्वराला उग्रतप आचरणारे, सत्यवादी, सुव्रत सिद्धच पाहूं शकतात. इतर दुराचरणी जनांस त्याचें दर्शन घडणें शक्य नाहीं.

हे राजन्, जिचा प्रचंड निर्घोष होत असतो, ती विश्वरूपी परिमित भागी-रथी मोठ्या वेगानें 'चंद्रमस्'-नांवाच्या पवित्र डोहांतून वहात असते. पुण्यवान् लोक त्या शुभ गंगेचें अर्चन करितात. जिचा प्रवाह दुधाच्या धारेसारखा शुभ्र आहे, अशा गंगेच्या प्रचंड प्रपातानें मेरुपर्वतावर सागरासारखा एक विस्तीर्ण व पवित्र डोह निर्माण झाला आहे. अशा त्या पर्वतांसहि दुर्धर असलेल्या गंगेला पिनाकपाणि शंकर आपल्या मस्तकावर सहस्रावधि वर्षें धारण करीत आहे.

हे नृपते, मेरूच्या पश्चिमेला आणि केतुमालाच्या बाजूला जम्बूखंड आहे. तेथील लोकांचें आयुष्य दहा हजार वर्षें असतें. तेथील पुरुषाची कांति तप्त सुवर्णासारखी असून स्त्रिया अप्सरोपम असतात. त्या प्रदेशांतील मानव अना-मय, शोकरहित व नित्य प्रसन्नचित्त असतात.

गंधमादनाच्या शिखरावर राक्षस आणि अप्सरांचा संघ यांनीं परिवेष्टित असलेला गुह्यकाधिप कुबेर रममाण होतो. गंधमादनाच्या बाजूला त्याचेच अवयवभूत असे लहान लहान पर्वत—टेकड्या आहेत. तेथील लोकांचें आयुष्य

अकरा हजार वर्षें आहे. तेथील लोक अतिशय हृष्ट, तेजस्वी व महाबलाढ्य असतात. सर्व स्त्रिया प्रसन्नवदन असून त्यांची कांति नीलकमलासारखी असते.

नीलपर्वताच्या पुढें श्वेतपर्वत आहे, श्वेताच्या पुढें श्रेष्ठ हिमवान् आहे. म्हणजे हिमवान्पर्वताच्या दक्षिणेला भारतवर्ष, त्याच्या उत्तरेला हैमवतवर्ष, हेमकूटाच्या उत्तरेला हरिवर्ष आणि निषधाच्या उत्तरेला, नीलाच्या दक्षिणेला व मेरूच्या समंततः 'इलावृत्त-' नामक चवथें ' वर्ष ' आहे. पुढें नीलपर्वताच्या उत्तरेला 'श्वेत'-नामक पांचवें वर्ष आहे. श्वेतपर्वताच्या उत्तरेला 'हैरण्यक'-नांवाचें सहावें वर्ष आहे. त्याच्या पुढें शृंगवान् पर्वताजवळ ' ऐरावत-' नांवाचें सातवें वर्ष आहे. धनुष्याचीं दोन टोकें एकत्र आणलीं असतां त्याच्यामध्यें एक किंचित् त्रिकोण साधत असतो. अशाच आकाराचीं दक्षिणेला भारतवर्ष व उत्तरेला ऐरावत असून या दोहोंच्यामध्यें पांच प्रदेश आहेत. याप्रमाणें ही सात वर्षांची रचना आहे. यांतील प्रत्येक वर्ष जसें उत्तरोत्तर उच्च आहे, तसें त्यांचें आयुःप्रमाण, आरोग्य आणि धर्मतः, कामतः व अर्थतः उत्कर्ष क्रमानें अधिक अधिक आहे. या सातहि देशांत भिन्न भिन्न जातीचे प्राणी आपापले संघ करून रहातात.

हे महाराज, याप्रमाणें ही पृथ्वी पर्वतांनीं व्यापिली आहे. हेमकूट हा फार मोठा पर्वत आहे. त्यालाच कैलास असेंहि म्हणतात. या पर्वतावर कुबेर गुह्यकांसह रहातो. या कैलासाच्या उत्तरेला मैनाकपर्वत आहे आणि मैनाकाच्या उत्तरेला ' हिरण्यशृंग '-नांवाचा रत्नजडित दिव्य पर्वत आहे. या दोहोंच्या मध्यभागीं बिन्दुसरोवर आहे. हें दिव्य व शुभ्र सरोवर सुवर्णाच्या वालुकेनें युक्त आहे.

हे प्रभो, याच रम्य बिंदुसरोवरावर राजा भगीरथानें भागीरथीला पाहून अनेक वर्षें वास केला. तेथें रत्नजडित यूप आणि सुवर्णमय चैत्य आहेत. त्याच पवित्र स्थलीं यज्ञ करून महायशस्वी सहस्त्राक्ष इंद्र सिद्धीला प्राप्त झाला. याच ठिकाणीं भूतगणांनीं परिवेष्टित असलेला भूतभावन सनातन रुद्र भूतांकडून उपासना केला जातो. त्याचप्रमाणें नर-नारायण, ब्रह्मा, मनु आणि पांचवा स्थाणु म्ह० रुद्र यांचीहि सर्व लोक उपासना करितात. ब्रह्मलोकांतून च्युत झालेली दिव्य गंगा प्रथम याच ठिकाणीं प्रतिष्ठित झाली व येथून ती वस्वौकसारा, नलिनी, पवित्र सरस्वती, जम्बूनदी, सीता, गंगा, आणि सातवी सिंधु अशा सातप्रकारें विभागली. परम कृपाळु ईश्वरानेंच लोकोपकारार्थ या

सात नद्यांचा विभाग केला आहे. युगान्तानंतर सृष्टीच्या आरंभीं देव व ऋषि यांनीं जें सत्र केलें, त्यांतील कांहीं ठिकाणीं सरस्वती दृश्य होती व कांहीं ठिकाणीं अदृश्य होती. या सातहि दिव्य गंगा त्रिभुवनांत प्रसिद्ध आहेत.

हिमवानावर राक्षस, हेमकूटावर गुह्यक आणि निषधावर सर्प व नाग रहातात. तेथेंच 'गोकर्ण'-नामक तपोवन आहे. श्वेतपर्वतावर देव आणि असुर यांचें वास्तव्य असतें. निषधावर गंधर्व सर्वदा निवास करितात. नीलपर्वतावर ब्रह्मर्षि रहातात. शृंगवान् पर्वत हा देवांचें विहारस्थान आहे.

याप्रमाणें मीं तुला सात वर्षांचे विभाग सांगितले. या सातहि वर्षांत स्थावर व जंगम भूतें रहातात. या भूतांमध्यें अनेक प्रकारची दैवी व मानुषी समृद्धि असलेली दिसून येते. तिची गणना करणें अशक्य आहे. श्रेयः-प्राप्तीची इच्छा करणारे लोक प्रथम अदृष्ट अर्थावर श्रद्धा ठेवून त्याच्या प्राप्ती-साठीं विहित असलेलीं कर्में करितात. अश्रद्धावान् करीत नाहींत.

( २ ) हे राजा, तूं मला ज्या दिव्य शशाकृतीविषयीं विचारलेंस, त्याचें उत्तर सांगतों ऐक. शशाच्या दक्षिण आणि उत्तर या दोन बाजूंस दोन वर्षें सांगितलीं आहेत. नागद्वीप आणि काश्यपद्वीप हे दोन प्रदेश जणुकाय त्या शशाच्या

१ (शश) शब्दाचा अध्यात्मिक अर्थ असा आहे—खाल्लेल्या अन्नादिकांचें संग्रह-स्थान जशा दोन कुशी असतात, त्याप्रमाणें कर्मसंचयाचें स्थान असें हें भारतवर्ष परमेश्वराची दक्षिण कुक्षी आहे आणि योगसंचयस्थान ऐरावत वर्ष हें त्याच्या उत्तर कुक्षीच्या स्थानीं आहे, असें जाणावें. त्या स्थानीं ब्रह्मलोकापासून च्युत झालेले योगभ्रष्ट उत्पन्न होतात. त्यांनाच विदेह प्रकृतिलय ही संज्ञा आहे. ते पूर्वसंस्कारानें पुनः योगाचा अभ्यास करितात. पण भारतवर्ष हें स्थान कर्म व योग या दोहोंच्याहि अनुष्ठानाला योग्य आहे. म्हणून त्याला परमेश्वराची दक्षिण कुक्षी असें म्हटलें आहे आणि दक्षिण कुक्षी या निर्देशानें त्याचें पूज्यत्वहि सुच-विलें आहे. ज्याप्रमाणें लौकिक शशाच्या शरीरामध्यें त्याचे कान हें उच्च स्थान आहे, त्याप्रमाणें परमेश्वराच्या शरीरांत नागद्वीप व काश्यपद्वीप हीं क्रमानें दक्षिण व उत्तर उच्चस्थानें आहेत. सत्यलोक आर्चिरादि मार्गानें प्राप्त होणारा आहे. तो योग्यालाच मिळतो. धूमादि मार्गानें देवलोकाची प्राप्ति होते. तो कर्म या उपायानें साध्य होतो. याप्रमाणें 'शश'-संज्ञक परमेश्वराच्या शरीरांत सर्व ब्रह्माण्ड समा-विष्ट आहे. म्हणून त्याच्या अवयवांच्या ठिकाणीं सर्व विश्वाची कल्पना करावी.

कर्णस्थानीं आहेत, ज्यावर ताम्रपत्रासारख्या तांबड्या शिला आहेत असा हा रम्य मलयपर्वत या शशाकृति द्वीपाच्या दुसऱ्या अर्धांत दिसतो.६. १. ६

---

## अध्याय ७ वा

[ १ संजयानें केलेलें उत्तरकुरूंचें वर्णन. २ जंबूद्वीपाचें व माल्यवान् पर्वताचें वर्णन. ]

संजयानें असें सांगितलें असतां चित्तदोषामुळें ध्यानमार्गाचे अनधिकारी असलेले मानव स्वर्गच्युत होऊन कोणत्या कर्मप्राप्त स्थानास प्राप्त होतात हें जाणण्याच्या इच्छेनें धृतराष्ट्र म्हणाला—हे संजया, मेरूचा उत्तरभाग, पूर्वभाग व मागली बाजू यांचें व त्याचप्रमाणें माल्यवान्पर्वताचेंहि मला सविस्तर वर्णन सांग.

( १ ) संजय—हे राजन्, नीलपर्वताच्या दक्षिणेस व मेरूच्या पाठीमागें सिद्धांनीं सेवन केलेला पुण्यप्रद उत्तरकुरु आहे. येथें नित्य पुष्पफलांनीं युक्त व स्वादुफल देणारे वृक्ष आहेत. त्या वृक्षाचीं फळें रसाळ व फुलें सुगंधयुक्त असतात. हे जनाधिपा, तेथें कांहीं वृक्ष सर्व कामना पूर्ण करणारे आहेत. दुसरे कित्येक 'क्षीरिण-'नांवाचे वृक्ष आहेत. ते वृक्ष अमृतासारख्या क्षीराचा व षड्सांचा सर्वदा स्राव करितात. त्यांच्या फलापासून वस्त्रें व आभरणें प्राप्त

---

१ याप्रमाणें 'शश'संज्ञक परमात्म्याचें हें मायिक बाह्यरूप सांगितलें. आतां येथें त्याच्या वासनांपासून उत्पन्न झालेलें दुसरें आन्तररूप सांगितलें आहे. रजोगुण रंजनात्मक असल्यामुळें लाल आहे, म्हणून त्याला ताम्र म्हटलें आहे. मन रजोगुणप्रधान असल्यामुळें तेंहि ताम्रच. वस्त्र, अन्न, पान, फल, पुष्प, हीं 'पर्ण-'शब्दानें उपलक्षित होतात व तेथील प्रासादादि 'शिला-'शब्दानें उपलक्षित होतात. जेथें हा ताम्रपर्ण व ताम्रशिला यांनीं युक्त असलेला श्रीमान् मलयपर्वत आहे, तो शशस्वरूप परमात्म्याचा भाग पूर्वोक्त बाह्य व मायिक स्वरूपाहून श्रेष्ठ आहे. कारण तो वासनामय आहे. उपनिषदांतहि ब्रह्माचीं स्थूल व सूक्ष्म अशीं दोन रूपें वर्णिलीं आहेत व तींच येथें चिंतन करण्यास योग्य म्हणून संजयानें धृतराष्ट्राला सांगितलीं आहेत. परमेश्वराच्या या दोन्ही स्वरूपांचें चिंतन करावें, असा संजयाचा या कथनांतील आशय आहे.

होतात. तेथील भूमि रत्नजडीत असून सुवर्णाची सूक्ष्म वालुका सर्व ऋतूंमध्यें सुखस्पर्श देणारी व पङ्करहित असते. त्याचप्रमाणें मनोरम व शुभ पुष्करणींचा स्पर्शहि सुखप्रद असतो.

हे राजा, देवलोकांतून च्युत झालेले सर्व मानव येथें उत्पन्न होतात. ते सर्वहि विष्णुभक्तांची संगति करणारे व प्रियदर्शन असतात. येथील स्त्रिया अप्सरांसारख्या सुंदर असतात. या ठिकाणीं स्त्री-पुरुषांचें दाम्पत्य एकाच वेळीं उत्पन्न होतें. तें क्षीरिण वृक्षाचें अमृततुल्य क्षीर प्राशन करितें व एकाच कालीं उत्पन्न झालेल्या त्यांची वाढहि एकसारखीच होत असते. त्याच रूप, गुण व वेष समान असून तें चक्रवाक् पक्ष्याप्रमाणें परस्परांस अनुरूप असतें. हे विभो, तेथील सर्व लोक निरामय व नित्य प्रसन्नचित्त असतात. त्यांचें आयुष्य हजारों वर्षांचें असून तें दांपत्य परस्परांचा कदापि त्याग करीत नाहींत. तर तीं एकाचवेळीं देहत्याग करितात. हे महाराज, तेथें 'भारुण्ड' नामक तीक्ष्ण चोंचीचे महा बलाढ्य पक्षी राहतात. ते मृतांचे देह वाहून नेतात व खोल दरींत टाकून देतात. याप्रमाणें उत्तरकुरूंचें मीं सविस्तर वर्णन केलें. आतां मेरूपर्वताच्या पूर्व व पश्चिम बाजूंचें वंणन करितों, तें ऐक.

हे विशांपते, जेथें भद्रसालवन आणि कालाम्राचा महावृक्ष आहे व जेथें भद्राश्वाला मूर्धाभिषेक झाला, तो शुभ कालाम्र नित्य पुष्प-फलांनीं युक्त असतो. तो वृक्ष एक योजन विस्तीण असून सिद्ध-चारण त्याचें सेवन करीत असतात. तेथील पुरुष श्वेतवर्ण, तेजस्वी व महाबलाढ्य असतात. स्त्रियांचा वण कुमुदासारखा असून त्या प्रियदर्शन असतात. ज्यांची प्रभा व वर्ण हीं दोन्ही चंद्राच्या प्रभेसारखीं, मुखें पूर्ण चंद्रासारखीं आह्लादकारक व गात्रें देखील चंद्रासारखीं शीतल आहेत, अशा नृत्य-गीत-विशारद सुंदर स्त्रिया तेथें रहातात. त्यांचें आयुष्य दहा हजार वर्षांचें असतें. कालाम्रवृक्षाचा रस प्राशन करणाऱ्या त्या युवती नित्य यौवनसंपन्न असतात.

(२) हे भरतश्रेष्ठा, नीलपर्वताच्या दक्षिणेला व निषधाच्या उत्तरेला सुदर्शन नांवाचा एक महाजम्बूवृक्ष आहे. तो पुण्यप्रद सनातन वृक्ष सर्व कामना पूर्ण करणारा आहे. सिद्धचारणांनीं सेवन केलेल्या त्या वृक्षाच्या नांवावरूनच हें सनातन जम्बूद्वीप प्रसिद्ध झालें आहे. स्वर्गाला स्पर्श करणाऱ्या त्या वृक्षाची उंची पंचावन योजनें उंच आहे व व्यास ( घेर ) अडीच हजार हात आहे.

त्या वृक्षाचीं फळें रसाळ व काकडीप्रमाणें पक्कदशेंत फुटणारीं असतात. तीं फळें परिपक्क होऊन जेव्हां भूमीवर पडतात, तेव्हां फार मोठा ध्वनि होतो. आणि त्यांतून रजतासारखा शुभ्ररस वाहूं लागतो. या जम्बूफलांतून वहाणाऱ्या रसाची नदी बनते व ती मेरूपर्वताला प्रदक्षिणा घालून उत्तरकुरूंमध्यें प्रवेश करिते. हे राजन्, तेथें रहाणाऱ्या लोकांना मनःशांति प्राप्त होते, पिपासा नष्ट होते आणि त्या फलाच्या रसाचें प्राशन केलें असतां जरा बाधत नाहीं. त्या रसाचेंच जम्बूनद नांवाचें सुवर्ण बनतें. तें देवांचें भूषण असून इंद्रगोपकीटकाप्रमाणें तांबुस वर्णाचें व चकचकीत असतें. तेथील मानव तरुण आदित्याच्या वर्णाचे असतात. त्याचप्रमाणें माल्यवान् पर्वताच्या शिखरावर कालाग्नीसारखा 'संवर्तक'-नामक अग्नि सर्वदा असतो. अकरा हजार योजनें विस्तीर्ण असलेल्या या माल्यवान् पर्वताच्या शृंगावर अनेक लहान लहान टेकड्या आहेत. तेथें कांचनासारख्या वर्णाचे मानव उत्पन्न होतात.

जे मानव इहलोकींच्या कर्मानें ब्रह्मलोकीं जातात, ते तेथून च्युत झाल्यावर माल्यवान् पर्वतावर जन्म पावतात आणि ऊर्ध्वरेते होऊन भूतांच्या रक्षणार्थ तीव्र तप आचरितात व शेवटीं आदित्याच्या सामीप्याला प्राप्त होतात. सहासष्ट हजार मानव आदित्याचें आक्रमण करून अरुणाच्या अग्रभागीं येतात. तेथेंहि तेवढींच वर्षें राहून विराट् पुरुषाची दीर्घकाल उपासना केल्यावर मनाची अधिष्ठात्री देवता जी 'चंद्रमा' तिच्यामध्यें प्रवेश करितात. ( म्हणजे सूत्रात्मभावाला प्राप्त होतात. ) ६. १. ७.

---

## अध्याय ८ वा.

[ १ पर्वत, तेथील प्रदेश व पर्वतवासी लोक यांचीं नांवें व वर्णन. ]

( १ ) धृतराष्ट्र—संजया, पर्वतांचीं नांवें, तेथील प्रदेश व पर्वतवासी जन यांचें मला सविस्तर वर्णन सांग.

संजय—हे राजन्, श्वेतपर्वताच्या दक्षिणेला नीलपर्वत आहे, त्याच्या उत्तरेला निषध आहे. नीलाच्या उत्तर प्रदेशाला व श्वेताच्या दक्षिणेला 'श्वेतवर्ष' असें नांव आहे. त्याच प्रदेशाला 'रमणक' असेंहि म्हणतात. तेथें उत्पन्न होणारे सर्व मानव अतिशय कुलवान्, प्रियदर्शन व शत्रुरहित असतात. ते नित्य प्रसन्नचित्त असतात व त्यांचें आयुष्य साडेबारा हजार वर्षें असतें.

नीलाच्या दक्षिणेला व निषधाच्या उत्तरेला 'हिरण्मय' नामक वर्ष (प्रदेश) आहे. तेथें हैरण्वती नदी वहात असते. त्याच प्रदेशांत हा पक्षिराज गरुड वास करितो. यक्षाचे अनुयायी धनाढ्य व प्रियदर्शन असून ते येथेंच रहातात. ते सर्व प्रसन्नचित्त व महाबलाढ्य असतात. तेहि साडे बारा हजार वर्षें जिवंत रहतात.

हे महाराज, या पर्वताला तीन विचित्र शृंगें आहेत. त्यांतील एक मणिमय, दुसरें सुवर्णमय आणि तिसरें सर्व रत्नमय आहे. तें प्रासादांनीं सुशोभित झालेलें आहे. तेथें शाण्डिली-नांवाची स्वयंप्रभादेवी नित्य वास करिते. या शृंगाच्या उत्तरेला समुद्रतीरावर 'ऐरावत'-नामक प्रदेश आहे. तो या शृंगाहून श्रेष्ठ आहे. तेथें सूर्याचा प्रकाश नाहीं. त्यामुळें तेथील मानव जराग्रस्त होत नाहींत. नक्षत्रांसह चंद्रमा तेथें प्रकाशत असतो. तेथील मानवांचा वर्ण व कांति कमलाप्रमाणें मृदु व रम्य असते. त्यांचे नेत्र कमलपत्रासारखे असतात. त्यांच्या देहाला पद्मपत्रासारखा सुवास येत असतो. ते मानव देवतुल्य असल्यामुळें स्वेदरहित असतात. त्यांच्या अंगाला सुवास येतो, त्यांना क्षुधा बाधत नाहीं व ते जितेंद्रिय असतात. कारण हे नृपाला, ते सर्व देवलोकांतून च्युत झालेले जीव रजोगुणरहित असून त्यांच आयुष्य तेरा हजार वर्षें असतें.

[ आदित्याच्या तापानें तप्त झालेले ते मानव शशिमंडलांत प्रवेश करितात म्ह० विराड्भावाचा त्याग करून सूत्रात्मभावाला प्राप्त होतात. असें वर्णन मागल्या अध्यायाच्या शेवटीं केलें आहे. आतां संजय पिप्पलाख्यकारण सांगण्यास आरंभ करितो. ]

त्याचप्रमाणें क्षीरसमुद्राच्या उत्तरेला 'वैकुंठ' नामक हरि सुवणमय रथांत रहातो. तो रथ अग्नीप्रमाणें देदीप्यमान, महातेजस्वी व सुवर्णानें भूषित असतो. त्याला आठ चाकें असतात आणि मनाप्रमाणें वेगवान् असलेलें तें वाहन भूतें ओढून नेतात. तो विभु सर्व भूतांचा स्वामी आहे. तो या समग्र विश्वाचा क्षय व विस्तार करीत असतो तो जीवरूपानें कर्ता व ईश्वररूपानें करविता आहे. (याप्रमाणें त्याच्या अध्यात्मरूपाचें वर्णन करून आतां त्याचेंच अधिभूतत्व व अधियज्ञत्व सांगतात.) तोच प्रभु पृथ्वी, आप, आकाश, वायु व तेज आहे. सर्व प्राण्यांचा यज्ञ तोच असून अग्नि हेंच त्याचें मुख आहे.

वैशंपायन—संजयानें असें सांगितलें असतां उदार मनाचा धृतराष्ट्र आपल्या पुत्रांविषयीं चिंतन करूं लागला व विचार करून पुनः म्हणाला—" हे सूतपुत्रा, कालच या जगाचा संहार करितो व तोच पुनः त्याला उत्पन्न करितो, यांत संशय नाहीं. या लोकीं कांहींहि शाश्वत नाहीं. तूं वर्णन केलेल्या जंबूखंडांतील मेरूपर्वतादिकहि शाश्वत नाहींत. सर्व वस्तुजात दृष्टनष्टस्वभाव केवल संकल्पानें उत्पन्न होणारें आहे. फार काय पण नर-नारायण–जीवेश्वरहि शाश्वत नाहींत. तर ते दोघेहि मिळून होणारें जें एक सर्वज्ञ स्वरूप तेंच शाश्वत आहे. त्यालाच देव वैकुंठाधिपति ' अच्युत ' म्हणतात आणि मानव त्याच प्रभूला ' विष्णु ' असें म्हणतात. ६. १. ८.

---

## अध्याय ९ वा.

[ १ भारतवर्षासंबंधीं प्रश्न. २ त्यांतील वृक्ष, नद्या व देश यांचें सविस्तर वर्णन. ]

( १ ) धृतराष्ट्र—हे संजया, ज्या या भारतवर्षांत हें सर्व सैन्य जमलें आहे, ज्याच्यासाठीं हा माझा पुत्र अतिशय लुब्ध झाला आहे, ज्याचा पांडुपुत्रहि लोभ करीत आहेत आणि ज्याविषयीं माझेंहि मन आसक्त होत आहे, त्या भारतभूमीचें यथार्थ वर्णन कर. कारण मला तूंच एक बुद्धिमान् दिसत आहेस.

( २ ) संजय—हे राजन्, माझें वचन ऐक. पांडव या भारतवर्षाविषयीं लुब्ध झालेले नाहींत, तर तुझा पुत्र दुर्योधन आणि सौबल शकुनि हेच त्याची इच्छा करीत आहेत. त्याचप्रमाणें दुसरेहि जे क्षत्रिय व अन्य देशांचे अधिपति भारतवर्षाचा लोभ करीत आहेत, ते परस्परांचें ऐश्वर्य सहन न करणारे आहेत.

हे महाराज, मी तुला या भारतवर्षाचें वर्णन करून सांगतों तें ऐक. ही कर्मभूमि असल्यामुळें ती इंद्रादि देव व वैवस्वत मनु यांनाहि प्रिय आहे. पृथु, वेनपुत्र, महात्मा इक्ष्वाकु, ययाति, अम्बरीष, मान्धाता, नहुष, मुचुकुन्द, औशीनर शिबि, ऋषभ, ऐल, नृगराज, कुशिक, महात्मा गाधि व सोमक दुर्धर्ष दिलीप, त्याचप्रमाणें इतरहि सर्व बलाढ्य क्षत्रिय, यांना हें भारतवर्ष अतिशय प्रिय होतें. अशाप्रकारच्या या भारतवर्षाविषयीं तूं मला जो प्रश्न केला आहेस, त्याचें सविस्तर उत्तर मी सांगतों, तें लक्षपूर्वक ऐक.

या भरतभूमीचे विस्तृत विभाग करणारे महेन्द्र, मलय, सह्य, शुक्तिमान्, ऋक्षवान्, विन्ध्य व पारियात्र हे सात महापर्वत आहेत. त्यांस कुलपर्वत म्हणतात. या सात पर्वतांखेरीज त्यांच्यासमीप चित्र-विचित्र शिखरांचे, प्रचंड व अभेद्य असे हजारों पर्वत आहेत. त्याचप्रमाणें अप्रसिद्ध असलेले अनेक क्षुद्र पर्वत आहेत. त्यावर पर्वतवासी क्षुद्र ( रानटी ) लोक रहातात व स्वतःची उपजीविका करितात.

भारतवर्षांतील आर्य, म्लच्छ व या दोहोंच्या मिश्रणानें झालेल्या जातीचे पुरुष ज्या नद्यांचें जल प्राशन करितात त्या विपुल जलयुक्त विस्तीण नद्यांचीं नांवेंहि मी तुला सांगतों, तीं एक—गंगा, सिंधु, सरस्वती, गोदावरी, नर्मदा, महानदी, बाहुदा, शतद्रु, चंद्रभागा, यमुना, दृषद्वती, विपाशा, स्थूलवालुका-युक्त विपापा, वेत्रवती, कृष्णा, वेण्या, इरावती, वितस्ता, उष्ण जलानें युक्त असलेली पयोष्णी, देविका, वेदस्मृता, वेदवती, त्रिदिवा, इक्षुला, कृमि, करी-षिणी, चित्रवाहा, चित्रसेना, गोमती, धूतपापा, वंदना, महानदी, कौशिकी, त्रिदिवा, कृत्या, निचिता, लोहतारणी, रहस्या, शतकुम्भा, सरयू, चर्मण्वती, वेत्रवती, हस्तिसोमा, दिशा, शरावती, पयोष्णी, वेणा, भीमरथी, कावेरी, चुलुका, वाणी, शतबला, नीवारा, अहिता, सुप्रयोगा, पवित्र कुंडली, राजनी, पुरमालिनी, पूर्वाभिरामा, वीरा, ओघवती भीमा, पापाशिनी, पापहरा, महेन्द्रा, पाटलावती, करीषिणी, असिक्नी, कुशचीरा, मकरी, प्रवरा, मेना, हेमा, घृत-वती, पुरावती, अनुष्णा, शैब्या, कापी, सदानीरा, अधृष्या, कुशधारा, सदा-कांता, शिवा, वीरवती, वस्त्रा, सुवस्त्रा, गौरी, कंपना, हिरण्यवती, वरा, वीरकरा, पंचमी, रथचित्रा, ज्योतिरथा, विश्वामित्रा, कपिंजला, उपेंद्रा, बहुला, कुवीरा, अंबुवाहिनी, विनदी, पिंजला, वेणा, तुंगवेणा, विदिशा, कृष्णवेणा, ताम्रा, कपिला, खलु, सुवामा, वेदाश्वा, हरिश्रावा, शीघ्रा, पिच्छिला, भारद्वाजी, कौशिकी, शोणा, बाहुदा, चंद्रमा, दुर्गा, चित्रशिला, ब्रह्मवेदा, बृहद्वती, यवक्षा, रोही, जांबूनदी, सुनसा, तमसा, दासी, वसा, वाराणसी, नीला, पर्णाशा, मानवी, वृषभा, ब्रह्ममेध्या, बृहद्ध्वनी या व आणखींहि अनेक महा-नद्या आहेत. त्याशिवाय सर्वदा निरामय असलेली मंदग कृष्णा, मंद वहाणारी ब्राह्मणी, महागौरी, चित्रोपला, चित्ररथा, मंजुल वहाणारी मन्दाकिनी, वैत-रणी, कोषा, शुक्तिमती, अनंगा, वृषसाह्वया, लोहित्या, करतोया, वृषकाह्वया, कुमारी, ऋषिकुल्या, मारिषा, सरस्वती, मन्दाकिनी, सुपुण्या, व सर्वागंगा.

हे भारता, या सर्व नद्या महाफल देणाऱ्या असून त्या सर्व विश्वाच्या माताच आहेत. दुसऱ्याहि अप्रसिद्ध नद्या सरस्रावधि आहेत. याप्रमाणें मला स्मरत असलेल्या सर्व नद्यांचीं नांवें मीं तुला सांगितलीं.

आतां भारतवर्षांतील देशांचीं नांवें सांगतों, तीं ऐक—हे राजा, हा आपला कुरुपांचालदेश, तसेच हे शाल्व, माद्रेय, जाङ्गल, शूरसेन, पुलिन्द, बोध, माल, मत्स्य, कुशल्य, सौशल्य, कुंति, कांति-कोसल, चेदि, मत्स्य, करूष, भोज, सिंधु, पुलिन्दक, उत्तमाश्व, दशार्ण, उत्कलासह मेकल, पंचाल, कोसल, नैकपृष्ठ, धुरंधर, गोधा, मद्रकलिंग काशय, अपरकाशय, जठर, कुक्कुर, अवंति, अपर कुंति, गोमन्त, मण्डक, सण्ड, विदर्भ, रूपवाहिक, अश्मक, पाण्डुराष्ट्र, गोपराष्ट्र, करीति, अधिराज्य, कुशाद्य, मल्लराष्ट्र, वारवास्य, अयवाह, चक्र, चक्राति, शक, विदेह, मगध, स्वक्ष, मलज, विजय, अंग, वंग, कलिंग, यकृल्लोम, मल्ल, सुदेष्ण, प्रह्लाद, माहिक, शशिक, बाह्लिक, वाटधान, आभीर, कालतोयक, अपरान्त, परान्त, पंचाल, चर्ममंडल, अटवी शिखर, मेरुभूत, उपावृत्त, अनुपावृत्त, स्वराष्ट्र, केकय, कुन्द, परान्त, माहेय, कक्ष, सामुद्रनिष्कुट, आंध्र, अंतर्गिरि, बहिर्गिरी, अंगमलज, मगध, मानवर्जक, समंतर, प्रावृषेय, भार्गव, पुंड्र, भर्ग, किरात, सुदृष्ट, यामुन, शक, निषाद, निषध, आनर्त, नैर्ऋत, दुर्गाल, प्रतिमत्स्य, कुंतल, कोसल, तीरग्रह, शूरसेन, ईजिक, कन्यकागुण, तिलभार, मसीर, मधुमन्त, सुकंदक, काश्मीर, सिंधुसौवीर, गांधार, दर्शक, अभीसार, उलूत, शैवल, दार्वी किंवा दर्वा, वातज, आमरथ, उरग, बाहुवाद्य, सुदामान, सुमल्लिका, वध्रा, करीषका, कुलिन्दोपत्यक, वनायु, दश, पार्श्वरोम, कुशबिन्दु, कच्छ, गोपालकक्ष, जांगल, कुरुवर्णक, किरात, बर्बर, सिद्ध, वैदेह, ताम्रलिप्तक, ओण्ड्र, म्लेच्छ, सैरिरिध्रा व पार्वतीय सैसिरिध्र.

त्याचप्रमाणें हे राजन्, दुसरे दक्षिण दिशेंतील देश सांगतों ते ऐक—द्रविड, केरल, प्राच्य, भूषिक, वनवासिक, कर्णाटक, महिषक, विकल्प, भूषक, झिल्लिक, कुंतल, सौहृद, नभ, कानन, कौकुट्टक, चोल, कोंकण, मालव, नर, समंग, करक, कुकुरांगर, मारिष, ध्वजिनीं, उत्सव, संकेत, त्रिगर्त, शाल्वसेन व्यूक, कोकबक, प्रोष्ठा, समवेगवश, विंध्यचुलिका, पुलिंद, वल्कल, बल्लव, मालव, अपर बल्लव, कुलिंद, कालद, कुंडल, करट, मूषक, स्वनबाल, सनीप, घटसंजय अठिद, पाशिवाट, तनय, सुनय, ऋषिक, विदर्भ, काकल, तंगण, व परतंगण.

हे भरतसत्तमा, उत्तरेला क्रूर अपर म्लेच्छ, यवन, चीन, काम्बोज, दारुण म्लेच्छजाति, सकृद्ग्रह, कुलथ, हूण, पारसिक, रमण, तसेच जेथें क्षत्रियांच्या वसाहती आहेत, व वैश्य-शूद्रांचीं कुलें रहातात, असे दशमालिक देश, शूद्र, आभीर, दरद, पशूसह काश्मीर, खाशीर, अंतचार, पल्हव, गिरिगव्हर, आत्रेय, भारद्वाज, स्तनपोषिक, प्रोषक, कलिंग, जेथें किरातांच्या जाति रहातात ते तोमर, हन्यमान आणि करभंजक हे प्रमुख देश आहेत.

हे प्रभो, याप्रमाणें मीं तुला पूर्व आणि पश्चिम दिशेंतील देशांचीं नांवें संक्षेपतः सांगितलीं. या खेरीज आणखीं दुसरे पुष्कळ देश आहेत. सत्त्वादि गुणांचें व शौर्याचें अतिक्रमण न करतां जर या भूमीचें योग्य पालन केलें, तर ती धर्म, अर्थ व काम या तिन्ही पुरुषार्थोपयोगी उत्कृष्ट फल देते आणि कामधेनूप्रमाणें सर्व कामना पूर्ण करीत असते. याच कारणास्तव धनाची इच्छा करणारे धर्मार्थकोविद शूर राजे या भरतभूमीच्या प्राप्तीसाठीं प्राणावर उदार होऊन युद्ध करतात. ही भूमि यज्ञाच्या योगानें देवांची व अन्नाच्या योगानें मानवांची आश्रयभूत आहे. यास्तव श्वान जसे मांसाच्या तुकड्यासाठीं परस्परांवर तुटून पडतात, तसे राजे या भूमीसाठीं परस्परांशीं युद्ध करितात.

या भूमीविषयीं अद्यापि कोणत्याहि भूपतीची कामना पूर्ण झालेली नाहीं. यास्तव तिच्या प्राप्तीसाठीं हे कौरव-पांडव साम, दान, भेद व दंड यांच्या योगानें यत्न करीत आहेत. ( याप्रमाणें भूमिजयाचें आधिदैविक फल सांगितलें, आतां त्याचें अध्यात्म फल सांगतों—) हे राजा, योगमार्गानें या भूमीचें संपूर्ण दर्शन झालें असतां ती पिता, भ्राता, पुत्र यांच्याप्रमाणेंच भूतांचें भौतिक आघातापासून रक्षण करिते, म्ह० वज्रदेहत्व देते. त्याचप्रमाणें ती स्वर्गप्रदहि होते, म्हणजे ती स्वर्गप्राप्ति करून देते. ६. १. ९.

---

## अध्याय १० वा.

[ १ भरतवर्ष, हैमवत व हरिवर्ष यांतील लोकांचें आयुःप्रमाण व शुभाशुभ बल यांचें वर्णन. ]

( १ ) धृतराष्ट्र—हे सूता, भारतवर्ष व हैमवत यांतील भूत, भविष्यत् व वर्तमानकालीन आयुःप्रमाण आणि शुभाशुभ बल यांचें सविस्तर वर्णन करून सांग. त्याचप्रमाणें हरिवर्षाचेंहि वर्णन कर.

संजय—हे भरतश्रेष्ठा, या भारतवर्षांत कृत, द्वापर, त्रेता व कलि अशीं चार युगें आहेत. पहिलें कृतयुग, त्यानंतर त्रेता, त्याच्यामागून द्वापर व शेवटीं कलियुग प्रवृत्त होतें. हे कुरुश्रेष्ठा, कृतयुगांत मानवांच्या आयुष्याचें प्रमाण चार हजार वर्षें असतें. त्रेतायुगांत तीन हजार व द्वापरांत दोन हजार वर्षें असतें आणि कलियुगांत मानव गर्भस्थ स्थितींतच मरण पावतात किंवा उत्पन्न झाल्यावरहि मृत्युमुखीं पडतात. त्यांच्या आयुष्याचें निश्चित प्रमाण कांहींच नाहीं.

कृतयुगांत उत्पन्न झालेले मानव महाबलाढ्य, अतिशय समर्थ, प्रज्ञा व गुण यांनीं संपन्न, धनाढ्य, प्रियदर्शक व तपोनिष्ठ असतात. त्यांच्यापासून तत्सदृश अशी सहस्रावधि प्रजा उत्पन्न होते.

त्रेतायुगांत उत्साहयुक्त महात्मे, धार्मिक, सत्यवादी, दर्शनीय, धिप्पाड, महावीर्यवान्, वराई आणि शूर असे क्षत्रिय निर्माण होतात आणि ते सर्व राजे चक्रवर्ती असतात.

द्वापरांत सर्वच वर्णांची प्रजा महोत्साही वीर्यवान् असून सर्व वर्ण परस्परांस जिंकण्याची इच्छा करीत असतात आणि कलियुगांतील पुरुष अल्पतेजानें युक्त, क्रोधी, लुब्ध व अनृतवादी निपजतात. ते ईर्ष्या, मान, क्रोध, माया, असूया, विषयासक्ति व लोभ यांनीं युक्त असतात.

हे नराधिपा, आतां द्वापरांतील गुणांचा लोपच होत चालला आहे, ( कलीमध्यें त्यांचा पूर्ण अभावच होणार. ) भारतवर्षाहून हैमवतांतील गुण श्रेष्ठ आहेत व हरिवर्षांतील त्याहूनहि वरिष्ठ आहेत. ६. १. १०.

येथें पहिलें जम्बूखण्डविनिर्माणपर्व समाप्त झालें.

---

## भूमिपर्व २.



### अध्याय ११ वा.

[ १ सप्तद्वीपांचें वर्णन. ]

( १ ) धृतराष्ट्र—हे संजया, तूं जम्बूखंडाचें संक्षिप्त वर्णन केलेंस, आतां त्याच्या विष्कंभाचें–विस्ताराचें परिमाण तत्त्वतः मला सांग. त्याचप्रमाणें समुद्राचें समग्र प्रमाण, शाकद्वीप, कुशद्वीप, शाल्मली, क्रौंचद्वीप आणि चंद्र, सूर्य व राहु यांविषयींचें सविस्तर वर्णन करून मला कथन कर.

**संजय**—राजन्, या समग्र जगांत विपुल द्वीपें आहेत, त्यांतील मुख्य सप्तद्वीपें व त्याचप्रमाणें चंद्र-सूर्य व राहु यांविषयीं मी तुला सांगतों तें ऐक. जम्बूपर्वताचा विस्तार अठरा हजार सहाशें योजनें आहे. लावण समुद्राचा विष्कंभ त्याच्या दुप्पट असल्याचें स्मृत आहे. या समुद्रांत विविध मणि, प्रवाल, रत्नें असून त्याच्या तीरावर अनेक देश पसरलेले आहेत. अनेक प्रकारच्या धातूंनीं चित्र विचित्र दिसणाऱ्या पर्वतांनीं तो सुशोभित झाला आहे. हा समुद्र मंडलाकार असून सिद्ध-चारणांनीं सतत व्याप्त असतो.

आतां शाकद्वीपाचें यथार्थ वर्णन करितों तें लक्षपूर्वक ऐक. शाकद्वीपाचें प्रमाण जंबूद्वीपाच्या दुप्पट असून ज्या समुद्रानें त्याला व्यापिलें आहे, त्याचा विस्तार शाकद्वीपाच्या दुप्पट आहे. या शाकद्वीपांतील लोक पुण्यशील असतात. त्यांना मृत्यु येत नाहीं. ते क्षमा व उत्साह यांनीं युक्त असतात. मग तेथें दुर्भिक्ष कोठलें ! याप्रमाणें मीं तुला शाकद्वीपाचें संक्षिप्त वर्णन सांगितलें. आतां आणखीं काय सांगूं ?

**धृतराष्ट्र**—हे संजया, तूं शाकद्वीपाचें संक्षिप्त वर्णन केलेंस, पण तेंच आतां सविस्तर ऐकण्याची माझी इच्छा आहे. तूं महाप्राज्ञ असल्यामुळें सविस्तर वर्णन करण्यास समर्थ आहेस.

**संजय**—हे राजन्, ठीक आहे, सांगतों ऐक. शाकद्वीपांत सात रत्नजडित पर्वत आहेत. तसेंच तेथें समुद्र व नद्या आहेत, त्यांचीं नांवें ऐक. हे जनाधिपा, तेथें सर्व वस्तु अतिशय गुणयुक्त व पवित्र असतात. तेथला मेरुपर्वत देवर्षि व गंधर्व यांनीं युक्त असल्यामुळें तो मुख्य गणलेला आहे. त्याच्या नंतर पूर्वेकडे मलयपर्वत आहे. त्याच्यापासून मेघ उत्पन्न होतात व सर्वत्र पसरतात. त्याच्या पुढें 'जलधार'-नामक महापर्वत आहे. या पर्वतापासूनच इंद्र नित्य पवित्र जल ग्रहण करितो. त्यामुळें तो वर्षाकालीं वृष्टि करण्यास समर्थ होतो. त्याच्यापुढें 'रैवतक' नांवाचा उच्च गिरि आहे. रेवती नक्षत्र ज्योतिर्मंडलरूपानें जरी अंतरिक्षांत भ्रमण करीत असलें तरी तें या पर्वताच्यावर पितामहाच्या नियमानें दिव्यरूपानें अढळ रहातें. हे राजेंद्रा, उत्तरेला 'श्याम'-नामक महापर्वत आहे. तो अतिशय उंच, उज्ज्वल, शोभिवंत आणि नूतन मेघाप्रमाणें नीलवर्ण आहे. हे राजा, या पर्वतापासूनच तेथील प्रजेला श्यामवर्ण प्राप्त झाला आहे.

धृतराष्ट्र—हे संजया, तुझें हें वर्णन ऐकून पर्वतामुळें तेथील प्रजा श्यामवर्णाला कशी प्राप्त झाली? असा माझ्या मनांत संशय उत्पन्न झाला आहे. ( त्याचें निरसन कर. )

संजय—हे महाराज, सर्व द्वीपांमध्यें श्वेत, श्याम व मिश्र वर्णाची प्रजा असते, परंतु या द्वीपांत केवल श्यामवर्ण लोकच असतात, म्हणून या पर्वताला श्यामगिरी असें म्हणतात. या पर्वतावर उत्पन्न होणाऱ्या शाक-अन्नादिकांच्या परिणामानें तेथील मनुष्येंहि श्यामवर्णाचींच निपजतात. ज्याअर्थी हा पर्वत श्यामवर्ण आहे, त्याअर्थी त्या स्थानाला श्यामत्वच प्राप्त झालें आहे.

याच्या पुढें फार उंच दुर्गशैल आहे. त्याच्या पलीकडे केसर पर्वत आहे. त्यावरून नित्य पुष्पकेसरयुक्त वायु वहात असतो. या साती पर्वतांचें प्रमाण क्रमानें उत्तरोत्तर प्रत्येकाच्या दुपटीनें अधिक आहे. या सात पर्वतांच्या कक्षेत सात द्वीपें आहेत, असें विद्वान् मुनींनीं म्हटलें आहे.

यांतील मेरूच्या सीमेंत असलेल्या प्रदेशाला महाकाश म्हणतात. जलद मलय पर्वताच्या प्रदेशास ‘ कुमुदोत्तर ’ असें नांव आहे. जलधारांच्या द्वीपाला सुकुमार म्हटलें आहे. रैवतकाचें कौमार, श्यामाचें मणिकांचन, केसराचें मौदाकि व त्याच्यापुढील ‘ महापुमान ’ या नांवानें द्वीपें प्रसिद्ध आहेत.

शाकद्वीपांत ‘ शाक ’-नामक एक महावृक्ष आहे. त्याचा परिघ व उंची जंबूद्वीपांतील जंबूवृक्षाच्या इतकीच आहे. या द्वीपांतील लोक त्या वृक्षाचें नित्य पूजन करितात. तेथील प्रजा पुण्यशील असून शंकरोपासक आहे. ती सर्व प्रजा धार्मिक असून चारी वर्ण स्वकर्मनिरत असतात. तेथें चोर दृष्टींहि पडत नाहींत. सिद्ध, चारण व देवता या द्वीपांत नेहमीं जात असतात. तेथील लोक दीर्घायु असून जरा व मृत्यु यांनीं रहित असतात. त्यामुळें वर्षाकालीं वृद्धि पावणाऱ्या नदीप्रमाणें तेथील प्रजा वृद्धिंगत होत असते.

या द्वीपांतील नद्यांचें जल अतिशय पवित्र असून गंगा अनेक रूपानें वहात असते. त्याशिवाय सुकुमारी, कुमारी, शीताशी, वेणिका, महानदी, मणिजला, चक्षुर्वर्धनिका या पवित्र जलानें युक्त असलेल्या मुख्य नद्या आहेत. इतरहि सहस्रावधि नद्या आहेत व त्या सर्वहि पुण्यजलानें युक्त आहेत. त्या असंख्य नद्यांचीं नांवें व विस्तार सांगतां येणें शक्य नाहीं.

या द्वीपांत मंग, मशक, मानस व मंदग या नांवांचे चार लोकप्रसिद्ध पवित्र देश आहेत. त्यांतील 'मंग'-देशांत ब्राह्मणांची संख्या अधिक असून ते सर्व स्वकर्मनिरत असतात. मशकांत प्रामुख्यानें क्षत्रिय असून ते धार्मिक, उदार व सर्व कामना पूर्ण करणारे असतात. मानसांतील बहुतेक प्रजा वैश्य वृत्तीची असून ती सर्व शूर व धर्मार्थ जाणणारी असते. मंदगांत 'शूद्र' विपुल असून ते सर्वहि धर्मशील असतात. तेथें राजा, दंड किंवा दंडाला पात्र असलेले लोक यांतील कोणीहि नाहींत. ते सर्व धर्मज्ञ आहेत व स्वधर्मानें परस्परांचें रक्षण करितात.

हे राजन्, याप्रमाणें त्या उज्ज्वल शाकद्वीपाचें जेवढें वर्णन करणें शक्य आहे व जेवढें श्रवणीय आहे, तेवढें मीं तुला सांगितलें. ६. २. ११.

---

## अध्याय १२ वा.

[ १ उत्तरादि द्वीपांचें वर्णन. २ सूर्यादि ग्रहांचें परिमाण. ]

( १ ) संजय—हे महाराज, आतां उत्तर दिशेंतील द्वीपाविषयीं जी कथा ऐकण्यांत येते, ती मी तुला सांगतों, ऐक. उत्तर द्वीपाच्या समीप घृतसमुद्र, दधिसमुद्र, सुरासमुद्र आणि जलसमुद्र असे चार समुद्र आहेत. ते सर्व परस्परांच्या अपेक्षेनें एकापेक्षां एक क्रमानें द्विगुण आहेत. ( म्ह० एकाच्या दुप्पट दुसरा, दुसऱ्याच्या दुप्पट तिसरा इत्यादि. ) या द्वीपांतील पर्वत समुद्रांनीं परिवेष्टित आहेत.

मध्यमद्वीपांत 'गौर'-नामक मनःशील धातूचा मोठा पर्वत आहे. पश्चिमद्वीपांत 'कृष्ण'-संज्ञक पर्वत आहे. तो नारायणाला फार प्रिय आहे. या पर्वतावरील दिव्य रत्नाचें रक्षण साक्षात् केशव करीत असतो. तो भगवान् सर्वदा प्रसन्न असून लोकांना अतिशय सुख देतो.

कुशद्वीपामध्यें 'कुशस्तंब'-नामक दर्भाची जाति आहे. तेथील प्रजा त्याचें पूजन करिते. शाल्मलीद्वीपांत 'शाल्मली' वृक्ष आहे, तेथील लोक त्याची पूजा करितात. क्रौंचद्वीपांत क्रौंच पर्वत आहे. तो रत्नाचा आकरच आहे. चातुर्वर्णाची प्रजा त्याचें नित्य पूजन करीत असते.

हे राजन्, सर्व धातूंनीं युक्त असलेला 'गोमन्त' पर्वत फार मोठा आहे. तेथें प्रभु नारायण हरि आपल्या मुक्त झालेल्या अनेक भक्तांसह रहातो. कुश-

द्वीपांत त्याच नांवाचा सुवर्णपर्वत आहे. तो पोवळ्यांनीं युक्त असून अत्यंत दुर्गम आहे. दुसरा हेमपर्वत आहे, तिसरा ' द्युतिमान् '-नामक कुमुद-पर्वत. चवथा पुष्पवान् पर्वत, पांचवा कुशेशय आणि सहावा हरिपर्वत. याप्रमाणें हे सहा श्रेष्ठ पर्वत आहेत. पर्वतांचें अंतर क्रमानें परस्परापेक्षां उत्त-रोत्तर द्विगुण आहे. या सहा पर्वतांच्या योगानें झालेलीं कुशद्वीपाचीं सात वर्षें प्रसिद्ध आहेत.

त्यांतील पहिलें औद्भिद, दुसरें वेणुमंडल, तृतीय सुरथाकार, चवथें कंबल, पांचवें धृतिमत्, सहावें प्रभाकर व सातवें कापिल वर्ष स्मृत आहे. ' वर्ष '-नांवाचे हे सात प्रदेश श्रेष्ठ आहेत. या सर्व प्रदेशांत देव, गंधर्व व इतर प्रजा यथेच्छ विहार करितात आणि सुखोपभोग घेतात. तेथील लोक मरण पावत नाहींत. तेथें चोर नसतात. किंवा म्लेच्छ जातीची प्रजाहि नाहीं. तेथील सर्व लोक गौर वर्णाचे व सुकुमार असतात.

हे मनुजेश्वरा, आतां मीं अवशिष्ट द्वीपांचें जें वर्णन ऐकलें आहे, तें सर्व तुला सांगतों, लक्षपूर्वक ऐक. क्रौंचद्वीपांत क्रौंच नामक महागिरि आहे. क्रौंचाच्या पुढें वामनक, त्याच्या पुढें अन्धकारक, त्याच्या पलीकडे मैनाक, त्याच्या पुढें गिरिश्रेष्ठ गोविंद, व त्याच्याहि पुढें ' निबिड '-नामक पर्वत आहे. या सर्व पर्वतांचें प्रमाण क्रमानें एकापेक्षां एक उत्तरोत्तर दुप्पट आहे.

हे महाराज, तेथील देशांचें वर्णन करितों, तें ऐक. क्रौंच पर्वताच्या समं-ततः कुशल देश आहे. वामनाच्या समीप मनोनुग, त्याच्या पुढें उष्णदेश, उष्णाच्या पुढें प्रावरक, प्रावरकाच्या पुढें अन्धकार, त्याच्या पलीकडे मुनि-देश स्मृत आहे व त्याच्या पुढें दुन्दुभिस्वन आहे. हा प्रदेश सिद्ध-चारणांनीं व्याप्त असून तेथील लोक गौरवर्णाचे असतात. हे सर्व देश देव-गंधर्वांनीं सेवन केलेले आहेत.

पुष्करद्वीपामध्यें पुष्कर नांवाचा रत्नजडित पर्वत आहे. तेथें साक्षात् प्रजा-पति नित्य वास करितो आणि देव व महर्षि त्याची नित्य प्रेमळ स्तवनांनीं उपासना करीत असतात. जंबूद्वीपांतून या द्वीपांत नानाप्रकारचीं रत्नें येत असतात. या सर्व द्वीपांतील प्रजांच्या आरोग्याचें व आयुष्यांचें प्रमाण ब्रह्म-चर्य, सत्य व दम यांच्या योगानें द्विगुणित झालेलें आहे. या द्वीपांतील सर्व

देशांमध्यें एकच धर्म प्रवृत्त असल्यामुळें तो सर्व एकच प्रदेश मानला जातो. प्रजापति हातांत दंड घेऊन स्वतः या द्वीपांचें नित्य रक्षण करीत असतो. प्रजापतिच सर्वांचा राजा, पिता व ईश्वर आहे. तो जडापासून पंडितापर्यंत सर्व प्रजेचें रक्षण करीत असतो.

हे महाराज, तेथें भोजन स्वतःसिद्ध असतें, तेंच अन्न तेथील प्रजा नित्य भक्षण करिते. या द्वीपाच्या पलीकडे ' सम ' नांवाचा प्रदेश आहे. तो चौकोनी असून त्याचें क्षेत्रफळ तेहतीस हजार योजनें आहे. या ठिकाणीं वामन-ऐरावतादि चार लोकप्रसिद्ध दिग्गज आहेत. ( हे चार दिग्गज पृथ्वीला आश्रयभूत असून ईश्वराच्या शक्तीनेंच हे पृथ्वी धारण करण्यास समर्थ होतात.)

हे राजन्, सुप्रतीकाचें गंडस्थल व मुख यांतून सतत मदस्राव होत असतो. त्याचें परिमाण सांगण्यास मी समर्थ नाहीं. त्या गजसमूहाच्या तिर्यग्, ऊर्ध्व व अधः अशा कोणत्याहि बाजूच्या प्रमाणाची गणना करतां येणें शक्य नाहीं. तेथें सर्व दिशांतून वायु वहात असतात, त्या वायूंचाहि हे असंबद्ध गज निग्रह करितात व महाप्रभेनें युक्त व विकसित कमलपत्राप्रमाणें सुगंधित अशा आपल्या शुण्डाग्रांनीं ते वायु शतधा बाहेर सोडतात. या दिग्गजांनीं श्वासोच्छ्वासानें सोडलेला हा वायु सर्वत्र वहात असतो व त्याच्या योगानें सर्व प्रजा प्राण धारण करिते.

धृतराष्ट्र—हे संजया, माझ्या प्रश्नांतील पूर्व भागाचें म्ह० द्वीपादिकांचें वर्णन तूं सविस्तर केलेंस. आतां उत्तर भागाचें म्ह० सूर्य, चंद्र व राहु यांचें प्रमाण मला कथन कर.

(२) संजय—हे महाराज, द्वीपांचें वर्णन मीं केलें, आतां ग्रहांचें तत्वतः वर्णन करतों, तें ऐक. स्वर्भानु म्ह० राहु वर्तुलाकार आहे, असें म्हणतात. त्याचा व्यास बारा हजार योजनें असून परिघ बेचाळीस हजार योजनें विस्तृत आहे, असें विद्वान् पौराणिकांचें मत आहे. चंद्रमाचा व्यास अकरा हजार व परिघ तेहतीस हजार एकुणसाठशें योजनें आहे. सूर्याचा व्यास दहा हजार योजनें असून परिघ तीस हजार अठ्ठावनशें योजनें आहे. शीघ्रगामी व परम उदार सूर्याचें प्रमाण जरी इतकें विस्तृत आहे, तरी राहूचा विस्तार सूर्य व चंद्र यांपेक्षां अधिक असल्यामुळें यथाकालीं तो या दोहोंसहि आच्छादित करितो. हे राजन्, मीं हें वर्णन संक्षेपतःच केलें आहे. तथापि तें शास्त्रदृष्टीनें केलें अस-

त्यामुळें यथार्थ आहे. यास्तव तूं तें ऐकून शांत हो. मीं तुला सर्व सृष्टीचें वर्णन सांगितलें आहे. हें सर्व जगत् ईश्वरानें निर्माण केलें आहे. यास्तव तुझ्या दुर्योधन पुत्राविषयीं खेद करूं नको. मनाचें समाधान कर.

हे भरतश्रेष्ठा, जो क्षत्रिय हें मनोरम भूमिपर्ववर्णन श्रवण करितो, तो श्रीमान्, कृतार्थ व सज्जनांस संमत होतो. त्याचें आयुष्य, बल, कीर्ति व तेज वाढतें. जो कोणी जितेंद्रिय पुरुष पौर्णिमा व अमावास्या या पर्वकालीं हें वर्णन ऐकतो, त्याचे पितर व पितामह त्याजवर प्रसन्न होतात. हे राजन्, सांप्रत आपण ज्या प्रदेशांत रहात आहोंत, तें भरतवर्ष आहे. तें अतिशय पवित्र असून पूर्वीच्या श्रेष्ठ पुरुषांनीं येथें अनेक पुण्य कर्में केलीं आहेत. तीं सर्व तूं ऐकलींच आहेस. ६. २. १२.

येथें दुसरें भूमिपर्व समाप्त झालें.

---

## भगवद्गीतापर्व ३.



### अध्याय १३ वा.

[ १ युद्धांत भीष्मपतन पावल्याचें धृतराष्ट्राला कथन. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा जनमेजया, ज्याला भूत, भविष्यत् व वर्तमान स्थितीचें सर्व ज्ञान आहे, असा प्रत्यक्षदर्शी विद्वान् संजय रणांगणांतून परत आला आणि विचारमग्न झालेल्या धृतराष्ट्रापाशीं अकस्मात् जाऊन भरतांचा पितामह भीष्म युद्धांत पडल्याची वार्ता दुःखित मनानें सांगूं लागला.

**संजय**—हे महाराज, मी संजय आलों आहें. आपल्याला नमस्कार करितों. हे भरतश्रेष्ठा, काय सांगूं! भरतांचा पितामह शांतनव आज युद्धांत हत झाला. तो कुरुपितामह सर्व योद्ध्यांचा जणुकाय ध्वज होता. सर्व धनुर्धरांचें साक्षात् तेजच होता. तो आज शरपंजरीं निजला आहे. ज्याच्या बाहुबलाचा आश्रय करून तुझ्या पुत्रांनीं द्यूत केलें, तो भीष्म शिखंडीच्या हातून वध पावून रणांगणावर शयन करीत आहे. राजा, ज्या महारथानें पूर्वी काशिपुरीमध्यें महायुद्धांत जमलेल्या सर्व पृथ्वीपालांना एका रथानें जिंकलें, ज्यानें

परशुरामाशीं निर्भयपणें युद्ध केलें, पण जामदग्न्य ज्याचा वध करूं शकला नाहीं, तो आज शिखंडीकडून हत झाला.

हे प्रभो, जो इंद्रासारखा शूर, हिमालयासारखा स्थिर, समुद्रासारखा गंभीर व पृथ्वीसारखा क्षमाशील होता; ज्या नरसिंहाच्या शर याच दाढा, धनुष्य हेंच मुख व खड्ग हीच जिव्हा होती, त्या तुझ्या दुरासद पित्याला पांचाल्यानें आज युद्धांत पाडलें. राजा, सिंहाला पाहून गाईंचा कळप जसा भयभीत होतो, तद्वत् युद्धांत सज्ज झालेल्या भीष्माला पाहून पांडवांचें महासैन्य भयानें उद्विग्न होऊन थरथरां कापूं लागलें. त्या वीरानें दहा रात्रीं कौरवसेनेचें रक्षण केलें आणि अतिशय दुष्कर कर्म करून तो महात्मा आदित्याप्रमाणें अस्त पावला. ज्यानें इंद्राप्रमाणें अक्षुब्ध राहून सहस्रावधि बाणांची वृष्टि केली आणि प्रत्यहीं दहा हजार योद्ध्यांचा वध करण्याविषयीं केलेल्या आपल्या प्रतिज्ञेप्रमाणें दहा दिवसांत एक अब्ज योद्ध्यांचा संहार केला, तो महारथ आज वातभग्न वृक्षाप्रमाणें पतन पावून भूमीवर शयन करीत आहे. राजा, तो महाबाहु अशा प्रकारच्या वधाला पात्र नव्हता; परंतु हें सर्व तुझ्या अविचाराचें फल आहे. ६. ३. १३.

---

## अध्याय १४ वा.

[ १ भीष्मवधाविषयीं धृतराष्ट्राचे संजयाला प्रश्न व शोक. ]

(१) धृतराष्ट्र—हे संजया, तूं हें सांगतोस तरी काय ? अरे, कुरूंचा सिंह शिखंडीच्या हातून कसा हत झाला ! तो माझा इंद्रतुल्य पिता भीष्म रथांतून कसा पडला ! माझे योद्धे भीष्मरहित झाले असें तूं मला सांगतोस तरी कसें ! अरे, अरे, ज्या सत्यप्रतिज्ञ वीरानें पित्यासाठीं आजन्म ब्रह्मचर्य पालन केलें, तो बलाढ्य, महाप्राज्ञ, धनुर्धर नरव्याघ्र हत झालेला पाहून तुझ्या मनाची काय स्थिति झाली ती मला सांग. तो कुरूंचा वृषभ, अचल पुरुषश्रेष्ठ हत झाल्याचें तूं मला सांगत आहेस. पण हें वृत्त ऐकून माझें मन अत्यंत व्याकुल होत आहे.

हे संजया, तो माझा पिता युद्धाला निघाला असतां त्याच्याबरोबर कोण कोण वीर गेले ! त्याच्यापुढें कोण होते ! त्याच्या समीप कोण राहिले ? परत

कोण फिरले आणि त्याला कोण अनुसरले ! त्याचप्रमाणें शत्रुसैन्यांत प्रवेश करणाऱ्या त्या क्षत्रियश्रेष्ठाच्या मागोमाग कोणते शूर गेले ? तें मला सांग.

हे गावल्गणे, सहस्त्ररश्मि सूर्य जसा अंधकाराला दूर घालवितो, त्याचप्रमाणें शत्रुसैन्यास केवल दृष्टिक्षेपानेंच भयभीत करणाऱ्या भीष्मानें रणांगणांत पांडुपुत्रांशीं दुष्कर कर्म केलें. हे संजया, तूं त्याच्या समीप उभें राहून तें सर्व प्रत्यक्ष पाहिलेंच आहेस. शत्रूंच्या सैन्याला ग्रासणाऱ्या त्यानें शत्रूंना वेढून टाकिलें असेल. तूं तें त्याचें महत् कर्म प्रत्यक्ष अवलोकन केलें असशील. पण अशा दुराधर्ष शान्तनवाचें पांडवांनीं युद्धांत कसें निवारण केलें ? त्या अजिंक्य पुरुषव्याघ्राला कौंतेयांनीं रणभूमीवर कसें पाडलें ? त्या उग्र धनुष्य धारण करणाऱ्या, श्रेष्ठ रथांत स्थित होऊन आपल्या बाणांनीं शत्रूंच्या मस्तकांना अणुकाय पुष्पवत् सहज खुडून टाकणाऱ्या व कालाग्नीप्रमाणें दुर्धर्ष असलेल्या त्या गांगेयाला रणांगणांत पाहूनच पांडवांचें सैन्य नित्य मूर्छित होत असे, ज्यानें दहा अहोरात्र शत्रुसैन्याला त्रस्त केलें, तो वीर अतिशय दुष्कर कर्म करून आज सूर्याप्रमाणें अस्त कसा पावला ! खरोखर तो धनुर्धर अशाप्रकारच्या मृत्यूला योग्य नसतांहि केवल माझ्या अविचारानें युद्धांत पडला ना !

बा संजया, भीमपराक्रमी भीष्माला पाहून त्यावर प्रहार करण्यास पांडवांचे सैनिक धजले तरी कसे ! पांडुपुत्रांनीं पितामहाशीं संग्राम तरी कसा केला ! आणि हे संजया, द्रोण जिवंत असतां त्याच्या समक्ष भीष्म पराजय कसा पावला ! त्याचप्रमाणें कृप व अश्वत्थामा हे दोघे संनिध असतां प्रहार करणारांतील श्रेष्ठ भीष्म युद्धांत कसा हत झाला !

देवांनाहि दुरासद असलेल्या त्या अतिरथाचा शिखंडीनें युद्धांत कसा वध केला ! ज्यानें महाबलाढ्य जामदग्न्याशीं रणांत स्पर्धा केली, शक्रतुल्य पराक्रमी असलेला जो सत्यव्रत जामदग्न्यालाहि अजिंक्य झाला, त्या महारथकुलोद्भवाचा आज समरांत वध कसा झाला !

बा संजया, माझ्या मनाला मुळींच शांति वाटत नाहीं. यास्तव माझ्या पुत्रांपैकीं त्या महाधनुर्धराचा युद्धांत त्याग कोणीं केला आणि ज्यांना दुर्यो-

---

१ येथें कांहीं श्लोक एकाच अर्थी व पुनः पुनः तेच ते असल्यामुळें पुनरुक्तीचा दोष टाळण्यासाठीं त्यांचा अर्थ घेतला नाहीं.

धनानें आज्ञा केली आहे, अशा कोणत्या वीरांनीं शत्रूचें निवारण केलें! तें मला सांग. शिखंडिप्रभृति सर्व पांडव भीष्मावर चाल करून गेले काय ? किंवा सर्व कौरव त्या अचल वीराला सोडून गेले नाहींतना ? खरोखर, माझें हृदय लोखंडाचेंच असलें पाहिजे, म्हणूनच पुरुषश्रेष्ठ भीष्म हत झाल्याचें ऐकूनहि तें विदीर्ण होत नाहीं !

ज्या अप्रमेय दुर्धर्ष भरतश्रेष्ठाच्या ठिकाणीं सत्य, मेधा व नीति स्थित होती, तो युद्धांत कसा निधन पावला ! ज्याच्या धनुष्याचा टणत्कार मेघगर्जनेप्रमाणें व शराचा महाशब्द विद्युल्लतेच्या कडकडाटाप्रमाणें होत असे, त्या वीरानें दानवांचा संहार करणाऱ्या इंद्राप्रमाणें शत्रूंच्या रथांचा नाश करीत पांचाल व सृंजय यांच्यासह कौंतेयांवर बाणांची वृष्टि कशी केली, तें मला सांग. त्यावेळीं त्याचा तो अस्त्रसमुद्रच भासत असेल. दुरासद बाण हे त्यांतील घोर नक्र, क्षणोक्षणीं चलित होणारीं धनुष्यें या लाटा, गदा व खड्ग हे त्याच्या आश्रयानें रहाणारे मकर, अश्व-गजांचीं मंडलें हेच आवर्त, सैन्यांतील पदाति हे मत्स्य, शंख-दुंदुभींचा निस्वन हीच समुद्राची गर्जना, शत्रूसैन्याचा नाश करणाऱ्या त्या समररूपी सागरांत अनेक अश्व, गज व रथी मोठ्या वेगानें शिरत असतील !

हे संजया, आपल्या तेजानें व क्रोधानें तो वीर जेव्हां समुद्रांतील वडवानलाप्रमाणें प्रज्वलित झाला, त्यावेळीं समुद्रतीरावर उभ्या रहणाऱ्या माणसाप्रमाणें कोणत्या वीरांनीं त्याचें निवारण केलें ! तें मला सांग.

दुर्योधनाच्या हितासाठीं भीष्मानें समरांगणांत जेव्हां हें दुष्कर कर्म केलें, तेव्हां त्याच्या पुरोभागीं कोण होते ! अमित तेजस्वी भीष्माच्या दक्षिण रथचक्राचें रक्षण कोणीं केलें ! त्या नियतव्रताच्या पृष्ठभागीं स्थित होऊन शत्रूच्या वीरांचें निवारण कोणीं केलें ! भीष्माचें पुढल्या बाजूनें रक्षण करण्यासाठीं त्याच्या समीप कोण उभे होते ! त्या युद्ध करणाऱ्या वीराच्या उत्तरचक्राचें कोणत्या वीरांनीं रक्षण केलें ! त्याचप्रमाणें डाव्या बाजूच्या चक्राजवळ राहून सृंजयांशीं कोणीं युद्ध केलें ! सैन्याच्या अग्रभागीं स्थित होऊन त्या दुरासद गांगेयाचें कोणत्या वीरांनीं रक्षण केलें ! दुर्गम गतीला प्राप्त होणाऱ्या त्या महात्म्याचें पाठीमागून कोणीं रक्षण केलें ! हे संजया, समरांगणांत शत्रूच्या वीरांशीं कोणीं प्रतियुद्ध केलें, तें मला कथन कर.

हे गावल्गणे, पांडवांचें सैन्य जरी दुर्जय असलें तरी वीरांच्या कडून रक्षण केला गेलेला हा भीष्म कसा जिंकला गेला ! देवांना जसा सर्व लोकेश्वर प्रजापति तसाच हा भीष्म असतांना पांडव त्याच्यावर प्रहार करण्यास कसे धजले ! एकाद्या द्वीपाप्रमाणें असलेल्या ज्या पितामहाच्या आश्वासनावर कौरवांनीं शत्रूंशीं युद्ध आरंभिलें, तो नरव्याघ्र मृत्युमुखीं पडल्याचें तूं कसें सांगत आहेस ! ज्या बृहद्बलाच्या बाहुबलाच्या आश्रयावर माझ्या पुत्रानें पांडवांची गणना केली नाहीं, तो शत्रूकडून कसा हत झाला ! पूर्वीं दानवांशीं युद्ध करण्याच्या प्रसंगीं सर्व देवांनीं साह्यार्थ ज्याची प्रार्थना केली होती, तो माझा महाव्रत पिता आज युद्धांत कसा पडला !

जो महावीर्यवान् पुत्रश्रेष्ठ उत्पन्न झाला असतां लोकप्रसिद्ध शान्तनूचें दैन्य, शोक व दुःख नाहींसें झालें ! ज्याची लोकामध्यें प्राज्ञ, परायण, स्वधर्मनिरत, शुचि व वेद-वेदाङ्गज्ञ अशी प्रसिद्धि आहे, तो हत झाला, असें कसें सांगतोस ! सर्वास्त्रविनयोपेत, शान्त, दान्त व मनस्वी, असा शान्तनव हत झाल्याचें ऐकून कौरवांचें अवशिष्ट असलेलें सैन्यच हत झालें, असें मला वाटत आहे.

ज्याअर्थीं पांडव आपल्या वृद्ध पितामहाचा वध करून राज्याची इच्छा करीत आहेत, त्याअर्थीं धर्माहून अधर्मच बलवान् आहे, असें मला वाटूं लागलें आहे. पूर्वीं अंबेसाठीं सर्वास्त्रवेत्ता जामदग्न्य राम युद्धाला उद्युक्त झाला असतां ज्या भीष्मानें त्याला रणांत जिंकिलें, तो इंद्रतुल्य कर्मे करणारा, सर्व धनुर्धरांचा अग्रणी हत झाल्याचें वर्तमान तूं मला सांगत आहेस, याहून अधिक दुःखकर तें काय असणार ! शत्रूंच्या वीरांचा घात करणाऱ्या वीर जामदग्न्यानें अनेकदा क्षत्रियांच्या समुदायांना युद्धांत जिंकलें, पण तो ज्या भीष्माचा वध करूं शकला नाहीं, त्याचा आज शिखंडीनें वध केला ! ज्याअर्थीं शिखंडीनें सर्वशास्त्रविशारद, परमास्त्रवित्, कृतास्त्र व शूर भीष्माचा वध केला, त्याअर्थीं युद्धदुर्मद महावीर्यवान् भार्गवापेक्षां त्या द्रुपदात्मजाचें तेज, बल व वीर्य अधिक असलें पाहिजे.

हे संजया, भीष्माचें पांडवांशीं युद्ध चाललें असतां कोणते वीर त्या शत्रूचा संहार करणाऱ्या शूराला अनुसरले, तें मला सांग. आज हत झालेल्या योद्ध्यांच्या स्त्रियांप्रमाणेंच माझ्या पुत्रांची सेनहि अनाथ झाली आहे. किंवा गोपालावांचून गायींचा कळप जसा इतस्ततः पसरतो, तशी भीष्मावांचून माझ्या सैन्याची

स्थिति झाली आहे. ज्या श्रेष्ठ वीराच्या अंगीं त्रिभुवनांतील पुरुषार्थ होता, तो या महायुद्धांत परलोकप्रिय झाला असतां तुमच्या मनाला काय वाटलें ! बा संजया, अशा धार्मिक व महावीर्यवान् पितामहाचा आमच्या समक्ष जर शत्रूकडून वध होऊं दिला, तर आमच्या अस्तित्वाचा उपयोग तरी काय राहिला ! अगाध जलामध्यें नाव बुडालेली पाहून तीरस्थ लोक जसे दुःखित होतात, तसे भीष्म हत झालेला पाहून माझे पुत्र शोकाकुल झाले असतील ! खरोखर, माझें हृदय लोखंडाचेंच असलें पाहिजे. म्हणूनच पुरुषव्याघ्र भीष्म हत झाल्याचें ऐकूनहि तें विदीर्ण होत नाहीं. अरे, अरे, जो दुर्धर्ष पुरुषश्रेष्ठ अप्रमेय अस्त्रें, बुद्धि व नीति यांनीं युक्त होता, तो युद्धांत कसा पडला ! यावरून हेंच सिद्ध होतें कीं, अस्त्रें, शौर्य, तप, मेधा, धैर्य किंवा त्याग यांतील कशानेंहि मृत्यूचें निवारण करतां येत नाहीं. खरोखर कालच अतिशय समर्थ आहे, व त्याचें कोणालाहि उल्लंघन करतां येत नाहीं. त्यामुळेंच आज भीष्मासारखा अजिंक्य वीर हत झाल्याचें तूं मला सांगत आहेस !

पुत्रांच्या शोकानें संतप्त झालेला मी 'भीष्मच माझा त्राता आहे' असें मानीत होतों, ती आशा आज नाहींशी झाली. दुर्योधनानें जेव्हां शांतनव भीष्माला आदित्याप्रमाणें भूमीवर पडलेलें पाहिलें, तेव्हां त्यानें काय केलें? संजया, मीं पुष्कळ विचार करून पाहिला असतां मला शेवटीं आपल्या किंवा शत्रूच्या सैन्यांतील एकहि नृपाल शिल्लक राहील असें वाटत नाहीं. ऋषींनीं घालून दिलेला हा क्षात्रधर्म खरोखर दारुण आहे. त्या क्षात्रधर्माचा आश्रय करूनच पांडव शांतनवाचा वध करून राज्याची इच्छा करीत आहेत आणि आम्हीहि त्या महाव्रताला मृत्युमुखीं देऊन राज्याचा अभिलाष धरीत आहों. सर्व आपत्तींमध्यें क्षत्रियांचें हें कर्तव्यच आहे. तस्मात् क्षात्रधर्मांत स्थित असलेले पांडव व माझे पुत्र यांच्याकडे कांहीं अपराध नाहीं.

हे सूता, जो अपराजित भीष्म पराक्रम व श्रेष्ठ शक्ति यांनीं युक्त होता, जो शत्रुसैन्याचा संहार करीत होता, त्याचें पांडुपुत्रांनीं निवारण कसें केलें, त्यांची सैन्यरचना कशाप्रकारची होती ? त्या महात्म्यांचें परस्परांशीं युद्ध कसें झालें ? तें मला सांग. बा संजया, तो माझा पिता शत्रूंच्या हातून कसा रे वध पावला ! भीष्म हत झाला असतां शकुनि, दुःशासन, दुर्योधन व कर्ण हे सर्व द्यूतकार काय म्हणाले ?

ज्या समरांगणरूपी द्यूतसभेंत नर, गज व अश्व यांचीं मृतशरीरें हींच आस्तरणें पसरलीं होतीं, महाभयंकर शर, शक्ति, महाखड्ग व तोमर हेच अक्ष आणि प्राण हेंच पणास लावलेलें द्रव्य होतें, त्या युद्धभूमीवर कोण-कोणत्या नरश्रेष्ठांनीं प्रवेश केला! व युद्धरूपी द्यूत केलें? त्यांतील कोणीं जिंकलें? कोण जिंकले गेले व शांतनव भीष्माखेरीज दुसरे कोण कोण पडले तें सर्व मला सांग.

माझा पिता भयंकर पराक्रम करणारा होता. युद्धाला 'शोभा आणणारा होता. त्या माझ्या पूज्य पित्याचा–देवव्रताचा युद्धांत वध झाल्याचें ऐकून माझ्या मनाची शांति नाहींशी झाली आहे.

आतां माझ्या पुत्रांचा नाश होणार ही दारुण चिंता माझ्या हृदयांत दृढ रुतली आहे आणि हे संजया, त्यांत तूंहि अग्नींत घृत ओतल्याप्रमाणें मला उद्दीपित करीत आहेस. सर्व लोकांत प्रसिद्ध असलेल्या भीष्मानें फार मोठा भार आपल्या शिरावर धारण केला होता, पण तो हत झालेला पाहून माझे पुत्र शोक करीत असावेत, असें मला वाटतें. दुर्योधनाचा तो विलाप ऐकण्याची माझी इच्छा आहे. यास्तव हे संजया, तेथील सर्व वृत्तान्त मला सांग. माझ्या मंदमति पुत्रांनीं त्या संग्रामांत जें कांहीं चांगलें किंवा वाईट आचरण केलें असेल, तें सर्व मला कथन कर. त्याचप्रमाणें जयाची इच्छा करणाऱ्या तेजस्वी भीष्मानें त्या युद्धांत जें कांहीं उज्ज्वल कृत्य केलें असेल, तें सर्व मला सविस्तर कथन कर. तसेंच कौरव-पांडवांच्या सैन्यांचें युद्ध कसें झालें आणि कोणत्या काळीं काय घडलें, तें सर्व मला क्रमानें निवेदन कर. ६. ३. १४.

---

## अध्याय १५ वा.

[ १ संजयानें धृतराष्ट्राला दिलेला दोष. २ दुर्योधन-दुःशासन संवाद. ]

( १ ) संजय—हे महाराज, तुझा हा प्रश्न योग्य आहे, तथापि तूं भीष्मवधाचा दोष जो दुर्योधनाला देऊं पहात आहेस, तें मात्र युक्त नाहीं. जो मनुष्य स्वतःच्या दुश्चरितानें दुःखाला प्राप्त होतो, त्यानें आपल्या त्या पापकृतीचा दोष दुसऱ्याला देणें योग्य नव्हे. जो पुरुष मनुष्यलोकीं जेवढें निंद्य

---

१ य आत्मनो दुश्चरितादशुभं प्राप्नुयान्नरः।
एनसा तेन नान्यं स उपाशङ्कितुमर्हति ॥

आहे, तेवढेंच सर्व आचरतो, व सर्व लोकांनीं निंद्य मानलेली कृति करितो तो वध्य होय. ( त्याचा नाश करण्यांत यत्किंचित्हि पाप लागत नाहीं. ) निष्कपट पांडवांनीं अमात्यांसह केवल तुझ्याकडे पाहून सर्व अपराध सहन केले व दीर्घकाल वनवासहि भोगला.

हे महीपाल, अमित तेजस्वी राजे, अश्व व गज यांचा जो वृत्तान्त मीं प्रत्यक्ष पाहिला व योगबलानें जाणला तो सर्व सांगतों, ऐक. व्यर्थ शोक करूं नको. ज्या तुझ्या पित्याच्या प्रसादानें मला दिव्य ज्ञान व अतींद्रिय दृष्टि प्राप्त झाली, त्याचप्रमाणें दूरच्या भाषणाचें श्रवण करितां आलें, भूत-भविष्यत्कालीन वृत्त कळलें परचित्ताचें आविष्करण झालें, शास्त्राज्ञेहून विपरीत–उन्मार्गानें जाणाराची कृति जाणण्यास व आकाशमार्गानें गमन करण्यास समर्थ झालों आणि युद्धांत अस्त्रापासून अलिप्त राहिलों, त्या महात्म्या व्यासमहर्षीला मी प्रथम नमस्कार करून तुला सविस्तर वृत्तान्त सांगतों. हे राजा, भारतांचें परम अद्भुत व अंगावर रोमांच उभे करणारें जें युद्ध झालें, त्याचें वर्णन करितों, तें लक्षपूर्वक ऐक.

( २ ) हे महाराज, तीं सर्व सैन्यें सज्ज होऊन व्यूह रचून उभीं राहिलीं असतां दुर्योधन दुःशासनाला म्हणाला—" हे दुःशासना, भीष्माचें रक्षण करण्यासाठीं सत्वर रथ सज्ज कर व सर्व सैन्यालाहि सज्ज होण्याची प्रेरणा कर. ससैन्य पांडव व कौरव यांच्या ज्या संग्रामाची मी अनेक वर्षांपासून प्रतीक्षा करीत होतों, तो समय आतां प्राप्त झाला आहे. या प्रसंगीं भीष्माच्या रक्षणावांचून अधिक श्रेष्ठ कर्तव्य कांहीं आहे, असें मला वाटत नाहीं. कारण तो जर सुरक्षित असला, तर तो सृंजय, पार्थ व सोमक यांचा वध करील.

तो गांगेय विशुद्धात्मा आहे. शिखंडी पूर्वी स्त्री होता, असें त्यानें ऐकलें होतें, त्यासाठीं मी ' त्याच्यावर प्रहार करणार नाहीं ' अशी त्या महात्म्यानें प्रतिज्ञा केली. यास्तव आपण भीष्माचें विशेषप्रकारें रक्षण केलें पाहिजे. शिखंडीचा वध करण्यासाठीं माझे सर्व सैनिक सज्ज होवोत. त्याचप्रमाणें अस्त्रांत कुशल असलेले योद्धे पूर्व, पश्चिम, दक्षिण व उत्तर या चारी दिशांतून पितामहाचें रक्षण करोत.

अरक्षित सिंह बलवान् जरी असला तरी कोल्हाहि त्याला मारूं शकतो, यास्तव शिखंडिरूपी जम्बूकाच्या हातून आमच्या पितामह सिंहाचा वध आम्हीं होऊं देऊं नये. अर्जुनाच्या रथाचें डावें चक्र युधामन्यु व उजवें चक्र

उत्तमौजा यांच्याकडून रक्षिलें जात आहे. ते दोघे अर्जुनाचें रक्षण करीत असून अर्जुन शिखंडीचें रक्षण करीत आहे. यास्तव ज्याचा भीष्मानें त्याग केला आहे व अर्जुन संरक्षण करीत आहे, तो शिखंडी भीष्माचा वध न करील अशी योजना कर.” ६. ३. १५.

---

## अध्याय १६ वा.

[ १ कौरवांच्या अकरा अक्षौहिणी सैन्याचें वर्णन. ]

( १ ) संजय—हे महाराज, त्यानंतर रात्र संपली असतां गर्जना करणाऱ्या राजांचा ‘ सज्ज व्हा, सज्ज व्हा ’ असा फार मोठा शब्द झाला. शंख व दुन्दुभि, यांचा ध्वनि, वीरांचा सिंहनाद, घोड्यांचें खिंकाळणें, रथचक्राचा घोष, हत्तींचा चीत्कार, योद्धयांची गर्जना व शस्त्रांचा खणखणाट, यांनीं सर्व दिशा निनादित झाल्या. हे राजेंद्रा, सूर्योदय होतांच तुझ्या पुत्रांचें व पांडवांचें सैन्य आपलीं शस्त्रें, कवचें व दुष्प्रधृष्य अस्त्रें यांनीं सज्ज झालें आणि रणांगणांत तीं प्रवेश करतांच त्यांचीं तेजस्वी कवचें व शस्त्रें सूर्यप्रकाशांत देदीप्यमान दिसूं लागलीं.

तेथें सुवर्णानें भूषविलेले गज विद्युद्युक्त मेघांप्रमाणें शोभत होते. रथ व सैन्यें नगराप्रमाणें भासलीं. त्यांच्या मध्यभागीं तुझा पितामह पूर्णचंद्राप्रमाणें अतिशय शोभला. हे विशांपते, धनुष्यें, ऋष्टि, खड्ग, गदा, शक्ति, तोमर इत्यादि सर्व शुभ्र आयुधें घेऊन योद्धे सैन्यांत स्थित होते. परसैन्याच्या बंधनार्थ सहस्रावधि योद्धे सज्ज होते. तुझ्या व शत्रूंच्या सैन्यांत विविधाकाराचे असंख्य तेजस्वी ध्वज दृष्टीं पडत होते. त्यांतील कांहीं सोनेरी, रत्नजडित व अग्नीप्रमाणें प्रज्वलित दिसत होते. इंद्रभुवनावर शोभणाऱ्या शुभ्र इंद्रध्वजाप्रमाणें सहस्रावधि ध्वजयुक्त हत्तीवर आरूढ होऊन सज्ज झालेले योद्धे युद्धाविषयीं उत्सुक झालेले दिसत होते. त्या सर्वांनीं विचित्र तलत्राणें व भाते बांधले होते. ते इतर आयुधें घेऊनहि सज्ज झाले होते. वृषभासारखे विशाल नेत्र असलेले ते सर्वश्रेष्ठ योद्धे सैन्याच्या अग्रभागीं शोभत होते.

शकुनि, शल्य, आवन्त्य, जयद्रथ, कैकेयदेशाचे विंदानुविंद, काम्बोजाधीश सुदक्षिण, कलिंगदेशाचा श्रुतायुध, राजा जयत्सेन, कोसलाधिपति बृहद्बल आणि सात्वत कृतवर्मा हे दहा वीर दहा अक्षौहिणी सैन्यांचे अधिपति होते.

हे सर्व पुरुषव्याघ्र यज्ञांत विपुल दक्षिणा देणारे व शूर होते. त्यांचे बाहू परिघासारखे दीर्घ होते. या दहा सेनाधिपाशिवाय आणखींहि महारथी राजे व राजपुत्र कवचें चढवून आपापल्या सैन्यांत उभे होते. ते सर्व नीतिमान् असून दुर्योधनाच्या आज्ञेप्रमाणें वागणारे होते. ते बलाढ्य योद्धे युद्धविशारद होते. त्या सर्वांनीं दुर्योधनासाठीं संतुष्ट चित्तानें या युद्धांत जणुकाय मरणाची दीक्षाच घेतली होती. याप्रमाणें दहा अक्षौहिणी समर्थ सेना सज्ज होती. धार्तराष्ट्रांची अकरावी अक्षौहिणी सेना महासेनेनें युक्त असून ती सर्व सैन्याच्या अग्रभागीं होती. सर्व सैन्याच्या अग्रभागीं शान्तनव भीष्म सज्ज होऊन आपल्या श्रेष्ठ रथांत स्थित होता. त्या गांगेयानें शुभ्र शिरस्त्राण धारण केलें होतें. त्याचें कवच शुभ्र होतें व रथाचे अश्वहि शुभ्रच होते. याप्रमाणें श्वेत आभरणांनीं युक्त असलेला तो पितामह उदय पावणाऱ्या चंद्राप्रमाणें शोभला. सुवर्णाच्या तालध्वजानें अलंकृत असलेल्या शुभ्र रथांत शोभणारा भीष्म श्वेत अभ्रांनीं युक्त असलेल्या सूर्याप्रमाणें कौरव-पांडवांना दिसला.

मुख पसरून जांभई देणाऱ्या महासिंहाला पाहून क्षुद्र मृग जसे भयभीत होतात, तसे या कुरुसिंहाला पाहून सृंजय व धनुर्धर धृष्टद्युम्नादि सर्व योद्धे वारंवार उद्विग्न झाले. याप्रमाणें श्रीनें युक्त असलेलें तुझें एकादश अक्षौहिणी सैन्य रणांगणाच्या एका भागांत स्थित होतें.

त्याचप्रमाणें महापुरुषांनीं रक्षण केलेलें पांडवांचें सात अक्षौहिणी सैन्य कुरुक्षेत्राच्या दुसऱ्या भागांत पूर्वाभिमुख स्थित होतें. तीं दोन्ही सैन्यें उन्मत्त मकर, आवर्त व भयंकर सुसरी यांनीं व्याप्त असलेल्या आणि युगान्तसमयीं क्षुब्ध झालेल्या दोन सागरांप्रमाणें भासलीं. हे राजन्, कौरवांच्या या असंख्य सैन्यासारखा जनसंमर्द मीं यापूर्वी कधीं पाहिलाहि नव्हता किंवा ऐकिलाहि नव्हता. ६. ३. १६.

---

## अध्याय १७ वा.

[ १ दुश्चिह्नांचें वर्णन. २ भीष्माचा राजांस आदेश. ३ सैन्यरचनेचें वर्णन. ]

( १ ) **संजय**—हे महाराज, कृष्णद्वैपायन व्यासानें जसें सांगितलें होतें, त्याचप्रमाणें सर्व महीपाल एकत्र होऊन रणांगणांत जमले. मघा म्ह० पित्र्य नक्षत्र, त्याचा जो देश तो पितृलोक, तेथें सोम म्ह० चंद्र जेव्हां गेला, त्या

दिवशीं युद्धाला आरंभ झाला. तेव्हां अंतरिक्षांत देदीप्यमान सात महाग्रह परस्परांच्या समीप आले होते. त्या दिवशीं सूर्य उदयकालीं द्विधा झाल्या-प्रमाणें भासला. रवीचीं किरणें प्रदीप्त ज्वालांप्रमाणें दिसलीं. मृतशरीरांचें मांस व शोणित यांच्या भोजनाची इच्छा करणारे गोमायु व वायस प्रदीप्त दिशेंत कर्कश शब्द करूं लागले.

प्रत्येक दिवशीं प्रातःकालीं उठतांच वृद्ध कुरुपितामह भीष्म आणि भरद्वा-जात्मज द्रोण हे दोघेहि सज्ज होऊन 'पांडुपुत्रांचा जय होवो' असें म्हणत असत आणि प्रतिज्ञेप्रमाणें तुझ्यासाठीं युद्ध करीत असत. त्यावेळीं तुझा सर्वधर्म-विशेषज्ञ पिता देवव्रत सर्व राजांना एकत्र जमवून असें म्हणाला—

( २ ) "हे क्षत्रियश्रेष्ठहो, स्वर्गाचें हें फार मोठें द्वार उघडलें आहे, त्यांतून तुम्ही सर्व प्रवेश करा आणि इंद्राच्या व ब्रह्मदेवाच्या सलोकतेला प्राप्त व्हा. तुमच्या पूर्वजांनीं आणि त्यांच्याहि पूर्वजांनीं हाच कायमचा मार्ग आक्रमिला आहे. यास्तव तुम्ही अव्यग्रमनानें या युद्धाचा विचार करा. पूर्वीचे नाभाग, ययाति, मांधाता, नहुष व नृग इत्यादि राजे अशाच प्रकारच्या कर्मांनीं परम स्थानाला प्राप्त झाले आहेत. क्षत्रियानें व्याधिग्रस्त होऊन घरांतील अंथरुणावर पडून मरणें, हा अधर्म आहे. शस्त्राघातानें मरण येणें, हाच त्याचा सनातन धर्म आहे."

( ३ ) भीष्माचें हें भाषण ऐकून आपापल्या श्रेष्ठ रथांत शोभणारे ते सर्व वीर आपापल्या सैन्यांकडे निघून गेले. भीष्म युद्ध करीपर्यंत अमात्य व बंधु यांच्यासह कर्णानें समरांत शस्त्रत्याग केलाच होता. त्यानंतर कर्णविरहित अस-लेले तुझे पुत्र व इतर राजे आपल्या सिंहनादानें दशदिशा निनादित करीत निघाले. ती सेना श्वेत छत्रें, पताका, ध्वजांनीं युक्त असलेले अश्व व गज, गजसादी व पदाति यांच्या योगानें शोभत होती. भेरी, पणव यांचा शब्द, दुन्दुभींचा निस्वन, रथनेमींचा निर्घोष, यांच्या योगानें समग्र पृथ्वी व्याकुल झाली. सुवर्णाचे अंगद, केयूर, व धनुष्यें धारण करणारे महारथ अग्नियुक्त पर्वताप्रमाणें शोभले. कुरुसैन्याच्या अग्रभागीं तेजस्वी भीष्म आपल्या पंच-तारयुक्त ध्वजानें विमल सूर्याप्रमाणें प्रकाशत होता. तुझ्या पक्षांतील इतर राजे भीष्मानें नियत केलेल्या स्थानीं स्थित झाले.

आपल्या देशांतील गोवासन राजांसह शैब्य, राजाला योग्य अशा ध्वजानें युक्त असलेल्या श्रेष्ठ गजावर आरूढ होऊन पुढें चालला होता. ज्यावर सिंहाच्या

पुच्छाचें चिह्न आहे, अशा ध्वजासह अश्वत्थामा तुझ्या सर्व सेनेच्या अग्रभागीं स्थित होता. श्रुतायुध, चित्रसेन, पुरुमित्र, विविंशति, शल्य, भूरिश्रवा व महारथी विकर्ण हे सातहि महाधनुर्धर श्रेष्ठ कवचें चढवून उत्तम रथावर आरूढ होऊन द्रोणपुत्राला पुढें करून भीष्माच्या अग्रभागीं उभे होते. या सातहि वीरांच्या रथांवर सुवर्णाचे उच्च ध्वज शोभत होते. द्रोणाचार्यांच्या रथावर सुवर्णाची वेदी, कमंडलु व धनुष्य यांनीं भूषित झालेला ध्वज होता.

ज्याच्या मागून सहस्रावधि सैनिक चालले आहेत, त्या दुर्योधनाचा हत्ती रत्नजडित ध्वजानें युक्त होता. पौरव, कालिंग, सुदक्षिणासह कांबोज, क्षेमधन्वा व शल्य यांचे रथ पुढें होते. ज्याच्या ध्वजावर वृषभाचें चिह्न आहे, तो कृपाचार्य मागध सैन्याला घेऊन चालला होता. कृप व कर्णपुत्र वृषकेतु यांचें रक्षण करणारें प्राच्यांचें फार मोठें सैन्य शरत्कालच्या मेघाप्रमाणें शोभलें. जयद्रथाच्या रजतरथावर वराहचिह्नयुक्त ध्वज होता. तो महा यशस्वी वीर सेनेच्या अग्रभागीं उभा होता. त्याच्या बरोबर त्याला अनुसरणारे एक लक्ष रथ, ऐंशी सहस्र गज व साठ सहस्र पदाति होते. त्या असंख्य रथ-अश्व-गजांनीं युक्त असलेली व सिंधुपतीनें रक्षण केलेली ती सेना अतिशय शोभत होती. सर्व कलिंगांचा अधिपति केतुमानासह साठ सहस्र रथ व दश सहस्र गज यांसह चालला होता.

पर्वतप्राय प्रचंड गज, तोफा, भाते, तुणीर व पताका यांच्या योगानें शोभत होते. ज्यावर अग्नीचें चिह्न आहे अशा ध्वजानें कालिंगक विराजत होते. श्वेतछत्र, चामर, व्यजन आणि ध्वज यांनीं अलंकृत झालेले व विचित्र श्रेष्ठ अंकुशांनीं युक्त असलेले हत्ती समरांगणांत स्थित होते. ते मेघाच्छादित सूर्याप्रमाणें भासले. ते श्रेष्ठ गज आपल्या तेजानें देदीप्यमान दिसत होते.

राजा, भगदत्त गजारूढ होऊन इंद्राप्रमाणें समरांगणांत आला. त्याला संमत असलेले विन्दानुविंद गजस्कंधावर आरूढ होऊन त्या केतुमानाला अनुसरले. रथसैन्यांनीं युक्त असलेल्या त्या व्यूहाचें हत्ती हेंच अंग, नृपति हें मस्तक व अश्व हे पक्ष होते. त्याला सर्व बाजूनें मुखें होतीं. हे राजन्, द्रोण, भीष्म, आचार्यपुत्र, कृप व बाह्लिक यांनीं तें सैन्य रहित होतें ६. ३. १७

---

## अध्याय १८ वा.

[ १ सैन्याचेंच अधिक वर्णन. ]

(१) संजय—हे महाराज, त्यानंतर एका घटकेंत युद्धाला उत्सुक झालेल्या योद्धयांची फार मोठी गर्जना ऐकूं आली. ती हृदयविदारक होती. शंख, दुंदुभि, यांचा निस्वन, गजांचा चीत्कार, रथनेमींचा घोष, यांच्या शब्दांनीं पृथ्वी विदीर्ण होऊं लागली. अश्वांचें खिंखाळणें व योद्धयांचे सिंहनाद, यांनीं अंतरिक्ष व पृथ्वी एका क्षणांत निनादित झाली.

हे राजन्, पांडवांचें व तुझ्या पुत्रांचें अशीं दोन्ही दुर्धर्ष सैन्यें परस्परांच्या समागमांत कापूं लागलीं. त्या युद्धांत सुवर्णानें भुषविलेले गज व रथ विद्युद्युक्त मेघाप्रमाणें भासले. तुझ्या पुत्राचे ध्वज अनेक आकारांचे होते. सुवर्णाचे अंगदादिक प्रज्वलित अग्नीप्रमाणें प्रकाशत होते. तेजोमय आदित्याप्रमाणें कांचनाचीं कवचें धारण केलेल्या वीरांची प्रभा देदीप्यमान सूर्याप्रमाणें दिसत होती. कौरवांचे वीर विचित्र धनुष्यें धारण करून सज्ज होते. त्यांनीं तलत्राणें बांधलीं होतीं. विविध आयुधें व पताका धारण केल्या होत्या. ऋषभासारखे नेत्र असलेले ते धनुर्धर सैन्याच्या अग्रभागीं अतिशय शोभले.

हे नृपश्रेष्ठा, दुर्विषह, दुःशासन, दुर्मुख, दुःसह, विविंशति, चित्रसेन आणि महारथ विकर्ण यांनीं भीष्माच्या पृष्ठभागाचें रक्षण केलें. सत्यव्रत, पुरुमित्र, जय, भूरिश्रवा व शल आपल्या वीस हजार अनुयायी योद्धयांसह त्यांस अनुसरले. अभीषाह, शूरसेन, शिबि, वसाति, शाल्व, मत्स्य, अम्बष्ठ, त्रिगर्त केकय, सौवीर, कैतव आणि उत्तर, पूर्व व पश्चिम या दिशांचे अधिपति, असे बारा देशांचे शूर अधिप होते. ते सर्व जीवावर उदार होऊन फार मोठ्या रथसमूहांसह पितामहाचें रक्षण करीत होते. त्याच्या मागोमाग मागधराज दहा हजार गतिमान् गजांनीं युक्त असलेल्या आपल्या सैन्यासह स्थित होता. त्या सेनेंत रथांचे चक्ररक्षक आणि गजांचे पादरक्षक साठ सहस्र होते. त्याचप्रमाणें धनुष्य, ढाली, व खड्गें धारण करणारे पदाति अग्रभागीं चालले होते आणि नखर व प्रास यांनीं युद्ध करणारांचीं संख्या अनेक सहस्र होती. हे भारता, तुझ्या पुत्रांची ही अनेक अक्षौहिणी सेना गंगा व यमुना यांच्या संगमाप्रमाणें भासत होती. ६. ३. १८

---

## अध्याय १९ वा.

[ १ पांडवांच्या व्यूहाचें वर्णन. ]

( १ ) धृतराष्ट्र—हे संजया, आमची अकरा अक्षौहिणी सेना व्यूह रचून उभी असलेली पाहून युधिष्ठिरानें आपल्या अल्प सैन्यानें प्रतिव्यूह कसा रचला! त्या पांडवाला मानुष, दैव, गांधर्व आणि आसुर हे सर्व प्रकारचे व्यूह अवगत आहेत. त्यानें भीष्माच्या व्यूहापुढें कशी व्यूहरचना केली? तें मला सांग.

संजय—महाराज, कौरवसैन्य व्यूह रचून उभें आहे, हें पाहून धर्मात्मा धर्मराज धनंजयाला म्हणाला—"महर्षि बृहस्पतीच्या वचनावरून तज्ज्ञ असें म्हणतात कीं, अल्प सैन्य असलें तर तें एकत्र जमवून युद्ध करावें आणि विपुल असलें तर तें पसरून युद्ध करावें. जेव्हां पुष्कळ सैन्यासह अल्पसेनेला युद्ध करावयाचें असतें, तेव्हां सूचीमुख व्यूह रचितात. म्हणजे सुईच्या आकाराची निमुळती रचना करितात. आमचें सैन्य अल्प असून शत्रूचें विपुल आहे."

धर्मराजाचें हें भाषण ऐकून अर्जुन म्हणाला—"हे राजसत्तमा, मी इंद्राला विहित असलेला 'वज्र' या नांवाचा दुर्जय व अचल व्यूह रचतों. प्रहार करणारांतील श्रेष्ठ भीम समरामध्यें शत्रूला झंझावाताप्रमाणें दुःसह होतो. तो युद्धांतील सर्व उपाय जाणण्यांत निष्णात आहे. तो शत्रुसैन्याचा तेजोभंग करीत सैन्याच्या अग्रभागीं राहून युद्ध करील. सिंहाला पाहून क्षुद्र मृग जसे भयभीत होतात, त्याप्रमाणें या वृकोदराला पाहून सर्व कौरव त्रस्त होतील. सर्व देव जसे अमरेश्वर इंद्राचा आश्रय करितात, तसे आम्ही सर्व निर्भय होऊन प्राकारवत् असलेल्या भीमाचा आश्रय करूं. उग्र कर्में करणाऱ्या क्रुद्ध वृकोदराला पाहून त्याच्या पुढें येण्यास धजेल असा यालोकीं एकहि पुरुष नाहीं."

असें बोलून महाबाहु धनंजयानें त्याप्रमाणें व्यूहरचना केली व तो फाल्गुन आपल्या सैन्यासह निघाला. कुरुसैन्याकडे जात असलेली ती पांडवांची महाचमू जलानें तुडुंब भरलेल्या व मंद वहाणाऱ्या गंगानदीप्रमाणें भासली. त्या सेनेच्या अग्रभागीं भीमसेन होता. वीर्यवान् धृष्टद्युम्न, नकुल, सहदेव व धृष्टकेतु, त्याच्या बरोबर चालले होते. अक्षौहिणी सैन्यासह राजा विराट, आपले पुत्र व भ्राते यांना घेऊन पृष्ठभागाचें रक्षण करीत होता. भीमाच्या दोन रथचक्रांचें महाद्युतिमान् माद्रिपुत्र रक्षण करीत होते व वेगवान् सौभद्रासह पांच द्रौपदेय त्याच्या रथाच्या पृष्ठभागाचें रक्षण करीत होते. पांचाल्य धृष्टद्युम्न

शूर प्रभद्रक सैनिकांसह या सहा राजपुत्रांचें रक्षण करीत होता. त्याच्या मागें भीष्माचा विनाश करण्यासाठीं निघालेला शिखंडी होता व अर्जुन त्याचें संरक्षण करीत होता. अर्जुनाच्या पृष्ठभागीं बलाढ्य युयुधान होता. धृष्टकेतु व चेकितान यांच्यासह पांचाल्य युधामन्यु व उत्तमौजा त्याच्या रथचक्राचें रक्षण करीत होते.

हे राजन्, त्यावेळीं आपली लोखंडाची दृढ गदा हातीं घेऊन वेगानें निघालेला भीमसेन जणुकाय समुद्राचेंहि शोषण करीत आहे कीं काय असा भासला. त्यावेळीं अर्जुन ' हे भीमसेना, हे सर्व कौरव तुझ्याकडे पहात उभे आहेत, तो सर्व तुझा भाग आहे. त्यांना आतां तूं आपलें सामर्थ्य दाखीव ' असें म्हणाला.

अर्जुनाचें हें वचन ऐकून सर्व सैनिकांनीं स्तुतिपर शब्दांनीं पार्थाची प्रशंसा केली. पर्वतप्राय प्रचंड गजांच्या समूहांत सैन्याच्या मध्यभागीं कुंतीपुत्र युधिष्ठिर स्थित होता. उदार मनाचा यज्ञसेन अक्षौहिणी सैन्यासह पांडवांसाठीं विराटाला अनुसरला. त्याच्या मागोमाग महारथ धृष्टद्युम्न भ्राते व पुत्र यांसह युधिष्ठिराचें रक्षण करीत होता. त्या रथस्थ वीरांचे उत्तम सुवर्णानें भूषविलेले ध्वज आदित्य व चंद्रमा यांच्यासारखे प्रकाशत होते. त्यांच्या रथावरील ते महाध्वज विविध चिह्नांनीं युक्त होते. राजा, तुझ्या व शत्रूच्या रथावरील असंख्य ध्वजांचा पराभव करून अर्जुनाच्या एकाच रथावर महाकपि सर्वांहून उच्चस्थानीं झळकत होता. हातांत खड्ग व शक्ति घेतलेले सहस्रावधि पदाति अग्रभागीं राहून भीमसेनाचें रक्षण करीत होते. सुवर्णाच्या झुलींनीं अलंकृत केलेले दशसहस्र प्रचंड हत्ती देदीप्यमान पर्वताप्रमाणें शोभत होते. त्यांच्या गंडस्थलांतून होणारा मदस्राव कमलाच्या सुगंधानें युक्त होता. याप्रमाणें ज्यांच्या मस्तकावरून सुगंधयुक्त मदाचा स्राव होत आहे, असे ते विशाल गज वर्षाकालीन् पर्वतांप्रमाणें भासले. ते सर्व मदोन्मत्त गज राजा युधिष्ठिराला अनुसरले.

भीमसेन आपली परिघासारखी गदा घेऊन सूर्याप्रमाणें सर्व सेनेला तप्त करीत महासैन्याच्या पुढें चालला असतां दुष्प्रेक्ष्य झाला. त्यावेळीं सर्व योद्धे त्याच्या समीप जाऊन त्याला पहाण्यास असमर्थ झाले. अर्जुनानें रचलेला तो ' वज्र ' नामक व्यूह निर्भय होता. त्याला सर्व बाजूंनीं द्वारें होतीं. त्यांतील

धनुष्यें व ध्वज हीं विद्युल्लतेप्रमाणें चमकत होतीं. अशा प्रकारें पांडवांनीं ज्याचें रक्षण केलें आहे, तो व्यूह तुमच्या सैन्याच्या समोर होता. तो या मानुषलोकीं अजिंक्य होता.

याप्रमाणें सूर्योदयाच्या संधीला तीं दोन्ही सैन्यें व्यूहरचना करून उभीं असतां आकाशांत मेघ नसतांनाच विजेचा कडकडाट झाला. रुक्ष वायु वाहूं लागला. त्यामुळें अतिशय धूळ उडाली व तिच्या योगानें सर्व जगत् आच्छादित झालें. सूर्योदय होतांच पूर्वदिशेंत एक फार मोठी उल्का त्याच्यावर आपटून विजेसारखा कडकडाट झाला व ती विदीर्ण होऊन नाश पावली. तीं दोन्ही सैन्यें युद्धोन्मुख झालीं असतां सूर्य निस्तेज झाला व मोठा आवाज होऊन भूकंप झाला. पृथ्वी हादरली व विदीर्ण झाली. सर्व दिशांतून घोर शब्द येऊं लागला. अंतरिक्ष धूलीनें भरल्यामुळें कांहीं दिसेनासें झालें. सुवर्णाच्या माला, रेशमी वस्त्रें व घुंगरू बांधलेल्या सूर्यासारख्या देदीप्यमान अनेक ध्वजा वाऱ्यानें हालूं लागल्या असतां ' झणझण ' असा आवाज होऊन वाऱ्यानें हलणाऱ्या तालवनाचाच भास झाला.

याप्रमाणें तुमच्या पुत्रांच्या सैन्याला पराजित करणारा प्रतिव्यूह रचून पांडुपुत्र भीमसेनाला पुढें करून समरांगणांत स्थित होते. तेव्हां ते आमच्या योद्धयांच्या शरीरांतील मज्जा ग्रासून टाकतात कीं काय असा भास झाला. ६. ३. १९.

---

## अध्याय २० वा.

[ १ व्यूह रचून उभ्या असलेल्या कौरव-पांडवसैन्याचें वर्णन. ]

( १ ) धृतराष्ट्र—हे संजया, सूर्योदय झाल्यानंतर सर्वांच्या पूर्वी युद्धाची इच्छा करणारे व हृष्ट कोण दिसत होते ? भीष्म ज्यांचा नेता आहे, ते माझे पुत्र किंवा भीमाच्या नेतृत्वाखालीं असलेले पांडव ? त्याचप्रमाणें चंद्र, सूर्य व वायु हे कोणाला प्रतिकूल होते ! कोणाच्या सैन्यांत श्वापदें क्रूर शब्द करीत होतीं ! आणि कोणत्या पक्षांतील तरुण योद्धे प्रसन्नवदन दिसत होते ! हें सर्व मला सविस्तर सांग.

संजय—हे नरेंद्रा, दोन्ही सेना प्रसन्न चित्तानें आपापल्या व्यूहांत स्थित होत्या. तीं दोन्ही सैन्यें एखाद्या वनराजीप्रमाणें चित्र-विचित्र दिसत होतीं.

तीं विस्तीर्ण पसरलीं असून गज, रथ, अश्व यांनीं परिपूर्ण होतीं. त्याचप्रमाणें तीं भयंकर सैन्यें परस्परांस असह्य वाटत होतीं. सत्पुरुषांनीं सेवन केलेलीं तीं दोन्ही सैन्यें जणुकाय स्वर्ग जिंकण्यासच सज्ज झालीं होतीं.

धार्तराष्ट्रासह सर्व कौरवपक्ष पश्चिमाभिमुख होता आणि युद्धोत्सुक असलेले पांडव पूर्वाभिमुख होते. कौरवांचें सैन्य दैत्येन्द्रासारखें व पांडवांचें सैन्य देवेंद्रासारखें दिसत होतें. पांडवांच्या मागच्या बाजूनें वायु वहात होता आणि कौरवपक्षांत श्वापदें ओरडत होतीं. हे राजा, तुझ्या पुत्रांचे हत्ती पांडवांच्या गजेंद्राच्या गंडस्थलांतून वहाणाऱ्या मदाचा उग्र दर्प सहन करूं शकले नाहींत.

हे महाराज, दुर्योधनाचा हत्ती कमलासारखा नीलवर्ण असून त्याच्या अंगावर सुवर्णाची जाळी व कंबरेला सुवर्णाची सांखळी होती. त्यावर आरूढ झालेला राजा दुर्योधन कौरवसेनेच्या मध्यभागीं स्थित होता व चारण आणि बंदिजन त्याची स्तुति करीत होते, चंद्रासारखी प्रभा असलेलें श्वेत छत्र त्याच्या मस्तकावर शोभत असून त्यानें सुवर्णाचा मुकुट धारण केला होता. त्याच्या बाजूला पर्वतवासी गांधारांनीं सर्वतः परिवेष्टित असलेला गांधारराज शकुनि स्थित होता.

श्वेत च्छत्र, श्वेत धनुष्य, श्वेत मुकुट व श्वेत ध्वज यांनीं युक्त असलेला वृद्ध भीष्म खड्ग धारण करून सर्व सैन्याच्या अग्रभागीं होता. त्याच्या रथाचे चार श्वेत अश्वहि धवलगिरीसारखे शोभत होते. भीष्माच्या सैन्यांत सर्व धार्तराष्ट्र, बाल्हीकांचा एकदेश, शल, अम्बष्ठ, दुसरे शूर क्षत्रिय, सिंधुदेशांतील योद्धे, सौवीर व पंचनद प्रान्तांतील शूर योद्धे होते. प्रायः सर्वराजांचा गुरु उदारसत्त्व महात्मा द्रोण हातांत धनुष्य घेऊन रक्तवर्ण अश्वांनीं युक्त असलेल्या सोनेरी रथांत बसून कौरवांच्या सैन्याचें पृष्ठतः रक्षण करीत होता. तो पर्वताप्रमाणें अचल होता. त्याच्या सैन्यामध्यें वार्ध, क्षत्रिय, भूरिश्रवा, पुरुमित्र, जय, शाल्व, मत्स्य आणि गजारूढ झालेले सर्व युद्धोत्सुक केकय भ्राते स्थित होते. शक, किरात, यवन व पल्हव, यांच्यासह विचित्र युद्ध करणारा महेष्वास कृपाचार्य सैन्याच्या उत्तर बाजूला होता. महारथ वृष्णिभोज व शस्त्रयुक्त सुराष्ट्र यांच्याकडून सुरक्षित असलेलें व कृतवर्म्यानें रक्षण केलेलें फार मोठें सैन्य तुझ्या सैन्याच्या दक्षिण बाजूला स्थित होतें.

हे राजन्, अर्जुनाला मारूं किंवा मरूं अशाच निश्चयानें निर्माण झालेले संशप्तकांचे दहा हजार योद्धे बरोबर घेऊन सज्ज झालेले शूर त्रिगर्त चालले होते. याप्रमाणें हे भारता, तुझ्या सैन्यांत एक लक्ष गज होते. प्रत्येक हत्तीच्या बरोबर शंभर रथ, प्रत्येक रथाच्या बरोबर शंभर अश्व, प्रत्येक अश्वासह दहा धनुर्धर आणि प्रत्येक धनुर्धराबरोबर शंभर ढाल धारण करणारे सैनिक, अशी भीष्मानें त्या सैन्याची योजना केली होती. कौरवांचा अग्रणी शांतनव भीष्म नित्य मानुष, दैव, गांधर्व किंवा आसुर यांतील कोणती तरी एक नवीन व्यूहरचना करीत असे. महारथांनीं व्याप्त असलेली ही कौरवांची विपुल सेना समुद्राप्रमाणें प्रचंड निर्घोष करीत होती. भीष्मानें तिला युद्धामध्यें व्यूह रचून पश्चिमाभिमुख उभें केलें. त्यावेळीं हे नरेंद्रा, तुझ्या पुत्रांची सेना अनंतरूप दिसत होती. ती ध्वजांनीं व्याप्त होती आणि भयंकर भासत होती. तशी पांडवांची सेना नव्हती. तथापि जिचा नेता केशवार्जुन आहे, तीच सेना प्रचंड आणि दुष्प्रधर्ष म्ह० अजिंक्य आहे असें मला वाटलें. ६. १. २०.

---

## अध्याय २१ वा.

[ १ संजयानें कथन केलेला धर्म व अर्जुन यांचा संवाद. ]

( १ ) **संजय**—हे महाराज, कौरवांची सज्ज झालेली फार मोठी सेना पाहून कुंतीपुत्र युधिष्ठिर खिन्न झाला. भीष्मानें रचलेला तो व्यूह अभेद्य होता. युधिष्ठिरालाहि तो अभेद्यच वाटला. त्याच्याकडे पाहून तो निस्तेज झाला आणि अर्जुनाला म्हणाला—हे अर्जुना, या संग्रामांत ज्यांचा योद्धा पितामह आहे त्या धार्तराष्ट्रांशीं आपल्याला युद्ध करतां येणें कसें शक्य आहे! त्या शत्रूंचा संहार करणाऱ्या शास्त्रज्ञ भीष्मानें हा अक्षोभ्य आणि अभेद्य व्यूह रचिला आहे. या महाव्यूहापुढें आपल्याला जय कसा प्राप्त होईल !

हे राजा, तेव्हां तुझ्या सेनेला पाहून खिन्न झालेल्या युधिष्ठिराला अर्जुन म्हणाला—हे प्रभो, प्रज्ञेनें अधिक, शूर, गुणवान् आणि बहुसंख्याक असलेल्या शत्रूला अल्पसंख्याक लोक ज्या साधनानें जिंकतात, तें मी तुला सांगतों ऐक. जें कारण देवर्षि नारद, भीष्म व द्रोण जाणतात, तेंच मी तुला कथन करितों. हे असूया न करणाऱ्या राजा, पूर्वी देव व असुर यांच्या युद्धांत पितामहानें इंद्रादि देवांना या [illegible]

उपदेश केला होता. सत्य, दया, धर्म व उद्यम या साधनांनीं जयेच्छु जसा यशस्वी होतो, तसा तो बल व सामर्थ्य यांच्या योगानें होत नाहीं. यास्तव धर्म व अधर्म जाणून, लोभाचा आश्रय न करतां अहंकार टाकून युद्ध करा. कारण जेथें धर्म तेथें जय आहे. यास्तव हे राजन्, युद्धांत आपला जय निश्चित आहे, असेंच समज. शिवाय नारदानेंहि म्हटलें आहे कीं, जेथें कृष्ण तेथें जय. कारण जय कृष्णाचा दास असल्यामुळें जेथें माधव असतो, त्याच्या पाठोपाठ जय धांवत जातो. विजय हा जसा श्रीकृष्णाचा अंकित आहे, तसाच नम्रता किंवा भक्तप्रवणता हाहि एक गुण त्याच्या ठिकाणीं आहे. तो अनन्त तेजस्वी गोविंद शत्रुसमुदायांत निर्भयपणें उभा रहातो. तो सनातन पुरुष आहे व त्यामुळेंच जेथें कृष्ण तेथें जय ही उक्ति खरी आहे. पूर्वी देवासुरांच्या युद्धप्रसंगीं ज्याचे बाण अमोघ आहेत व ज्याची गति अकुंठित आहे, असा हा भगवान् हरि होऊन त्या दोघांसहि म्हणाला—' कोणाचा जय होणार ? '

त्यावर ज्यांनीं ' तुझ्यावांचून आम्ही कसे जिंकणार ? ' असें म्हटलें, त्यांनाच जय मिळाला. याप्रमाणें त्या प्रभूच्या प्रसादानें इंद्रादि देवांना त्रैलोक्याचें राज्य प्राप्त झालें. तस्मात् हे भारता, ज्याअर्थी तो देवेश्वर विश्वभोक्ता आमच्या जयाची आशा करीत आहे, त्याअर्थी तूं यत्किंचित्‌हि व्यथित व्हावेंस असें मला वाटत नाहीं. ६. ३. २१.

---

## अध्याय २२ वा.

[ १ पांडवांच्या सैन्याची व्यूहरचना. ]

( १ ) **संजय**—राजा धृतराष्ट्रा, त्यानंतर युधिष्ठिरानें भीष्माच्या व्यूहापुढें प्रतिव्यूह रचून जाण्याची आपल्या सेनेला प्रेरणा केली. धर्मयुद्धानें परम स्वर्गाची इच्छा करणाऱ्या पांडवांनीं उद्दिष्ट स्थानीं स्वसेनेचा व्यूह रचिला. सव्यसाचीनें ज्याचें रक्षण केलें आहे, तो शिखंडी मध्यभागीं स्थित होता. भीमसेनानें ज्याचें रक्षण केलें आहे, तो धृष्टद्युम्न सैन्याच्या अग्रभागीं चालला होता. धनुर्धर शक्राप्रमाणें सात्वत श्रेष्ठ युयुधान दक्षिण बाजूच्या सैन्याचें रक्षण करीत होता.

---

१ न तथा बलवीर्याभ्यां जयन्ति विजिगीषवः ।
यथा सत्यानृशंस्याभ्यां धर्मेणैवोद्यमेन च ॥

युधिष्ठिराचा रथ इंद्राच्या रथाप्रमाणें होता. तो सुवर्ण व रत्नें यांनीं अलंकृत केलेला होता. त्यांतील सर्व युद्धसामग्री कांचनानें भूषविलेली होती. हा श्रेष्ठ रथ युधिष्ठिरानें हस्तिनापुरांतून मागविला होता. या रथांत तो ज्येष्ठ पांडव बसला असून त्याच्या मस्तकावर हस्तिदंती दंडानें युक्त असलेलें शुभ्र छत्र शोभत होतें. महर्षि जसें महेंद्राचें स्तवन करितात, तसे पुरोहित याला प्रदक्षिणा घालून 'शत्रूचा नाश होवो' असें बोलत त्याच्या बरोबर चालले होते. महर्षि, सिद्ध, आणि वेदपारग ब्राह्मण जप, मंत्र, महौषधि इत्यादिकांच्या योगानें सर्व बाजूनें स्वस्त्ययन करीत चालले होते. त्यावेळीं राजा युधिष्ठिर महात्म्या ब्राह्मणांना वस्त्रें, गायी, फल, पुष्पें आणि सुवर्णाचीं नाणीं यांचें दान करीत अमरेश शक्राप्रमाणें पुढें निघाला.

हे महाराज, अर्जुनाचा रथ सहस्रावधि सूर्यतुल आदर्श चक्रांनीं सुशोभित केला होता. त्याला शेकडों घंटा बांधल्या होत्या. त्याचीं चक्रें दृढ व उत्कृष्ट होतीं व त्याला शुभ्र अश्व जोडलेले होते. देदीप्यमान अग्नीप्रमाणें किंवा प्रखर सूर्याप्रमाणें शोभणाऱ्या त्या रथांत धनंजय बसला होता. भगवान् केशव त्याचें सारथ्य करीत होता आणि रथावर कपिध्वज होता. हातांत गांडिव धारण करून बसलेल्या पार्थाला पाहून 'असा धनुर्धर पूर्वीं झाला नव्हता व पुढें होणार नाहीं.' असें वाटूं लागलें. त्याचें तें अतिशय उग्र स्वरूप पाहून तुझ्या पुत्रांची सेना थरथरां कापूं लागली.

आपल्या केवल बाहुबलानेंच युद्धांत शत्रूंचे नर, अश्व व गज यांचें आयुधावांचून भस्म करण्यास समर्थ असलेला जो भीमसेन, तो नकुल-सहदेवांसह वीरांच्या रथाचें रक्षण करीत होता. इंद्राच्या ऐरावताप्रमाणें बलाढ्य व सिंह किंवा वृषभ यांच्या मत्तलीलाप्रमाणें युद्ध करणारा दुरासद वृकोदर सैन्याच्या अग्रभागीं चालत असलेला पाहून चिखलांत रुतलेल्या हत्तीप्रमाणें तुझें सैन्य व्यथित झालें. भीमसेनाचा तो हत्तीसारखा उदग्र दर्प सहन न होऊन तुझे योद्धे भयभीत झाले.

नंतर सैन्याच्या मध्यभागीं स्थित असलेल्या दुरासद गुडाकेशाला वासुदेव म्हणाला—हे पार्था, हा जो बलाढ्य भीष्म सिंहाप्रमाणें क्रोधानें आपल्या सेनेकडे पाहून तिला जणुकाय स्वतेजानें दग्धच करीत आहे, त्यानें तीनशें अश्वमेध केले आहेत. मेघ जसे सूर्याला आच्छादित करितात त्याप्रमाणें

हीं सर्व सैन्यें या महानुभावाला परिवेष्टित करून उभीं आहेत. यास्तव हे पुरुषश्रेष्ठा, प्रथम तूं या सर्व सैन्याचा संहार कर आणि नंतर त्या भरतश्रेष्ठ भीष्माशीं युद्धाला सज्ज हो. ६. ३. २२.

---

## अध्याय २३ वा.

[ १ अर्जुनानें केलेलें दुर्गास्तवन. २ फलश्रुति. ]

( १ ) संजय—राजा, युद्धाला सज्ज झालेलें कौरवसैन्य पाहून अर्जुनाच्या हितासाठीं कृष्णानें त्याला असें हितवचन सांगितलें.

श्रीभगवान्—हे महाबाहो, तूं शुचिर्भूत हो, समरांगणाच्या अभिमुख उभा रहा आणि शत्रूंच्या पराजयासाठीं दुर्गेचें स्तवन कर. असुरांचा विनाश करणाऱ्या दुर्गेची प्रसिद्धिच आहे. तिचें स्तवन केलें असतां असुरांचे अंश असे जे शत्रु त्यांचा तिच्या प्रसादानें पराभव होईल.

संजय—वासुदेवानें याप्रमाणें संग्रामांत सांगितलें असतां अर्जुन रथांतून खालीं उतरला. त्यानें हात जोडले व पुढील स्तोत्र आरंभिलें.

अर्जुन—हे आर्ये, तूं योग्यांच्या समुदायांना परमपद प्राप्त करून देत असतेस. म्हणून तुला सिद्धसेनानी म्हणतात. हे मंदरपर्वतावर वास करणाऱ्या आर्ये, मी तुला नमस्कार करितों. तूं जरादिकांनीं रहित व सर्वदा ब्रह्मचर्यांत स्थित असल्यामुळें तुला कुमारी म्हणतात. तूं कालशक्तीनें युक्त आहेस. कापाल जो रुद्र त्याची पत्नी म्हणून तुला कापाली असेंहि नांव आहे. तूं कपिला-कृष्ण व पिंगल वर्णाची आहेस.

संहार करणारी कालरूपा महाकाली आहेस. कालाचाहि अन्त करणारी चण्डी आहेस. संकटांतून तारणारी तारिणी आहेस. सर्वसौभाग्यानें युक्त असलेली वरवर्णिनी आहेस. हे कतगोत्रोद्भव महापूज्ये, तुला मी वंदन करितों. हे क्रूररूप-धारिणी कराली, जयस्वरूपे, तूं साक्षात् विजयप्रद आहेस. तूं नानाप्रकारच्या भूषणांनीं अलंकृत असून तुझ्या मस्तकावर मयूरपिच्छांचा ध्वज शोभत असतो. तुझ्या हातांत उग्र शूल असून तूं खड्ग व ढाल धारण करितेस. हे देवि, तूं श्रीकृष्णाची कनिष्ठ भगिनी ( कृत्या ) आहेस व नंदगोपकुलांत उत्पन्न झालेली ज्येष्ठ कन्या आहेस. तुला नित्य महिषाचें रक्त प्रिय आहे. हे प्रसन्नवदने, तुझें

मुख चक्रवत् असून तूं पीतवसनानें शोभत असतेस. तूं रणप्रिय आहेस. हे शाकंभरि उमे, तूं महेश्वररूपानें श्वेता व वासुदेवरूपानें कृष्णा आहेस. कैटभदैत्याचा तूंच वध केलास. तुझे नेत्र पीतवर्ण असल्यामुळें तूं हिरण्याक्षी आहेस. मनुष्यादि रूपानें विविध प्रकारच्या नेत्रांनीं युक्त असल्यामुळें विरूपाक्षी आणि मार्जारादि रूपानें धूम्राक्षी आहेस. अशा सर्वात्मत्वानें युक्त असलेल्या तुला नमस्कार असो.

तूं वेदरूप आहेस, तूंच श्रुतिहि आहेस. यज्ञकर्म करणाऱ्या ब्राह्मणांवर तूं अनुग्रह करणारी आहेस. अत्यंत पवित्र असलेल्या तुझें जंबूद्वीपराजधानींतील देवालयांत नित्य वास्तव्य असतें. सर्व विद्यांतील श्रेष्ठ ब्रह्मविद्या तूंच आहेस. सर्व जीवांची महानिद्रा जी मुक्ति तीहि तूंच आहेस. तूं स्कन्दाची माता असल्यामुळें तुला सर्व देवतारूपत्व आहे. हे कांतारवासिनि भगवति दुर्गे, तुला मी नमस्कार करितों. तुला सर्वकर्मरूपत्व असल्यामुळें स्वाहा व स्वधा म्हणतात. सर्व स्थूल सूक्ष्मकालरूपी कला, काष्ठा व सरस्वतीहि तूंच आहेस. तुझ्या ठिकाणीं सर्व वाङ्मयरूपत्व असल्यामुळें तूं सावित्री, वेदमाता आणि वेदान्तहि म्हटली जातेस.

हे महादेवि, मी शुद्ध अंतःकरणानें तुझी स्तुति करीत आहें. तुझ्या प्रसादानें रणांगणांत माझा नित्य जय होवो. वनांतील भयप्रद दुर्गांमध्यें, भक्तांच्या घरामध्यें व पातालामध्यें तुझा निवास असतो. युद्धांत तूं दानवांना जिंकतेस. हे भगवति, तूं तंद्रा, मोहिनी, निद्रा, अद्भुत प्रदर्शन करणारी माया, त्याचप्रमाणें विद्या-तपोधनादिसमृद्धिरूप लक्ष्मी, सृष्टिप्रलयकर्ती संध्या, चंद्र-सूर्यप्रभायुक्त अहो-रात्र प्रकाशनशक्तिरूप सावित्री व मातृवत् पालन करणारी जननी आहेस. तुष्टि, पुष्टि व धैर्य तूंच आहेस. चंद्र-सूर्यांची कांति वाढविणारी ज्योति तूंच आहेस. महेश्वरादिकांचें ऐश्वर्य तूंच आहेस. हे देवि, समाधीमध्यें जीवन्मुक्त सिद्ध व चारण प्रत्यगात्मत्वानें तुझाच अनुभव घेतात. हे देवि, आकारविशेषोपहित ब्रह्माभिध्यात सत् तूंच आहेस व मोक्षाच्या आधीं भक्तांना राज्य विजयादि सिद्धि देणारी तूंच आहेस.

संजय—याप्रमाणें विश्वरूपाची कल्पना करून अर्जुनानें दुर्गेचें स्तवन केलें असतां पार्थाची भक्ति जाणून त्या मानववत्सल देवीनें श्रीकृष्णाच्या अग्रभागीं अंतरिक्षांत स्थित होऊन असा वर दिला—

**देवी**—हे दुर्धर्ष पांडवा, तूं अल्पावधींतच शत्रूंना जिंकशील. तूं नर आहेस आणि नारायण तुझा साह्यकर्ता आहे. साक्षात् इंद्र जरी शत्रूकडे असला तरी तूं युद्धांत अजिंक्य आहेस.

**संजय**—असें बोलून ती वरद देवी क्षणांत अन्तर्धान पावली. तेव्हां असा वर मिळाला असतां पार्थ स्वतःचा विजय झालाच आहे असें समजला. तो आपल्या अतिशय श्रेष्ठ रथावर चढला व एकाच रथांत स्थित असलेल्या त्या कृष्णार्जुनांनीं दिव्य शंख वाजविले.

( २ ) जो मानव प्रभातीं उठून या स्तोत्राचें पठन करितो, त्याला यक्ष, राक्षस व पिशाच यांच्यापासून कदापि भय प्राप्त होत नाहीं. त्याचप्रमाणें त्याचे शत्रु, सर्पादि प्राणी व हिंस्र पशु, यांच्यापासून आणि राजकुलापासूनहि त्याला भय रहात नाहीं. त्याला वादविवादांत जय मिळतो. बद्ध असलेला बंधनापासून सुटतो. संकटाला अवश्य तरतो व चोरापासून मुक्त होतो. संग्रामांत त्याचा नित्य विजय होतो, शाश्वत लक्ष्मी प्राप्त होते. त्याचप्रमाणें आरोग्य व बल यांनीं संपन्न होऊन तो शंभर वर्षें जिवंत रहातो.

राजा धृतराष्ट्रा, धीमान् व्यासांच्या प्रसादानें हें माझ्या दृष्टीं पडलें. परंतु तुझे हे सर्व क्रोधवश झालेले पुत्र मोहामुळें या नर-नारायणऋषींना जाणत नाहींत. कालपाशानें बद्ध झालेल्या तुझ्या पुत्रांना द्वैपायन व्यास, नारद, कण्व, त्याचप्रमाणें निष्पाप भार्गवराम यांनींहि प्राप्तकाल वचन सांगितलें व त्यांचें युद्धापासून निवारण केलें, परंतु त्यांनीं तें ऐकलें नाहीं. हे राजन्, जेथें धर्म तेथें द्युति व कांति आणि जेथें ह्री तेथेंच श्री व मति वास करिते. त्याचप्रमाणें जेथें धर्म तेथें कृष्ण आणि जेथें कृष्ण तेथें जय, हें तूं निश्चयानें समज. ( धृतराष्ट्र कदाचित् असें समजत असेल कीं, माझ्या पक्षांतहि धर्म आहे. म्हणून संजयानें 'जेथें धर्म तेथें कृष्ण' असें म्हटलें आणि कृष्णाच्या अभावीं तुझ्या पक्षांत धर्मंहि नाहीं व त्यामुळें धर्माची फलभूत जी द्युति, कांति इत्यादि त्यांचाहि अभावच आहे, हें दर्शविलें. ) ६. ३. २३.

## अध्याय २४ वा.

[ १ उभयपक्षांतील योद्ध्यांच्या मनोवृत्तीचें वर्णन. ]

(१) धृतराष्ट्र—हे संजया, त्या हृदयविदारक युद्धांत कोणत्या पक्षांतील योद्धे संतुष्टचित्तानें अग्रभागीं गेले ! खिन्न, व्यग्र आणि दीन कोण झाले ! युद्धांत आरंभीं प्रहार कोणीं केले ! माझ्या पुत्रांनीं किंवा पांडुपुत्रांनीं, तें मला सांग. कोणाच्या सेनासमुदायांत पुष्पमालांचा सुगंध दरवळला होता ! कोणत्या पक्षांतील योद्धे रणगर्जना करीत असतां शुभ वाणी बोलत होते ? तेंहि मला कथन कर.

संजय—राजा, त्या युद्धप्रसंगीं दोन्ही सैन्यांतील योद्धे प्रफुल्ल वदनानें युद्ध करीत होते. पुष्पमालांचा सुवास दोन्ही सैन्यांत पसरला होता. व्यूह रचून एकत्र जमलेल्या त्या दोन्ही सैन्यांचा फार मोठा संघर्ष होऊन तुमुल युद्ध झालें. रणशूर योद्ध्यांची परस्परांकडे पाहून होणारी गर्जना व रणवाद्यांचा प्रचंड ध्वनि यांनीं अंतरिक्ष दुमदुमून गेलें. याप्रमाणें हे राजन्, उभय पक्षांतील परस्परांकडे पहाणारे वीर, चीत्कार करणारे श्रेष्ठ गज आणि हृष्ट झालेले सैनिक यांचा तो संग्राम अपूर्व होता. ६. ३. २४.

---

## अध्याय २५ वा.

# श्रीमद्भगवद्गीता.

—×—

( अध्याय १ ला अर्जुनविषादयोग.

[ १ धृतराष्ट्राचा प्रश्न, संजयाचें उत्तर, दुर्योधनाचें द्रोणाशीं भाषण. २ अर्जुनाची सैन्याच्या मध्यभागीं रथ उभा करण्याविषयीं प्रार्थना. ३ दोन्ही सैन्यांतील स्वजनांस पाहून अर्जुनाचा विषाद. ]

धृतराष्ट्र उवाच—

**धर्मक्षेत्रे कुरुक्षेत्रे समवेता युयुत्सवः ।**
**मामकाः पाण्डवाश्चैव किमकुर्वत संजय ॥ १ ॥**

(१) धृतराष्ट्र—संजया, धर्मक्षेत्र असें जें प्रसिद्ध कुरुक्षेत्र त्यांत युद्धाच्या इच्छेनें जमलेले माझे दुर्योधनादि पुत्र व पांडूचे युधिष्ठिरादि पुत्र यांनीं काय केलें ! [ परशुरामाच्या ऋचीकादि पूर्वजांच्या वरानें परशुरामानें क्षत्रियांच्या

रक्तानें भरलेले पांच डोह ‘स्यमंतपंचक’ या नांवानें प्रसिद्ध झाले. त्यामुळें ‘कुरुक्षेत्र’ ही पुण्यभूमि आहे, अशी तिची प्रसिद्धि झाली. जाबाल उपनिषदांमध्येंहि कुरुक्षेत्राला ‘देवयजन’ म्हटलेलें आहे. चांगल्या शेतांत पेरलेलें धान्य जसें चांगलें उगवतें व त्यांत चांगलें फलहि उत्पन्न होतें, त्याप्रमाणें कुरुक्षेत्रांत केलेलें धर्माचरण अधिक फल देतें. म्हणून त्याला ‘धर्मक्षेत्र’ असें म्हटलें आहे. अशा त्या धर्मक्षेत्रांत क्षत्रियधर्माला अनुसरून युद्धाच्या इच्छेनें एकत्र जमलेल्या कौरव-पांडवांनीं काय केलें? असा धृतराष्ट्राच्या या प्रश्नाचा आशय आहे. ]

संजय उवाच—

दृष्ट्वा तु पाण्डवानीकं व्यूढं दुर्योधनस्तदा ।
आचार्यमुपसंगम्य राजा वचनमब्रवीत् ॥ २ ॥

**संजय**—राजा, त्यावेळीं पांडवांचें सैन्य व्यूहरचना करून उभें आहे, असें पाहून राजा दुर्योधन द्रोणाचार्यांपाशीं गेला व असें वचन बोलला—

पश्यैतां पाण्डुपुत्राणामाचार्य महतीं चमूम् ।
व्यूढां द्रुपदपुत्रेण तव शिष्येण धीमता ॥ ३ ॥

—हे आचार्य, तुमच्या बुद्धिमान् शिष्यानें म्हणजे द्रुपदपुत्र धृष्टद्युम्नानें व्यूहरचना केलेली पांडुपुत्रांची ही मोठी सेना पहा.

अत्र शूरा महेष्वासा भीमार्जुनसमा युधि ।
युयुधानो विराटश्च द्रुपदश्च महारथः ॥ ४ ॥
धृष्टकेतुश्चेकितानः काशिराजश्च वीर्यवान् ।
पुरुजित्कुन्तिभोजश्च शैब्यश्च नरपुङ्गवः ॥ ५ ॥
युधामन्युश्च विक्रान्त उत्तमौजाश्च वीर्यवान् ।
सौभद्रो द्रौपदेयाश्च सर्व एव महारथाः ॥ ६ ॥

—या सैन्यांत शूर, मोठमोठीं धनुष्यें धारण करणारे, युद्धांत भीमार्जुनासारखे पराक्रमी, असे अनेक वीर आहेत. त्यांतील कित्येकांचीं नांवेंहि सांगतों. यादव सात्यकि, राजा विराट, महारथ द्रुपद, पराक्रमी धृष्टकेतु, चेकितान व काशिराज, नरश्रेष्ठ पुरुजित, कुंतिभोज व शैब्य, पराक्रमी युधामन्यु, वीर्यवान् उत्तमौजा, सुभद्रापुत्र अभिमन्यु व द्रौपदीचे प्रतिविंध्यादि पांच पुत्र, हे महावीर आहेत. ते सर्वच महारथ आहेत.

अस्माकं तु विशिष्टा ये तान्निबोध द्विजोत्तम ।
नायका मम सैन्यस्य संज्ञार्थं तान्ब्रवीमि ते ॥ ७ ॥
भवान्भीष्मश्च कर्णश्च कृपश्च समितिंजयः ।
अश्वत्थामा विकर्णश्च सौमदत्तिस्तथैव च ॥ ८ ॥
अन्ये च बहवः शूरा मदर्थे त्यक्तजीविताः ।
नानाशस्त्रप्रहरणाः सर्वे युद्धविशारदाः ॥ ९ ॥

—आतां आमच्या सैन्यांत जे श्रेष्ठ व माझ्या सैन्याचे नायक असे जे वीर आहेत, त्यांचींहि नांवें मी तुला सांगतों. हे द्विजश्रेष्ठा, आपल्याला कळण्यासाठीं मी त्यांतील कांहींचीं नांवें सांगत आहें. आपल्याला ते वीर माहित नाहींत, म्हणून सांगतों, असें नाहीं, तर पांडवांप्रमाणें आपल्या पक्षांतहि केवळाले लोकोत्तर वीर आहेत, त्यांचें आपल्याला स्मरण व्हावें, म्हणून सांगत आहें. स्वतः आपण, इच्छामरणी भीष्म, वासवी शक्तीनें युक्त असलेला कर्ण, संग्रामांत विजयी होणारे कृपाचार्य, अश्वत्थामा, विकर्ण, तसाच सौमदत्ति व दुसरेहि अनेक शूर आपल्या सैन्यांत आहेत. त्या सर्वांनीं माझ्यासाठीं आपल्या जीविताचा त्याग करण्याचा निश्चय केला आहे. ते सर्व युद्धामध्यें विशारद असून अनेकप्रकारचीं शस्त्रें हींच त्यांच्यापाशीं शत्रूवर प्रहार करण्याचीं साधनें आहेत.

अपर्याप्तं तदस्माकं बलं भीष्माभिरक्षितम् ।
पर्याप्तं त्विदमेतेषां बलं भीमाभिरक्षितम् ॥ १० ॥

—याप्रमाणें आम्हांकडे आपल्यासारखे मोठमोठे वीर आहेत. आमचें सैन्य अकरा अक्षौहिणी आहे. भीष्मासारख्या अनुभवी वीरानें त्याचें रक्षण केलें आहे, म्हणून आमचें सैन्य संख्या, पराक्रम आणि अनुभवी सेनापति, यांच्या योगानें अजिंक्य झालें आहे. पण पांडवांचें सैन्य सात अक्षौहिणीच आहे. त्यांच्याकडे सात्यकीसारखे वीर जरी असले, तरी ते सर्व तरुण आहेत, त्यांना अशा मोठ्या संग्रामाचा अनुभव नाहीं. त्यांच्या सैन्याचा रक्षकहि भीम आहे. त्यामुळें सर्वप्रकारें त्यांचें सैन्य सुजेय आहे.

अयनेषु च सर्वेषु यथाभागमवस्थिताः ।
भीष्ममेवाभिरक्षन्तु भवन्तः सर्व एव हि ॥ ११ ॥

—यास्तव आपण सर्वच आपापल्या नियत स्थानांत स्थित होऊन आपापला भाग न सोडतां केवल भीष्माचेंच दक्षतेनें रक्षण करा.

संजय उवाच—

तस्य संजनयन्हर्षं कुरुवृद्धः पितामहः ।
सिंहनादं विनद्योच्चैः शङ्खं दध्मौ प्रतापवान् ॥ १२ ॥

संजय म्हणाला—दुर्योधनाचें हें भाषण होतांच त्याला प्रोत्साहन देणाऱ्या कुरुवृद्ध पितामह प्रतापी भीष्मानें मोठ्यानें सिंहनाद केला व आपला शंख वाजविला.

ततः शङ्खाश्च भेर्यश्च पणवानकगोमुखाः ।
सहसैवाभ्यहन्यन्त स शब्दस्तुमुलोऽभवत् ॥ १३ ॥

—भीष्मानें शंख वाजवितांच सर्व बाजूंनीं शंख, नगारे, ढोल, मृदंग, खंजिऱ्या इत्यादि रणवाद्यें वाजूं लागलीं. त्यामुळें वाद्यांचा फार मोठा नाद झाला. तो ध्वनि अतिशय भयंकर होता. पण त्याच्या योगानें पांडवांचीं हृदयें भीतीनें कंपित झालीं नाहींत.

ततः श्वेतैर्हयैर्युक्ते महति स्यन्दने स्थितौ ।
माधवः पाण्डवश्चैव दिव्यौ शङ्खौ प्रदध्मतुः ॥ १४ ॥

—त्यानंतर शुभ्र अश्व जोडलेल्या फार मोठ्या रथावर स्थित झालेला माधव व अर्जुन यांनीं आपापले दिव्य शंख वाजविले.

पाञ्चजन्यं हृषीकेशो देवदत्तं धनंजयः ।
पौण्ड्रं दध्मौ महाशङ्खं भीमकर्मा वृकोदरः ॥ १५ ॥
अनन्तविजयं राजा कुन्तीपुत्रो युधिष्ठिरः ।
नकुलः सहदेवश्च सुघोषमणिपुष्पकौ ॥ १६ ॥
काश्यश्च परमेष्वासः शिखण्डी च महारथः ।
धृष्टद्युम्नो विराटश्च सात्यकिश्चापराजितः ॥ १७ ॥
द्रुपदो द्रौपदेयाश्च सर्वशः पृथिवीपते ।
सौभद्रश्च महाबाहुः शङ्खान्दध्मुः पृथक् पृथक् ॥ १८ ॥

—हृषीकेशानें पांचजन्य, धनंजयानें देवदत्त, व भयंकर कर्मं करणाऱ्या वृकोदरानें आपला 'पौंड्र' नांवाचा महाशंख वाजविला. कुंतिपुत्र राजा युधिष्ठिरानें 'अनंतविजय', माद्रीपुत्र नकुल व सहदेव यांनीं क्रमानें 'सुघोष' व 'मणिपुष्पक' हे शंख वाजविले. महाधनुर्धर काश्य, महारथ शिखंडी, धृष्टद्युम्न,

विराट, अजिंक्य सात्यकि, द्रुपद, द्रौपदीचे पुत्र, महाबाहु सौभद्र या सर्वांनीं सर्वतः आपापले पृथक् पृथक् शंख वाजविले.

स घोषो धार्तराष्ट्राणां हृदयानि व्यदारयत् ।
नभश्च पृथिवीं चैव तुमुलो व्यनुनादयन् ॥ १९ ॥

—तेव्हां हे महाराज, काय सांगूं ! पांडवसैन्यांतील वीरांच्या त्या तुमुल शंखध्वनीनें धृतराष्ट्रपुत्रांचीं हृदयें विदीर्ण झालीं. त्या ध्वनीनें आकाश व पृथ्वी यांना दुमदुमून सोडलें.

अथ व्यवस्थितान्दृष्ट्वा धार्तराष्ट्रान्कपिध्वजः ।
प्रवृत्ते शस्त्रसंपाते धनुरुद्यम्य पाण्डवः ॥ २० ॥
हृषीकेशं तदा वाक्यमिदमाह महीपते ।

अर्जुन उवाच—

सेनयोरुभयोर्मध्ये रथं स्थापय मेऽच्युत ॥ २१ ॥
यावदेतान्निरीक्षेऽहं योद्धुकामानवस्थितान् ।
कैर्मया सह योद्धव्यमस्मिन् रणसमुद्यमे ॥ २२ ॥
योत्स्यमानानवेक्षेऽहं य एतेऽत्र समागताः ।
धार्तराष्ट्रस्य दुर्बुद्धेर्युद्धे प्रियचिकीर्षवः ॥ २३ ॥

( २ )—त्यानंतर कौरवादि धृतराष्ट्रपुत्र निर्भयपणें युद्धार्थ सज्ज होऊन उभे राहिले आहेत, व आतां शस्त्रप्रहार प्रवृत्त होण्याचा प्रसंग प्राप्त झाला आहे, हें पाहून कपिध्वज पांडवानें आपलें गांडीव धनुष्य उचललें आणि हे राजा, अर्जुनानें त्यावेळीं हृषीकेशाला असें म्हटलें—हे अच्युता, माझा रथ दोन्ही सैन्याच्या मध्यभागीं उभा कर. युद्धाच्या इच्छेनें जे हे राजे येथें उपस्थित झाले आहेत, त्यांचें मी निरीक्षण करीपर्यंत माझा रथ तेथेंच स्थिर उभा राहूं दे. या समरांगणांत मला कोणाकोणाशीं युद्ध करावयाचें आहे, तें मी पहातों. युद्धांत या दुर्बुद्धि धार्तराष्ट्राचें प्रिय करण्याच्या इच्छेनें जे हे येथें आले आहेत, त्या युद्ध करणाऱ्या वीरांना मी पहातों.

संजय उवाच—

एवमुक्तो हृषीकेशो गुडाकेशेन भारत ।
सेनयोरुभयोर्मध्ये स्थापयित्वा रथोत्तमम् ॥ २४ ॥
भीष्मद्रोणप्रमुखतः सर्वेषां च महीक्षिताम् ।
उवाच पार्थ पश्यैतान्समवेतान्कुरूनिति ॥ २५ ॥

संजय—हे महाराज धृतराष्ट्रा, अर्जुनानें हृषीकेशाला असें सांगितलें असतां त्या महात्म्यानें त्याचा उत्तम रथ दोन्ही सैन्याच्या मध्यें भीष्म, द्रोण व सर्व राजे यांच्या समोर उभा केला आणि " हे अर्जुना, युद्धासाठीं जमलेल्या या सर्व कौरवांना तूं पाहून घे " असें म्हटलें.

तत्रापश्यत्स्थितान्पार्थः पितॄनथ पितामहान् ।
आचार्यान्मातुलान्भ्रातॄन् पुत्रान्पौत्रान्सखींस्तथा ॥ २६ ॥
श्वशुरान्सुहृदश्चैव सेनयोरुभयोरपि ।
तान्समीक्ष्य स कौंतेयः सर्वान्बंधूनवस्थितान् ॥ २७ ॥

—तेव्हां अर्जुनानें त्या दोन्ही सैन्यामध्यें स्थित असलेल्या भूरिश्रवाप्रभृति पितृव्यांस, भीष्मादि पितामहांस, द्रोणाचार्यादि आचार्यांस, शल्यादि मातुलांस, भीम, दुर्योधनादि भ्रात्यांस, अभिमन्यु, लक्ष्मण प्रभृति पुत्रांस, पौत्रांस, अश्वत्थामाप्रभृति मित्रांस, द्रुपदादि श्वशुरांस, कृतवर्मा, भगदत्त इत्यादि इतर निरपेक्ष उपकार करणाऱ्या सुहृदांस पाहिलें आणि रणांगणांत प्राणत्याग करण्यास सज्ज होऊन उपस्थित झालेल्या त्या सर्व आप्तांस पाहून त्याला मोठी दया आली. परम दयेनें युक्त होऊन तो कुंतीचा पुत्र विषाद पावला व दीन वचनानें असें बोलला—

अर्जुन उवाच—

कृपया परयाविष्टो विषीदन्निदमब्रवीत् ।
दृष्ट्वेमं स्वजनं कृष्ण युयुत्सुं समुपस्थितम् ॥ २८ ॥
सीदन्ति मम गात्राणि मुखं च परिशुष्यति ।
वेपथुश्च शरीरे मे रोमहर्षश्च जायते ॥ २९ ॥
गाण्डीवं स्रंसते हस्तात्त्वक्चैव परिदह्यते ।
न च शक्नोम्यवस्थातुं भ्रमतीव च मे मनः ॥ ३० ॥
निमित्तानि च पश्यामि विपरीतानि केशव ।
न च श्रेयोऽनुपश्यामि हत्वा स्वजनमाहवे ॥ ३१ ॥
न कांक्षे विजयं कृष्ण न च राज्यं सुखानि च ।
किं नो राज्येन गोविन्द किं भोगैर्जीवितेन वा ॥ ३२ ॥

( ३ ) अर्जुन—हे कृष्णा, युद्ध करण्याच्या इच्छेनें रणांगणांत उपस्थित झालेल्या या स्वजनांस पाहून माझीं सर्व गात्रें निर्बल होत आहेत. मुख शुष्क

होत आहे. माझा देह कांपूं लागला आहे. अंगावर रोमांच उभे रहात आहेत. हातांतून गांडीव गळत आहे. माझी त्वचा संतापानें दग्ध होत आहे. मी आतां स्थिर उभा रहाण्यास समर्थ नाहीं. माझें मन जणुकाय भ्रमण पावत आहे. हे केशवा, मी अशुभ चिह्नें पहात आहें व संग्रामांत स्वजनांना मारून परिणामीं हित होईल, असें मला वाटत नाहीं. हे कृष्णा, मी विजयाची इच्छा करीत नाहीं. राज्याची किंवा सुखाची इच्छा करीत नाहीं. हे गोविंदा, आम्हांला राज्य, भोग व जीवित यांचा काय उपयोग !

येषामर्थे काङ्क्षितं नो राज्यं भोगाः सुखानि च ।
त इमेऽवस्थिता युद्धे प्राणांस्त्यक्त्वा धनानि च ॥ ३३ ॥
आचार्याः पितरः पुत्रास्तथैव च पितामहाः ।
मातुलाः श्वशुराः पौत्राः श्यालाः संबंधिनस्तथा ॥ ३४ ॥

—ज्यांच्यासाठीं राज्य, भोग व सुख यांची आकांक्षा करावयाची ते हे आमचे आचार्य, पितर, पुत्र, पितामह, मातुल, श्वशुर, पौत्र, शालक व संबंधी या युद्धांत प्राण व धन यांचा त्याग करून उपस्थित झाले आहेत.

एतान्न हन्तुमिच्छामि घ्नतोऽपि मधुसूदन ।
अपि त्रैलोक्यराज्यस्य हेतोः किं नु महीकृते ॥ ३५ ॥
निहत्य धार्तराष्ट्रान्नः का प्रीतिः स्याज्जनार्दन ।
पापमेवाश्रयेदस्मान्हत्वैतानाततायिनः ॥ ३६ ॥
तस्मान्नार्हा वयं हन्तुं धार्तराष्ट्रान्स्वबान्धवान् ।
स्वजनं हि कथं हत्वा सुखिनः स्याम माधव ॥ ३७ ॥

—पण हे मधुसूदना, मी त्रैलोक्याच्या राज्यासाठींहि यांना मारण्याची इच्छा करीत नाहीं. मग केवल पृथ्वीच्या राज्यासाठीं त्यांचा घात करीन, हें कसें शक्य आहे ! शिवाय या धृतराष्ट्रपुत्रांना मारून आमचें काय प्रिय होणार ! उलट या आततायी धृतराष्ट्रपुत्रांना मारून आम्हांला पापच लागेल ! ( हे आततायी आहेत यांत संशय नाहीं. कारण आग लावणारा, विष घालणारा, हातांत शस्त्र घेऊन मारावयास धावून येणारा, धन, क्षेत्र व स्त्री यांचा अपहार करणारा, असे सहा प्रकारचे आततायी असतात. कौरवांनीं आमचे हे सहाहि अपराध केले आहेत. वारणावतांतील जतुगृहांत यांनीं आम्हांला जाळण्याचा यत्न केला. भीमाकडून विषान्न भक्षण करविलें व आतां हातांत शस्त्र घेऊन युद्धाला सज्ज झाले आहेत. व द्यूतांत आमच्या

खांडवप्रस्थांतील राज्याचा, क्षेत्राचा व द्रौपदीचा अपहार केला. तथापि त्यांना मारल्यास आम्हांला दोष लागेल.) म्हणून या आततायींचाहि वध करणें आम्हांला योग्य नाहीं. कारण ते आमचे बांधव आहेत आणि हे माधवा, आम्ही स्वजनांना मारून सुखी कसे होऊं !

यद्यप्येते न पश्यन्ति लोभोपहतचेतसः ।
कुलक्षयकृतं दोषं मित्रद्रोहे च पातकम् ॥ ३८ ॥
कथं न ज्ञेयमस्माभिः पापादस्मान्निवर्तितुम् ।
कुलक्षयकृतं दोषं प्रपश्यद्भिर्जनार्दन ॥ ३९ ॥

—वस्तुतः हा विचार त्यांच्याहि मनांत यावयास पाहिजे होता, पण त्यांचें चित्त लोभानें विवेकशून्य झालें आहे. त्यामुळें ते कुलक्षयामुळें लागणारा दोष व मित्रद्रोहामुळें लागणारें पातक या घोर परिणामाकडे जरी पहात नसले तरी कुलक्षयकृत दोष व मित्रद्रोहजन्य पातक यांस जाणणारे आम्हीं या पापापासून निवृत्त व्हावें, हें कसें बरें न जाणावें !

कुलक्षये प्रणश्यन्ति कुलधर्माः सनातनाः ।
धर्मे नष्टे कुलं कृत्स्नमधर्मोऽभिभवत्युत ॥ ४० ॥
अधर्माभिभवात्कृष्ण प्रदुष्यन्ति कुलस्त्रियः ।
स्त्रीषु दुष्टासु वार्ष्णेय जायते वर्णसंकरः ॥ ४१ ॥
संकरो नरकायैव कुलघ्नानां कुलस्य च ।
पतन्ति पितरो ह्येषां लुप्तपिण्डोदकक्रियाः ॥ ४२ ॥

—कुलक्षय झाला असतां सनातन कुलधर्म नाश पावतात. धर्म नष्ट झाला असतां अधर्म सर्वहि कुलाला व्यापतो, अधर्मानें पराभूत झालेल्या कुलांतील कुलस्त्रिया दूषित होतात. हे वार्ष्णेय कृष्णा, स्त्रिया दूषित झाल्या असतां वर्णसंकर होतो, संकर कुलघातक्यांच्या व त्या कुलाच्याहि नरकाला कारण होतो. त्यांच्या श्राद्धादि पिंडक्रिया व उदकादि तर्पणक्रिया लुप्त झाल्या असतां त्यांचे पितर अधोगतीस जातात.

दोषैरेतैः कुलघ्नानां वर्णसंकरकारकैः ।
उत्साद्यन्ते जातिधर्माः कुलधर्माश्च शाश्वताः ॥ ४३ ॥
उत्सन्नकुलधर्माणां मनुष्याणां जनार्दन ।
नरके नियतं वासो भवतीत्यनुशुश्रुम ॥ ४४ ॥

हे कृष्णा, कुलघ्नांच्या या वर्णसंकरकारक दोषांनीं दीर्घ कालापासून चालत आलेले जातिधर्म व कुलधर्म विनाश पावतात आणि ज्यांचे कुलधर्म विनाश पावले आहेत, अशा मनुष्यांचा वास निश्चयानें नरकांत होतो, असें आम्हीं तज्ज्ञांच्या तोंडून ऐकलें आहे.

अहो बत महत्पापं कर्तुं व्यवसिता वयम् ।
यद्राज्यसुखलोभेन हन्तुं स्वजनमुद्यताः ॥ ४५ ॥
यदि मामप्रतीकारमशस्त्रं शस्त्रपाणयः ।
धार्तराष्ट्रा रणे हन्युस्तन्मे क्षेमतरं भवेत् ॥ ४६ ॥

अरेरे, आम्ही राज्य व सुख यांच्या लोभानें स्वजनांचा वध व महत्पाप करण्यास उद्युक्त झालों आहों, ही मोठी खेदाची गोष्ट आहे. यास्तव हातांत शस्त्रें घेतलेले धृतराष्ट्राचे पुत्र शस्त्ररहित असलेल्या व त्यांचा प्रतीकार न करणाऱ्या मला जरी समरांगणांत मारतील, तरी तें मोठें कल्याणावहच होईल.

संजय उवाच—

एवमुक्त्वाऽर्जुनः संख्ये रथोपस्थ उपाविशत् ।
विसृज्य सशरं चापं शोकसंविग्नमानसः ॥ ४७ ॥

संजय—राजा, समरांगणांत कृष्णाला असें बोलून आणि शरांसह धनुष्याचा त्याग करून, ज्याचें मन शोकानें उद्विग्न झालें आहे, असा अर्जुन रथांत जाऊन बसला.

(येथें भगवद्गीतेचा 'अर्जुनविषादयोग' नांवाचा पहिला अध्याय समाप्त झाला.) ६.३.२५.

---

## अध्याय २६ वा.

### ( गीताध्याय २ रा सांख्ययोग. )

[ १ या विषादाविषयीं कृष्णार्जुनांचा सामान्य संवाद. २ अर्जुनाची शरणागति व आत्मज्ञानाविषयीं प्रार्थना. ३ कृष्णानें सांगितलेला आत्मानात्मविवेक. ४ लौकिकन्याय. ५ सांख्य व योग या दोन बुद्धींच्या विभागपूर्वक योगाच्या प्रतिपादनास आरंभ. ६ स्थितप्रज्ञाचीं लक्षणें.]

संजय उवाच—

तं तथा कृपयाऽऽविष्टमश्रुपूर्णाकुलेक्षणम् ।
विषीदन्तमिदं वाक्यमुवाच मधुसूदनः ॥ १ ॥

भगवानुवाच—

कुतस्त्वा कश्मलमिदं विषमे समुपस्थितम् ।
अनार्यजुष्टमस्वर्ग्यमकीर्तिकरमर्जुन ॥ २ ॥
क्लैब्यं मास्म गमः पार्थ नैतत्त्वय्युपपद्यते ।
क्षुद्रं हृदयदौर्बल्यं त्यक्त्वोत्तिष्ठ परंतप ॥ ३ ॥

( १ ) संजय—राजा, पहिल्या अध्यायांत वर्णन केल्याप्रमाणें अर्जुन कृपायुक्त झाला, त्याचे नेत्र अश्रूंनीं भरून आले, त्यामुळें ते आकुल झाले. पण अशा रीतीनें खेद करीत असलेल्या त्याला भगवान् मधुसूदन म्हणाला—हे अर्जुना, या कठिण प्रसंगीं तुला श्रेष्ठांनीं न अंगीकारलेलें व अकीर्ति करणारें हें पाप कोठून प्राप्त झालें ! तुझ्या मनांत ही दुर्बुद्धि कोठून उत्पन्न झाली ? अरे बाबा, असा दुर्बल होऊं नको. हें क्लैब्य तुला शोभत नाहीं, यास्तव हे शत्रूंना ताप देणाऱ्या अर्जुना, हृदयाचें हें क्षुद्र दुर्बलत्व टाकून तूं ऊठ.

अर्जुन उवाच—

कथं भीष्ममहं संख्ये द्रोणं च मधुसूदन ।
इषुभिः प्रतियोत्स्यामि पूजार्हावरिसूदन ॥ ४ ॥

अर्जुन—हे मधुसूदना, मी संग्रामांत भीष्म व द्रोण यांच्याशीं बाणांनीं कसा बरें युद्ध करूं ! कारण हे अरिसूदना, ते दोघेहि पूजा करण्यास योग्य आहेत.

गुरूनहत्वा हि महानुभावान्
श्रेयो भोक्तुं भैक्ष्यमपीह लोके ।
हत्वार्थकामांस्तु गुरूनिहैव
भुञ्जीय भोगान्रुधिरप्रदिग्धान् ॥ ५ ॥

—हे कृष्णा, या महा प्रभावशाली गुरूंना न मारल्यामुळें आम्हांला या लोकीं भिक्षान्न खाण्याचा जरी प्रसंग आला, तरी तो श्रेयस्कर आहे, पण याच्या उलट या गुरूंना मारल्यास केवल याच लोकीं रक्तानें माखल्याप्रमाणें निंद्य असलेले अर्थ व काम हेच भोग मी भोगीन.

न चैतद्विद्मः कतरन्नो गरीयो
यद्वा जयेम यदि वा नो जयेयुः ।
यानेव हत्वा न जिजीविषाम-
स्तेऽवस्थिताः प्रमुखे धार्तराष्ट्राः ॥ ६ ॥

—आम्हां पांडवांना युद्ध करणें व भिक्षान्न खाणें यांतील कोणतें श्रेष्ठ आहे, तें कळत नाहीं. म्हणजे आमचा त्याविषयीं निश्चय होत नाहीं. तसेंच या संग्रामांत ते आम्हांला जिंकतील किंवा आम्ही त्यांना जिंकूं हेंहि आम्हांला ठाऊक नाहीं. शिवाय ज्या दुर्योधनादि बंधूंना मारून आम्हांला जिवंत रहाण्याची इच्छा होणार नाहीं, तेच हे धृतराष्ट्रपुत्र आमच्या समोर युद्धाला उभे राहिले आहेत.

कार्पण्यदोषोपहतस्वभावः
पृच्छामि त्वां धर्मसंमूढचेताः ।
यच्छ्रेयः स्यान्निश्चितं ब्रूहि तन्मे
शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम् ॥ ७ ॥

(२)—हे भगवन्, आत्म्याचें स्वरूप न जाणणें या दोषामुळें माझा क्षात्रधर्म नष्ट झाला आहे व त्यामुळेंच मी स्वधर्माविषयीं विवेकशून्य झालों आहें. यास्तव माझें निश्चित श्रेय ज्यामुळें होईल, तेंच कर्तव्य तूं मला सांग. मी तुझा शिष्य आहें व तुला शरण आलों आहें, यास्तव मला श्रेयाचा उपदेश कर.

न हि प्रपश्यामि ममापनुद्याद्-
यच्छोकमुच्छोषणमिन्द्रियाणाम् ।
अवाप्य भूमावसपत्नमृद्धं
राज्यं सुराणामपि चाधिपत्यम् ॥ ८ ॥

—मला या भूलोकांतील निष्कंटक व समृद्ध राज्य मिळालें किंवा देवांचेंहि राज्य प्राप्त झालें, तरी त्याच्या योगानेंहि माझ्या इंद्रियांना शुष्क करणारा हा शोक निवृत्त होईल, असें मला वाटत नाहीं. तात्पर्य, ज्या उपायानें माझा हा शोक निवृत्त होईल, असा उपायच मला दिसत नाहीं. यास्तव तूं मला या शोकाचा नाश होण्यासाठीं मोक्षसाधनाचा उपदेश कर.

संजय उवाच—

एवमुक्त्वा हृषीकेशं गुडाकेशः परंतप ।
न योत्स्य इति गोविन्दमुक्त्वा तूष्णीं बभूव ह ॥ ९ ॥
तमुवाच हृषीकेशः प्रहसन्निव भारत ।
सेनयोरुभयोर्मध्ये विषीदन्तमिदं वचः ॥ १० ॥

संजय—राजा, अर्जुन हृषीकेशाला असें बोलून व 'कांहीं झालें तरी मी युद्ध करणार नाहीं' असें त्याला सांगून स्वस्थ बसला. तेव्हां, हे धृतराष्ट्र महाराज, हृषीकेश दोन्ही सैन्याच्या मध्यभागीं स्थित होऊन याप्रमाणें खेद करणाऱ्या अर्जुनाला असें बोलला—

श्रीभगवानुवाच—

अशोच्यानन्वशोचस्त्वं प्रज्ञावादांश्च भाषसे ।
गतासूनगतासूंश्च नानुशोचन्ति पण्डिताः ॥ ११ ॥

(३) श्रीभगवान्—हे अर्जुना, तूं शोक करण्यास योग्य नसलेल्या भीष्मद्रोणांसाठीं शोक केला आहेस व गोष्टी तर बुद्धिमानांच्या सांगतोस. पण बाबारे, जे पंडित म्ह० आत्मज्ञानी आहेत, ते मेलेल्यांविषयीं व जिवंत असलेल्यांविषयीं शोक करीत नाहींत. [भीष्मादिक सद्वर्तनशील आहेत. त्यामुळें मरणोत्तर त्यांचा उत्कर्षच होणार, हें निर्विवाद आहे. ज्यांचा उत्कर्ष होतो, ते केव्हांहि शोच्य नसतात. शिवाय ते परमार्थ आत्मरूपानें नित्य आहेत. त्यामुळें त्यांचा नाशच संभवत नाहीं. या दृष्टीनेंहि ते अशोच्य आहेत. पण अशा अशोच्य असलेल्या भीष्मादिकांविषयींहि माझ्यामुळें हे सर्व मरत आहेत, पण त्यांचा वियोग झाल्यावर 'मी राज्यसुखादिकांस घेऊन काय करणार !' (अध्याय १–३२, ३३.) असा त्यांच्याविषयीं शोक केलास व इकडे तर मोठ्या तत्त्ववेत्याच्या गोष्टी (अ. १–४०. ४५.) सांगत आहेस. म्ह० एखाद्या वेड्याप्रमाणें तूं आपल्या ठिकाणीं मूढत्व व पांडित्य असे परस्परविरुद्ध भाव दाखवीत आहेस; पण आत्मज्ञानी पंडित मेलेल्या व जिवंत असलेल्या लोकांविषयीं शोक करीत नाहींत. मेलेल्याविषयीं शोक सुप्रसिद्ध आहे आणि मूर्ख, अज्ञ, दुराचारी इत्यादि आप्त जिवंत असतांनाहि शोच्य होतात, हेंहि सर्वत्र प्रसिद्ध आहे; पण आत्मज्ञानी पंडित त्यांतील कोणाविषयींच कधींहि शोक करीत नाहींत. ]

न त्वेवाहं जातु नासं न त्वं नेमे जनाधिपाः ।
न चैव न भविष्यामः सर्वे वयमतः परम् ॥ १२ ॥

—भीष्मादि अशोच्य कां ! तर ते नित्य आहेत म्हणून. फारकाय पण मी, तूं व हे सर्व राजे या जन्माच्यापूर्वीं नव्हतों असें नाहीं व मेल्यावर नसूं असेंहि

नाहीं. तर आम्ही आत्मरूपानें तिन्ही काळीं नित्यच आहों. आतां आत्मा नित्य कसा याविषयीं दृष्टान्त—

देहिनोऽस्मिन्यथा देहे कौमारं यौवनं जरा ।
तथा देहान्तरप्राप्तिर्धीरस्तत्र न मुह्यति ॥ १३ ॥

—देहाला ' हा मी ' किंवा ' हा माझा ' असें जो समजतो तो देही, अशा देहाभिमानी आत्म्याला याच देहांत बाल्यावस्था, तारुण्य व वृद्धावस्था अशा तीन परस्परविरुद्ध अवस्था जशा प्राप्त होतात, त्यांतील एका अवस्थेचा नाश झाला असतां आत्म्याचा नाश, किंवा दुसऱ्या अवस्थेचा आरंभ झाला असतां आत्म्याचा आरंभ—जन्म जसा होत नाहीं, तर स्वतःच्या सत्-चित् सुखरूपानें निर्विकार असलेल्या आत्म्यालाच जशी दुसरी, तिसरी अवस्था प्राप्त होते, तशीच त्या निर्विकार असलेल्या आत्म्याला दुसऱ्या देहाची प्राप्ति होते. [ मनुष्य लहानाचा मोठा व मोठ्याचा म्हातारा जरी झाला तरी त्याच्या आत्मस्वरूपांत कांहींच फरक पडत नाहीं, हें प्रसिद्ध आहे. त्याचप्रमाणें पूर्वदेह सोडून दुसरा देह घेतांना त्याच्या स्वरूपांत यत्किंचित्‌हि फरक पडत नाहीं. याप्रमाणें आत्मा निर्विकार व नित्य असल्यामुळें आत्मज्ञानी पुरुष शरीराबरोबर आत्मा मरतो असें समजून मोहित होत नाहीं. ]

मात्रास्पर्शास्तु कौन्तेय शीतोष्णसुखदुःखदाः ।
आगमापायिनोऽनित्यास्तांस्तितिक्षस्व भारत ॥ १४ ॥

—" पण आत्मा नित्य आहे असें जरी कळलें तरी शीतोष्णादिकांमुळें होणारा लौकिक मोह व शोक यांचें निवारण होत नाहीं " अशी शंका अर्जुन यावर घेईल, असें समजून भगवान् म्हणाले—हे अर्जुना, इंद्रियांचे विषयांशीं होणारे संबंध किंवा इंद्रियें व विषय हे दोन्ही शीतोष्णाच्या द्वारा सुख-दुःखादि देणारे आहेत. इंद्रियांच्या द्वारा विषय सुख-दुःख देतात, हें प्रसिद्ध आहे. सुख व दुःख हे अंतःकरणाचे धर्म आहेत. आत्म्याचे नव्हेत. ते उत्पन्न होऊन विनाश पावणारे असल्यामुळें अनित्य आहेत. उत्पन्न होऊन विनाश पावणें हेंच अनित्यत्वाचें लक्षण आहे. याप्रमाणें सुख-दुःख हे क्षेत्रधर्म असल्यामुळें व अनित्य असल्यामुळें अनुकूल प्रतिकूलतेच्या द्वारा सुख-दुःख देणाऱ्या मात्रास्पर्शांस तूं सहन कर. त्यांची जरी प्राप्ति झाली तरी तूं हर्ष किंवा विषाद मानूं नको. यांना सहन करणें, यावांचून दुसरा उपाय नाहीं. ' शीतोष्णा-

दिकांना सहन करणाऱ्या मुमुक्षूला कोणता लाभ होतो ' असें विचारशील तर सांगतों.—

यं हि न व्यथयन्त्येते पुरुषं पुरुषर्षभ ।
समदुःखसुखं धीरं सोऽमृतत्वाय कल्पते ॥ १५ ॥

—अर्जुना, सुख व दुःख यांना समान लेखणाऱ्या म्ह० सुख प्राप्त झालें असतां हर्ष न मानणाऱ्या व दुःख प्राप्त झालें असतां विषाद न मानणाऱ्या ज्या नित्यानित्य विवेकी व विरक्त पुरुषाला हे शीतोष्णादिक किंवा शीतोष्ण देणारे मात्रास्पर्श पीडा देत नाहींत, तो मोक्षाचा अधिकारी होतो. याहि कारणानें शोक व मोह न करतां शीतोष्णादिकांस सहन करणें उचित होय.

नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः ।
उभयोरपि दृष्टोऽन्तस्त्वनयोस्तत्त्वदर्शिभिः ॥ १६ ॥

—अविद्यमान शीतोष्णादिकांचें अस्तित्व संभवत नाहीं व विद्यमान आत्म्याचा अभाव संभवत नाहीं. या दोन्ही गोष्टींचा निर्णय तत्त्ववेत्त्यांनीं साक्षात् अनुभविला आहे. [ शिवाय पदार्थांच्या स्वरूपांत जो बदल होतो, त्याला विकार असें म्हणतात आणि विकार एकाच स्वरूपांत कधीं रहात नाहीं. तेव्हां क्षणोक्षणीं बदलणाऱ्या वस्तूला सत् कसें म्हणतां येईल ! आणि जी सत् नसलेली वस्तु तिला विद्यमान कोण म्हणेल ! शीतोष्ण, सुख-दुःख, इत्यादि द्वंद्वें क्षणोक्षणीं बदलणारीं आहेत. पण सद्रूप आत्मा केव्हांहि नाहीं, असें होत नाहीं. देहादिकांचा अभाव होणें हा आत्म्याचा अभाव नव्हे व देह जरी विद्यमान असल्यासारखा भासतो, तरी तो वस्तुतः विद्यमान नाहींच. कारण तो विकार पावणारा आहे. हा सत् व असत् यांचा निर्णय तत्त्ववेत्त्यांना करतां येतो. ते कधींहि न बदलणाऱ्या चैतन्यात्म्याला असत् समजत नाहींत व क्षणोक्षणीं बदलणाऱ्या अनात्मवस्तूला सत् समजत नाहींत.

अविनाशि तु तद्विद्धि येन सर्वमिदं ततम् ।
विनाशमव्ययस्यास्य न कश्चित्कर्तुमर्हति ॥ १७ ॥

—हे अर्जुना, असें जें सत् तत्त्व तेंच ब्रह्म आहे. त्यानें या सर्व असत् वस्तूंना व्यापिलें आहे, म्हणून तें अविनाशी आहे, असें तूं समज. विनाश न पावणें हा त्याचा स्वभावच आहे. शिवाय या ' सत् ' संज्ञक अव्यय आत्म्याचा

विनाश करण्यास ईश्वरहि समर्थ नाहीं. कारण तो सर्वांशीं अविरुद्ध आहे व ज्या दोन पदार्थांत विरोध असतो, त्यांतील बलवान् दुर्बलाचा नाश करितो, असा अनुभव आहे. हें अविनाशी तत्त्व सर्वांचा आत्मा असल्यामुळेंच याचा नाश करण्यास कोणी समर्थ होत नाहीं. [ आतां 'असत्' काय तेंहि सांगतों. ]

अन्तवन्त इमे देहा नित्यस्योक्ताः शरीरिणः ।
अनाशिनोऽप्रमेयस्य तस्माद्युध्यस्व भारत ॥ १८ ॥

—या पूर्वोक्त नित्य, अविनाशी, अप्रमेय, शरीरी आत्म्याचे हे प्रत्यक्ष असलेले देह विनाशी आहेत. यास्तव भीष्मादिकांच्या आत्म्याचा नाश होणें अशक्य असल्यामुळें व देह चिरकाल स्थित होण्याचा असंभव असल्यामुळें तूं प्राप्त युद्ध कर. [ भीष्मादिकांच्या आत्म्याविषयीं शोक करूं नको व देहासाठींहि विषाद पावूं नको. असें असल्यामुळें या युद्धांत भीष्मादिक माझ्या हातून मारले जाणार, मी त्यांचा हिंसक होणार, असें जें तुला वाटत आहे तो भ्रम आहे. हें श्रुतिवचनानें दाखवितात. ]

य एनं वेत्ति हन्तारं यश्चैनं मन्यते हतम् ।
उभौ तौ न विजानीतो नायं हन्ति न हन्यते ॥ १९ ॥
न जायते म्रियते वा कदाचि-
न्नायं भूत्वाऽभविता वा न भूयः ।
अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो
न हन्यते हन्यमाने शरीरे ॥ २० ॥

—जो अज्ञ या प्रकृत आत्म्याला हननक्रिया करणारा समजतो व जो आत्मा हननक्रियेचा विषय होतो असें जाणतो, म्हणजे आत्मा हननक्रियेचा कर्ता व कर्म होतो, असें जो जाणतो; ते दोघेहि आत्मस्वरूपाचे अनभिज्ञ आहेत. कारण तो कोणाचें हनन करीत नाहीं व कोणाकडूनहि हनन केला जात नाहीं. [ देहानें दुसऱ्याला मारलें म्हणजे मीं याला मारलें व दुसऱ्यानें याच्या देहाला मारलें म्हणजे मलाच यानें मारलें असें जे समजतात, ते दोघेहि आत्म्याचें निर्विकार स्वरूप जाणत नाहींत. ज्याअर्थीं तो निर्विकार आहे, त्याअर्थीं 'मी हंता आहें' इत्यादि ज्ञान, हें अज्ञान आहे. कारण तो निर्विकार असल्यामुळेंच कोणत्याहि क्रियेचा कर्ता किंवा कर्म होत नाहीं. प्रत्येक लौकिक वस्तूला अवश्य होणारे जन्मादि सहा विकार आत्म्याला होत

नाहींत. कारण तो केव्हांहि उत्पन्न होत नाहीं. म्हणून अज आहे. मरत नाहीं म्हणून तो नित्य आहे. तो नसून उत्पन्न होणारा किंवा असून नाश पावणारा नाहीं. तो शाश्वत व पुराण असून हन्यमान शरीराबरोबर हत होत नाहीं. म्ह० तो कोणत्याहि विक्रियेचा विषय होत नाहीं. यांतील पहिल्या मंत्रानें आत्मा कोणत्याहि कर्मांचा कर्ता व कर्म होत नाहीं, असें सांगून दुसऱ्या मंत्रांत 'आत्मा निर्विकार आहे,' याविषयीं हेतु सांगितला. ] भगवान् आतां त्याचाच उपसंहार करीत आहेत.—

वेदाविनाशिनं नित्यं य एनमजमव्ययम् ।
कथं स पुरुषः पार्थ कं घातयति हन्ति कम् ॥ २१ ॥

—जो मरणरहित, विपरिणामरहित, अज, अव्यय आत्म्याला जाणतो, तो आत्मज्ञानी पुरुष स्वतः कोणाला कसा मारणार व दुसऱ्याकडून तरी कोणाला कसा मारविणार ! तो कधींच कोणाला मारीत नाहीं व मारवीत नाहीं.

वासांसि जीर्णानि यथा विहाय
नवानि गृह्णाति नरोऽपराणि ।
तथा शरीराणि विहाय जीर्णा-
न्यन्यानि संयाति नवानि देही ॥ २२ ॥

—आतां आत्मा अविनाशी, निर्विकार, इत्यादि कसा ? म्हणून विचारशील तर तें दृष्टान्तपूर्वक सांगतों. ज्याप्रमाणें पुरुष जुनीं वस्त्रें टाकून नवीं वस्त्रें धारण करितो, पण त्यामुळें त्याच्यामध्यें कोणत्याहि प्रकारचा विकार—बदल झालेला दिसत नाहीं, त्याचप्रमाणें जराजर्जर झालेलें शरीर टाकून दुसरें नवें शरीर धारण करणाऱ्या आत्म्यामध्येंहि कांहीं विकार होत नाहीं. तो आपल्या अवि-कृत स्वरूपानेंच नवीन शरीरास प्राप्त होतो.

नैनं छिन्दन्ति शस्त्राणि नैनं दहति पावकः ।
न चैनं क्लेदयन्त्यापो न शोषयति मारुतः ॥ २३ ॥
अच्छेद्योऽयमदाह्योऽयमक्लेद्योऽशोष्य एव च ।
नित्यः सर्वगतः स्थाणुरचलोऽयं सनातनः ॥ २४ ॥

—कारण आत्म्याला शस्त्रें तोडीत नाहींत. म्ह० पृथ्वीचा त्याच्यावर परिणाम होत नाहीं. त्याचप्रमाणें आप, तेज व वायुहि क्रमानें क्लेदन, दहन व शोषण

हा परिणाम करूं शकत नाहींत. कारण तो भूतांचा अविषय आहे, त्यामुळें अविक्रिय आहे. म्हणूनच हा आत्मा अच्छेद्य, अदाह्य, अक्लेद्य व अशोष्य आहे. म्ह० शस्त्रानें त्याचा छेद होत नाहीं. अग्नीनें दाह होत नाहीं. पाण्यानें तो कुजत नाहीं व वायूनें शुष्क होत नाहीं. म्हणूनच तो नित्य, आकाशादि सर्वांना व्यापणारा, स्थिर व अचल आहे. त्यामुळेंच चिरकालीन् आहे. एखाद्या कारणापासून कार्यरूपानें नवीन उत्पन्न झालेला नाहीं.

अव्यक्तोऽयमचिन्त्योऽयमविकार्योऽयमुच्यते ।
तस्मादेवं विदित्वैनं नानुशोचितुमर्हसि ॥ २५ ॥

—तसाच तो अव्यक्त व अव्यक्त असल्यामुळें अचिंत्य आहे. म्हणून या आत्म्याला तो अशा स्वरूपाचा आहे हें जाणून भीष्मादिकांविषयीं शोक करणें तुला योग्य नाहीं. [ अर्जुनाचा शोक घालविण्यासाठीं 'अशोच्यान्०' या श्लोकापासून भगवानांनीं त्याला आत्मोपदेश केला आणि येथें 'तुला शोक करणें उचित नाहीं' असें म्हणून उपसंहार केला आहे. या उपक्रम-उपसंहारावरून आत्मज्ञानानें शोक-मोहात्मक संसारबीजाची निवृत्ति करणें हाच सर्व गीतेचा आणि या प्रकरणाचा प्रतिपाद्य विषय ठरतो. आतां आत्मा अनित्य आहे, असें जरी मानलें तरी शोक करणें अयोग्य कसें तें सांगतात. ]

अथ चैनं नित्यजातं नित्यं वा मन्यसे मृतम् ।
तथापि त्वं महाबाहो नैनं शोचितुमर्हसि ॥ २६ ॥

—प्रत्येक देह उत्पन्न झाला कीं, 'हा अमुक जन्मास आला' व प्रत्येक देह मेला कीं 'हा मृत झाला' असें व्यवहारांत म्हणतात. या लोकप्रसिद्धीला अनुसरून आत्माच प्रत्येक देहाबरोबर उत्पन्न होतो व प्रत्येक देहनाशाबरोबर मरतो, असें जरी तूं मानिलेंस व तसें मानूनच 'अहो बत महत्पापं कर्तुं व्यवसिता वयम्' (अ. १. श्लो. ४५.) असें म्हटलेंस तरी उत्पन्न होणाऱ्या प्रत्येकाला नाश व नाश पावणाऱ्या प्रत्येकाला पुनः जन्म हे विकार अवश्य होणारे असल्यामुळें तुला असा शोक करणें शोभत नाहीं. कारण—

जातस्य हि ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्य च ।
तस्मादपरिहार्येऽर्थे न त्वं शोचितुमर्हसि ॥ २७ ॥

—जो जन्माला आला, त्याचा मृत्यु निश्चित आहे आणि मेलेल्या आत्म्याचा जन्म निश्चित आहे. आत्मा देहाबरोबर उत्पन्न होतो, असें मानिलें तर त्याला

मरणावांचून गत्यंतर नाहीं. तो कांहीं घटकांनीं, दिवसांनीं, महिन्यांनीं, वर्षांनीं, युगांनीं किंवा कल्पांनीं अवश्य नाश पावतोच. त्याचप्रमाणें जो मेला आहे, तो आपलें बीज मागें ठेवूनच मेलेला असतो. त्याचा स्थूल आकार जरी नष्ट झाला, तरी सूक्ष्म जीवनशक्ति नष्ट होत नाहीं. त्यामुळें त्या बीजापासून योग्य वेळीं पुनः त्याचा जन्म होतो. म्हणून जन्मलेल्याचें मरण व मेलेल्याचा पुनः जन्म कोणाला टाळतां येत नाहीं. यास्तव अशा अपरिहार्य गोष्टीविषयीं तूं शोक करूं नको. [ज्याला कांहीं उपायच नाहीं, त्याविषयीं शोक करणें केव्हांहि योग्य नव्हे. म्हणून आत्म्याला उद्देशून शोक करणें जसें योग्य नाहीं, त्याचप्रमाणें शरीरेंद्रियसंघातरूप भूतांना उद्देशूनहि शोक करणें योग्य नव्हे, असें भगवान् सांगतात.]

अव्यक्तादीनि भूतानि व्यक्तमध्यानि भारत ।
अव्यक्तनिधनान्येव तत्र का परिदेवना ॥ २८ ॥

—हे अर्जुना, भूतें म्ह० शरीरेंद्रियांचा समुदाय म्ह० प्रत्यक्ष दिसणारीं प्राणिशरीरें उत्पत्तीच्या पूर्वीं उपलब्ध होत नाहींत. म्हणून उत्पत्तीच्या पूर्वींची त्यांची अवस्था अव्यक्त असते. उत्पत्तीपासून मरणापर्यंत जी अवस्था तिला मध्य म्हणतात. ती व्यक्त असते. म्ह० त्या भूतांना व्यावहारिक सत्यत्व असतें. मरणानंतरहि जन्माच्या पूर्वीं जी अव्यक्त अवस्था असते, तिलाच ते प्राप्त होतात. तेव्हां पूर्वीं अदृष्ट, मध्यें दृष्ट व शेवटीं पुनः सर्वथा नष्ट, याप्रमाणें भ्रांतीचा विषय होणाऱ्या पुत्र-मित्रादि भूतांविषयीं विलाप करण्यांत काय अर्थ आहे ! [आत्मा दुर्ज्ञेय आहे, म्हणून त्याच्याविषयीं सर्वांनाच भ्रम होतो. पण तो दुर्ज्ञेय कसा म्हणून विचारशील तर सांगतों.]

आश्चर्यवत्पश्यति कश्चिदेन-
माश्चर्यवद्वदति तथैव चान्यः ।
आश्चर्यवच्चैनमन्यः शृणोति
श्रुत्वाप्येनं वेद न चैव कश्चित् ॥ २९ ॥

—कोणी एखादा आश्चर्याप्रमाणें या आत्म्याला पहातो, म्ह० जसें एखादें आश्चर्य पहावें तसें तो त्याला पहातो. तसाच दुसरा कोणी एखाद्या आश्चर्याप्रमाणेंच आत्म्याविषयीं बोलतो. कोणी एखादाच श्रोता एखादें आश्चर्य जसें ऐकावें, त्याप्रमाणें आत्म्याचें श्रवण करितो आणि कोणी तर त्याचें श्रवण

करूनहि त्याला जाणत नाहीं. म्ह० आत्म्याचें दर्शन जसें दुर्लभ आहे, तसाच त्याचा द्रष्टाहि दुर्लभ आहे. त्याच्याविषयीं बोलणेंहि दुर्लभ व उपदेशकर्ताहि दुर्लभ. आत्मश्रवणहि दुर्लभ व श्रोताहि दुर्लभ आणि कदाचित् तें सर्वहि जरी सुलभ झालें, तरी ज्याला त्याचा साक्षात्कार झाला आहे, असा पुरुष तर त्या सर्वांहून दुर्लभ आहे. आतां या प्रकरणाचा उपसंहार करितात—

देही नित्यमवध्योऽयं देहे सर्वस्य भारत ।
तस्मात्सर्वाणि भूतानि न त्वं शोचितुमर्हसि ॥ ३० ॥

—याप्रमाणें आत्मा नित्य व निरवयव असल्यामुळें कोणत्याहि अवस्थेंत अवध्यच आहे. तो सर्वव्यापी असल्यामुळें स्थावरादि सर्व प्राण्यांच्या शरीरांत जरी असला व सर्व प्राण्यांचीं शरीरें मारलीं जात असलीं तरी हा आत्मा त्याबरोबर वधास पात्र होत नाहीं. यास्तव भीष्मादि कोणत्याहि प्राण्याला उद्देशून शोक करणें तुला योग्य नाहीं. [ या अध्यायाच्या अकराव्या श्लोकापासून या श्लोकापर्यंत जें आत्मज्ञान सांगितलें आहे, त्याला सांख्य म्हणतात. तें ज्यांना साक्षात् झालेलें असतें, त्यांना सांख्य ज्ञानी ' संन्याशी ' म्हणतात. ते ज्ञानयोगाचे मुख्य अधिकारी होत. याप्रमाणें परमार्थदृष्ट्या शोक व मोह संभवत नाहीं, असें सांगून आतां स्वधर्माकडे पाहूनहि त्यांचा असंभव दाखवितात—

स्वधर्ममपि चावेक्ष्य न विकम्पितुमर्हसि ।
धर्म्याद्धि युद्धाच्छ्रेयोऽन्यत्क्षत्रियस्य न विद्यते ॥ ३१ ॥

—( ४ ) अर्जुना, तूं आपल्या स्वधर्माकडे जरी दृष्टि दिलीस तरी तुला असें व्याकुल होणें योग्य नाहीं. स्वधर्म सोडून त्यापासून चलित होणें, तुला उचित नव्हे, कारण क्षत्रियाला अशा धर्म्ययुद्धाहून अन्य कांहीं श्रेयस्कर नाहीं.

यदृच्छया चोपपन्नं स्वर्गद्वारमपावृतम् ।
सुखिनः क्षत्रियाः पार्थ लभन्ते युद्धमीदृशम् ॥ ३२ ॥

—शिवाय हें यदृच्छेनें उघडलेलें स्वर्गद्वार तुम्हांला प्राप्त झालेलें आहे. इच्छा किंवा प्रार्थना न करितां प्राप्त झालेलें हें युद्ध म्हणजे हें उघडलेलें स्वर्गद्वारच होय. अशा प्रकारचें हें युद्ध ज्या क्षत्रियांना न मागतां प्राप्त होतें, ते खरोखर मोठे भाग्यवान् होत.

अथ चेत्त्वमिमं धर्म्यं संग्रामं न करिष्यसि ।
ततः स्वधर्मं कीर्तिं च हित्वा पापमवाप्स्यसि ॥ ३३ ॥

—पण असें असतांना तूं या अनायासानें प्राप्त झालेल्या धर्मयुद्धापासून जर परत फिरशील, म्ह० हा धर्म्य-संग्राम करणार नाहींस, तर तूं स्वधर्माला मुकशील. हा मोठा धनुर्धर व शूर आहे. अशी लोकांत पसरलेली तुझी कीर्ति नाहींशी होईल व तुला पाप लागेल. [क्षत्रिय असून स्वधर्मरूपी युद्ध सोडल्यास तुला पारलौकिक प्रत्यवाय तर लागेलच, पण त्याशिवाय शिष्टनिंदारूप ऐहिक प्रत्यवायहि प्राप्त होईल, असें आतां भगवान् सांगतात. ]

अकीर्तिं चापि भूतानि कथयिष्यन्ति तेऽव्ययाम् ।
संभावितस्य चाकीर्तिर्मरणादतिरिच्यते ॥ ३४ ॥

—सर्व लोक दीर्घकाल तुझी अकीर्ति सांगत रहातील आणि हे अर्जुना, मान्य पुरुषाची अकीर्ति त्याला मरणाहूनहि दुःसह होते. [या आणखी एका कारणानेंहि तुला युद्ध केलें पाहिजे. तें कोणतें म्हणून विचारशील तर सांगतों.—]

भयाद्रणादुपरतं मंस्यन्ते त्वां महारथाः ।
येषां च त्वं बहुमतो भूत्वा यास्यसि लाघवम् ॥ ३५ ॥

—तूं प्राण्यांची हिंसा होऊं नये, म्हणून दयेनें जरी युद्धापासून निवृत्त झालास, तरी तुझे दुर्योधनादि शत्रु ' अरे हा कर्णादिकांना भ्याला, म्हणून युद्धापासून परत फिरला ' असें म्हणून तुझा उपहास करतील. पण ज्या दुर्योधनादिकांना तूं पूर्वी मोठा शूर, योद्धा, खरा क्षत्रिय म्हणून मान्य झाला होतास, त्यांच्याच तिरस्कारास पात्र होशील.

अवाच्यवादांश्च बहून्वदिष्यन्ति तवाहिताः ।
निन्दन्तस्तव सामर्थ्यं ततो दुःखतरं नु किम् ॥ ३६ ॥

—अरे, अरे, ते तुझे शत्रु तुझ्या पूर्व पराक्रमाची निंदा करीत होत्साते, अनेक अवाच्य म्ह० बोलूं नयेत असे शब्द बोलतील. त्याहून अधिक दुःखकर असें काय बरें आहे ! [' अहो पण, युद्धांत गुरूंची हिंसा केल्यास मध्यस्थ लोक निंदा करणार व युद्धांपासून निवृत्त झाल्यास शत्रु निंदा करणार, तेव्हां कांहीं झालें तरी निंदा होणारच ' म्हणून म्हणशील, तर तसें नाहीं. कारण—]

हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीम् ।
तस्मादुत्तिष्ठ कौन्तेय युद्धाय कृतनिश्चयः ॥ ३७ ॥

—तूं युद्धांत शत्रूकडून मारला गेलास तर स्वर्गाला प्राप्त होशील व कर्णादि शूरांना जिंकलेंस तर पृथ्वीचा उपभोग घेशील. म्हणजे जय किंवा पराजय, यांतील कांहीं जरी झालें तरी लाभच आहे. जयाविषयीं जरी संशय असला तरी लाभाविषयीं संशय नाहीं, असा निश्चय करून तूं युद्धार्थ ऊठ. पण स्वधर्म म्हणून युद्ध करीत असतांना तूं हा उपदेश लक्षांत ठेव.—

सुखदुःखे समे कृत्वा लाभालाभौ जयाजयौ ।
ततो युद्धाय युज्यस्व नैवं पापमवाप्स्यसि ॥ ३८ ॥

—सुख-दुःख, लाभ-अलाभ, जय-पराजय, यांना तुल्य मानून तूं युद्ध कर.

[ नत्वेवाहं० श्लो० १२ येथून परमपुरुषार्थरूप जो आत्मा त्याचें प्रकरण चालू झालें आहे. ' न जायते० ' श्लो. २० इत्यादि श्लोकांनीं त्याचेंच उपपादन केलें आहे. ' देही नित्यं० ' या श्लोकांत प्रकरणार्थाचा उपसंहार केला व मध्येंच श्लोक ३१–३८ लौकिक न्याय सांगितल्यावर आतां पुनः या ३९ व्या श्लोकांत परमार्थदर्शनाचा उपसंहार या गीताशास्त्राचा विभाग स्पष्टपणें दाखविण्यासाठीं पुनः केला जात आहे. सांख्यनिष्ठा व योगनिष्ठा हा त्याचा विभाग आहे व तो पुढील प्रतिपादनावरून आपोआप कळण्यासारखा आहे. तथापि येथें एकदा शास्त्राचा विषयविभाग स्पष्टपणें प्रदर्शित केलेला असला म्हणजे पुढें ३ ऱ्या अध्यायाच्या ३ ऱ्या श्लोकांत सांगितलेलें दोन निष्ठाविषयींचें शास्त्र अनायासें सुलभपणें प्रवृत्त होईल व श्रोतेहि त्याचें विषयविभागपूर्वक सहज ग्रहण करतील. आरंभींच एकदा विषयविभाग सुचवून ठेवलेला असला म्हणजे मग शास्त्राचें प्रतिपादन करणारांस व तें समजून घेणारांस फार त्रास पडणार नाहीं, अशा आशयानें भगवान् पुढील श्लोकांत तोच विषयविभाग दाखवितात. ]

एषा तेऽभिहिता सांख्ये बुद्धिर्योगे त्विमां शृणु ।
बुद्ध्या युक्तो यया पार्थ कर्मबन्धं प्रहास्यसि ॥ ३९ ॥

( ५ )—अर्जुना, ही मीं तुला परमार्थवस्तुविवेकाविषयीं बुद्धि सांगितली म्ह० शोकमोहादि अनर्थरूप संसाराच्या निवृत्तीचें कारण जें आत्मज्ञान तें सांगितलें. आतां योगबुद्धि म्ह० त्या आत्मज्ञानप्राप्तीच्या उपायाचें ज्ञान तूं ऐक. फलाची आसक्ति न ठेवतां सुख-दुःखादि द्वंद्वत्यागपूर्वक ईश्वराच्या आराधनेसाठीं केलेला जो कर्मयोग व त्यामुळें प्राप्त होणारा जो समाधियोग त्याविषयींचा उपदेश

तूं ऐक. त्या बुद्धियोगानें युक्त झालास म्हणजे तूं धर्माधर्मादि कर्मबंधनाचा त्याग करशील.

नेहाभिक्रमनाशोऽस्ति प्रत्यवायो न विद्यते।
स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात् ॥ ४० ॥

—अर्जुना, या मोक्षमार्गरूप कर्मानुष्ठानांत आरंभिलेल्या कर्माचा नाश होत नाहीं. त्यांत कांहीं दोषहि उत्पन्न होत नाहीं. या कर्मानुष्ठानाचें थोडेंसेंहि अनुष्ठान फार मोठ्या जन्म-मरणादिरूप संसारभयापासून रक्षण करितें.

व्यवसायात्मिका बुद्धिरेकेह कुरुनंदन।
बहुशाखा ह्यनन्ताश्च बुद्धयोऽव्यवसायिनाम् ॥ ४१ ॥

—अर्जुना, ही जी वर सांगितलेली सांख्यबुद्धि आणि पुढें सांगावयाची योगबुद्धि, तीच एक या मोक्षमार्गांत निश्चयस्वभावाची बुद्धि आहे. कारण ती वेदरूप सम्यक् प्रमाणापासून उत्पन्न झालेली आहे. इतर अविवेकी लोकांच्या बुद्धि अनंत व अनेक प्रकारच्या असतात.

यामिमां पुष्पितां वाचं प्रवदन्त्यविपश्चितः।
वेदवादरताः पार्थ नान्यदस्तीति वादिनः ॥ ४२ ॥
कामात्मानः स्वर्गपरा जन्मकर्मफलप्रदाम्।
क्रियाविशेषबहुलां भोगैश्वर्यगतिं प्रति ॥ ४३ ॥
भोगैश्वर्यप्रसक्तानां तयापहृतचेतसाम्।
व्यवसायात्मिका बुद्धिः समाधौ न विधीयते ॥ ४४ ॥

—अर्जुना, वेदांचे जे रमणीय अर्थवाद त्यांत आसक्त झालेले, स्वर्गादि फल देणाऱ्या कर्माहून अन्य कांहीं नाहीं असें बोलणारे, कामस्वभाव, स्वर्गाला श्रेष्ठ पुरुषार्थ समजणारे अविवेकी लोक फुललेल्या वृक्षाप्रमाणें शोभणारी, जन्मरूप कर्मफल देणारी, भोग व ऐश्वर्याच्या प्राप्तीसाठीं अनेक प्रकारच्या क्रियांचें प्रकाशन करणारी जी वाणी बोलतात, ती त्यांचें चित्त हरण करिते व त्या वाणीनें ज्याचें चित्त हरण केलें आहे, अशा त्या भोग-ऐश्वर्य यांत आसक्त झालेल्या अविवेक्यांच्या अंतःकरणांत सांख्ययोगविषयक बुद्धि उत्पन्न होत नाहीं.

त्रैगुण्यविषया वेदा निस्त्रैगुण्यो भवार्जुन।
निर्द्वन्द्वो नित्यसत्त्वस्थो निर्योगक्षेम आत्मवान् ॥ ४५ ॥

—अर्जुना, कर्मकांडरूप वेदाचा प्रतिपाद्य विषय त्रैगुण्य म्ह० संसार आहे. यास्तव त्याचें परिमार्जन करण्यासाठीं विवेक सिद्ध व्हावा म्हणून तूं काय करावेंस तें ऐक. वेदाचा विषय संसार आहे, यास्तव विवेकबुद्धिरहित सकाम पुरुषाला ‘ संसार ’ हेंच फल मिळावें हें न्यायप्राप्तच आहे. म्हणून तूं निष्काम, निर्द्वंद्व, म्ह० शीतोष्ण, सुख-दुःख, लाभालाभ इत्यादि द्वंद्वांनीं रहित, नित्य सत्त्वगुणी, योग-क्षेमाची चिंता न करणारा व आत्मस्वरूपाविषयीं सावधान हो. [ स्वधर्माचें अनुष्ठान करीत असतांना त्यामुळेंच चित्तशुद्धि होऊन मुमुक्षुत्व बाणावें, म्हणून तुला हा उपदेश केला आहे. त्याप्रमाणें तूं स्वधर्माचरण केलेंस म्हणजे चित्तशुद्धि, मुमुक्षुत्व इत्यादि ज्ञानाधिकारी पुरुषाला अवश्य असलेले गुण तुझ्यामध्यें येतील. ]

यावानर्थ उदपाने सर्वतः संप्लुतोदके ।
तावान्सर्वेषु वेदेषु ब्राह्मणस्य विजानतः ॥ ४६ ॥

—‘ वेदोक्त कर्मांचीं जीं अनंत फलें आहेत, त्यांची जर अपेक्षा करावयाची नाहीं, तर तीं ईश्वरासाठीं तरी कां करावयाचीं,’ म्हणून विचारशील तर सांगतों—विहीर, तळीं, इत्यादि मर्यादित जलांनीं युक्त असलेल्या अनेक जलाशयांत मिळून लोकांचा जेवढा कार्यभाग होतो, तेवढा तो सर्व, पाण्यानें सर्व बाजूंनीं तुडुंब भरलेल्या मोठ्या सागरांत होतो. लहान, लहान अशा अनेक जलाशयांचें प्रयोजन एका फार मोठ्या जलाशयांत अंतर्भूत होतें, हें प्रसिद्धच आहे. त्याचप्रमाणें वेदोक्त सर्वकर्मांचें जें फल आहे, तें सर्व तत्त्वज्ञानी संन्यासी ब्राह्मणाच्या ज्ञानफलांत अंतर्भूत होतें. [ कारण ज्ञानाचें फल जलानें तुडुंब भरलेल्या मोठ्या जलाशयासारखें आहे आणि फार मोठें फल मिळालें असतां क्षुद्र फलांची अपेक्षा रहात नाहीं, हेंहि प्रसिद्ध आहे. पण कर्ममार्ग व्यर्थ—निरुपयोगी नाहीं. तो ज्ञानाचा अधिकार देणारा आहे. यास्तव ज्ञाननिष्ठेचा अधिकार प्राप्त होईपर्यंत कर्माधिकारी पुरुषानें कर्मच करावें. तें विहिर, तळें, इत्यादि मर्यादित जलासारखें अल्पफल देणारें जरी असलें, तरी ज्ञानाधिकार प्राप्त होई तों तें सोडूं नये. ]

कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन ।
मा कर्मफलहेतुर्भूर्मा ते सङ्गोऽस्त्वकर्मणि ॥ ४७ ॥

—याप्रमाणें आत्मज्ञानफल जरी फार मोठें मोक्षफल देणारें असलें तरी तुझा अधिकार कर्मामध्येंच आहे, ज्ञानांत नाहीं. तूं कर्माधिकारी आहेस, ज्ञानाधि-

कारी नाहींस. पण कर्में करीत असलेल्याहि तुझा फलामध्यें अधिकार नाहीं, कर्म करतांना, त्यापूर्वी व तें केल्यावरहि तुला कर्मफलाचा अधिकार नाहीं. कर्मफलाविषयीं अभिलाष धरून तूं त्याचा हेतु होऊं नकोस व " कर्मांच्या फलाची इच्छा जर करावयाची नाहीं, तर क्लेशकर कर्म तरी कां करावें !" असें म्हणून तें न करण्याविषयींहि तूं आसक्ति ठेवूं नको. [कारण निष्कामकर्म चित्तशुद्धीच्या द्वारा ज्ञाननिष्ठेचा अधिकार प्राप्त करून देत असतें. म्हणून तूं फलाभिलाष न धरतां कर्म कर.]

योगस्थः कुरु कर्माणि सङ्गं त्यक्त्वा धनंजय ।
सिद्ध्यसिद्ध्योः समो भूत्वा समत्वं योग उच्यते ॥ ४८ ॥

—' जर फलासाठीं कर्म करूं नये, तर तें कसें करावें !' म्हणून विचारशील तर सांगतों—हे धनंजया, तूं योगामध्यें स्थित होऊन कर्मफलाविषयींची आसक्ति सोडून केवल ईश्वरार्थ व त्यांतहि ईश्वर मजवर प्रसन्न होवो, अशी आसक्ति न ठेवतां विहित कर्में कर. चित्तशुद्धीपासून झालेली ज्ञानप्राप्तिरूप सिद्धि व चित्ताच्या अशुद्धीपासून झालेली ज्ञानाची अप्राप्तिरूप असिद्धि यांना तुल्य मानणें हाच तो योग होय. या [योगामध्यें स्थित होऊन—या योगामध्यें निष्ठा ठेवून तूं ईश्वरार्थ कर्में कर.]

दूरेण ह्यवरं कर्म बुद्धियोगाद्धनंजय ।
बुद्धौ शरणमन्विच्छ कृपणाः फलहेतवः ॥ ४९ ॥

—हे धनंजया, बुद्धियोगाहून म्ह० समत्वबुद्धियुक्त कर्माहून अथवा ज्ञानयोगाहून फलाच्या इच्छेनें केलेलें कर्म अत्यंत निकृष्ट आहे. यास्तव तूं बुद्धींत म्ह० ज्ञानांत आश्रय मिळविण्याची इच्छा कर. [परमार्थज्ञानशरण हो. कारण फलाच्या तृष्णेनें कर्मफलाचे हेतु होणारे कर्मठ कृपण—अज्ञ आहेत.]

बुद्धियुक्तो जहातीह उभे सुकृतदुष्कृते ।
तस्माद्योगाय युज्यस्व योगः कर्मसु कौशलम् ॥ ५० ॥

—समत्वबुद्धीनें युक्त असलेला पुरुष चित्तशुद्धि, ज्ञानप्राप्ति, या परंपरेनें शुभ कर्मांपासून उत्पन्न होणारें पुण्य व अशुभ कर्मांपासून उत्पन्न होणारें पाप हीं दोन्ही येथल्या येथेंच टाकतो. त्याला त्यांचा लेप लागत नाहीं. समत्वबुद्धीनें चित्तशुद्धि होते, चित्तशुद्धीनंतर ज्ञानप्राप्ति होते. मी अकर्ता, अभोक्ता,

नित्य, निर्विकार आहें, असें आत्मज्ञान होतें. तें झाल्यामुळें पुण्य-पापांचा क्षय होतो. पण नुस्त्या समत्वबुद्धीनें पुण्य-पापक्षय संभवत नाहीं. तथापि तूं प्रथम समत्वबुद्धियोगासाठींच यत्न कर. त्यांत आपलें मन स्थिर कर. कारण कर्त्याला पुण्य-पापांनीं बद्ध करणें हा कर्मांचा जरी स्वभावच असला तरी समत्वबुद्धि-योग हेंच त्या कर्मांतील कुशलत्व आहे. कारण त्यामुळें कर्मांचा स्वभाव बद-लतो आणि असा स्वभावहि बदलून सोडणें हेंच कर्मांतील कौशल आहे. म्हणून तूं समत्वबुद्धियुक्त हो.

कर्मजं बुद्धियुक्ता हि फलं त्यक्त्वा मनीषिणः ।
जन्मबन्धविनिर्मुक्ताः पदं गच्छन्त्यनामयम् ॥ ५१ ॥

—देवादिकांचा देह हा इष्ट देह; पश्वादिकांचा देह हा अनिष्ट देह व मनुष्य-देह हा मिश्र देह होय. त्यांची प्राप्ति होणें हेंच कर्मांपासून मिळणारें फल आहे. पण पूर्वोक्त समत्वबुद्धियुक्त पुरुष चित्तशुद्धीच्या द्वारा ज्ञानी होऊन ज्ञानाच्या बलानेंच त्याचा परित्याग करितात. याप्रमाणें जन्मरूप बंधांतून आपल्याला सोडवून जीवन्मुक्त झालेले ते ज्ञानी प्रारब्धकर्मांचा क्षय होतांच विदेहमोक्षाला प्राप्त होतात. [ किंवा ' बुद्धियोगाद्धनंजय० ' येथून पुढें सर्व बाजूंनीं तुडुंब भरलेल्या फार मोठ्या जलाशयाच्या स्थानीं असलेली कर्मानुष्ठानापासून उत्पन्न झालेली जी चित्तशुद्धि व तिच्यापासून उद्भवलेली परमार्थज्ञानरूप बुद्धि तीच दाखविलेली आहे. कारण पुण्य-पापांचा त्याग व जन्म-बंधनापासून मोक्ष यांचें प्रत्यक्ष हेतुत्व त्या बुद्धीलाच सांगितलें आहे. म्हणून या बुद्धिशब्दाचा अर्थ ' परमार्थज्ञान ' असाच करणें उचित होय. ]

यदा ते मोहकलिलं बुद्धिर्व्यतितरिष्यति ।
तदा गन्तासि निर्वेदं श्रोतव्यस्य श्रुतस्य च ॥ ५२ ॥

—आतां योगानुष्ठानामुळें झालेली जी चित्तशुद्धि, तिच्यापासून होणारें हें ज्ञान केव्हां होतें, म्हणून विचारशील तर सांगतों—जेव्हां तुझी बुद्धि अविवेकरूप दोषांचें अतिक्रमण करील म्ह० शुद्ध होईल, तेव्हां अध्यात्मशास्त्रार्थरिक्त इतर शास्त्रांचें श्रोतव्य व श्रुत या दोन्हीविषयीं तूं विरक्त होशील. जें ऐकलें आहे व जें ऐकावयाचें आहे, तीं दोन्ही व्यर्थ आहेत, असें तुला वाटेल; अध्यात्म-शास्त्राचा मात्र तुला असा कंटाळा येणार नाहीं.

श्रुतिविप्रतिपन्ना ते यदा स्थास्यति निश्चला ।
समाधावचला बुद्धिस्तदा योगमवाप्स्यसि ॥ ५३ ॥

—कर्मयोगाचें फल असा जो परमार्थयोग तो केव्हां प्राप्त होईल, असें विचा-शील तर सांगतों. अनेक साध्य-साधनसंबंध दाखविणाऱ्या श्रवणांनीं विक्षिप्त झालेली तुझी बुद्धि जेव्हां विक्षेपरहित होईल व विकल्पशून्य होऊन आत्म्या-मध्यें स्थिर होईल, त्यावेळीं मुख्य योगाला तूं प्राप्त होशील. [ मोहरूपी चित्तमल नाहींसा होऊन पूर्वोक्त विवेकादिकांनीं युक्त झालेली तुझी बुद्धि आत्म्यामध्यें जेव्हां स्थिर होईल, तेव्हां तो ज्ञानरूप परमार्थयोग सिद्ध होईल. हें अर्जुनाच्या पूर्वोक्त प्रश्नाचें उत्तर आहे. ]

अर्जुन उवाच—

स्थितप्रज्ञस्य का भाषा समाधिस्थस्य केशव ।
स्थितधीः किं प्रभाषेत किमासीत व्रजेत किम् ॥ ५४ ॥

( ६ )—संन्याश्यांची ज्ञाननिष्ठा व तिच्या प्राप्तीचें कथन हें प्रश्नाचें बीज मिळतांच ज्याला समाधिप्रज्ञा प्राप्त झाली आहे, त्या पुरुषाचें लक्षण जाणण्याच्या इच्छेनें अर्जुन म्हणाला—हे केशवा, आत्मनिष्ठ स्थितप्रज्ञाचें लक्षण काय आहे ! स्थितप्रज्ञ काय बोलतो ! तो कसा रहातो ? व व्यवहार कसा करतो ! [ या श्लोकांत अर्जुनानें समाधिस्थ स्थितप्रज्ञाचें लक्षण विचारलें आहे. समाधि म्ह० स्वाभाविक चित्तसमाधान. आत्मसाक्षात्कार झाल्यामुळें स्वाभाविक चित्तसमा-धानवान् स्थितप्रज्ञाचें म्ह० ‘ मीच ब्रह्म आहें. ’ अशी ज्याची प्रज्ञा स्थिर झाली आहे, त्या ज्ञाननिष्ठाचें लक्षण काय आहे ! लोक त्याच्याविषयीं काय बोलतात, तो स्वतः काय बोलतो व व्यवहारांत कसा वागतो ? ]

श्रीभगवानुवाच—

प्रजहाति यदा कामान्सर्वान्पार्थ मनोगतान् ।
आत्मन्येवात्मना तुष्टः स्थितप्रज्ञस्तदोच्यते ॥ ५५ ॥

—मुमुक्षूचीं यत्नसाध्य साधनें व ज्ञाननिष्ठाचीं स्वाभाविक लक्षणें सांगण्या-साठीं श्रीकृष्ण म्हणाले—हे अर्जुना, पुरुष आपल्या मनांतील सर्व कामांस सर्वथा जेव्हां सोडतो आणि आत्म्यामध्येंच आत्मस्वरूपानें संतुष्ट झालेला असतो, तेव्हां तो स्थितप्रज्ञ म्हटला जातो. [ मनांतील सर्व इच्छांचा त्यांच्या वासनांसह त्याग करून आपल्या अंतर्यामीच्या स्वरूपांत दुसऱ्या कोणत्याहि अनात्मपदार्थांच्या लाभाची अपेक्षा न करतां त्या आत्मस्वरूपानेंच जो संतुष्ट असतो तो स्थितप्रज्ञ होय. स्थितप्रज्ञाचें हें मुख्य लक्षण आहे. ]

दुःखेष्वनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः ।
वीतरागभयक्रोधः स्थितधीर्मुनिरुच्यते ॥ ५६ ॥

—मुमुक्षूचें दुसरें कर्तव्य व विद्वानाचें दुसरें लक्षण सांगण्यासाठीं भगवान् म्हणतात—जो पुरुष आध्यात्मिकादि दुःखें प्राप्त झालीं असतां उद्विग्न होत नाहीं, नानाप्रकारचीं सुखें प्राप्त झालीं असतांहि त्यांबरोबर ज्याची तृष्णा वाढत नाहीं, म्ह० त्यांच्याविषयीं जो निरिच्छ असतो, ज्याचे राग, भय, व क्रोध निवृत्त झालेले असतात, तो स्थितप्रज्ञ मुनि म्हटला जातो. [ दुःखानें उद्विग्न न होणारा, सुखाविषयीं तृष्णा वाढूं न देणारा आणि आसक्ति, भय व क्रोध यांनीं रहित असलेला जो पुरुष तो स्थितप्रज्ञ मुनि होय. मुनि म्ह० आत्मवेत्ता संन्यासी. वरील अवस्था जेव्हां प्राप्त होते, तेव्हां त्याला स्थितप्रज्ञ म्हणतात. ]

यः सर्वत्रानभिस्नेहस्तत्तत्प्राप्य शुभाशुभम् ।
नाभिनन्दति न द्वेष्टि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ५७ ॥

मुमुक्षूचें तिसरें कर्तव्य व विद्वानाचें तिसरें लक्षण जो देह-जीवितादिकांविषयींहि अत्यंत प्रीतिरहित असतो, तें तें शुभ व अशुभ, यांस प्राप्त होऊन त्यांतील शुभप्राप्तीचें अभिनंदन व अशुभप्राप्तीचा द्वेष करीत नाहीं. त्याची प्रज्ञा प्रतिष्ठित आहे. तोच स्थितप्रज्ञ होय.

यदा संहरते चायं कूर्मोऽङ्गानीव सर्वशः ।
इन्द्रियाणीन्द्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ५८ ॥

—जिज्ञासूचें चवथें कर्तव्य व ज्ञान्याचें चवथें लक्षण—कांसव आपले अवयव जसे एकदम आंवरून घेतो, तसा हा पुरुष जेव्हां विषयांपासून इंद्रियें सर्वप्रकारें परतवून घेतो, तेव्हां त्याची प्रज्ञा प्रतिष्ठित झाली आहे, असें समजावें. इंद्रियांना विषयांपासून विमुख करणें हें प्रज्ञास्थैर्याचें लक्षण आहे.

व्यवहारांत विषयभोगापासून विमुख झालेल्या रोग्याचींहि इंद्रियें निवृत्त होतात, पण त्या विषयांची प्रीति निवृत्त होत नाहीं. यास्तव विषयप्रीतिहि कशी निवृत्त होते तें सांगतात—

विषया विनिवर्तन्ते निराहारस्य देहिनः ।
रसवर्जं रसोऽप्यस्य परं दृष्ट्वा निवर्तते ॥ ५९ ॥

—जो विषयांचें आहरण करूं शकत नाहीं, अनुभव घेऊं शकत नाहीं, अशा उपाशीं किंवा अशक्त प्राण्यापासूनहि शब्द-स्पर्शादि विषय प्रीतीवांचून निवृत्त होतात. विषयासक्तीसह निवृत्त होत नाहींत. पण या स्थितप्रज्ञाचा तो विषयासक्तिरूप रसहि परमार्थतत्त्वाचा अनुभव घेऊन निवृत्त होतो. [ विषयांचें सेवन करावयाचें नाहीं, अशा हठानें जे इंद्रियांना विषयांपासून परतवितात किंवा इंद्रियांचा हठानें निरोध केल्यामुळें विषय त्यांच्यापासून निवृत्त होतात, तीं इंद्रियें किंवा ते विषय विषयप्रीतिसह निवृत्त होत नाहींत. तर विषयवासना मनांत जशीच्या तशी ठेवूनच निवृत्त होतात. विषयवासनेसह निवृत्त होत नाहींत. पण रस म्ह० विषयप्रीति. परब्रह्माला साक्षात् जाणल्यानें ‘ मीच तें आहें ’ असा अनुभव घेऊन त्यांतच स्थिर झाल्यानें ती विषयप्रीतीहि निवृत्त होते. ]

यततो ह्यपि कौन्तेय पुरुषस्य विपश्चितः ।
इन्द्रियाणि प्रमाथीनि हरन्ति प्रसभं मनः ॥ ६० ॥
तानि सर्वाणि संयम्य युक्त आसीत मत्परः ।
वशे हि यस्येन्द्रियाणि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ६१ ॥

—सम्यग्दर्शनरूप प्रज्ञास्थैर्य करण्याची इच्छा करणारानें प्रथम इंद्रियांना आपल्या स्वाधीन ठेवावें. तसें न केल्यास कोणता दोष घडतो, तें सांगण्यासाठीं भगवान् म्हणतात—हे कौंतेया, यत्न करणाऱ्याहि बुद्धिमान् पुरुषाचीं व्याकुल करणारीं इंद्रियें त्याच्या मनाला हरण करितात. यास्तव त्या सर्व इंद्रियांचें संयमन करून त्यांना आपल्या वश ठेवून शांतचित्त व मत्पर होऊन म्ह० ‘ मीच श्रेष्ठ आहें, मजहून अन्य कोणी श्रेष्ठ नाहीं ’ असें समजून स्थिर रहावें. कारण इंद्रियें ज्याच्या अधीन असतात, त्याची प्रज्ञा प्रतिष्ठित असते. [ प्रज्ञास्थैर्याची इच्छा करणाऱ्या पुरुषानें प्रथम जितेंद्रिय व्हावें. कारण इंद्रियांना स्वाधीन न ठेवल्यास वारंवार विषयांतील दोषांचें चिंतन करणाऱ्या विद्वान् पुरुषाचींहि इंद्रियें त्याच्या विवेक-विज्ञानयुक्त मनालासुद्धां बलात्कारानें विषयांकडे ओढून नेतात. कारण पुरुषाला विषयांसाठीं व्याकुल करणें हा त्यांचा स्वभावच आहे. म्हणून प्रथम इंद्रियांचें संयमन करून, शांत होऊन मी सर्वान्तर्यामी जो वासुदेव तत्पर होऊन, तोच ‘ मी, त्याहून निराळा नव्हे ’ असा निश्चय करून रहावें. परमात्म्याहून मी अन्य नाहीं, असें निरंतर अनुसंधान,

किंवा विषय-दोषांच्या चिंतनाचा अभ्यास, यामुळें ज्याचीं इंद्रियें वश झालेलीं असतात, तोच स्थितप्रज्ञ होय. ]

ध्यायतो विषयान्पुंसः संगस्तेषूपजायते ।
सङ्गात्संजायते कामः कामात्क्रोधोऽभिजायते ॥ ६२ ॥
क्रोधाद्भवति संमोहः संमोहात्स्मृतिविभ्रमः ।
स्मृतिभ्रंशाद्बुद्धिनाशो बुद्धिनाशात्प्रणश्यति ॥ ६३ ॥

—सर्व अनर्थांचें मूळ विषयचिंतनांत आहे. तें कसें ? म्हणून विचारशील तर सांगतों—विषयांचें ध्यान–चिंतन करणाऱ्या पुरुषाची त्या विषयांच्या ठिकाणीं प्रीति–आसक्ति उत्पन्न होते. विषयासक्तीमुळें त्यांची इच्छा होते. विषयेच्छेपासून क्रोध उत्पन्न होतो, तीव्र विषयेच्छेला कोणीं प्रतिबंध केल्यास त्याच्याविषयीं क्रोध उत्पन्न होणें स्वाभाविक आहे. त्या क्रोधापासून कार्य व अकार्य याविषयींचा अविवेक उत्पन्न होतो. त्या अविवेकापासून स्मृतिभ्रंश होतो. म्ह० शास्त्रादिकांच्या उपदेशाची आठवण नाहींशी होते. स्मृतिभ्रंशापासून बुद्धीचा नाश होतो आणि बुद्धिभ्रंश झाल्यामुळें तो पुरुषच नाश पावतो. तो पुरुषार्थांचा अधिकारी रहात नाहीं.

रागद्वेषवियुक्तैस्तु विषयानिन्द्रियैश्चरन् ।
आत्मवश्यैर्विधेयात्मा प्रसादमधिगच्छति ॥ ६४ ॥

—पण याच्या उलट राग-द्वेषरहित व स्वतःच्या स्वाधीन असलेल्या इंद्रियांनीं विषयांचा अनुभव घेणारा विधेयात्मा म्ह० ज्याचें अंतःकरण त्याच्या इच्छेप्रमाणें चालतें, तो पुरुष चित्ताच्या स्वास्थ्यास प्राप्त होतो. [ कर्म व ज्ञान यांचे जे अधिकारी असतात, त्यांतील मुमुक्षु राग-द्वेषरहित व स्वाधीन ठेवलेल्या इंद्रियांनीं अंतःकरणालाहि आपल्या इच्छेच्या विरुद्ध वागूं न देतां शरीर जिवंत रहाण्यास अगदीं अवश्य तेवढ्याच विषयांचा उपभोग घेतो. त्यामुळें त्याच्या चित्ताला स्वास्थ्य मिळतें. इंद्रियें व अंतःकरण या दोहोंनाहि आपल्या स्वाधीन ठेवल्यामुळें त्याची प्रवृत्ति अनियमानें होऊं शकत नाहीं, तर ती नियमानेंच होते. त्यामुळें त्याचें चित्त अत्यंत निर्मल—प्रसन्न होतें. ]

प्रसादे सर्वदुःखानां हानिरस्योपजायते ।
प्रसन्नचेतसो ह्याशु बुद्धिः पर्यवतिष्ठते ॥ ६५ ॥

—आणि असें चित्तस्वास्थ्य प्राप्त झालें असतां त्याच्या सर्व आध्यात्मिकादि विविध दुःखांचा नाश होतो व ज्याअर्थी शांतचित्त पुरुषाची बुद्धि–चित्त

सर्व बाजूंनीं सत्वर स्थिर होते, त्याअर्थीं राग-द्वेषरहित इंद्रियांनीं अनिषिद्ध व अगर्दीं अवश्य तितक्याच विषयांचा अनुभव घ्यावा. त्यांचेंच सेवन करावें. निषिद्ध व अनावश्यक विषयांचें सेवन कधींहि करूं नये.

नास्ति बुद्धिरयुक्तस्य न चायुक्तस्य भावना ।
न चाभावयतः शान्तिरशान्तस्य कुतः सुखम् ॥ ६६ ॥

—अर्जुना, ज्याचें चित्त स्थिर झालेलें नसतें, त्याला आत्म्याविषयींची बुद्धि नसते. तसेंच ज्याचें चित्त प्रसन्न असतें, त्याला आत्मज्ञानाविषयींचा अभिनिवेश नसतो. सतत आत्मानुसंधान, 'मीच ब्रह्म' ही बुद्धि नसते. आणि तशी बुद्धि न करणाराला चित्ताची स्वस्थता नसते. ज्याचें चित्त शांत म्ह० स्वस्थ झालेलें नाहीं, त्याला सुख कोठचें ! [ ज्याचें चित्त विक्षिप्त असतें, संकल्प, विकल्प, संशय, विपरीत भावना, इत्यादि दोषांनीं युक्त असतें, त्याला आत्म्याविषयीं बुद्धिच होत नाहीं. तसल्या विक्षिप्त चित्त पुरुषाकडून आत्मानुसंधान—सतत चिंतनहि होत नाहीं. दीर्घकाल—वर्षेंच्या वर्षे आत्म्याचें सतत स्मरण न करणाराला शांति प्राप्त होत नाहीं. त्या त्या अनर्थांची निवृत्ति होत नाहीं आणि ती न झाल्यामुळें संसारसागरांतच निमग्न झालेल्या अशान्त पुरुषाला सुख कोठून होणार ! कारण इंद्रियांना विषयेच्छारहित करणें हेंच सुख आहे. विषयतृष्णा वाढविणें किंवा तिला चित्तांत राहूं देणें हें सुख नव्हे; कारण तृष्णा असेपर्यंत सुखाचा लेशहि अनुभवास येत नाहीं. असा अनुभव पदोपदीं येतो व शास्त्रहि तसेंच सांगतें. ]

इन्द्रियाणां हि चरतां यन्मनोऽनुविधीयते ।
तदस्य हरति प्रज्ञां वायुर्नावमिवाम्भसि ॥ ६७ ॥

—असमाहित पुरुषाला आत्म्याविषयींची बुद्धि कां होत नाहीं ? म्हणून विचारशील तर सांगतों—आपापल्या विषयामध्यें प्रवृत्त होणाऱ्या इंद्रियांच्या मागोमाग जें मन जातें, तें या साधकाच्या प्रज्ञेला—आत्मा व अनात्मा यांच्या विवेकावांचून उत्पन्न झालेल्या बुद्धीला हरण करितें. जलामध्यें वायु जसा नौकेला अमार्गानें नेतो, त्याप्रमाणें तें मन इंद्रियांना अमार्गानें जावयास लावतें. [ म्हणून अयुक्ताला आत्मसाक्षात्काररूप बुद्धि होत नाहीं. ]

तस्माद्यस्य महाबाहो निगृहीतानि सर्वशः ।
इन्द्रियाणीन्द्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ६८ ॥

—म्हणून हे महाबाहो अर्जुना, ज्या पुरुषाचीं इंद्रियें विषयांपासून सर्व प्रकारें निग्रह करून ठेवलेलीं असतात, त्याची आत्मानात्म विवेकजन्य बुद्धि प्रतिष्ठित झालेली असते. [ ६० व्या श्लोकांत इंद्रियें मनाला विषयासक्त करून पुरुषाचा घात कसा करितात, तें सांगण्यास आरंभ करून ६२ व्या श्लोकापासून पुढील श्लोकांनीं त्याविषयीं उपपत्ति सांगितली व या श्लोकांत त्याच विषयाचा उपसंहार केला आहे. ]

या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी ।
यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः ॥ ६९ ॥

—सर्व लौकिक-वैदिक व्यवहार हें अविद्येचें कार्य आहे व अविद्येचा विद्येशीं विरोध आहे. त्यामुळें ज्ञानी पुरुषाची अविद्या निवृत्त होतांच त्याच्या व्यवहाराची निवृत्ति होते. ती कशी, म्हणून विचारशील तर सांगतों—सर्व भूतांची जी रात्र म्ह० परमार्थदर्शन, तिच्यामध्यें संयमवान् जितेंद्रिय योगी—स्थितप्रज्ञ जागतो व ज्या व्यवहारदर्शेत सर्व भूतें जागतात—दक्ष असतात, ती व्यवहारावस्था ज्ञानी मुनीची रात्र असते. [ आत्मज्ञान ही सर्व भूतांची रात्र, पण त्यांत ज्ञानी जागतो व व्यवहारदशा हा सर्व भूतांचा दिवस, ती ज्ञानीपुरुषाची रात्र आहे. ]

आपूर्यमाणमचलप्रतिष्ठं
समुद्रमापः प्रविशन्ति यद्वत् ।
तद्वत्कामा यं प्रविशन्ति सर्वे
स शान्तिमाप्नोति न कामकामी ॥ ७० ॥

—अर्जुना, निष्काम स्थितप्रज्ञ यतीलाच मोक्ष प्राप्त होतो. सकाम पुरुषाला नाहीं. हा सिद्धान्त मी तुला दृष्टान्तानें स्पष्ट करून सांगतों—पाण्यानें चोहोंकडून सतत भरल्या जाणाऱ्या, तथापि आपली मर्यादा न सोडणाऱ्या समुद्रामध्यें जसें अनेक नद्यांचें जल प्रवेश करितें, तथापि समुद्र स्वरूपांतच स्थित असतो, त्याप्रमाणें सर्व काम ज्या पुरुषामध्यें त्याला विकारयुक्त न करतां प्रवेश करतात, तोच शांतीला प्राप्त होतो. विषयांची इच्छा करणारा पुरुष शांतीला प्राप्त होत नाहीं. [ हजारों नद्यांचें जल चहूंकडून प्रतिक्षणीं समुद्रास येऊन मिळत असतें, पण त्याच्या उदकरूप नियत स्वरूपांत थोडासाहि न्यूनाधिक भाव झालेला दिसत नाहीं. त्याची स्थिति एकरूपच असते. त्याचप्रमाणें सर्व

विषय विद्वानाच्या अगदीं समीप असले, तरी त्यांविषयींच्या इच्छा त्याच्या अंतःकरणांत लीन होतात. त्या त्याच्यामध्यें कोणताहि विकार उत्पन्न करीत नाहींत. अशा विषयांविषयीं अत्यंत विरक्त झालेल्या निष्काम ज्ञानी पुरुषालाच मोक्षरूप शांति प्राप्त होते. विषयासक्त सकाम पुरुषाला ती प्राप्त होत नाहीं. ]

विहाय कामान्यः सर्वान्पुमांश्चरति निःस्पृहः ।
निर्ममो निरहंकारः स शान्तिमधिगच्छति ॥ ७१ ॥

—अर्जुना, ज्याअर्थीं असा अबाधित नियमच आहे, त्याअर्थीं जो पुरुष—संन्यासी सर्व कामनांचा निःशेष त्याग करून केवल जीवनाला अवश्य तेवढीच चेष्टा करतो, शरीर जीवंत रहाण्यास अवश्य तेवढेंच कर्म करतो व एकाच जागीं राहिल्यास त्या स्थलादिकांवर आसक्ति जडेल म्हणून एकाच नियत स्थानीं न राहतां सदा पर्यटन करितो आणि जो निर्मम व निरहंकार असतो म्ह० ज्याला शरीराच्या केवल जीवनास अत्यंत अवश्य असलेल्या परिग्रहाविषयींहि 'हा माझा' असा अभिनिवेश नसतो, तसेंच जो 'मी मोठा विद्वान् आहें,' अशा प्रकारच्या विद्यावत्त्वाविषयींच्या आत्मसंभावनेनें रहित असतो, तो स्थितप्रज्ञ ब्रह्मवेत्ता सर्व संसारदुःखांचा क्षय हेंच जिचें स्वरूप आहे, अशा 'निर्वाण'-संज्ञक शांतीला प्राप्त होतो. [ मोक्षाची इच्छा करणाऱ्या संन्याशाचीं सर्व कामत्याग, निःस्पृहता, निर्ममता, निरहंकार, जितेंद्रियत्व इत्यादि विशेषणें यत्नसाध्य असून 'कैवल्य' हें त्याचें फल आहे. ]

एषा ब्राह्मी स्थितिः पार्थ नैनां प्राप्य विमुह्यति ।
स्थित्वास्यामन्तकालेऽपि ब्रह्मनिर्वाणमृच्छति ॥ ७२ ॥

—अर्जुना, ही जी वर सांगितलेली स्थितप्रज्ञता हीच ब्राह्मी स्थिति आहे. या स्थितीला प्राप्त होऊन मनुष्य मोहित होत नाहीं. या स्थितींत अन्त्य वयामध्येंहि स्थित होऊन मनुष्य मोक्षास प्राप्त होतो. [ या अध्यायांत शोकमोहांची साक्षात् निवृत्ति करणारी ज्ञाननिष्ठा प्राधान्यानें व उपायभूत कर्मनिष्ठा गौणत्वानें सांगितली आहे. म्हणून या अध्यायाला 'सांख्ययोग' असें नांव दिलें आहे. ]

( येथें भगवद्गीतेचा 'सांख्ययोग' नांवाचा दुसरा अध्याय समाप्त झाला. ) ६. ३. २६.

---

## अध्याय २७ वा.

### ( गीताध्याय ३ रा. कर्मयोग )

[ १ अर्जुनाचा प्रश्न. २ भगवानाचें या लोकीं दोन निष्ठा आहेत असें उत्तर. ३ कर्मयोगाचें सविस्तर व सकारण प्रतिपादन. ४ कर्मयोगाच्या अपवादभूत ज्ञान्यांचें नैष्कर्म्य. ५ कर्माधिकाऱ्यानें लोकसंग्रहार्थ कर्म करण्याची अनेक उपपत्तींनीं आवश्यकता. ६ अर्जुनाचा प्रश्न व भगवानाचें 'काम हाच सर्व अनर्थ उत्पन्न करणारा शत्रु' असें उत्तर. ]

अर्जुन उवाच—

**ज्यायसी चेत्कर्मणस्ते मता बुद्धिर्जनार्दन ।**
**तत्किं कर्मणि घोरे मां नियोजयसि केशव ॥ १ ॥**
**व्यामिश्रेणेव वाक्येन बुद्धिं मोहयसीव मे ।**
**तदेकं वद निश्चित्य येन श्रेयोऽहमाप्नुयाम् ॥ २ ॥**

(१)—भगवान् इतर साधकांना ज्ञाननिष्ठा हें साक्षात् श्रेयसाधन सांगतात आणि मला मात्र 'कर्म कर' असें म्हणतात. हें त्याचें कृत्य बरोबर नाहीं, असें समजून अर्जुन म्हणाला—हे जनार्दना, कर्माहून ज्ञान श्रेष्ठ आहे, हें जर तुला संमत आहे, तर मग तूं मला या घोर कर्मांत कां नियुक्त करितोस ? हे प्रभो, आपल्या संदिग्ध भाषणानें तूं जणुकाय मला मोहच पाडीत आहेस. यास्तव माझा वर्ण, आश्रम, अधिकार इत्यादिकांस योग्य असें एक श्रेयःसाधन निश्चित सांग.

श्रीभगवानुवाच—

**लोकेऽस्मिन्द्विविधा निष्ठा पुरा प्रोक्ता मयानघ ।**
**ज्ञानयोगेन सांख्यानां कर्मयोगेन योगिनाम् ॥ ३ ॥**

( २ ) **भगवान्**—हे निष्पाप अर्जुना, मीं सृष्टीच्या आरंभीं सर्व प्रजा उत्पन्न करून त्यांच्या ऐहिक व पारलौकिक उत्कर्षासाठीं आणि मोक्षासाठीं त्यांतील त्रैवर्णिकांना दोन प्रकारची निष्ठा सांगितली. ज्ञानयोगानें सांख्यांची निष्ठा—तत्परता व कर्मयोगानें—कर्माधिकारी द्विजांची निष्ठा अशी दोन प्रकारची पृथक् निष्ठा पृथक् अधिकाऱ्यांसाठीं सांगितली आहे.

**न कर्मणामनारम्भान्नैष्कर्म्यं पुरुषोऽश्नुते ।**
**न च संन्यसनादेव सिद्धिं समधिगच्छति ॥ ४ ॥**

—'आतां ज्ञान जर कर्माहून श्रेष्ठ आहे व कर्म जर संसारबंध उत्पन्न करणारें आहे, तर तेंच करण्याविषयीं मला आग्रह कां करितोस ?' असें विचारशील तर त्याचें कारण सांगतों—कर्माधिकारी पुरुष विहित कर्माचा आरंभ केल्यावांचून ज्ञानयोगनिष्ठेला प्राप्त होत नाहीं. कारण नित्य-नैमित्तिक कर्मांचें अनुष्ठान हा नैष्कर्म्याचा उपाय आहे. उपायावांचून उपेयाची प्राप्ति होत नाहीं, असा न्याय आहे. म्हणून कर्मारंभावांचून नैष्कर्म्य प्राप्त होत नाहीं. केवल कर्मसंन्यासानेंच नैष्कर्म्य प्राप्ति होईल, असें जर तूं समजत असशील तर तें योग्य नाहीं. कारण पुरुष केवल ज्ञानरहित संन्यासानेंच ज्ञानयोगनिष्ठेला प्राप्त होत नाहीं. [ज्ञानासह संन्यासानेंच नैष्कर्म्य प्राप्ति होते. ज्ञानासाठीं चित्तशुद्धि व्हावी लागते व चित्तशुद्धीला नित्य-नैमित्तिक कर्मांची अपेक्षा आहे, म्हणून श्रौत-स्मार्त कर्मांच्या अनुष्ठानाला आरंभ केल्यावांचून नैष्कर्म्य प्राप्त होत नाहीं.]

न हि कश्चित्क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत् ।
कार्यते ह्यवशः कर्म सर्वः प्रकृतिजैर्गुणैः ॥ ५ ॥

(३)—अर्जुना, ज्ञानरहित कर्मसंन्यासानेंच नैष्कर्म्यरूप सिद्धि कां मिळत नाहीं याचें कारण सांगतों—कोणताहि प्राणी एक क्षणभर सुद्धां कर्म सोडून राहूं शकत नाहीं. कारण प्रकृतीच्या पराधीन असलेला प्रत्येक जीव त्या ईश्वराच्या अचिंत्यशक्तीपासून झालेल्या सत्त्व-रजस्तमो गुणांकडून कर्म करविला जातो. ते गुण प्रत्येक जीवाकडून कर्म करवितात. [गुणातीत झालेला सम्यग्ज्ञानी मात्र गुणांकडून कर्म करविला जात नाहीं. ]

कर्मेन्द्रियाणि संयम्य य आस्ते मनसा स्मरन् ।
इन्द्रियार्थान्विमूढात्मा मिथ्याचारः स उच्यते ॥ ६ ॥

—जो अत्यंत मूढबुद्धि पुरुष कर्मेंद्रियांचें संयमन करून मनानें विषयांचें स्मरण करीत रहातो, तो ढोंगी म्हटला जातो. [कर्मेंद्रियांचें संयमन करून मनानें विषयचिंतन करणारा पुरुष अज्ञ संन्यासीहि नसून शुद्ध ढोंगी आहे. ]

यस्त्विन्द्रियाणि मनसा नियम्यारभतेऽर्जुन ।
कर्मेन्द्रियैः कर्मयोगमसक्तः स विशिष्यते ॥ ७ ॥

—पण हे अर्जुना, याच्या उलट जो पुरुष ज्ञानेंद्रियांचा मनानें निग्रह करून कर्मफलांमध्यें आसक्त न होतां कर्मेंद्रियांनीं कर्मयोगाचा आरंभ करितो, तो श्रेष्ठ होय. [जो कर्माधिकारी अज्ञ पुरुष चक्षुः-श्रोत्रादि पांची ज्ञानेंद्रियांचें

विवेकयुक्त अंतःकरणानें नियमन करितो आणि वाक्, हस्त, इत्यादि कर्मेंद्रियांनीं कर्मानुष्ठानाला, त्यांत आसक्त न होतां, आरंभ करितो, तो इतर मिथ्याचाराहून म्ह० पूर्वोक्त ढोंग्याहून अधिक चांगला होय. ]

नियतं कुरु कर्म त्वं कर्म ज्यायो ह्यकर्मणः ।
शरीरयात्रापि च ते न प्रसिद्ध्येदकर्मणः ॥ ८ ॥

—याप्रमाणें कर्म करणें व न करणें यांचा परिणाम प्रत्यक्ष प्रमाणानेंच अनुभवास येतो. यास्तव कर्माधिकारी असल्यामुळें तूं नित्य कर्म कर. कारण कर्म मुळींच न करण्यापेक्षां तें करणें श्रेष्ठ आहे. फार काय, पण कर्म न केल्यानें तुझी शरीरस्थितिहि शास्त्रविहित मार्गानें सिद्ध होणार नाहीं.

यज्ञार्थात्कर्मणोऽन्यत्र लोकोऽयं कर्मबन्धनः ।
तदर्थं कर्म कौन्तेय मुक्तसङ्गः समाचर ॥ ९ ॥

—पण कर्म बंधाला कारण होणारें असल्यामुळें तें करूं नये, असें जें तूं समजत आहेस, तें बरोबर नाहीं. कारण हा कर्माधिकारी पुरुष ईश्वराच्या आराधनेसाठीं केलेलें जें कर्म त्यानें बद्ध होत नाहीं. तर ईश्वरार्थ न केलेल्या कर्मानेंच बद्ध होतो. म्हणून हे अर्जुना, तूं ईश्वरासाठीं मुक्तसंग होऊन म्ह० कर्मफलाविषयींची आसक्ति सोडून कर्माचें आचरण कर.

सहयज्ञाः प्रजाः सृष्ट्वा पुरोवाच प्रजापतिः ।
अनेन प्रसविष्यध्वमेष वोऽस्त्विष्टकामधुक् ॥ १० ॥

—कर्माधिकारी पुरुषानें याहि आणखी एका कारणास्तव नैमित्तिक कर्मासह नित्यकर्म करावें. तें कारणच आतां सांगतों—प्रजांचा स्रष्टा ब्रह्मदेव सृष्टीच्या आरंभीं यज्ञासहवर्तमान तीन वर्णांना उत्पन्न करून 'या यज्ञानें तुम्ही आपली वृद्धि करून घ्या, हा तुमचे इष्ट मनोरथ पूर्ण करो.' असें म्हणाला.

देवान्भावयतानेन ते देवा भावयन्तु वः ।
परस्परं भावयन्तः श्रेयः परमवाप्स्यथ ॥ ११ ॥

—पण हा यज्ञ इष्ट काम कसे देणार ! तेंहि त्यानें त्या प्रजांना सांगितलें. तो म्हणाला—"तुम्ही हे यज्ञादि करुन हविर्भागांनीं देवतांना प्रसन्न करा व वृष्टि, अन्न इत्यादिकांच्या योगानें देव तुमचें परिपोषण करतील. याप्रमाणें परस्परांच्या उपयोगी पडून तुम्ही स्वर्गाची इच्छा असल्यास देवतांच्या प्रसा-

दानें स्वर्गाला प्राप्त व्हाल व तुम्हांला स्वर्गाची इच्छा नसून तुम्ही जर मुमुक्षु असाल तर चित्तशुद्धि, ज्ञानप्राप्ति या क्रमानें मोक्षाला प्राप्त व्हाल."

इष्टान्भोगान्हि वो देवा दास्यन्ते यज्ञभाविताः।
तैर्दत्तानप्रदायैभ्यो यो भुङ्क्ते स्तेन एव सः॥ १२॥

—अर्जुना, कर्माधिकारी पुरुषानें कर्मच करावें यांविषयीं तुला एक कारण सांगितलें. आतां आणखीहि एक कारण सांगतों, तें ऐक. यज्ञानें संतुष्ट केले गेलेले देव तुम्हांला इष्ट असलेले भोग देतील. पण देवांनीं दिलेले भोग त्यांस परत न देतां जो भोगतो, तो चोरच होय. [ तुम्हांकडून यज्ञांनीं संतुष्ट केले गेलेले देव तुम्हांला इष्ट भोग देतील. पण त्यांचें आनृण्य संपादन न करतां म्ह० यज्ञांच्या योगानें देवांच्या, ब्रह्मचर्यानें ऋषींच्या व प्रजेच्या योगानें पितरांच्या ऋणांतून मुक्त न होतां त्यांना त्या त्या साधनांनीं तृप्त केल्यावांचून जो त्यांचा उपभोग घेतो, आपलाच देह व इंद्रियें यांस तृप्त करितो, तो देव, ऋषि व पितर यांच्या धनाचा अपहार करणारा चोरच होय. ]

यज्ञशिष्टाशिनः सन्तो मुच्यन्ते सर्वकिल्बिषैः।
भुञ्जते ते त्वघं पापा ये पचन्त्यात्मकारणात्॥ १३॥

—पण, याच्या उलट देवयज्ञादि करून अवशिष्ट राहिलेलें अन्न खाणारे शिष्ट सर्व पापांकडून मुक्त केले जातात, परंतु जे आपलेंच पोट भरण्यासाठीं अन्न शिजवितात ते पापी लोक पापच खातात. [ जे देवयज्ञादि करून अवशिष्ट राहिलेलें 'अमृत'-संज्ञक अन्न खातात, ते 'पंचसूना'-दोषांपासून मुक्त होतात. देवयज्ञ, पितृयज्ञ, मनुष्ययज्ञ, भूतयज्ञ व ब्रह्मयज्ञ असे पंचमहायज्ञ गृहस्थाला अवश्य अनुष्ठेय आहेत. 'पंच सूना' म्ह० पांच हिंसास्थानें. गृहस्थाच्या घरीं चूल, पाटा-वरवंटा किंवा जातें, उखळ, मुसळ, केरसुणी व पाणी भरून ठेवण्याचीं रांजणासारखीं पात्रें हीं पांच हिंसास्थानें नियमानें असतात. या पांच ठिकाणीं गृहस्थाच्या घरीं हिंसा नित्य होते. त्यामुळें बुद्धिपूर्वकृत होणाऱ्या पापापासून पूर्वोक्त पंचमहायज्ञाच्या योगानें पुरुष मुक्त होतो. पण जे गृहस्थ आपलें पोट भरण्यासाठींच अन्न शिजवितात, ते स्वतः पापी असून पापच भक्षण करितात. ]

अन्नाद्भवन्ति भूतानि पर्जन्यादन्नसंभवः।
यज्ञाद्भवति पर्जन्यो यज्ञः कर्मसमुद्भवः॥ १४॥

कर्म ब्रह्मोद्भवं विद्धि ब्रह्माक्षरसमुद्भवम् ।
तस्मात्सर्वगतं ब्रह्म नित्यं यज्ञे प्रतिष्ठितम् ॥ १५ ॥

—कर्माधिकारी पुरुषानें म्ह० गृहस्थानें पंचमहायज्ञरूपी कर्म अवश्य करावें, याविषयीं तिसरें कारण सांगतों—खाल्लेल्या अन्नाचा रस-रक्तादि परिणाम होऊन त्यापासून प्राण्यांचीं शरीरें उत्पन्न होतात. पर्जन्यापासून अन्न होतें, 'अपूर्व-' संज्ञक यज्ञापासून पर्जन्य होतो, ऋत्विक् व यजमान यांच्या कर्मांपासून यज्ञ संभवतो. तें कर्म वेदापासून संभवतें आणि वेद परमात्म्यापासून उत्पन्न झाला आहे. त्यामुळें तो वेद सर्व विषयांचें प्रकाशन करणारा जरी असला, तरी यज्ञाचें विधान करणें हें त्याचें प्रधानकर्तव्य असल्यामुळें तो यज्ञप्रधान आहे. म्हणून तें 'वेद' संज्ञक ब्रह्म सतत यज्ञांत स्थिर स्थित आहे.

एवं प्रवर्तितं चक्रं नानुवर्तयतीह यः ।
अघायुरिन्द्रियारामो मोघं पार्थ स जीवति ॥ १६ ॥

—(अधिकारी पुरुषानें अध्ययनादिकांच्या द्वारा जगच्चक्राचें अनुवर्तन करावें. नाहीं तर प्रजापतीच्या आज्ञेचें उल्लंघन करणाऱ्या त्याला प्रत्यवाय लागतो. म्हणून हे अर्जुना, प्रजापतीनें जगाला उत्पन्न केलें व त्याच्या स्थितीसाठीं त्याचें कर्म नियत केलें. वेद परमेश्वरापासून झाला. त्या वेदावरून कर्मांचें ज्ञान होतें. कर्मांपासून अपूर्व उत्पन्न होतें. त्या अपूर्वांपासून पर्जन्य, पर्जन्यापासून अन्न, अन्नापासून प्राणिशरीरें हेंच जगत्, त्यापासून पुनः वेदविहित कर्म, कर्मा-पासून अपूर्व, अपूर्वांपासून पर्जन्य, पर्जन्यापासून अन्न व अन्नापासून पुनः प्रजा, असें हें जगच्चक्र आहे.) पण जो कर्माधिकारी कर्मानुष्ठानानें त्याचें अनुवर्तन करीत नाहीं, तो अघायु होय. त्याची सर्व क्रीडा इंद्रियांमध्यें असते. हे पार्था, तो या लोकीं वृथा जिवंत रहातो. [त्याच्या जीवनाचा त्यालाहि उपयोग नाहीं व दुसऱ्या कोणालाहि नाहीं.]

[पण ईश्वरानें प्रवृत्त केलेलें हें जगच्चक्र प्रत्येक द्विजानें चालविलें पाहिजे कीं पूर्वोक्त ज्ञाननिष्ठेला प्राप्त न झालेल्या अनात्मज्ञानेंच या चक्राचें अनु-वर्तन करणें उचित आहे ? या प्रश्नाचें उत्तर भगवान् या दोन श्लोकांत देत आहेत. किंवा शास्त्रार्थाचा विशेष उत्तम प्रकारें ध्यानांत यावा म्ह० संन्यासा-सह आत्मज्ञान हेंच मुक्तीचें साधन आहे. ज्ञानकर्मसमुच्चय किंवा केवळ कर्म मुक्तीचें साधन नाहीं, असा निश्चयपूर्वक विवेक करण्यासाठीं भगवान् पुढील दोन श्लोकांत श्रुत्यर्थ सांगत आहेत.]

यस्त्वात्मरतिरेव स्यादात्मतृप्तश्च मानवः ।
आत्मन्येव च संतुष्टस्तस्य कार्यं न विद्यते ॥ १७ ॥
नैव तस्य कृतेनार्थो नाकृतेनेह कश्चन ।
न चास्य सर्वभूतेषु कश्चिदर्थव्यपाश्रयः ॥ १८ ॥

( ४ ) पण याच्या उलट जो मानव अर्थात् सांख्य—आत्मज्ञाननिष्ठ आत्मरतिच असतो, म्ह० त्याची रति आत्म्यामध्येंच असते, तो आत्मस्वरूपांतच तृप्त असतो आणि आत्म्यामध्येंच संतुष्ट असतो. त्या आत्मज्ञ ज्ञाननिष्ठाला कांहींच शास्त्रविहित कर्तव्य नसतें. तो सर्व कर्तव्यशून्य असतो. कारण या लोकीं त्यानें केलेल्या कर्मांचें कांहीं फल नाहीं. त्याचप्रमाणें त्याच्या न केलेल्या कर्मांनें कोणताहि प्रत्यवाय लागत नाहीं आणि या सांख्याचा ब्रह्मादिस्तंबपर्यंत सर्व भूतांतील कोणीहि प्रयोजनाचा आश्रय नाहीं. [ परमात्म्यामध्यें रत झालेल्या आत्मनिष्ठाला केलेल्या कर्मांचें कांहीं फल मिळावयाचें नसतें. कारण तें कर्म अहंकारपूर्वक केलेलें नसतें. तसेंच त्यानें कर्मत्याग केला तर त्यामुळें त्याचें कांहीं अनिष्ट व्हावयाचें नसतें. कारण इष्ट व अनिष्ट हीं दोन्ही सत्त्वादि गुणांचीं कार्यें असल्यामुळें संसारांत अंतर्भूत होतात. पण हा सांख्य गुणातीत झालेला असतो. त्यामुळें त्याला आब्रह्मस्तंबपर्यंत जीं असंख्य भूतें आहेत, त्यांतील एखाद्यासाठींहि कर्मानें कांहीं प्रयोजन साधावयाचें नसतें. ]

तस्मादसक्तः सततं कार्यं कर्म समाचर ।
असक्तो ह्याचरन्कर्म परमाप्नोति पूरुषः ॥ १९ ॥

—पण ज्याअर्थीं ज्ञाननिष्ठेच्या अभावीं कर्मांचें अनुष्ठान अवश्य केलें पाहिजे, त्याअर्थीं तूं आसक्तिरहित होऊन सतत अवश्य कर्तव्य असलेलें जें वर्णाश्रमविहित नित्य कर्म तें कर. कारण फलांमध्यें आसक्त न होतां ईश्वरार्पण बुद्धीनें कर्म करणारा पुरुष चित्तशुद्धीच्या द्वारा मोक्षास प्राप्त होतो. [अर्जुना, तूं ज्ञाननिष्ठ नाहींस व त्या निष्ठेवांचून कर्मत्याग संभवत नाहीं. तसाच तूं ज्ञाननिष्ठेचा अधिकारीहि नाहींस. म्हणून संगरहित होऊन सर्वदा शास्त्रविहित असलेल्या नित्य कर्मांचें उत्तमप्रकारें अनुष्ठान कर. कारण संगरहित होऊन कर्म करणाऱ्या पुरुषाला चित्तशुद्धीच्या द्वारा ज्ञान होऊन परंपरेनें मोक्ष मिळतो. ]

कर्मणैव हि संसिद्धिमास्थिता जनकादयः ।
लोकसंग्रहमेवापि संपश्यन्कर्तुमर्हसि ॥ २० ॥

( ५ ) शिष्टाचारहि असाच आहे. कारण जनक, अश्वपति इत्यादि विद्वान् क्षत्रिय कर्माचरणानेंच मोक्ष मिळविण्यास प्रवृत्त झाले. ते कर्मानुष्ठानानेंच मोक्ष मिळविण्याचा यत्न करूं लागले. ( 'ते अज्ञ असल्यामुळें कर्मांच्या द्वारां परंपरेनें मोक्ष मिळविण्यास तयार झाले असतील. पण त्यांच्या उदाहरणानें ज्ञानी व कृतार्थ झालेल्या माझ्या सारख्यानेंहि तें केलें पाहिजे असें होत नाहीं,' म्हणून म्हणशील तर तेंहि मला मान्य आहे ! ) पण 'तूं ज्ञानी आहेस' असें जरी मानलें तरी तूं आपल्या प्रारब्धकर्माधीन आहेस. त्या कर्मानेंच तुला क्षत्रियकुलांत उत्पन्न केलें आहे, यास्तव लोकसंग्रहाकडे दृष्टि देऊनहि तुला स्वधर्मरूप कर्म करणेंच उचित आहे. लोकांच्या स्वाभाविक उन्मार्ग प्रवृत्तीचें निवारण करणें, याला लोकसंग्रह म्हणतात. तेंच आपल्या धर्माचरणाचें फल आहे, असें समजून तुला कर्मच केलें पाहिजे. [ 'सर्वे राजाश्रिता धर्मा राजा धर्मस्य धारकः' म्ह० सर्व धर्म राजाच्या आश्रयानें रहाणारे आहेत. राजा धर्मांचें धारण करणारा आहे, असें स्मृतिवचन आहे. त्यावरून क्षत्रिय वर्णाश्रमधर्मप्रवर्तक आहे, हें सिद्ध होतें. म्हणून तुला स्वधर्मरूप कर्म केलें पाहिजे. ]

यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जनः ।
स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते ॥ २१ ॥

—आतां लोकसंग्रह करण्यास कोण योग्य आहे व तो कसा तें सांगतों— श्रेष्ठ पुरुष जें जें विहित किंवा निषिद्ध कर्म करितो, तेंच इतर प्राकृत जनहि आचरितो. यास्तव विद्वानानेंहि लोकमर्यादा राखण्यासाठीं विहित कर्म करावें. सामान्य लोक आचरणांत शिष्टांचें अनुकरण करतात. एखादी गोष्ट प्रमाण किंवा अप्रमाण मानावयाची झाल्यास ते त्या प्रसंगींहि श्रेष्ठांचेंच अनुकरण करितात.

न मे पार्थास्ति कर्तव्यं त्रिषु लोकेषु किंचन ।
नानवाप्तमवाप्तव्यं वर्त एव च कर्मणि ॥ २२ ॥

—अर्जुना, या लोकसंग्रहाच्या कर्तव्यतेविषयीं तुला जर कांहीं संदेह असला तर तूं मजकडेच कां पहात नाहींस ? मला या त्रिभुवनांत कांहीं कर्तव्य नाहीं. कारण मी आप्तकाम असल्यामुळें मला कांहीं न प्राप्त झालेलें प्राप्त करून घ्यावयाचें आहे, असेंहि नाहीं. तथापि मी माझ्या दिव्य सृष्टयादि कर्मांमध्यें प्रवृत्त होतोंच.

यदि ह्यहं न वर्तेयं जातु कर्मण्यतन्द्रितः ।
मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः ॥ २३ ॥

—मीं आळस सोडून शास्त्राप्रमाणें धर्माचरण जर न केलें, तर इतर लोकहि माझेंच सर्व प्रकारें अनुकरण करतील. कारण मी श्रेष्ठ आहें. यास्तव मला धर्माचा कांहीं उपयोग जरी नसला, तरी माझ्या अनुयायी लोकांनीं धर्माचरण करावें म्हणून मलाहि तें करावें लागतें.

उत्सीदेयुरिमे लोका न कुर्यां कर्म चेदहम् ।
संकरस्य च कर्ता स्यामुपहन्यामिमाः प्रजाः ॥ २४ ॥

—अर्थात् मी आपलें विहित कर्म जर न करीन, तर हे सर्व लोक नाश पावतील. त्यामुळें मी वर्णसंकराचा कर्ता म्ह० निमित्त होईन व जणुकाय या सर्व लोकांचा घातच करीन. [ म्ह० मज ईश्वराला अनुरूप नसलेली गोष्ट घडेल. ]

सक्ताः कर्मण्यविद्वांसो यथा कुर्वन्ति भारत ।
कुर्याद्विद्वांस्तथासक्तश्चिकीर्षुर्लोकसंग्रहम् ॥ २५ ॥

—पण मजप्रमाणें तूं किंवा दुसराहि जो कोणी कृतार्थबुद्धि आत्मज्ञ असेल त्यालाहि परानुग्रह करणेंच उचित आहे. त्यानेंहि दुसऱ्यावर अनुग्रह करण्यासाठीं कर्मानुष्ठान करावें. 'पण तें कसें करावें!' म्हणून म्हणशील तर सांगतों. ' या कर्माचा मी कर्ता आहें, मला याचें फल अवश्य मिळेल, अशा अभिमानानें कर्मामध्यें आसक्त झालेले अविद्वान्—आत्मज्ञानशून्य लोक जसें कर्म करतात, त्याप्रमाणें लोकसंग्रह—लोकानुग्रह करण्याची इच्छा करणाऱ्या विद्वानानें ' मी याचा कर्ता व भोक्ता आहें ' असा अभिनिवेश न करतां कर्माचरण करावें.

न बुद्धिभेदं जनयेदज्ञानां कर्मसंगिनाम् ।
जोषयेत्सर्वकर्माणि विद्वान्युक्तः समाचरन् ॥ २६ ॥

—याप्रमाणें लोकसंग्रह करण्याची इच्छा करणाऱ्या मला किंवा दुसऱ्या कोणा आत्मवेत्याला लोकसंग्रह सोडून दुसरें कर्तव्य नसतें. म्हणून कर्म व त्याचें फल यांत आसक्ति ठेवणाऱ्या अज्ञांचा—आत्मज्ञानशून्यांचा बुद्धिभेद करूं नये. त्यांची कर्मावरील श्रद्धा ढळवूं नये. तर विद्वानानें—आत्मज्ञानी श्रेष्ठ पुरुषानें समाहित चित्त राहून कर्मानुष्ठान करीत त्या अज्ञांकडूनहि सर्व कर्में करवावीं.

प्रकृतेः क्रियमाणानि गुणैः कर्माणि सर्वशः ।
अहंकारविमूढात्मा कर्ताहमिति मन्यते ॥ २७ ॥

—अविद्वान्—अज्ञ पुरुष कर्मांमध्यें कसा आसक्त होतो, तें सांगतों—ज्याचें चित्त शरीरालाच 'मी' असें मानणें या अहंकारानें विवेकहीन झालें आहे, अशा अज्ञ प्रकृतीच्या गुणांकडून म्ह० शरीरेंद्रियरूप परिणामांकडून केलीं जाणारीं सर्व लौकिक व शास्त्रीयकर्में 'मीच करितों' असें मानतो म्ह० त्या कर्मांत आसक्त होतो.

तत्त्ववित्तु महाबाहो गुणकर्मविभागयोः ।
गुणा गुणेषु वर्तन्त इति मत्वा न सज्जते ॥ २८ ॥

—पण याच्या उलट विद्वान् कसा आसक्त होत नाहीं, हेंहि सांगतों—हे पराक्रमी अर्जुना, सत्त्वादि गुणविभाग आणि शमादि कर्मविभाग यांचें तत्त्व—स्वरूप जाणणारा ज्ञानी इंद्रियात्मक गुण विषयात्मक गुणांमध्यें प्रवृत्त होतात, असें मानून त्यांत आसक्त होत नाहीं. [ 'मी शरीरेंद्रिय संघातरूप नाहीं' हा गुणाहून आत्म्याचा विभाग आहे व 'शमादि कर्में माझीं नव्हेत' हा कर्मांहून आत्म्याचा विभाग आहे. त्या दोन विभागाचें तत्त्व—यथार्थ स्वरूप जाणणारा म्ह० गुण व कर्में यांहून आत्मा अगदीं निराळा आहे असें साक्षात् जाणणारा तत्त्ववेत्ता अहंकारविमूढात्मा होत नाहीं, उलट इंद्रियरूपगुण विषयरूप गुणांमध्यें प्रवृत्त होतात, मी आत्मा होत नाहीं, असें मानून त्यांत आसक्त होत नाहीं. ]

प्रकृतेर्गुणसंमूढाः सज्जन्ते गुणकर्मसु ।
तानकृत्स्नविदो मन्दान्कृत्स्नविन्न विचालयेत् ॥ २९ ॥

—अर्जुना, याप्रमाणें मीं तुला विद्वान् व अविद्वान् यांचें स्वरूप सांगितलें. पण विद्वानानें अविद्वानाचा बुद्धिभेद करूं नये. कारण मायेच्या गुणांपासून उत्पन्न झालेल्या शरीरेंद्रिय विकारांनीं अत्यंत मूढ झालेले अज्ञ शरीरेंद्रियांच्या कर्मांमध्यें—हालचालीमध्यें आसक्त होतात. ती हालचाल—चेष्टा 'आम्हीच फलासाठीं करतों' असा अभिनिवेश धरतात. पण आत्मज्ञानें त्या अनात्मज्ञांचा स्वतः बुद्धिभेद करूं नये. [ कारण तसें केल्यास त्यांची धर्मावरील श्रद्धाच उडून ते नास्तिक बनतील व पुरुषार्थापासून भ्रंश पावतील. त्यापेक्षां ते श्रद्धेनें कर्मेंच करीत राहिल्यास कांहीं दिवसांनीं त्यांनाच यातायातीचा कंटाळा येऊन ते आपोआप जिज्ञासु बनतील. ]

मयि सर्वाणि कर्माणि संन्यस्याध्यात्मचेतसा ।
निराशीर्निर्ममो भूत्वा युद्ध्यस्व विगतज्वरः ॥ ३० ॥

—'पण कर्मामध्यें अधिकृत असलेल्या अज्ञ मुमुक्षूनें कर्म करें करावें' म्हणून विचारशील तर सांगतों—नित्य-नैमित्तादिकांदि सर्व कर्मे विवेकबुद्धीनें 'मी कर्ता जीव अंतर्यामीसाठीं चाकराप्रमाणें हीं कर्में करीत आहें, अशा भावनेनें मज सर्वज्ञ परमेश्वराच्या ठिकाणीं समर्पण करून फलाशारहित व देह-पुत्रादिकांविषयींच्या ममतेनें रहित होऊन म्ह० आशारहित व ममतारहित होऊन शोकरहित होऊन तूं युद्ध कर. [ या श्लोकांत भगवान् सर्व कर्में ईश्वरार्पण करून कर्मफलाशा व पुत्रादिकांविषयींची ममता सोडून, शोकाचा त्याग करून युद्ध कर, असा मुमुक्षु अर्जुनाला साधनरूप कर्मयोगाचा—स्वधर्मानुष्ठानाचा उपदेश करीत आहेत. ]

ये मे मतमिदं नित्यमनुतिष्ठन्ति मानवाः ।
श्रद्धावन्तोऽनसूयन्तो मुच्यन्ते तेऽपि कर्मभिः ॥ ३१ ॥

—पार्था, जे श्रद्धालु व असूया न करणारे मानव माझें हें मत नित्य अनुष्ठितात, माझ्या सांगण्याप्रमाणें आचरण करतात, ते सुद्धां पुण्य-पापांपासून मुक्त केले जातात. [येथील 'तेऽपि' या अपि शब्दानें त्यांची मुक्ति मुख्य नव्हे, तर क्रममुक्ति आहे, असें सुचविलें आहे. किंवा या माझ्या मताचें अनुवर्तन करणारे मानव चित्तशुद्धि, ज्ञानप्राप्ति या क्रमानें मुक्त होतात असें समजावें. धर्माच्या सामर्थ्यानें मरणोत्तर उत्तरायण मार्गानें ब्रह्मलोकीं जाणें, कल्प संपेपर्यंत तेथेंच रहाणें, व कल्पाच्या शेवटीं तेथील हिरण्यगर्भासह परमार्थस्वरूपीं मिळून जाणें ही क्रममुक्ति व याच देहांत आत्मसाक्षात्कारानें जीवन्मुक्त होऊन मरतांच परमार्थस्वरूप होणें ही सद्योमुक्ति होय. ]

ये त्वेतदभ्यसूयन्तो नानुतिष्ठन्ति मे मतम् ।
सर्वज्ञानविमूढांस्तान्विद्धि नष्टानचेतसः ॥ ३२ ॥

—पण याच्या उलट जे असूया करणारे हें माझें मत आचरीत नाहींत—त्याप्रमाणें आचरण करीत नाहींत, त्यांना सर्व ज्ञानांविषयीं अनेक प्रकारें मूढ, अविवेकी व नष्ट झालेले समज.

सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृतेर्ज्ञानवानपि ।
प्रकृतिं यान्ति भूतानि निग्रहः किं करिष्यति ॥ ३३ ॥

—ज्ञानवान् मनुष्यहि आपल्या प्रारब्धकर्माप्रमाणें—स्वभावाप्रमाणें व्यवहार करितो. सर्व प्राणी आपापल्या स्वभावावर जातात. त्याला माझा किंवा

दुसऱ्या कोणा राजादिकांचा निग्रह काय करणार ! [ पूर्वजन्मीं आचरिलेला धर्म व अधर्म, संपादन केलेलें ज्ञान, मनांत दृढ धरलेली इच्छा आणि त्या सर्वांचा संस्कार, हीं सर्व मरणानंतर पुनः शरीर घेईपर्यंत जरी अगदीं सूक्ष्म अवस्थेंत रहात असलीं, तरी तीं सर्व या जन्माच्या अगदीं आरंभीं अभिव्यक्त होतात. तीच प्राण्यांची प्रकृति होय. तिचें उल्लंघन ज्ञानी पुरुषालाहि करतां येत नाहीं, मग अज्ञाला कसें करतां येणार ! अर्थात् ज्ञानी व अज्ञ असे सर्व प्रकृतीच्या अधीन असल्यामुळें आपापल्या स्वभावावर जातात. त्यांची इच्छा जरी नसली तरी ते प्रकृतीप्रमाणें व्यवहार करतात. त्यामुळें मीं किंवा दुसऱ्या कोणींहि ' असें करूं नका ' असें सांगून, जरी त्याचा निषेध केला तरी त्याचा कांहीं उपयोग होत नाहीं. ]

इन्द्रियस्येन्द्रियस्यार्थे रागद्वेषौ व्यवस्थितौ ।
तयोर्न वशमागच्छेत्तौ ह्यस्य परिपंथिनौ ॥ ३४ ॥

—'प्रत्येक प्राणी आपल्या प्रकृतीप्रमाणें व्यवहार करतो, प्रकृतीशून्य कोणीच नाहीं' असें जर म्हटलें, तर पुरुषाच्या प्रयत्नाला अवकाश रहात नाहीं. तेव्हां ' अमुक कर व अमुक करूं नको, ' असें सांगणारें विधि-निषेधशास्त्र व्यर्थ नाहीं का होत ? अशी शंका येते, म्हणून मी त्याचें समाधान सांगतों—

प्रत्येक इंद्रियाच्या विषयांतील इष्ट विषयांविषयीं प्रीति व अनिष्ट विषयांविषयीं द्वेष अवश्य उत्पन्न होतात. पण शास्त्र क्रमानें हळुहळू त्याचा निरोध करीत असतें, म्हणून त्याला व्यर्थत्व नाहीं. यास्तव त्या राग-द्वेषांच्या वश होऊं नये. कारण ते मोक्षमार्गांमध्यें विघ्न करणारे चोर–वाटमारे आहेत.

श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ।
स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः ॥ ३५ ॥

—( पण व्यवहारांत राग व द्वेष यांनीं प्रेरित झालेला पुरुष शास्त्रार्थालाहि विपरीत मानतो. तो परधर्मेहि धर्मच असल्यामुळें आपल्याला अनुष्ठानास योग्य आहे, असें समजतो; पण तें बरोबर नाहीं. ) कारण उत्तम प्रकारें अनुष्ठान केलेल्या—सर्वगुणसंपन्न परधर्माहून विगुण-गुणरहित असलेला स्वधर्म अधिक चांगला होय. [ परवर्णाचा व परआश्रमाचा धर्म सर्व सद्गुणांनीं युक्त असा जरी आचरितां आला, तरी त्याहून स्वतःच्या वर्णाला व आश्रमाला विहित असलेला धर्म, त्यांत हिंसेसारखे दोष जरी असले तरी आचरणेंच अधिक

चांगलें होय. ] स्वधर्माचरण करीत असतांना मरण आलेलेंहि पत्करलें, पण दुसऱ्या वर्णाचा व आश्रमाचा धर्म केव्हांहि भयावह आहे. [ स्वधर्माचा त्याग करून परधर्माचें अनुष्ठान करणाऱ्या पुरुषाला स्वधर्मत्यागाचा दोष अवश्य लागतो. म्हणून स्वधर्माचा त्याग केव्हांहि श्रेयस्कर नाहीं. ]

अर्जुन उवाच—

अथ केन प्रयुक्तोऽयं पापं चरति पूरुषः ।
अनिच्छन्नपि वार्ष्णेय बलादिव नियोजितः ॥ ३६ ॥

—सर्व अनर्थांचें मूळ कामच आहे. असा भगवानाच्या मुखानें निश्चय करून घेण्यासाठीं अर्जुन म्हणाला—हे कृष्णा, पण कोणाकडून प्रेरणा केला गेलेला हा पुरुष पाप करण्याची इच्छा करीत नसतांनाहि जणुकाय बलात्कारानें तें करावयास लावल्याप्रमाणें पापाचरण करितो ?

श्रीभगवानुवाच—

काम एष क्रोध एष रजोगुणसमुद्भवः ।
महाशनो महापाप्मा विद्ध्येनमिह वैरिणम् ॥ ३७ ॥

( ६ )—पुरुषाला पापांत प्रवृत्त करणारा हा काम आहे, त्याला प्रतिबंध झाला असतां तोच क्रोध होतो. म्हणून क्रोधहि कामच आहे. तो रजोगुणापासून उत्पन्न होणारा, किंवा तो रजोगुणाला वाढविणारा आहे. तो अतिशय खादाड व पापी आहे, म्हणून त्या कामाला या संसारांत तूं आपला वैरी समज.

धूमेनाव्रियते वह्निर्यथादर्शो मलेन च ।
यथोल्बेनावृतो गर्भस्तथा तेनेदमावृतम् ॥ ३८ ॥

—ज्याप्रमाणें अप्रकाशरूप सहज धूमाकडून प्रकाशरूप अग्नि आच्छादित केला जातो, आगंतुक मलानें आरसा झांकला जातो व गर्भवेष्टनानें गर्भ आच्छादित झालेला असतो, त्याप्रमाणें त्या कामानें हें आच्छादित केलें आहे.

आवृतं ज्ञानमेतेन ज्ञानिनो नित्यवैरिणा ।
कामरूपेण कौन्तेय दुष्पूरेणानलेन च ॥ ३९ ॥

—हे अर्जुना, आतां ' हें ' म्हणजे काय तें सांगतों—ज्ञानी पुरुषाचा नित्यवैरी, ज्याची तृप्ति—पूर्ति कधींच होत नाहीं अशा या इच्छारूप शत्रूनें ज्ञानाला आच्छादित केलें आहे. [ ज्ञान—चैतन्यरूप आत्मा या कामाच्यां आवरणाचा विषय आहे. ]

इन्द्रियाणि मनो बुद्धिरस्याधिष्ठानमुच्यते ।
एतैर्विमोहयत्येष ज्ञानमावृत्य देहिनम् ॥ ४० ॥

—पण कोणत्या अधिष्ठानाचा आश्रय करून हा सर्वांचा वैरी होतो? म्हणून विचारशील तर सांगतों—इंद्रियें, मन व बुद्धि हें या कामाचें अधिष्ठान–आश्रय आहे. या इंद्रियादिकांच्या योगानें–या आश्रयांनीं हा काम ज्ञानाला आच्छादित करून देहवानाला–शरीराभिमानी आत्म्याला नानाप्रकारें मोहित करतो.

तस्मात्त्वमिन्द्रियाण्यादौ नियम्य भरतर्षभ ।
पाप्मानं प्रजहि ह्येनं ज्ञानविज्ञाननाशनम् ॥ ४१ ॥

—म्हणून हे अर्जुना, तूं आपलीं इंद्रियें नियमित करून त्यांचें नियमन करून शास्त्रज्ञान व आत्मसाक्षात्काररूप विज्ञान यांचा नाश करणाऱ्या या पाप्याला सोड. त्याचा परित्याग कर.

चाळिसाव्या श्लोकांत हा काम इंद्रियें, मन व बुद्धि यांचा आश्रय करून शरीराभिमानी आत्म्याला मोहित करतो, असें सांगितलें. आतां त्याच्या उलट मुमुक्षूनें कोणाचा आश्रय करून कामत्याग करावा तें भगवान् सांगतात—

इन्द्रियाणि पराण्याहुरिन्द्रियेभ्यः परं मनः ।
मनसस्तु परा बुद्धिर्यो बुद्धेः परतस्तु सः ॥ ४२ ॥

—श्रोत्रादि पांच ज्ञानेंद्रियें बाह्य स्थूल देहाच्या अपेक्षेनें पर–श्रेष्ठ, सूक्ष्म व आन्तर आहेत, असें पंडित सांगतात. इंद्रियाहून मन पर आहे आणि मनाहून बुद्धि पर आहे आणि जो बुद्धिहूनहि पर–श्रेष्ठ, सूक्ष्म व आन्तर असलेला साक्षी तोच प्रसिद्ध आत्मा आहे.

एवं बुद्धेः परं बुद्ध्वा संस्तभ्यात्मानमात्मना ।
जहि शत्रुं महाबाहो कामरूपं दुरासदम् ॥ ४३ ॥

—हे पराक्रमी अर्जुना, याप्रमाणें बुद्धीच्याहि पलीकडे असलेल्या या विलक्षण साक्षी आत्म्याला जाणून व सुसंस्कृत मनानें अंतःकरणाला त्यामध्यें स्थिर करून या कामरूपी दुरासद शत्रूला तूं मार. हा दुरासद–अजिंक्य शत्रु आहे. यास्तव त्याला तूं जिंक. [ भगवद्गीतेच्या या तिसऱ्या अध्यायांत प्राधान्यानें साधनभूत कर्मनिष्ठा व गौणत्वानें कर्मनिष्ठेनें साध्य असलेली ज्ञाननिष्ठा सांगितली आहे.]

( येथें भगवद्गीतेचा 'कर्मयोग' नांवाचा तिसरा अध्याय समाप्त झाला. ) ६. ३. २७.

## अध्याय २८ वा.

### ( गीताध्याय ४ था ज्ञान-कर्मसंन्यासयोग. )

[ १ गीतेचा संप्रदाय. २ कृष्णाच्या अनीश्वरत्वाविषयीं शंका व तिचें समाधान. ३ भगवदवताराचें निमित्त व कार्य. ४ या मार्गाचें अनादित्व. ५ चातुर्वर्ण्य ईश्वरसृष्ट आहे. ६ कर्म गहन म्हणून कर्माकर्माचा निर्णय. ७ ज्ञानी पुरुषाची स्तुति. ८ ज्ञानयज्ञ व त्याच्या स्तुत्यर्थ अनेक यज्ञांचा उपन्यास. ९ ज्ञानप्राप्तीचा उपाय व ज्ञानाची प्रशंसा. १० संशय सर्वथा त्याज्य, म्हणून त्याचा त्याग करून ज्ञानसाधनभूत कर्मयोगाच्या अनुष्ठानाचा उपदेश. ]

कर्मयोग हा ज्याचा उपाय आहे, असा संन्यासासह ज्ञाननिष्ठारूप योग गेल्या दोन अध्यायानें सांगितला. त्या निष्ठाद्वयात्मक योगांत प्रवृत्तिलक्षण व निवृत्तिलक्षण वेदार्थ सर्वप्रकारें अंतर्भूत झाला आहे आणि पुढील सर्व गीताध्यायांमध्यें हाच साधनासह ज्ञाननिष्ठारूप योग सांगावयाचा आहे. म्हणून या गेल्या दोन अध्यायांत वेदार्थ पूर्णपणें समाप्त झाला आहे–त्यांत अंतर्भूत झाला आहे, असें मानणारे भगवान् त्या योगाची संप्रदायाच्या कथनानें स्तुति करतात.

श्रीभगवानुवाच—

इमं विवस्वते योगं प्रोक्तवानहमव्ययम् ।
विवस्वान्मनवे प्राह मनुरिक्ष्वाकवेऽब्रवीत् ॥ १ ॥

( १ ) भगवान्—मीं हा अक्षय फल देणारा ज्ञानयोग आदित्याला सांगितला. त्या आदित्यानें मनूला सांगितला. मनूनें इक्ष्वाकु नांवाच्या आदित्यराजाला–आपल्या पुत्राला सांगितला. [ इक्ष्वाकु हा सूर्यवंशांतील पहिला राजा आहे. ]

एवं परंपराप्राप्तमिमं राजर्षयो विदुः ।
स कालेनेह महता योगो नष्टः परंतप ॥ २ ॥

—याप्रमाणें क्षत्रियांच्या परंपरेनें प्राप्त झालेल्या या योगास राजर्षि जाणते झाले–त्यांनीं या योगाचें अनुष्ठान केलें. पण हे अर्जुना, मध्यें पुष्कळ काळ निघून गेल्यामुळें तो योग आज संप्रदायरहित झाला आहे. [ याप्रमाणें क्षत्रियांच्या परंपरेनें अनादिकालापासून चालत आलेल्या या योगाला राजर्षि जाणत

होते. ऐश्वर्यसंपन्न असून सूक्ष्म अर्थ जाणण्यास समर्थ असणें हें राजर्षित्व होय. पण सांप्रतकालीं मध्यें दीर्घकाल लोटल्यामुळें त्या योगाचा संप्रदाय अविच्छिन्न राहिला नाहीं. क्षत्रिय पित्यानें आपल्या पुत्राला तो योग सांगावयाचा, त्यानें आपल्या पुत्राला, अशी जी या योगाची परंपरा चालली होती, ती आतां राहिली नाहीं. ती परंपरा तुटली. ]

स एवायं मया तेऽद्य योगः प्रोक्तः पुरातनः ।
भक्तोऽसि मे सखा चेति रहस्यं ह्येतदुत्तमम् ॥ ३ ॥

—पण क्षत्रिय प्रजा अजितेंद्रिय निपजल्यामुळें हा योग नष्ट झाला व लोक पुरुषार्थहीन झाले, असें पाहून मीं तोच हा योग आज तुला सांगितला. असें सांगण्यासाठीं भगवान् म्हणतात—तोच हा पुरातन योग मीं तुला आज सांगितला. तें कां ? तर तूं माझा भक्त व सखा आहेस म्हणून सांगितला. कारण हें उत्तम रहस्य–ज्ञान आहे.

( २ ) भगवान् हें भलतेंच कांहीं तरी सांगत आहेत, अशी कोणाची कल्पना होऊं नये, म्हणून अर्जुन म्हणाला—

अर्जुन उवाच—

अपरं भवतो जन्म परं जन्म विवस्वतः ।
कथमेतद्विजानीयां त्वमादौ प्रोक्तवानिति ॥ ४ ॥

—आपला जन्म अलीकडचा–कांहीं वर्षांपूर्वी झालेला व सूर्याचा जन्म सृष्टीच्या आरंभीं, फार प्राचीन् कालीं झालेला. तेव्हां तूंच आरंभीं हा योग सूर्याला सांगितलास अशा प्रकारचें हें तुझें अनुपपन्न वचन मीं सत्य कसें मानावें ! [ अर्जुनाचा हा प्रश्न भगवानांच्या निजस्वरूपाला अनुलक्षून नाहीं. तर लोकदृष्ट्या भगवानांनीं जें मानुषशरीर धारण केलें आहे, त्याला उद्देशून आहे. ]

श्रीभगवानुवाच—

बहूनि मे व्यतीतानि जन्मानि तव चार्जुन ।
तान्यहं वेद सर्वाणि न त्वं वेत्थ परंतप ॥ ५ ॥

—भगवान् वासुदेव आपल्याविषयीं 'हा ईश्वर नाहीं, सर्वज्ञ नाहीं' अशी जी मूर्खांची शंका तिचा परिहार करीत होत्साते म्हणतात—हे अर्जुना, माझे

व तुझे पुष्कळ जन्म मागें होऊन गेले आहेत. पण मी ते सर्व जाणतों व तूं जाणत नाहींस. तुझी ज्ञानशक्ति धर्म, अधर्म, राग-द्वेष-लोभ इत्यादिकांमुळें प्रतिबद्ध झाली आहे. पण मी नित्यस्वभाव, शुद्धस्वभाव, ज्ञानस्वभाव व मुक्तस्वभाव असल्यामुळें माझी ज्ञानशक्ति आवरणरहित आहे. त्यामुळें हे शत्रुतापना, मी माझ्या मागील जन्मांना जाणतों. मला त्रिकालज्ञान आहे. पण तुझी ज्ञानशक्ति आवृत झाली असल्यामुळें तूं ते जाणत नाहींस.

अजोऽपि सन्नव्ययात्मा भूतानामीश्वरोऽपि सन् ।
प्रकृतिं स्वामधिष्ठाय संभवाम्यात्ममायया ॥ ६ ॥

—'पण तुज नित्य ईश्वरालाहि धर्माधर्मांच्या अभावीं जन्म कां घ्यावा लागतो व तूं तो कसा घेतोस' म्हणून विचारशील तर सांगतों—मी सर्वसाक्षी जन्मरहित असूनहि—माझें ज्ञानशक्तिस्वरूप कधींहि क्षीण न होणारें असें असूनहि मी आब्रह्मस्तंबपर्यंत भूतांचा ईश्वर—नियमन करणारा असून आपल्या त्रिगुणात्मक मायाख्य प्रकृतीला स्वाधीन ठेवून आपल्या अचिंत्य सामर्थ्यानें जणुकाय देहवान् असल्यासारखा होतों.

यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।
अभ्युत्थानमधर्मस्य तदात्मानं सृजाम्यहम् ॥ ७ ॥

( ३ )—आतां तो मायिक जन्म केव्हां होतो, तें सांगतों—हे भरतकुलोत्पन्ना, जेव्हां जेव्हां धर्माची हानि व अधर्माचा उद्भव होतो, त्यावेळीं मी कूटस्थ आत्मा स्वतःला पूर्वोक्त प्रकारें उत्पन्न करितों. [ वर्ण, आश्रम, त्यांचा आचार, यावरून ज्ञात होणाऱ्या धर्माची हानि झाली असतां लोक पुरुषार्थहीन होतात व त्यांची प्रवृत्ति स्वभावतःच अधर्माकडे होते. अशा वेळीं मी मायेनें शरीर धारण करितों.]

परित्राणाय साधूनां विनाशाय च दुष्कृताम् ।
धर्मसंस्थापनार्थाय संभवामि युगे युगे ॥ ८ ॥

—तो कशासाठीं होतो, म्हणून विचारशील तर तेंहि सांगतों—सन्मार्गस्थांचें सर्वप्रकारें रक्षण करण्यासाठीं, पाप्यांचा विनाश करण्यासाठीं आणि वर्णाश्रमधर्मांचें उत्तमप्रकारें स्थापन करण्यासाठीं मी प्रत्येक युगांत उत्पन्न होतों. [ धर्माची स्थापना केल्यानें जगाची स्थापना केल्यासारखी होते. नाहीं तर धर्ममर्यादेनें रहित असलेलें जगत् पुरुषार्थांपासून च्युत होईल. ]

**जन्म कर्म च मे दिव्यमेवं यो वेत्ति तत्त्वतः ।**
**त्यक्त्वा देहं पुनर्जन्म नैति मामेति सोऽर्जुन ॥ ९ ॥**

—जो माझा वर सांगितलेल्या प्रकारचा अलौकिक जन्म व कर्म यथार्थ जाणतो, तो वर्तमान देहाचा त्याग करून पुनर्जन्मास प्राप्त होत नाहीं, तर हे अर्जुना, तो श्रेष्ठ पुरुष मला प्राप्त होतो. [ ईश्वराचा जन्म मायामय आहे, खरा नव्हे. जगत्परिपालन हें त्याचेंच कर्म आहे, दुसऱ्या कोणाचें नव्हे, असें जाणणाऱ्या पुरुषाला श्रेयःप्राप्ति होते. पण याच्या उलट ईश्वराचा जन्म खराच आहे व जगत्परिपालनादि कर्म क्षत्रियांचें आहे, असें जो जाणतो, त्याच्या जन्मादि संसाराची परंपरा तुटत नाहीं. ]

**वीतरागभयक्रोधा मन्मया मामुपाश्रिताः ।**
**बहवो ज्ञानतपसा पूता मद्भावमागताः ॥ १० ॥**

( ४ )—अर्जुना, हा मोक्षमार्ग आतां नवीन प्रवृत्त झाला आहे, असें नाहीं, तर तो फार दिवसांपासून—सृष्टीच्या आरंभापासून प्रवृत्त झाला आहे, त्यामुळें विषयासक्ति, भय व क्रोध यांनीं रहित असलेले, ईश्वरमय झालेले, म्ह० ईश्वराहून मी भिन्न आहें, असें न समजणारे, माझाच पूर्ण आश्रय केलेले—केवल ज्ञाननिष्ठ, असे अनेक लोक ईश्वराविषयींचें ज्ञान, याच तपानें पवित्र होत्साते माझ्या स्वरूपास—मोक्षास प्राप्त झाले आहेत. [ सृष्टीच्या आरंभापासून आजपर्यंत निष्काम, ऐक्यदर्शी व केवल ज्ञाननिष्ठ झालेले पुष्कळ मुमुक्षु ज्ञान-तपानें पावन होऊन मत्स्वरूपास प्राप्त झाले आहेत. ‘ ज्ञानतपसा ’ हें विशेषण इतर तपाची अपेक्षा न करतां ‘ ज्ञान ’ याच तपामध्यें निष्ठा ठेवून रहाणारे, असें सुचविण्यासाठीं आहे. ]

**ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम् ।**
**मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः ॥ ११ ॥**

—तर मग तूंहि राग-द्वेषवान् आहेस, कारण तूं कांहीं लोकांनाच आत्मभाव देतोस, सर्वांना देत नाहींस, असें म्हणशील, तर तसें नाहीं. कारण जे लोक मला ज्याप्रकारें भजतात, त्यांवर मी तसा अनुग्रह करितों. अर्थात् मी राग-द्वेष व मोह यांच्या वश होऊन कांहीं करीत नाहीं. सर्व लोक सर्व प्रकारें माझ्याच ज्ञानकर्म मार्गाचें अनुवर्तन करितात.

काङ्क्षन्तः कर्मणां सिद्धिं यजन्त इह देवताः ।
क्षिप्रं हि मानुषे लोके सिद्धिर्भवति कर्मजा ॥ १२ ॥

—'तुझ्या ठिकाणीं राग-द्वेषादि दोष जर नाहींत व सर्व प्राण्यावर अनुग्रह करण्याची इच्छाहि एकसारखीच आहे. तर सर्व लोक ज्ञानानेंच मुक्त होण्याची इच्छा कां करीत नाहींत,' म्हणून विचारशील तर सांगतों—कर्मांचें फल इच्छिणारे लोक येथें इंद्रादि देवतांचें यजन करितात. कारण मनुष्यलोकांत कर्मफलांची सिद्धि शीघ्र होत असल्यामुळें त्या फलाच्या नादाला लागलेले लोक प्रायः ज्ञानमार्गापासून विमुख होतात. [ गीतेंत फलेच्छा सोडून ईश्वरार्पण बुद्धीनें कर्मैं करण्याविषयीं जो उपदेश केला आहे, तो मनुष्यानें ज्ञानमार्गाला लागावें म्हणून आहे. म्हणूनच मागें अर्जुनाला 'बुद्धौ शरणमन्विच्छ' २—४९; ज्ञानमार्गाचा आश्रय कर असें सांगितलें आहे. ]

चातुर्वर्ण्यं मया सृष्टं गुणकर्मविभागशः ।
तस्य कर्तारमपि मां विद्ध्यकर्तारमव्ययम् ॥ १३ ॥

( ५ )—'मानुषलोकांतच वर्णाश्रमादि कर्मांचा अधिकार आहे, अन्य लोकांत नाहीं. असा नियम कोणत्या कारणानें केला आहे ? किंवा मनुष्य नियमानें तुझ्याच मार्गाला कां अनुसरतात ? दुसऱ्या कोणाच्या मार्गाला कां अनुसरत नाहींत !' म्हणून विचारशील तर सांगतों—मीं गुणांच्या विभागाला अनुसरून कर्मांचा विभाग केला व त्याच्या अनुरोधानें चार वर्ण उत्पन्न केले आहेत. मायिक व्यवहारदृष्टया मी जरी त्यांचा कर्ता आहें, तरी परमार्थदृष्टया अकर्ता आहें व त्यामुळेंच असंसारी आहें. [ मीं या मनुष्यलोकांतच ब्राह्मणादि चार वर्ण व ब्रह्मचारी इत्यादि चार आश्रम उत्पन्न केले आहेत. त्यांच्या शमादि कर्मांचाहि विभाग केला आहे. मला मायेमुळें कर्तृत्व आहे, वस्तुतः नाहीं, त्यामुळें मायिकदृष्टया मी चातुर्वर्ण्य, कर्म इत्यादिकांचा जरी कर्ता असलों, तरी खरोखर अकर्ता व अभोक्ता आहें, असें तूं समज. ]

न मां कर्माणि लिम्पन्ति न मे कर्मफले स्पृहा ।
इति मां योऽभिजानाति कर्मभिर्न स बध्यते ॥ १४ ॥

—मी पूर्वोक्त कर्मांचा अकर्ताच कसा व कां ? व तसें जाणल्यानें कोणतें फल मिळतें, तें आतां सांगतों—मला कर्मैं पुण्य-पापानें लिप्त करीत नाहींत. कारण 'मी हीं कर्मैं करतों,' असा मला अभिमान नसतो व त्यांच्या फलाची

इच्छाहि नसते. म्हणून तीं मला लिप्त करीत नाहींत. [ तीं केवळ मलाच बद्ध करीत नाहींत असें नाहीं, तर दुसराहि जो कोणी मला आत्मत्वानें 'मी कर्ता नाहीं, व मला फलेच्छा नाहीं' असें स्मरतो, तोहि कर्मांकडून बद्ध केला जात नाहीं. ]

एवं ज्ञात्वा कृतं कर्म पूर्वैरपि मुमुक्षुभिः ।
कुरु कर्मैव तस्मात्त्वं पूर्वैः पूर्वतरं कृतम् ॥ १५ ॥

—पूर्वीच्याहि मुमुक्षूंनीं 'मी—आत्मा कर्ता नाहीं व मला कर्मफलाची इच्छा नाहीं' असें जाणून पूर्वीपासून चालत आलेलें कर्मच केलें. यास्तव तूंहि कर्मच कर. स्वधर्मरूप कर्म सोडून मुकाट्यानें बसूं नको, किंवा परधर्मरूप संन्यासहि करूं नको.

"मनुष्यलोकीं कर्म जर करावयासच पाहिजे असेल, तर मी तें तुझ्या सांगण्यावरूनच करीन. पूर्वीच्या जनकादिकांनीं त्यांच्याहि पूर्वीपासून चालत आलेलें कर्म केलें व तेंच तूं कर, असें कशाला सांगावयास पाहिजे !" म्हणून म्हणशील तर कर्मांचें वास्तविक स्वरूप कळणें फार कठिण आहे. कारण—

किं कर्म किमकर्मेति कवयोऽप्यत्र मोहिताः ।
तत्ते कर्म प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् ॥ १६ ॥

( ६ )—कर्म काय व अकर्म काय ? याविषयीं मोठे मोठे बुद्धिमानहि मोहित झाले आहेत, म्हणून मी तुला कर्म व अकर्म कोणतें तें सांगेन. कर्मा-कर्मांचें तत्त्व कळल्यानें तूं अशुभापासून—संसारापासून मुक्त होशील.

"अहो पण, कर्म म्ह० शरीरेंद्रियांची हाल-चाल व अकर्म म्ह० मुका-ट्यानें बसणें, हें प्रसिद्ध आहे. मग त्यांत जाणावयाचें काय आहे ?" असें जर म्हणशील, तर तें बरोबर नाहीं.

कर्मणो ह्यपि बोद्धव्यं बोद्धव्यं च विकर्मणः ।
अकर्मणश्च बोद्धव्यं गहना कर्मणो गतिः ॥ १७ ॥

—कारण शास्त्रविहित कर्मांचेंहि तत्त्व जाणणें उचित आहे. व शास्त्रनिषिद्ध कर्मांचेंहि तत्त्व समजून घेणें योग्य आहे. तसेंच सर्व कर्में टाकून मुकाट्यानें बसणें या अवस्थेचेंहि स्वरूप समजून घेण्यासारखें आहे. कारण कर्मांचें यथार्थ स्वरूप गहन आहे. [ कर्म, अकर्म व विकर्म यांचें तात्त्विक स्वरूप अवश्य समजून घेतलें पाहिजे. कारण त्याचें तत्त्व कळणें फार कठिण आहे. ]

कर्मण्यकर्म यः पश्येदकर्मणि च कर्म यः ।
स बुद्धिमान्मनुष्येषु स युक्तः कृत्स्नकर्मकृत् ॥ १८ ॥

—जो विवेकी मनुष्य शरीर-इंद्रियें-प्राण यांच्या प्रत्येक व्यापारामध्यें—त्यांच्या प्रत्येक हालचालींत अकर्म—आत्म्याचें अकर्तृत्व पहातो व जो मुकाट्यानें बसणें या अकर्मांत कर्तृत्व पहातो, तो सर्व मनुष्यांमध्यें मोठा बुद्धिमान्—ज्ञानी, मोठा योगी, व समस्त कर्मै करणारा होय. [ वेगानें धांवत असलेल्या नौकेंतील मनुष्याला तीरावरील वृक्ष उलट दिशेला वेगानें जात आहेत, असें जरी वाटलें, तरी वृक्षांच्या ठिकाणीं धांवणें ही क्रिया नाहीं, असें पहाणें हें यथाभूत दर्शन—सम्यग्दर्शन आहे. त्याचप्रमाणें लौकिकदृष्ट्या आत्म्यामध्यें भासणारें कर्म वस्तुतः आत्म्याचें नव्हे, असें जो पहातो—तो बुद्धिमान्, ज्ञानी होय. त्याचप्रमाणें अकर्मामध्यें—शरीरेंद्रियांच्या व्यापाराभावांत—कर्माप्रमाणेंच आत्म्यामध्यें आरोपिलेल्या कर्माभावांत, मी मुकाट्यानें कांहीं न करतां सुखानें बसलों आहें, अशाप्रकारें अहंकार व फलाभिलाप यांना तो कर्माभाव कारण होत असल्यामुळें कर्म जो पहातो, तो बुद्धिमान् होय. अज्ञ लोक आत्म्यावर शरीरेंद्रियांचा आरोप करितात व शरीरेंद्रियांचीं कर्मै तीं आत्म्याचींच कर्मै आहेत, असें मानूं लागतात. शुक्तीच्या ठिकाणीं रजताचा जसा आरोप करितात, तसाच आत्म्यावर कर्माकर्मांचा आरोप होतो. पण शुक्तीच्या ठिकाणीं वस्तुतः रजत नाहीं, हें जसें पहावें, त्याप्रमाणें आत्म्यामध्यें कर्म नाहीं, असें जो पहातो, त्याचप्रमाणें शरीरेंद्रियांचा व्यापार शान्त करून त्याच्याद्वारा मीच आतां कर्मरहित झालों आहें, सुखी—स्वस्थ आहें, अशा प्रकारच्या अकर्माला अहंकारामुळें जो कर्मच समजतो, तो पंडित होय. कारण रुपें व त्याचा अभाव या दोन्ही पदार्थांनीं हीन असलेल्या शिंपीला तिच्याच रूपानें पहावें, त्याप्रमाणें कर्म व अकर्म यांनीं हीन असलेल्या केवल निर्विकार आत्म्याला जाणणारा पुरुष ज्ञानी, योगी, इत्यादि स्तुतीला पात्र होतो. ]

यस्य सर्वे समारम्भाः कामसंकल्पवर्जिताः ।
ज्ञानाग्निदग्धकर्माणं तमाहुः पण्डितं बुधाः ॥ १९ ॥

( ७ ) ज्या विवेकी पुरुषाचे सर्व समारंभ—कर्मै विषयेच्छा व त्याचें कारण संकल्प यांनीं रहित असतात, त्यावरील ज्ञानरूपी अग्नीनें ज्याचीं कर्मै जळालीं आहेत, अशा त्याला ब्रह्मवेत्ते खरा पंडित म्हणतात. [ शरीराच्या कर्माला

आत्म्याचें अकर्म व शरीराच्या अकर्माला शरीराचें कर्म जाणणाऱ्या पुरुषांची सर्व लौकिक व वैदिक कर्में फलेच्छा व त्याविषयींचे संकल्प यांनीं रहित असतात. तो प्रवृत्त मार्गांत–कर्माधिकारी गृहस्थ असेल, तर आपलीं सर्व कर्में लोकसंग्रहासाठीं करतो व निवृत्त मार्गांत असेल, तर केवल शरीर-धारणार्थ अवश्य तेवढींच करतो, पण तीं सर्व कामसंकल्पवर्जित असल्यामुळें केवल शरीरेंद्रियांची हालचाल या स्वरूपाचींच होत असतात. अशा त्या ज्ञाना-ग्नीनें कम जाळून टाकणाऱ्या पुरुषाला ब्रह्मवेत्ते खरा पंडित–आत्मज्ञ म्हणतात. ]

त्यक्त्वा कर्मफलासङ्गं नित्यतृप्तो निराश्रयः ।
कर्मण्यभिप्रवृत्तोऽपि नैव किञ्चित्करोति सः ॥ २० ॥

—जो कम व कर्मफल यांविषयींचा अभिमान् व इच्छा टाकून आत्मज्ञा-नानें–आत्मस्वरूप सुखाच्या अनुभवानें नित्य तृप्त झालेला–विषयांविषयीं विरक्त झालेला व ऐहिक आणि पारलौकिक फलांच्या लौकिक-वैदिक साधनांचा आश्रय न करणारा ज्ञानी, अज्ञानावस्थेंत जसा, तसाच कर्मांमध्यें जरी सर्व प्रकारें प्रवृत्त झाला असला तरी कांहीं करीत नाहीं. [ लोकांना हा पूर्वींप्रमाणेंच कर्मानुष्ठान करीत आहे, असें जरी वाटलें, तरी स्वतःच्या दृष्टीनें तो कांहींच करीत नाहीं. कारण त्याला सर्व कर्मशून्य आत्म्याचें साक्षात् ज्ञान झालेलें असतें. वस्तुतः अशा अवस्थेंत त्याला कर्मांचा कांहींच उपयोग नसतो. त्या-मुळें त्याला शिखा-सूत्रादि साधनांसह सर्व कर्मांचा त्याग करणेंच शास्त्रतः प्राप्त असतें. पण ज्याला प्रारब्धानुसार लोकसंग्रहाची इच्छा असते, किंवा शिष्टजनांनीं आपली निंदा करूं नये, असें वाटत असतें, तो साक्षात् कर्म-संन्यास करूं शकत नाहीं. तो गृहस्थाश्रमांत राहून कर्मयोगच आचरितो. तथापि त्याचीं कर्में आत्मज्ञानानें दग्ध होत असल्यामुळें वस्तुतः तीं कर्मेंच नव्हेत. ]

पण वरच्या श्लोकांत सांगितलेल्या लोकसंग्रहादिकांची इच्छा करणाऱ्या पुरुषाहून अगदीं निराळ्या म्ह० गृहस्थाश्रम स्वीकारण्याच्या पूर्वींच ज्याला ब्रह्मात्मसाक्षात्कार झाला आहे, मीच सर्वान्तर्यामी निष्क्रिय ब्रह्म आहें, असा अपरोक्षानुभव आला आहे, त्यामुळें ज्याच्या ऐहिक व पारलौकिक विषयां-विषयींच्या सर्व इच्छा नाहींशा झाल्या आहेत, तो ऐहिक व पारलौकिक फल देणाऱ्या कर्मांचा आपल्याला कांहीं उपयोग नाहीं, असें पहातो व त्यामुळें

साधनांसह सर्व कर्मांचा संन्यास करतो आणि शरीरयात्रा चालण्यास अत्यंत अवश्य तेवढीच हालचाल करतो. असला ज्ञाननिष्ठ यतिच मुक्त होतो, असें भगवान् सांगतात.

निराशीर्यतचित्तात्मा त्यक्तसर्वपरिग्रहः ।
शारीरं केवलं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ॥ २१ ॥

—तृष्णाशून्य म्ह० विषयांविषयीं विरक्त, ज्यानें चित्त व शरीरेंद्रियसंघात यांचें उत्तम प्रकारें संयमन केलें आहे; ज्यानें स्त्री-पुत्रादि सर्व परिग्रह सोडला आहे, असा ज्ञाननिष्ठ यति नुसतें शरीरस्थितीला कारण होणारें कर्म जरी करीत असला; तरी तो पापाला म्ह० दोषाला प्राप्त होत नाहीं. [ असा ज्ञाननिष्ठ पुरुष शरीरस्थितीपुरतेंच व तेंहि अहंकाररहित कर्म जरी करीत असला तरी त्याला पाप लागत नाहीं. त्या तेवढ्या कर्मानें तो बद्ध होत नाहीं. अर्थात् 'मी अकर्ता आहें व सर्व क्रिया शरीरेंद्रियांच्या आहेत,' असें जाणून केलेलें कोणतेंहि कर्म बंध उत्पन्न करीत नाहीं. म्हणजे तें कर्म अकर्मच आहे. ]

सर्व परिग्रहाचा त्याग केलेल्या यतीपाशीं शरीराच्या निर्वाहासाठीं अवश्य असलेल्या अन्नाच्छादनादिकांचाहि अभाव असल्यामुळें भिक्षा, सेवा, शेती, इत्यादि उपायांतील एखाद्या उपायानें शरीरनिर्वाह करणें प्राप्त होतें. पण यतीनें अयाचित, असंक्लप्त, यदृच्छाप्राप्त इत्यादि उपायांनीं शरीरस्थितीला अवश्य असलेलें अन्नादि संपादन करावें, अशी धर्मशास्त्रानें 'अयाचितं असंक्लृतम्' या वचनानें अनुज्ञा दिली आहे. तोच शास्त्रोक्त अन्नप्राप्तीचा मार्ग भगवान् पुढील वाक्यांत प्रकट करीत आहेत.

यदृच्छालाभसंतुष्टो द्वन्द्वातीतो विमत्सरः ।
समः सिद्धावसिद्धौ च कृत्वाऽपि न निबध्यते ॥ २२ ॥

—अनायासानें व याचनेवांचून जें प्राप्त होईल, त्यानें संतुष्ट होणारा, शीतोष्ण द्वंद्वांची कितीहि पीडा होत असली तरी विषाद न मानणारा, कोणाचाहि मत्सर न करणारा, मनांत वैरबुद्धि न बाळगणारा, शरीरयात्रेसाठीं अत्यंत अवश्य अशाहि अन्नाच्छादनाचा लाभ झाला असतां हर्ष न मानणारा, तें न मिळाल्यास विषाद न करणारा व कर्मादिकांस अकर्मादि समजणारा आत्मज्ञाननिष्ठ पुरुष शरीरस्थिति एवढेंच ज्याचें प्रयोजन आहे, अशा शरीरेंद्रियांनीं होणाऱ्या भिक्षाटनादि कर्मांत जरी प्रवृत्त झाला, तरी तो तें कांहीं

करीत नाहीं. कारण तें करीत असतांनाहि 'गुणागुणेषु वर्तन्ते' ही त्याची भावना दृढ असते. त्यामुळेंच तो आत्मा अकर्ता आहे ही गोष्ट केव्हांहि विसरत नाहीं. म्हणून तो भिक्षाटनादि करीत असला तरी त्यानें बद्ध होत नाहीं.

गतसङ्गस्य मुक्तस्य ज्ञानावस्थितचेतसः ।
यज्ञायाचरतः कर्म समग्रं प्रविलीयते ॥ २३ ॥

—ज्याची कर्म व फल यांविषयींची आसक्ति निवृत्त झाली आहे; ज्याची त्यांत आसक्ति राहिलेली नाहीं, त्यामुळें जो धर्माधर्मादि बंधनापासून सुटला आहे व ज्याचें चित्त ज्ञानांतच अवस्थित आहे, अशा यज्ञासाठींच कर्म करणाऱ्या पुरुषाचें तें कर्म फलासह विनाश पावतें. [ ज्यानें अगोदर कर्मानुष्ठानाला आरंभ केला आहे, पण पुढें ज्याला निष्क्रिय ब्रह्मच माझा आत्मा आहे, असें आत्मज्ञान झालें, तो आत्मा अकर्ता आहे, त्याचें अमुक कर्तव्य आहे, त्याचें त्याला अमुक फल मिळेल, असें समजत नाहीं, तर त्याच्या ठिकाणीं कर्तृकर्म प्रयोजनांचा अभाव आहे, असें समजतो, त्याला कर्मत्यागच प्राप्त होतो. अशा स्थितींत तो संन्यासच करील, यांत संशय नाहीं. पण कांहीं कारणानें त्याला संन्यास करतां न आल्यास तो ज्ञान झाल्यावरहि पूर्वींप्रमाणेंच कर्मानुष्ठान करीत रहातो. तथापि वस्तुतः तो कांहींच करीत नाहीं, असें म्हणून त्याच्या कर्मांचा अभाव वर २० व्या श्लोकांत सांगितला आहे. पण ज्याचा याप्रमाणें कर्माभाव प्रदर्शित केला आहे, त्या आसक्तिशून्य, धर्माधर्मादि बंधनरहित व ज्ञानामध्येंच अवस्थितचित्त अशा ज्ञानी पुरुषानें भगवत्प्राप्तीसाठीं किंवा केवळ यज्ञाचें स्वरूप सिद्ध होण्यासाठीं केलेलें कर्म समग्र—फलासह नाश पावतें. तें पुढील जन्माला कारण होत नाहीं. ]

( ८ )—'कर्माचें फल भोगल्यावांचून दीर्घकाल जरी लोटला, तरी तें क्षीण होत नाहीं.' अशी स्मृति असल्यामुळें केलेलें कर्म आपल्या कार्याचा—फळाचा आरंभ न करतां कोणत्या बरें कारणानें समग्र नाश पावतें?' असें विचारशील तर सांगतों—

ब्रह्मार्पणं ब्रह्म हविर्ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम् ।
ब्रह्मैव तेन गन्तव्यं ब्रह्मकर्मसमाधिना ॥ २४ ॥

—स्रुक्, स्रुवा इत्यादि ज्या साधनांनीं ब्रह्मवित् अग्नींत हवि अर्पण करितो, तें साधन ब्रह्म; तूप, भात, इत्यादि अग्नींत होमावयाचा पदार्थहि ब्रह्म; ज्यांत

होम करावयाचा तो अग्नि ब्रह्म. हवन करणारा यजमान ब्रह्म. ब्रह्मच कर्म, त्यामध्यें ज्याच्या चित्ताची समाधि–समाधान–स्थिरता आहे, अशा पुरुषाला प्राप्तव्य असलेलें फलहि ब्रह्मच म्ह० ब्रह्मरूप साधनानें ब्रह्मरूप हवि ब्रह्मरूप अग्नीमध्यें ब्रह्मरूप यजमानाकडून ब्रह्मरूप होम केला जातो, व त्याला इष्ट असलेल्या फलहि ब्रह्मच आहे. [अर्जुना, कर्तृत्वाभिमान व फलेच्छा यांनीं युक्त होऊन केलेल्या शुभाशुभ कर्मांमध्यें कितीहि जरी काल लोटला तरी आपलें फल दिल्यावांचून तें क्षीण होत नाहीं. हें शास्त्रवचन खरें आहे. त्यामुळें 'ज्ञानी पुरुषानेंहि केलेलें कर्म फलाचा आरंभ केल्यावांचून क्षीण होईल असें वाटत नाहीं. तेव्हां तें समग्र विनाश कसें पावणार !' अशी तुला आलेली जी शंका ती यथार्थ आहे. पण ब्रह्मवेत्त्याला सर्व द्वैत ब्रह्ममात्र भासतें. त्याच्या दृष्टीनें कर्म व त्याचें साधनादि हीं सर्व ब्रह्मरूप असतात. त्यामुळें बाधित झालेलें कर्म समग्र नाश पावतें. ज्ञान झाल्यावरहि लोकसंग्रहादि कांहीं कारणानें गृहस्थाश्रमाचा त्याग न करणाऱ्या पुरुषानें अग्निहोत्रादि कर्म जरी केलें, तरी तें ब्रह्मबुद्धीनें बाधित होत असल्यामुळें वस्तुतः अकर्मच आहे. त्यामुळें लोकसंग्रहार्थ कर्में करणाराहि कर्मयोगी नव्हे, तर तो तत्त्वतः संन्यासीच आहे. या श्लोकांत ज्ञानाची स्तुति केली आहे. प्रसिद्ध यज्ञांत जीं अर्पणादि साधनें आहेत, तीं सर्व ज्ञानी पुरुषाच्या ज्ञानरूप आहेत. परमार्थदर्शी पुरुष अर्पणादि सर्व ब्रह्मच पहातो. त्यामुळें त्याला प्रत्यक्ष कर्मानुष्ठान करावें लागत नाहीं. अर्थात् सर्व ब्रह्मच आहे, असें जाणणाऱ्या ज्ञाननिष्ठाच्या सर्व कर्मांचा अभाव आहे. येथें लोकसंग्रहार्थ कर्में करणाऱ्या पुरुषाला ब्रह्मदृष्टीमुळें कर्म बद्ध करूं शकत नाहीं, असें सांगून ज्ञाननिष्ठाच्या दृष्टीनें त्याचा अभावच आहे असें सांगितलें आहे.]

दैवमेवापरे यज्ञं योगिनः पर्युपासते ।
ब्रह्माग्नावपरे यज्ञं यज्ञेनैवोपजुह्वति ॥ २५ ॥

—आत्मवेत्त्याची सर्वत्र ब्रह्मदृष्टि हाच ज्ञानयज्ञ आहे, असें सांगून आतां त्याच्या स्तुतीसाठीं भगवान् दुसऱ्या यज्ञांचाहि उल्लेख करितात. ज्यांत देवतांना उद्देशून हवन केलें जातें तो दैवयज्ञ कांहीं कर्माधिकारी गृहस्थ करितात. दुसरे ज्ञाननिष्ठ संन्यासी सत्य-ज्ञान-अनंत-विज्ञान-आनंद-साक्षात्-अपरोक्ष–सर्वान्तर आत्मरूप ब्रह्माग्नींत आत्म्याचा होम करितात, म्ह० सोपाधिक आत्मा निरुपाधिक ब्रह्मरूप आहे असें पहातात. हेंच मूळ श्लोकांत दुसरे

कांहीं ब्रह्मवेत्ते–ज्ञाननिष्ठ ‘ यज्ञं ’–आत्म्याला म्ह० बुद्ध्यादि उपाधियुक्त जीवाला ‘ ब्रह्माग्नौ ’–ब्रह्मरूप अग्नींत ‘ यज्ञेन एव ’–निरुपाधिक ब्रह्मरूपानेंच हवन करितात, या वाक्यानें सांगितला आहे. [ सोपाधिक आत्मा निरुपाधिक ब्रह्मरूप आहे, असें पहातात. आत्मा बुद्ध्यादि उपाधींनीं संयुक्त झाल्यामुळें त्याच्यावर उपाधीचे सर्व धर्म आरोपिले जातात. त्यामुळें तो परब्रह्माहून अगदीं भिन्न आहे, असा भ्रम होतो. तो घालविण्यासाठीं ज्ञाननिष्ठ त्या सोपाधिक आत्म्याचा निरुपाधिक आत्मतत्त्वांत लय करतात. पुढें ३३ व्या श्लोकांत ज्ञानयज्ञाची स्तुति करावयाची असल्यामुळें येथें दैवयज्ञादिकांत त्याची पुनः गणना केली आहे; असो. याप्रमाणें येथें गृहस्थांच्या प्रसिद्ध मुख्य यज्ञाची प्रथम गणना करून नंतर ‘ ज्ञाननिष्ठाचें ब्रह्मात्मैक्यज्ञान हाहि यज्ञच आहे, ’ असें गौणवृत्तीनें म्हटलें आहे. यज्ञांतील गुण यांत दाखविण्यासाठीं सोपाधिक आत्म्याचा निरुपाधिक ब्रह्मरूप अग्नींत सर्वसंसारधर्मरहित निर्विशेष स्वरूपानें होम करितात, असें म्हटलें आहे. ]

श्रोत्रादीनीन्द्रियाण्यन्ये संयमाग्निषु जुह्वति ।
शब्दादीन्विषयानन्य इन्द्रियाग्निषु जुह्वति ॥ २६ ॥

—या श्लोकांत भगवान् आणखी दोन गौणयज्ञ सांगतात—श्रेयःसाधनांचें अनुष्ठान करणारे दुसरे योगी श्रोत्रादिक इंद्रियें पांच इंद्रियांचा पांच प्रकारचा संयम–निग्रह हेच अग्नि, त्यांत होमितात. संयमाग्नींत होम करितात. दुसरे कांहीं योगी शब्द, स्पर्श, रूप, रस, व गंध या पूर्वोक्त श्रोत्रादि ज्ञानेंद्रियांच्या विषयांस इंद्रियरूप अग्नींत होमितात. [ मनोरूप संयमांत इंद्रियांचा होम करावयाचा आहे. म्हणून त्यांना येथें अग्नि म्हटलें आहे. बाह्य व आंतर इंद्रियांचा मनांत प्रत्याहार करितात, असा याचा भावार्थ. हा तिसरा संयमयज्ञ होय. दुसरे साधक शब्दादि विषयांचा इंद्रियाग्नींत होम करितात. इंद्रियें हेच अग्नि, त्या इंद्रियाग्नींत विषयांचा होम करितात. श्रोत्रादि इंद्रियांनीं अनिषिद्ध विषयांचें ग्रहण करणें यालाच ते होम मानितात. म्ह० निषिद्ध विषय सोडून प्राप्त झालेल्या विहित विषयांना राग-द्वेषरहित होत्साते त्या त्या इंद्रियांनीं भोगितात. ]

सर्वाणीन्द्रियकर्माणि प्राणकर्माणि चापरे ।
आत्मसंयमयोगाग्नौ जुह्वति ज्ञानदीपिते ॥ २७ ॥

—या श्लोकांत आणखी एक गौण यज्ञ सांगतात. दुसरे कांहीं साधक सर्व इंद्रियांचीं कर्में व प्राणापानादि वायूंचीं कर्में विवेकज्ञानानें प्रदीप्त झालेल्या आत्मसंयमरूप योगाग्नींत होमितात. [ तेलानें दीप जसा प्रदीप्त करतात, त्याप्रमाणें विवेकज्ञानानें उज्ज्वल भावास प्राप्त केलेल्या योगाग्नींत इंद्रियकर्में व प्राणकर्में यांना कोणी अत्यंत लीन करितात–त्यांना त्यांत मिळवून सोडतात. सर्व व्यापारांचा निरोध करून आत्म्यामध्यें चित्ताचें समाधान करितात असा याचा भावार्थ. ]

द्रव्ययज्ञास्तपोयज्ञा योगयज्ञास्तथापरे ।
स्वाध्यायज्ञानयज्ञाश्च यतयः संशितव्रताः ॥ २८ ॥

—या श्लोकांत आणखी सहा गौण यज्ञ सांगतात—सत्पात्रीं द्रव्याचा विनियोग यज्ञाच्या भावनेनें जे करितात, ते द्रव्ययज्ञ होत. जे तपश्चर्या करितात, ते तपोयज्ञ होत. तसेच जे दुसरे योगांगांचा अभ्यास करितात, ते योगयज्ञ, जे ऋग्वेदादिकांचें यथाविधि अध्ययन करितात, ते स्वाध्याययज्ञ, जे शास्त्रार्थांचा अभ्यास करून शास्त्रार्थज्ञान संपादन करितात, ते ज्ञानयज्ञ व ज्यांनीं व्रतें अतिशय तीक्ष्ण केलीं आहेत, ते यति–संन्यासी हे व्रतयज्ञ होत.

अपाने जुह्वति प्राणं प्राणेऽपानं तथापरे ।
प्राणापानगती रुद्ध्वा प्राणायामपरायणाः ॥ २९ ॥

—आतां प्राणायामसंज्ञक यज्ञ सांगतात—दुसरे कांहीं मुमुक्षु अपान वायूंत प्राणवायूला, त्याचप्रमाणें प्राणवायूंत अपानाला होमितात आणि प्राण व अपान यांच्या गति बंद करून प्राणायामपरायण होतात. [ क्रमानें पूरक, रेचक व कुंभक करितात. हा बाह्य कुंभक होय. ]

अपरे नियताहाराः प्राणान्प्राणेषु जुह्वति ।
सर्वेऽप्येते यज्ञविदो यज्ञक्षपितकल्मषाः ॥ ३० ॥

—दुसरे कित्येक परिमित आहार करणारे प्राणापानादि वायुभेदांस प्राणांमध्येंच होमितात. हे सर्वहि यज्ञवेत्ते म्ह० आपापल्या साधनाला यज्ञ समजून त्याचें अनुष्ठान करणारे, यज्ञानें पापाचा क्षय केलेले असे होतात, म्ह० यज्ञानें निष्पाप होतात. [ प्राणापानगतिनिरोधरूप कुंभक करून पुन्हां पुन्हां वायूचा जय करतात. म्ह० जिंकलेल्या वायुभेदांत न जिंकलेले वायूचे भेद जणुकाय प्रविष्ट झाले आहेत, असें पहातात. हे सर्वहि आपापल्या श्रेयःसाधनामध्यें यज्ञकल्पना करणारे यज्ञवेत्ते यज्ञाच्या योगानें निष्पाप होतात. ]

यज्ञशिष्टामृतभुजो यान्ति ब्रह्म सनातनम् ।
नायं लोकोऽस्त्ययज्ञस्य कुतोऽन्यः कुरुसत्तम ॥ ३१ ॥

—याप्रमाणें यज्ञ करून अवशिष्ट राहिलेल्या वेळीं 'अमृत' नांवाचें अन्न खाणारे मुमुक्षु चित्तशुद्धि-ज्ञानप्राप्तीच्या द्वारा नित्य ब्रह्मास प्राप्त होतात. हे कुरुकुल श्रेष्ठा, यांतील एकहि यज्ञ न करणाऱ्या पुरुषाला हा सर्वसाधारण लोकहि नाहीं. मग विशिष्ट साधनांनीं साध्य होणारा दुसरा असाधारण लोक कोठचा !

एवं बहुविधा यज्ञा वितता ब्रह्मणो मुखे ।
कर्मजान्विद्धि तान्सर्वानेवं ज्ञात्वा विमोक्ष्यसे ॥ ३२ ॥

—याप्रमाणें अनेक प्रकारचे यज्ञ वेदाच्या द्वारा विस्तारलेले आहेत. ते सर्व कर्मांपासून झालेले आहेत, असें जाणून तूं अशुभ संसारापासून मुक्त होशील. [ ज्याअर्थी अशा प्रकारचे सर्व यज्ञ वेदमूलक आहेत, त्याअर्थी ते काल्पनिक नाहींत. ]

श्रेयान्द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः परंतप ।
सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते ॥ ३३ ॥

—पण हे शत्रूंना ताप देणाऱ्या अर्जुना, द्रव्यादि साधनांनीं साध्य होणाऱ्या या सर्व साधनांहून 'ब्रह्मार्पणम्०' या श्लोकांत सांगितलेला ज्ञानयज्ञ श्रेष्ठ आहे. हे पार्था, सर्व कर्मे प्रतिबद्ध न होतां ज्ञानांत अंतर्भूत होतें. [ द्रव्य या साधनानें साध्य होणाऱ्या यज्ञाहून ज्ञानयज्ञ श्रेष्ठ आहे, या वाक्यांतील द्रव्य हा शब्द स्वाध्यायादिकांच्या उपलक्षणार्थ आहे. कारण ज्ञानयज्ञ स्वाध्यायादि इतर सर्व यज्ञांहूनहि श्रेयस्कर आहे. कारण द्रव्यमय यज्ञ फलाचा आरंभक आहे. ज्ञानयज्ञ कोणत्याहि फलाचा आरंभक नाहीं. तर नित्य मोक्षाला अभिव्यक्त करणारा आहे. म्हणून अग्निहोत्रादि सर्व कर्मांचें फल 'सर्वतः संप्लुतोदकस्थानीय' मोक्षसाधनरूप ज्ञानांत अंतर्भूत होतें. येथें पूर्वोक्त यज्ञानें ज्ञानाची स्तुति केली आहे. ]

तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया ।
उपदेक्ष्यन्ति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्वदर्शिनः ॥ ३४ ॥

( ९ )—असें हें अत्यंत श्रेष्ठ ज्ञान कोणत्या उपायानें प्राप्त होतें तें सांगतों— अर्जुना, तूं हें ज्ञान आचार्यांना शरण जाऊन, त्यांना साष्टांग नमस्कार करून

बंध-मोक्षासंबंधीं विविध प्रश्न विचारून व त्यांची शुश्रूषा करून संपादन कर. तत्त्वदर्शी ज्ञानी तुला त्या ज्ञानाचा उपदेश करतील.

यज्ज्ञात्वा न पुनर्मोहमेवं यास्यसि पांडव ।
येन भूतान्यशेषेण द्रक्ष्यस्यात्मन्यथो मयि ॥ ३५ ॥

—हे पांडवा, तें ज्ञान संपादन केल्यावर तूं पुनरपि असा मोहित होणार नाहींस, उलट त्या ज्ञानानें आब्रह्मस्तंबपर्यंत सर्व भूतांस आपल्या प्रत्यगात्म्या-मध्यें व मज परमेश्वरामध्यें पहाशील. [ तत्त्वज्ञ आचार्यांनीं ज्ञानोपदेश केला असतां तुला आत्मसाक्षात्कार होईल. त्यानंतर तुला आतां जसा मोह झाला आहे, तसा पुनः होणार नाहीं. इतकेंच नव्हे, तर त्या ज्ञानाच्या योगानें आब्रह्मस्तंबपर्यंत सर्व भूतें तूं आपल्या आत्म्यामध्यें व त्याचप्रमाणें मजमध्यें पहाशील. म्ह० क्षेत्रज्ञ व ईश्वर यांचें ऐक्य तुझ्या अनुभवास येईल. ]

अपि चेदसि पापेभ्यः सर्वेभ्यः पापकृत्तमः ।
सर्वं ज्ञानप्लवेनैव वृजिनं संतरिष्यसि ॥ ३६ ॥

—अर्जुना, तूं जरी सर्व पाप्यांहून अधिक पाप करणारा असलास, तरी या ज्ञानरूपी नौकेनेंच म्ह० ब्रह्मात्मैक्य ज्ञानालाच नौका करून सर्व पापाच्या समुद्राला तूं उत्तम प्रकारें तरून जाशील. [ अध्यात्मशास्त्रांत मुमुक्षूचा धर्महि ' पाप ' म्हटला जातो. येथें मुमुक्षूच्या धर्मालाहि पाप म्हटलें आहे. कारण निषिद्धाचरणाप्रमाणेंच विहिताचरणहि त्याला बंध उत्पन्न करतें व मुमुक्षूचे धर्माधर्मसंज्ञक सर्व बंध तुटले पाहिजेत, तरच त्याला मोक्ष मिळतो. गीता-भाष्यार्थ पृ. १४० पहा. येथें आत्मज्ञानाचें माहात्म्य सांगितलें आहे. ]

---

१ यावरून ' अर्जुन ज्ञानी होता व ज्ञानी पुरुषानें ज्ञानोत्तर आयुष्यक्रमण कसें करावें, येथूनच गीतेचा आरंभ आहे, ' असें जें कित्येकांचें म्हणणें आहे, तें खोटें आहे, हें उघड होतें.

२ अर्जुनाला झालेला मोह हें अज्ञानाचें कार्य असून ' ज्ञान होतांच तें निवृत्त होईल ' असें भगवान् येथें उघड सांगत आहेत. त्यावरून अर्जुन ज्ञानी नव्हता व ज्ञानी पुरुषानें ज्ञानोत्तर काय करावें हें सांगण्यासाठीं गीता नसून, मुमुक्षूनें स्वधर्माचरणानें चित्तशुद्धि करून घेऊन—तत्त्वज्ञानी पुरुषाला शरण जाऊन त्याच्या ज्ञानोपदेशानें कृतार्थ व्हावें, हेंच सांगण्यासाठीं ती आहे, असें सिद्ध होतें.

यथैधांसि समिद्धोऽग्निर्भस्मसात्कुरुतेऽर्जुन ।
ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात्कुरुते तथा ॥ ३७ ॥

—अर्जुना, ज्याप्रमाणें प्रदीप्त झालेला अग्नि इंधनाला जाळून भस्म करितो, त्याप्रमाणें ज्ञानरूप अग्नि अज्ञानाचा नाश करून त्याच्या द्वारा, ज्या कर्मांच्या फलाला आरंभ झालेला नाहीं, अशीं याच जन्मांत ज्ञानोत्पत्तीच्या पूर्वी केलेलीं, ज्ञानानंतर शरीर असेपर्यंत होणारीं व मागें होऊन गेलेल्या अनेक जन्मीं केलेलीं अशीं संचित व आगामी सर्व कर्में दग्ध—निर्बीज करितो.

न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते ।
तत्स्वयं योगसंसिद्धः कालेनात्मनि विन्दति ॥ ३८ ॥

—अर्जुना, ज्याअर्थी या ज्ञानाचें एवढें माहात्म्य आहे, त्याअर्थी त्या ब्रह्मात्मैक्य ज्ञानासारखें पावन करणारें—शुद्धि करणारें या जगांत कांहींच नाहीं. तें आत्मविषयक ज्ञान कर्मयोगानें व समाधियोगानें सुसंस्कृत झालेला मुमुक्षु दीर्घकालानें स्वतःच संपादन करितो. [ कर्मयोग व समाधियोग या योगानें सुसंस्कृत झालेल्या मुमुक्षूला ब्रह्मात्मैक्यज्ञान अनायासानें होतें. अर्थात् ज्ञानाची योग्यता संपादन करण्यासाठीं पुरुषाला अनेक जन्म दीर्घकाल यत्न करावा लागतो. ज्ञानाची योग्यता प्राप्त झाल्यावर त्याच्या सिद्धीसाठीं पृथक् यत्न करावा लागत नाहीं, असा याचा भावार्थ. ]

श्रद्धावाँल्लभते ज्ञानं तत्परः संयतेन्द्रियः ।
ज्ञानं लब्ध्वा परां शान्तिमचिरेणाधिगच्छति ॥ ३९ ॥

—ज्याच्या योगानें नियमानें ज्ञानप्राप्ति होते, तो अंतरंग उपाय मी तुला सांगतों—श्रद्धालु, गुरूची उपासना इत्यादि ज्ञानप्राप्तीच्या उपायांमध्यें अतिशय तत्पर असणारा व विषयांपासून इंद्रियांना निवृत्त करणारा पुरुष आत्मज्ञानाला प्राप्त होतो. अशाच पुरुषाला आत्मज्ञान होतें आणि ज्ञानप्राप्ति झाल्यावर त्याला मोक्ष नांवाची पराशान्ति सत्वर प्राप्त होते.

अज्ञश्चाश्रद्दधानश्च संशयात्मा विनश्यति ।
नायं लोकोऽस्ति न परो न सुखं संशयात्मनः ॥ ४० ॥

( १० )—श्रद्धावान्, गुरुसेवाप्रभृति उपायांमध्यें तत्पर व जितेंद्रिय असलेल्या मुमुक्षूला निश्चयानें ज्ञान होतें व तें झालें म्हणजे तो मोक्ष या नांवाच्या श्रेष्ठ उपरतीला सत्वर प्राप्त होतो. या सिद्धान्ताविषयीं मनांत संशय आणूं

नये. कारण तो संशय अतिशय पापी आहे असें सांगण्यासाठीं भगवान् म्हण-
तात—आत्म्याला न जाणणारा–अश्रद्धालु व संशयचित्त–संशयस्वभाव–संशयी
पुरुष विनाश पावतो. कारण संशयी पुरुषाला हा सर्वसाधारण मनुष्य-
लोकहि मिळत नाहीं. विशिष्ट साधनांनीं साध्य होणारा परलोकहि नाहीं व
सुखहि मिळत नाहीं. कारण त्याला त्या त्या फलाच्या प्राप्तीविषयीं संशय
येणारच. [ मीं या साधनाचें आचरण करीत आहें खरें, पण त्याचें फल
मिळेल कीं नाहीं, हें कोणाला ठाऊक, असा संशय संशयचित्त पुरुषाला येणें
अपरिहार्य आहे. म्हणून अज्ञ व अश्रद्धालु हे दोघेहि जरी विनाश पावत असले
तरी संशयात्मा जसा विनाश पावतो, तसे ते विनाश पावत नाहींत. संशय
महापापी आहे. म्हणून संशयात्म्याला हा सर्वप्राणिसाधारण मनुष्यलोकहि
मिळत नाहीं; मग विशिष्ट साधनांनीं साध्य असलेला स्वर्गादि परलोक व
श्रेष्ठ सुख कोठून मिळणार ! ]

योगसंन्यस्तकर्माणं ज्ञानसंछिन्नसंशयम् ।
आत्मवन्तं न कर्माणि निबध्नन्ति धनंजय ॥ ४१ ॥

—यास्तव हे अर्जुना, आत्मा व ईश्वर यांच्या एकत्वदर्शनरूप ज्ञानानें ज्याचा
संशय पार गेला आहे व त्यामुळें परमार्थदर्शनरूप योगानें म्ह० ज्ञानयोगानें धर्म
व अधर्म या नांवांचीं कर्में ज्यानें सोडलीं आहेत, अशा सावधान पुरुषाला
धर्माधर्माख्य कर्में बद्ध करीत नाहींत. [ म्ह० त्या त्या इष्टानिष्ट कर्मांचा आरंभ
करीत नाहींत. कारण तो तीं कर्में शरीरेंद्रियांचीं आहेत, माझीं नव्हेत, असें
सतत समजतो. त्यामुळें तीं त्याला कर्मफलानें बद्ध करूं शकत नाहींत. ]

तस्मादज्ञानसंभूतं हृत्स्थं ज्ञानासिनात्मनः ।
छित्त्वैनं संशयं योगमातिष्ठोत्तिष्ठ भारत ॥ ४२ ॥

—ज्याअर्थी कर्मयोगाच्या अनुष्ठानामुळें अशुद्धीचा क्षय होऊन उत्पन्न
होणाऱ्या ज्ञानानें ज्याचा संशय तुटला आहे, तो कर्मांकडून बद्ध केला
जात नाहीं आणि ज्याअर्थी ज्ञान व कर्मानुष्ठान यांविषयीं ज्याला संशय
असतो, तो विनाश पावतो, त्याअर्थी अर्जुना, तूं अविवेकामुळें–अज्ञानापासून
उत्पन्न झालेल्या व बुद्धींत असलेल्या आत्म्याविषयींच्या या संशयास
शोक-मोहादि दोषांना घालविणाऱ्या परोक्ष यथार्थ ज्ञानरूपी तरवारीनें तोडून
अपरोक्ष ज्ञानसाधनस्वरूप कर्मानुष्ठान कर. हे भारता, आतां अगोदर तूं

युद्धाला ऊठ. [ कर्मानुष्ठानानें अशुद्धीचा क्षय होऊन ज्ञान होतें. ज्ञानानें सर्व संशय नाहींसे होतात व ज्ञानाग्नीनें सर्व कर्मे दग्ध झाल्यामुळें तो ज्ञानी धर्मा-धर्माख्य कर्मांनीं बद्ध होत नाहीं. त्याचप्रमाणें ज्ञान व कर्म यांविषयीं ज्याला संशय असतो तो विनाश पावतो. म्हणून तूं आपल्या बुद्धींतील अविवेकामुळें उत्पन्न झालेल्या अत्यंत पापी संशयाला शोक-मोहादि दोष घालविणाऱ्या तत्त्व-दर्शनानें—परोक्ष आत्मज्ञानानें घालवून, ज्ञानरूपी खड्गानें आत्म्याविषयींच्या संशयाला तोडून, आत्मसाक्षात्काराचा उपाय असा जो कर्मयोग त्याचें अनुष्ठान कर. पण हे अर्जुना, आतां अगोदर त्या स्वधर्मरूप कर्मयोगाचा एकदेश असें जें हें प्राप्त युद्ध तें कर. या समग्र अध्यायांत 'योगाचें कृत्रिमत्व व भग-वानाचें अनीश्वरत्व याविषयींची शंका घालवून प्रणिपातादि बहिरंग व श्रद्धादि अंतरंग साधनांच्या योगानें उत्पन्न झालेल्या कर्मादिकांमध्यें अकर्मादि दर्शन-रूप आत्म्याच्या अपरोक्ष ज्ञानानें सर्व अनर्थांची निवृत्ति होऊन ब्रह्मभावप्राप्ति होते,' असें सांगितलें व शेवटीं संशयरहित असलेल्या पुरुषालाच सर्वोत्तम ज्ञानाचा अधिकार असल्यामुळें सर्व अनर्थांचें मूळ असा जो संशय तो घालवून उत्तम अधिकाऱ्यासाठीं ज्ञाननिष्ठा व मध्यम अधिकाऱ्यासाठीं कर्मनिष्ठा विहित आहे, असें सिद्ध केलें. ]

( येथें भगवद्गीतेचा 'ज्ञान-कर्मसंन्यासयोग' नांवाचा चवथा अध्याय समाप्त झाला. ) ६. ३. २८.

---

## अध्याय २९ वा.

### ( गीताध्याय ५ वा. संन्यासयोग. )

[ १ कर्मानुष्ठान व कर्मसंन्यास यांतील श्रेष्ठ काय ? असा अर्जुनाचा प्रश्न. २ अज्ञकृत संन्यासाहून कर्मयोग श्रेष्ठ असें उत्तर व कर्मयोगाची स्तुति. ३ सांख्य व योग हें फलतः एकच. ४ चित्तशुद्धयर्थ कर्मयोग व त्यानेंच नैष्कर्म्य-प्राप्ति. ५ संन्यासयोगाचें ज्ञानासह सविस्तर वर्णन, ६ ध्यानयोगाचे सूत्रभूत श्लोक. ]

चवथ्या अध्यायांत 'कर्मण्यकर्म यः पश्येत्०' येथून आरंभ करून 'योग संन्यस्त कर्माणं' ४१. येथपर्यंतच्या वचनांनीं भगवानांनीं सर्व कर्मांचा संन्यास सांगितला आहे, तसेंच परोक्षज्ञानरूपी खड्गानें संशयाचा छेद करून साक्षा-

ध्काराचा उपाय असा जो कर्मयोग त्याचें अनुष्ठान कर, असेंहि शेवटीं सांगितलें आहे. परंतु कर्मानुष्ठान व कर्मसंन्यास यांचा चालणें व उभें राहणें यांप्रमाणें परस्परविरोध आहे. त्यामुळें एकाच पुरुषाला एकाच वेळीं त्यांचें अनुष्ठान करतां येणें शक्य नाहीं. भिन्न कालीं त्यांचें अनुष्ठान करावें असेंहि विधान नाहीं. तेव्हां अर्थातच कर्मसंन्यास व कर्मयोग यांतील कांहीं तरी एकच करणें प्राप्त झालें असतां त्यांतल्या त्यांत जें अधिक प्रशस्त असेल तेंच करावें, असें समजून 'त्यांतील अधिक चांगलें कोणतें ?' हें जाणण्याच्या इच्छेनें अर्जुन म्हणाला—

अर्जुन उवाच—

संन्यासं कर्मणां कृष्ण पुनर्योगं च शंससि ।
यच्छ्रेय एतयोरेकं तन्मे ब्रूहि सुनिश्चितम् ॥ १ ॥

(१)—हे कृष्णा, एकदां तूं कर्मांचा संन्यास सांगतोस व पुनरपि शास्त्रोक्त कर्मांचें अनुष्ठान करावयास सांगतोस, पण त्यांचा परस्परविरोध असल्यामुळें एकाच वेळीं त्यांचें अनुष्ठान करतां येणें शक्य नाहीं. यास्तव, त्यांतील जें एक तुला अत्यंत श्रेयस्कर वाटत असेल, तेंच तूं निश्चयानें सांग.

श्रीभगवानुवाच—

संन्यासः कर्मयोगश्च निःश्रेयसकरावुभौ ।
तयोस्तु कर्मसंन्यासात्कर्मयोगो विशिष्यते ॥ २ ॥

—अर्जुनाच्या या प्रश्नाचा निर्णय करण्यासाठीं भगवान् म्हणाले—अज्ञ मुमुक्षूनें केलेला कर्मांचा परित्याग व त्यानें केलेलें कर्मानुष्ठान हीं दोन्ही साधनें मोक्ष देणारीं आहेत. परंतु त्या दोन साधनांतील अनात्मज्ञाच्या कर्मत्यागाहून त्याचें कर्मानुष्ठान अधिक चांगलें आहे. [ अज्ञ पुरुषाचा कर्मसंन्यास व त्याचेंच कर्मानुष्ठान हीं दोन्ही जरी निःश्रेयसाचीं समबल साधनें आहेत, तरी ज्ञानरहित संन्यासाहून कर्मयोग श्रेष्ठ आहे. कारण कर्मसंन्यासाहून तो सुकर आहे. भगवान् कर्मयोगाची ही स्तुति करीत आहेत व ज्याअर्थीं ते स्तुति करीत आहेत त्याअर्थीं कर्मयोगच अर्जुनाला किंवा त्याच्यासारख्या जिज्ञासूला विहित आहे. ]

ज्ञेयः स नित्यसंन्यासी यो न द्वेष्टि न काङ्क्षति ।
निर्द्वन्द्वो हि महाबाहो सुखं बन्धात्प्रमुच्यते ॥ ३ ॥

( २ ) कर्मानुष्ठान निःश्रेयस्कर करें व संन्यासाहून कर्मयोग श्रेष्ठ कां तें भगवान् सांगतात—जो कोणाचा द्वेष करीत नाहीं व कशाचीहि आकांक्षा करीत नाहीं, तो नित्य संन्यासीच जाणावा. कारण हे महाबाहो, द्वंद्वरहित पुरुष धर्माधर्माख्य बंधापासून अनायासानें सर्वथा मुक्त होतो. [ जो कर्मयोगी सुख व त्याचें साधन यांची आकांक्षा करीत नाहीं व दुःख आणि त्याचें साधन यांचा द्वेष करीत नाहीं, तो नित्य, म्हणजे मी अकर्ता, अभोक्ता, आत्मा आहे, असा साक्षात् अनुभव येण्याच्या पूर्वींहि संन्यासीच आहे, असें सांगितलें आहे. ]

भिन्न भिन्न पुरुषांनींच अनुष्ठान करण्यास योग्य व परस्परविरुद्ध, अशा संन्यासाच्या व कर्मयोगाच्या फलांतहि विरोध असणेंच युक्त आहे. त्या दोहों-नाहि निःश्रेयसकरत्वच असणें युक्त नाहीं, या शंकेचें निरसन—

सांख्ययोगौ पृथग्बालाः प्रवदन्ति न पंडिताः ।
एकमप्यास्थितः सम्यगुभयोर्विन्दते फलम् ॥ ४ ॥

( ३ )—अज्ञ जन सांख्य व योग निरनिराळें फल देणारे आहेत, असें सांगतात. पण पंडित म्ह० तत्त्ववेत्ते तसें सांगत नाहींत. त्या दोहोंतील एका साधनाचाहि उत्तम प्रकारें आश्रय केलेला पुरुष या दोहोंच्या फलास संपादन करतो. [ अर्जुनानें केवल संन्यास म्ह० ज्ञानरहित संन्यास व कर्मयोग यांविष-यींच प्रश्न केला व भगवानांनींहि त्याविषयींच उत्तर दिलें. पण पुढें भगवा-नांनीं संन्यास व कर्मयोग यांचा सर्वथा त्याग न करितां त्यांचा अर्थांतच आपल्याला इष्ट असलेला अधिक अर्थ जोडून सांख्य व योग या शब्दांनीं बोलण्यास आरंभ केला आहे. 'संन्यास' या शब्दाच्या अर्थांत ज्ञान घातलें म्ह० तोच संन्यास सांख्य होतो व कर्मानुष्ठानांत ज्ञानाचा उपाय अशी समत्वबुद्धि, शम, दम, इत्यादिकांची योजना केली कीं, तें कर्मानुष्ठानच योग बनतें. अर्थात् सांख्य व योग हे शब्द संन्यास व कर्मयोग या शब्दांच्या अगदीं विरुद्ध नाहींत. तर सकाम कर्मयोग आणि संन्यास यांच्या फलांमध्यें विरोध आहे. त्यामुळें येथें भगवानांनीं विषयांतर केलेलें नसून त्यांना गीतेंत जें सांगावयाचें आहे, त्याचाच स्पष्ट उल्लेख केला आहे. सांख्य म्ह० आत्मज्ञान व योग म्ह० त्याचा उपाय. दुसऱ्या अध्यायाच्या ३९ व्या श्लोकांत याच अर्थीं सांख्य-योगशब्दांचा उल्लेख केला आहे. ]

यत्सांख्यैः प्राप्यते स्थानं तद्योगैरपि गम्यते ।
एकं साङ्ख्यं च योगं च यः पश्यति स पश्यति ॥ ५ ॥

—सांख्य व योग यांतील एकाचेंहि जरी उत्तम प्रकारें अनुष्ठान केलें तरी दोहोंचें फल कसें प्राप्त होतें तें सांगतात—जें स्थान सांख्यांकडून मिळविलें जातें, तेंच योग्यांनाहि क्रमानें प्राप्त होतें. यास्तव सांख्य—ज्ञानलक्षण संन्यास—ज्ञाननिष्ठा व योग—त्याचा उपाय—निष्काम ईश्वरार्थ कर्मानुष्ठान एकच आहे, असें जो पहातो, तो यथार्थ पहातो—जाणतो. [ ज्ञाननिष्ठ संन्याश्यांना साक्षात् मोक्षसंज्ञक स्थान प्राप्त होतें, हें तर प्रसिद्धच आहे. तेंच स्थान योग्यांनाहि मिळतें. पण तें कसें? साक्षात् नव्हे. तर जे जिज्ञासु सर्व कर्में त्यांच्या फलाची इच्छा न करतां भगवत्प्रसादार्थ चित्तशुद्धीच्या द्वारा ज्ञानप्राप्तीचा उपाय या रूपानें अनुष्ठितात, ते योगी होत. येथील योग हा शब्द योगी या अर्थी आहे. सर्व द्वैतप्रपंच खरा नाहीं. तो मायेचा विलास—मायाकार्य आहे, म्हणून मिथ्या होय. म्ह० त्याला पारमार्थिक सत्ता नाहीं. आत्मा अविक्रिय व एक आहे. त्यामुळें तो सत्य आहे. असें जें ज्ञान तेंच परमार्थज्ञान होय. असा ज्ञानपूर्वक जो संन्यास त्याच्या द्वारा ईश्वरार्थ कर्मानुष्ठान करणारांनाहि तेंच स्थान प्राप्त होतें. त्यामुळें सांख्य व योग यांना एकफलत्व आहे, असें म्हणण्यांत कांहीं विरोध नाहीं. सांख्य व योग यांचें स्वरूप एक नाहीं. योग्यताहि सारखीच नाहीं. पण शेवटीं दोहोंचें फल एकच आहे, म्हणून फलदृष्ट्या त्यांना जो एकच समजतो, तो खरा ज्ञानी होय, असा याचा भावार्थ. ]

'३—५ श्लोकांच्या अर्थाचा विचार केला असतां योग सांख्याच्या—ज्ञानपूर्वक संन्यासाच्या द्वाराच मोक्षाचें साधन होतो, साक्षात् नव्हे, असें स्पष्ट दिसतें. मग 'कर्मयोग श्रेष्ठ असें कसें म्हणतां?' असें विचारशील तर सांगतों—ज्ञानरहित संन्यास व केवल कर्मयोग यांची तुलना केल्यास संन्यास आचरण्यास कठिण व कर्मयोग सुलभ. संन्यासाश्रमांत आश्रमविरुद्ध वर्तन झाल्यास आरूढपतित होण्याची भीति. कर्मयोग्यांना म्ह० गृहस्थांना तशी भीति नाहीं. म्हणून 'कर्मयोग अज्ञकृत संन्यासाहून चांगला' असें म्हटलें आहे. पण ज्ञानयुक्त संन्यास म्ह० सांख्य व तोच परमार्थ—मुख्य योग होय. त्याला उद्देशूनच गीतेला योग किंवा योगशास्त्र असें म्हटलें आहे. तथापि वैदिककर्मयोग त्या परमार्थयोगासाठीं—त्याचें साधन असल्यामुळें त्यालाहि येथें 'योग' व 'संन्यास' असें गौणवृत्तीनें म्हटलें आहे. तसेंच पुढें

१३ व्या अध्यायांतहि 'अमानित्वादि' ज्ञानसाधनांना ज्ञान म्हटलें आहे. ( अ. १३ श्लो. ११ पहा. ) आतां कर्मयोगाला परमार्थयोगाचें साधनत्व कसें तेंच सांगतों—

संन्यासस्तु महाबाहो दुःखमाप्तुमयोगतः ।
योगयुक्तो मुनिर्ब्रह्म न चिरेणाधिगच्छति ॥ ६ ॥

—हे पराक्रमी अर्जुना, पण खरा संन्यास—परमार्थ संन्यास म्ह० सांख्य योगावांचून प्राप्त होणें कठिण आहे. वैदिक कर्मानुष्ठानानें युक्त असलेला व ईश्वराचें मनन करणारा मुनि परमार्थसंन्यासाला लवकरच प्राप्त होतो.

योगयुक्तो विशुद्धात्मा विजितात्मा जितेन्द्रियः ।
सर्वभूतात्मभूतात्मा कुर्वन्नपि न लिप्यते ॥ ७ ॥

—ज्ञानप्राप्तीचा उपाय या रूपानें जेव्हां हा मुमुक्षु नित्य-नैमित्तिक कर्मानुष्ठान करितो, तेव्हां त्याचें चित्त शुद्ध म्ह० रजस्तमोगुणरहित होतें. त्यामुळें त्याचें शरीर व इंद्रियें हीं दोन्ही त्याच्या स्वाधीन रहातात. त्याला 'माझा आत्माच सर्व भूतांचा आत्मा आहे' असें सर्वात्मैक्यदर्शन होतें. अशा ज्ञानामध्यें स्थित असलेल्या त्यानें पुढें लोकसंग्रहासाठीं कर्में जरी केलीं, तरी तीं त्याला बद्ध करीत नाहींत—पुनर्जन्माचीं निमित्तें होऊन रहात नाहींत. [ अर्थात् ज्ञानोत्तर घडणारीं कर्में आभासरूप असल्यामुळें त्यांना 'कर्मयोग' हें नांव देतां येत नाहीं. ] पण हा ज्ञानी वस्तुतः कांहीं करीत नाहीं. म्हणून त्यानें शरीरेंद्रियांचीं स्वाभाविक कर्में करीत असतांनाहि असें चिंतन करावें—

नैव किंचित्करोमीति युक्तो मन्येत तत्त्ववित् ।
पश्यञ्शृण्वन्स्पृशञ्जिघ्रन्नश्नन्गच्छन्स्वपञ्श्वसन् ॥ ८ ॥
प्रलपन्विसृजन्गृह्णन्नुन्मिषन्निमिषन्नपि ।
इन्द्रियाणीन्द्रियार्थेषु वर्तन्त इति धारयन् ॥ ९ ॥

—तत्त्वज्ञ डोळ्यांनीं पहात असतांना, कानांनीं ऐकत असतांना, त्वगिंद्रियानें स्पर्श करीत असतांना, घ्राणेंद्रियानें वास घेत असतांना, जिभेनें चाटीत असतांना, पायांनीं चालत असतांना, मन लीन झाल्यामुळें झोंप घेत असतांना तसेंच श्वासोच्छ्वास करतांना व वागिंद्रियानें बोलतांना, पायु-इंद्रियानें मलत्याग करतांना, हातांनीं ग्रहण करतांना व पापण्यांनीं नेत्रांची उघड-झांप करीत असतांनाहि इंद्रियें आपापल्या विषयांमध्यें प्रवृत्त होत आहेत, मी प्रत्यगात्मा

त्या क्रिया करीत नाहीं, असें मनांत दृढ धरून—असें समजून कोणतीहि क्रिया मी स्वतः करीत नाहींच, असें आत्म्यामध्यें चित्ताला स्थिर ठेवून चिंतन करावें. [ तत्त्वज्ञानें शरीरेंद्रियांचीं हीं स्वाभाविक कर्मेंहि माझीं नव्हेत, असें सतत अनुसंधान ठेवावें. ]

ब्रह्मण्याधाय कर्माणि सङ्गं त्यक्त्वा करोति यः ।
लिप्यते न स पापेन पद्मपत्रमिवाम्भसा ॥ १० ॥

—पण याच्या उलट जो तत्त्ववेत्ता नसतो, तो शास्त्रीय कर्में ब्रह्मामध्यें—ईश्वरामध्यें समर्पण करून व फलाची आसक्ति सोडून करतो. त्यामुळें जलानें कमलाचें पान किंवा पाकळी जशी लिप्त होत नाहीं, त्याप्रमाणें तो पापानें लिप्त होत नाहीं. [ सर्व विहित कर्में ईश्वरार्पण करून मोक्षफलाचीहि इच्छा न करतां जो अनात्मज्ञ तीं आचरितो, त्याला तीं धर्माधर्मानें बद्ध करीत नाहींत; तर अविद्वानाच्या त्या कर्मांचें केवल सत्त्वशुद्धि एवढेंच फल आहे. ]

कायेन मनसा बुद्ध्या केवलैरिन्द्रियैरपि ।
योगिनः कर्म कुर्वन्ति सङ्गं त्यक्त्वात्मशुद्धये ॥ ११ ॥

( ४ )—कर्माधिकारी पुरुष केवल शरीरानें, केवल मनानें, केवल बुद्धीनें व केवल इंद्रियांनींहि फलाविषयींचीहि आसक्ति सोडून चित्तशुद्धीसाठीं नित्य व नैमित्तिक कर्में करितात. [ कर्माधिकारी मुमुक्षु ममतारहित शरीरेंद्रियांनीं फलासक्ति सोडून चित्तशुद्धीसाठीं नियतकर्में करितात. म्हणून तूंहि चित्तशुद्धी-साठीं कर्मच कर. ]

युक्तः कर्मफलं त्यक्त्वा शान्तिमाप्नोति नैष्ठिकीम् ।
अयुक्तः कामकारेण फले सक्तो निबध्यते ॥ १२ ॥

—हीं कर्में ईश्वरासाठीं आहेत, असें समजून मनांत शांत असलेला मुमुक्षु कर्मफलांचा त्याग करून ज्ञानद्वारा नैष्ठिक-मोक्षाख्य शांतीला प्राप्त होतो. म्हणून तुला फलासक्ति सोडून कर्मेंच करणें उचित आहे. पण याच्या उलट जो अविद्वान् पुरुष मनांत अशान्त असतो, तो कामानें प्रेरित झाल्यामुळें—काम-किंकर झाल्यामुळें फलामध्यें आसक्त होऊन धर्माधर्माख्य बंधानें अत्यंत बद्ध होतो. [ ईश्वरार्थ हीं कर्में आहेत, माझ्या फलासाठीं नाहींत, अशाप्रकारें शांतचित्तानें कर्में करणारा कर्मफलाचा त्याग करून नैष्ठिकी म्ह० चित्तशुद्धि, ज्ञानप्राप्ति, सर्वकर्मसंन्यास व ज्ञाननिष्ठा या क्रमानें नैष्ठिकी शांतीला प्राप्त

होतो. पण याच्या उलट अयुक्त–अशांत असतो तो कामाकडून प्रेरित झाल्या-मुळें ' मला फल मिळावें म्हणून मी हें कर्म करतों ' अशाप्रकारें फलांत आसक्त होऊन पूर्णपणें बद्ध होतो. याप्रमाणें असमाधानांत मोठा दोष असल्यामुळें तूं समाहितचित्त हो. ]

सर्वकर्माणि मनसा संन्यस्यास्ते सुखं वशी ।
नवद्वारे पुरे देही नैव कुर्वन्न कारयन् ॥ १३ ॥

( ५ ) —पण जो परमार्थदर्शी असतो तो जितेंद्रिय मुमुक्षु विवेकबुद्धीनें सर्व कर्में सोडून नऊ द्वारांनीं युक्त अशा पुरांत–शरीरांत स्वतः कांहीं एक न करीत व दुसऱ्याकडून कांहीं न करवीत सुखानें रहातो.

न कर्तृत्वं न कर्माणि लोकस्य सृजति प्रभुः ।
न कर्मफलसंयोगं स्वभावस्तु प्रवर्तते ॥ १४ ॥

—' मुमुक्षु आत्म्याला कर्तृत्व व कारयितृत्व नाहीं ' असें जें वर म्हटलें आहे, त्याचाच अधिक विस्तार—आत्मा लोकांचें कर्तृत्व–' तूं अमुक कर ' असें म्हणून निर्मित नाहीं. कर्त्याला अत्यंत इष्ट असलेले कर्मभूत रथादि पदार्थहि उत्पन्न करीत नाहीं आणि रथादि पदार्थ करणाऱ्या कर्त्याला त्याच्या फलांशीं संयुक्त करीत नाहीं. ' तर मग हें सर्व कोण करतो व करवितो ' म्हणून विचारशील तर सांगतों—अविद्यारूप माया–प्रकृति प्रवृत्त होते. [ आत्मा देहादिकांचा स्वामी असल्यामुळें त्याला ' प्रभु ' असें म्हटलें आहे. तो कोणा-लाहि ' तूं हें कर्म कर ' अशी प्रेरणा करून त्याचें कर्तृत्व उत्पन्न करीत नाहीं. म्ह० करविता–कर्त्याचा प्रयोजक होत नाहीं. व्याकरणांत कर्त्याला प्राप्त करून घेण्यास अत्यंत इष्ट असलेल्या पदार्थास ' कर्म ' म्हणतात. यास्तव आत्मा रथ, घट, राजवाडा, इत्यादि कर्त्याला ईप्सिततम असलेले पदार्थहि तो उत्पन्न करीत नाहीं. रथादि पदार्थ करणाराला त्याचें फल देऊन त्याच्याशीं संबद्ध करीत नाहीं. म्ह० तो भोजयिता–फलभोग देवविणाराहि नाहीं. तर अविद्या नांवाची माया म्हणजेच येथील स्वभाव होय. ती परमेश्वराची अचिंत्य शक्तिच म्ह० मायाच सर्व करते व करविते. ]

नादत्ते कस्यचित्पापं न चैव सुकृतं विभुः ।
अज्ञानेनावृतं ज्ञानं तेन मुह्यन्ति जन्तवः ॥ १५ ॥

—पण परमार्थदृष्ट्या पाहिल्यास तो विभु—आत्मा कोणा भक्ताचेंहि पाप घेत नाहीं व भक्तानें अर्पण केलेलें पुण्यहि घेत नाहीं, असें तूं निश्चयानें जाण. तर मग भक्ताकडून पूजादिरूप व याग, दान, होम इत्यादि पुण्याचरण त्याला कशासाठीं अर्पण केलें जातें, तें भगवान् सांगतात—अज्ञानानें ज्ञानाला म्ह० विवेकविज्ञानाला आच्छादित केलें आहे. त्यामुळें अविवेकी—संसारी जीव मोहित होतात. [ म्ह० मी करतों—करवितों, भोग घेतों—घेववितों, अशा मोहाला प्राप्त होतात. ]

ज्ञानेन तु तदज्ञानं येषां नाशितमात्मनः ।
तेषामादित्यवज्ज्ञानं प्रकाशयति तत्परम् ॥ १६ ॥

—पण सर्वांचेंच ज्ञान अनादि अज्ञानानें जरी आच्छादित झालेलें असलें, तरी ज्ञानानें त्याचा नाश होऊन संसारनिवृत्ति संभवते, कारण ज्यांचें तें आत्मविषयक अज्ञान आत्म्याच्या ज्ञानानें नष्ट केलें आहे, त्यांचें तें ज्ञान सूर्याप्रमाणें परमात्म्याला प्रकाशित करितें. [ ज्याप्रमाणें सूर्य सर्व रूपजाताला प्रकाशित करितो, त्याप्रमाणें ज्ञानानें ज्याचें अज्ञान नष्ट केलें आहे, त्याचें तें ज्ञान त्या परमार्थतत्त्वाला प्रकाशित करतें. ]

तद्बुद्धयस्तदात्मानस्तन्निष्ठास्तत्परायणाः ।
गच्छन्त्यपुनरावृत्तिं ज्ञाननिर्धूतकल्मषाः ॥ १७ ॥

—विद्वान् व विविदिषु—जिज्ञासु यांच्यासाठीं ज्ञानपरिपाकाचीं अंतरंग साधनें सांगावीं, म्हणून भगवान् म्हणतात—परमार्थ तत्त्वामध्यें ज्यांची बुद्धि आहे,—जे तद्रूप झालेले आहेत, त्यांतच ज्यांची निष्ठा आहे, हें तत्त्व हीच ज्यांची परागति आहे, ते ज्ञाननिर्धूतकल्मष होत्साते पुनर्जन्मरहितत्वास—मोक्षास प्राप्त होतात. [ ज्ञानानें ज्यांचें आत्मविषयक अज्ञान नाहींसें झालें आहे व त्या ज्ञानानेंच ज्यांचा संसाराला कारण होणारा पापादि दोष नाहींसा झाला आहे, ते ज्ञानी—संन्यासी मुक्त होतात. ]

विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि ।
शुनि चैव श्वपाके च पण्डिताः समदर्शिनः ॥ १८ ॥

—ते तत्त्ववेत्ते—पंडित तत्त्व कसें पहातात, तेंच सोदाहरण सांगतात—विद्या व विनय यांनीं संपन्न असलेल्या ब्राह्मणाचे ठिकाणीं, गायीमध्यें किंवा बैलामध्यें, हत्तीमध्यें, कुत्र्यामध्यें व चांडाळामध्यें ब्रह्मज्ञानी—ब्रह्मनिष्ठ सम-

ब्रह्म पहाणारे असतात. [ सत्त्वादि गुणांनीं व सत्त्वगुणांपासून झालेल्या संस्कारांनीं, त्याचप्रमाणें राजस संस्कारांनीं व तामस संस्कारांनीं अत्यंत अस्पृष्ट म्ह० सत्त्वादि गुणांचा व त्यांच्या संस्कारांचा ज्याला मुळींच स्पर्शहि झालेला नाहीं, असें सम, एक व अविक्रिय ब्रह्म पहाण्याचें ज्यांचें शील आहे, ते पंडित समदर्शी होत. पूर्वोक्त ब्राह्मणादि सर्वांमध्यें एक, निर्विकार समब्रह्म पहाणें हेंच पांडित्य होय. ]

इहैव तैर्जितः सर्गो येषां साम्ये स्थितं मनः ।
निर्दोषं हि समं ब्रह्म तस्माद्ब्रह्मणि ते स्थिताः ॥ १९ ॥

—ज्यांचें अंतःकरण सर्व भूतांतील साम्यामध्यें स्थित असतें, त्यांनीं या शरीरांत असतांनाच–जिवंतपणींच पुढील जन्म जिंकला आहे. कारण अक्षर आत्मतत्त्व सर्व दोषशून्य व सर्वत्र सम आहे. म्हणून ते सर्व ज्ञानी ब्रह्मामध्यें स्थित आहेत.

न प्रहृष्येत्प्रियं प्राप्य नोद्विजेत्प्राप्य चाप्रियम् ।
स्थिरबुद्धिरसंमूढो ब्रह्मविद्ब्रह्मणि स्थितः ॥ २० ॥

—ज्याअर्थी निर्दोष व समब्रह्म आत्मा आहे, त्याअर्थी इष्ट वस्तूला किंवा परिस्थितीला प्राप्त होऊन अतिशय हृष्ट होऊं नये आणि तसेंच अनिष्ट वस्तूला किंवा अवस्थेला प्राप्त होऊन उद्विग्न होऊं नये. तर ज्याची बुद्धि स्थिर आहे; ब्रह्म निर्दोष व सम आहे, याविषयीं ज्याला संशय नाहीं; त्यामुळें ज्याला संमोह झालेला नाहीं, असें त्यानें व्हावें. असा ब्रह्मवेत्ता ब्रह्मामध्यें अवस्थित असतो. [ आत्मा एक सम व निर्दोष आहे, अशी आपली बुद्धि दृढ करून विवेकसंपन्न व्हावें. तोच ब्रह्मनिष्ठ सर्वकर्मसंन्यासी होय. ]

बाह्यस्पर्शेष्वसक्तात्मा विन्दत्यात्मनि यत्सुखम् ।
स ब्रह्मयोगयुक्तात्मा सुखमक्षय्यमश्नुते ॥ २१ ॥

—शिवाय ब्रह्मामध्यें स्थित झालेला ब्रह्मवित् वर सांगितलेल्या प्रकारें केवळ हर्ष-विषादरहित होतो, एवढेंच नव्हे, तर शब्दादि बाह्य विषयांमध्यें ज्याचें अन्तःकरण सक्त–आसक्त झालेलें नसतें, तो प्रत्यगात्म्यामध्यें जें स्वरूपभूत सुख असतें, तें अनुभवितो. ब्रह्मामध्यें तो योग म्हणजे चित्ताची स्थिरता–चित्तसमाधान, त्यानें ज्याचें चित्त युक्त आहे, असा तो क्षय न पावणारें–नित्य सुख अनुभवितो. [ विषयासक्ति हेंच आत्मस्वरूपसुखाचें आवरण आहे. त्यामुळें

विषयासक्तिरूप आवरण जसें जसें दूर होऊं लागतें, तसें तसें आत्मस्वरूपसुख अभिव्यक्त होऊं लागतें. असक्तात्मा केवल शमामुळेंच सुखानुभव घेतो, असें नाहीं. तर ब्रह्मसमाधीच्या योगानें, ज्याचें अंतःकरण समाहित—शांत झालें आहे, तो अनंत सुखाचा अनुभव घेतो. म्हणून अनंत सुखाची इच्छा करणाऱ्या साधकानें मोठ्या प्रयत्नानें इंद्रियांना विषयविमुख करावें. ]

ये हि संस्पर्शजा भोगा दुःखयोनय एव ते ।
आद्यन्तवन्तः कौन्तेय न तेषु रमते बुधः ॥ २२ ॥

—इंद्रियें व विषय यांच्या संबंधापासून होणारे जे भोग—सुखानुभव ते सर्व दुःखाचीं बीजेंच आहेत. तसेंच ते उत्पत्ति व नाश यांनीं युक्त आहेत. हे अर्जुना, तत्त्वज्ञ पंडित त्या विषयांमध्यें रममाण होत नाहींत.

शक्नोतीहैव यः सोढुं प्राक्शरीरविमोक्षणात् ।
कामक्रोधोद्भवं वेगं स युक्तः स सुखी नरः ॥ २३ ॥

—अर्जुना, जो पुरुष जिवंतपणींच—शरीराचा नाश होईपर्यंत काम-क्रोध यांपासून उत्पन्न होणारा वेग सहन करण्यास समर्थ होतो, तोच योगी व या लोकीं खरा सुखी पुरुष होय. अर्थात् कर्मयोग्यामध्यें काम-क्रोधोद्भव वेग मरेपर्यंत सहन करण्याचें सामर्थ्य संभवत नसल्यामुळें हें ज्ञानयोगी सांख्याचेंच वर्णन आहे. [ काम-क्रोधोद्भववेग हा श्रेयोमार्गाचा प्रतिपक्षी, सर्व अनर्थांचें निमित्त, अतिशय कष्टकर व दुर्निवार्य असा एक दोष आहे. यास्तव त्याच्या निवारणासाठीं शरीरपात होईतों सांख्य—ज्ञानयोग्यानेंहि यत्न करावा, असा याचा भावार्थ. ]

योऽन्तःसुखोऽन्तरारामस्तथान्तर्ज्योतिरेव यः ।
स योगी ब्रह्मनिर्वाणं ब्रह्मभूतोऽधिगच्छति ॥ २४ ॥

—अर्जुना, अन्तरात्म्यामध्येंच ज्याचें सुख आहे व आत्म्यामध्येंच ज्याचा आराम—आक्रीडा—करमणूक आहे, त्याचप्रमाणें जो आत्मा हीच ज्याची ज्योति—प्रकाश आहे, तो आत्मनिष्ठ ब्रह्मरूप होऊन ब्रह्मामध्यें निर्वाणास प्राप्त होतो. [ सुखासाठीं बाह्यविषयांची अपेक्षा न करणें, हेंच अन्तःसुखत्व आहे. करमणूक, क्रीडा यांसाठीं बाह्य स्त्री, मित्र इत्यादिकांची अपेक्षा नसणें, त्यावांचूनच आंतल्याआंत क्रीडेचें फल प्राप्त होणें, हें अन्तरारामत्व आहे. इंद्रियादिकांपासून होणाऱ्या विषयप्रकाशाची अपेक्षा नसणें, विषयज्ञानराहित्य

हेंच अन्तर्ज्योतिष्ठ आहे. अशा विशेषणांनीं संपन्न असलेला समाहित पुरुष जिवंत असतांनाच ब्रह्मभावास प्राप्त होतो. म्ह० परिपूर्ण शांतीला प्राप्त होतो.]

लभन्ते ब्रह्मनिर्वाणमृषयः क्षीणकल्मषाः ।
छिन्नद्वैधा यतात्मानः सर्वभूतहिते रताः ॥ २५ ॥

—ज्यांचे पापादि दोष क्षीण झाले आहेत, ज्यांचे सर्व संशय तुटले आहेत, ज्यांनीं इंद्रियांचें नियमन केलें आहे व जे सर्व प्राण्यांच्या हितामध्यें रत आहेत, असे ज्ञानी—तत्ववेत्ते—संन्याशी ब्रह्मामध्यें निर्वाण पावतात.

कामक्रोधवियुक्तानां यतीनां यतचेतसाम् ।
अभितो ब्रह्मनिर्वाणं वर्तते विदितात्मनाम् ॥ २६ ॥

—काम व क्रोध यांनीं रहित असलेल्या, चित्ताचें संयमन केलेल्या, आत्म्याला साक्षात् जाणलेल्या संन्याश्यांचा मोक्ष जिवंतपणीं व मेल्यावरहि असतो. [ या श्लोकांत ' यतीनाम् ' असें प्रत्यक्ष पद आहे, त्यावरून हे सर्व धर्म कर्मयोग्याचे आहेत, असें म्हणतांच येत नाहीं. काम-क्रोधरहित, चित्ताचें नियमन केलेल्या, आत्मज्ञानी संन्याश्यांनाच जीवन्मुक्तीचा लाभ होतो. स्वर्गादि फलाप्रमाणें त्यांना मोक्षहि मेल्यावर मिळतो असें नाहीं, तर त्यांना जिवंतपणींच सद्योमुक्ति प्राप्त होते. त्यांचें मोक्ष हें ज्ञानफल कर्मफलाप्रमाणें परोक्ष नसतें, तर प्रत्यक्ष असतें. ]

आत्मज्ञाननिष्ठ संन्याश्यांची जीवन्मुक्ति सांगितली व ब्रह्मार्पण करून अनुष्ठिला जाणारा कर्मयोग चित्तशुद्धि, ज्ञानप्राप्ति व सर्वकर्मसंन्यास या क्रमानें मोक्षाला कारण होतो, असें भगवानांनीं पदोपदीं सांगितलें आहे व पुढेंहि सांगतील. आतां सम्यग्दर्शनाचा अंतरंगसाधन असा जो ध्यानयोग पुढें सांगावयाचा आहे, त्याचे सूत्रस्थानीय श्लोक येथें सांगतात—

स्पर्शान्कृत्वा बहिर्बाह्यांश्चक्षुश्चैवान्तरे भ्रुवोः ।
प्राणापानौ समौ कृत्वा नासाभ्यन्तरचारिणौ ॥ २७ ॥
यतेन्द्रियमनोबुद्धिर्मुनिर्मोक्षपरायणः ।
विगतेच्छाभयक्रोधो यः सदा मुक्त एव सः ॥ २८ ॥

( ६ )—अर्जुना, जो मुनि—संन्यासी विषयोन्मुखता सोडून, विक्षेपाच परिहार करण्यासाठीं चक्षूहि भुवयांच्या मध्यभागीं स्थिर करून, नागपुड्या व कंठादि आंतील स्थान यांत संचार करण्याचें ज्यांचें शील आहे, अशा प्राणा-

पानांना सम करून—कुंभकाच्या योगानें त्यांचा निरोध करून म्ह० सर्व इंद्रि-यांचें संयमन करून व प्राणायामपरायण होऊन, इंद्रियें, मन व बुद्धि यांचें नियमन करून केवल मोक्षाचीच अपेक्षा करणारा असा मननशील होतो, तो सदा मुक्तच आहे. त्याला कांहीं कर्तव्य उरत नाहीं.

भोक्तारं यज्ञतपसां सर्वलोकमहेश्वरम् ।
सुहृदं सर्वभूतानां ज्ञात्वा मां शान्तिमृच्छति ॥ २९ ॥

—यज्ञ व तपश्चर्या यांचा कर्ता व देवतारूपानें भोक्ता, सर्व लोकांचा महान् ईश्वर, सर्व भूतांवर निरपेक्ष उपकार करणारा, अशा मला जाणून पुरुष सर्व संसारशांतीस प्राप्त होतो. [याप्रमाणें या अध्यायांत अमुख्य संन्यासापेक्षां कर्म-योग श्रेष्ठ असला तरी मुख्य संन्यास कर्माहून श्रेष्ठ असल्यामुळें चित्तशुद्धीनें युक्त असलेल्या, काम-क्रोधांचा वेग मरेपर्यंत सहन करण्यास समर्थ असलेल्या शम-दमादिसंपन्न, योगाधिकारी, 'त्वं'पदाचा अर्थ जाणणाऱ्या व परमात्माच माझा प्रत्यगात्मा आहे, असें समजणाऱ्या मुख्य संन्याश्यालाच मुक्ति प्राप्त होते, हें सिद्ध झालें.]

( येथें भगवद्गीतेचा 'संन्यासयोग' नांवाचा पांचवा अध्याय समाप्त झाला. ) ६. ३. २९.

## अध्याय ३० वा.

### ( गीताध्याय ६ वा. ध्यानयोग. )

[ १ निष्काम कर्मयोग्याची संन्यासत्वानें व योगित्वानें प्रशंसा. २ कर्म व शम यांची मर्यादा. ३ आत्मोद्धार करावा असा सकारण उपदेश. ४ ध्यानयोगाचीं अंतरंग-बहिरंग साधनें. ५ ध्यानयोगाचें लक्षण व फल. ६ मनोनिग्रहाच्या अशक्यतेविषयीं अर्जुनाचा प्रश्न. ७ 'उपायानें तो शक्य आहे' असें भगवानांचें उत्तर. ८ योगभ्रष्टाविषयीं अर्जुनाचा प्रश्न व भगवानांचें उत्तर. ]

पांचव्या अध्यायाच्या शेवटीं आत्मसाक्षात्काराचें अंतरंग साधन असा जो ध्यानयोग, त्याचे 'स्पर्शान्कृत्वा' इत्यादि सूत्रभूत श्लोक उपदेशिले. आतां त्या श्लोकांच्या विवरणस्थानीं असलेला हा सहावा अध्याय आरंभिला जातो. ध्यानयोगाचें बहिरंग कर्म आहे, म्हणून ध्यानयोगावर आरोहण कर-ण्यास समर्थ होईतों कर्माधिकारी गृहस्थानें कर्म करावें, असें विधान आहे. म्हणून भगवान् अगोदर त्याची स्तुति करितात—

श्रीभगवानुवाच—

**अनाश्रितः कर्मफलं कार्यं कर्म करोति यः ।**
**स संन्यासी च योगी च न निरग्निर्न चाक्रियः ॥ १ ॥**

( १ ) **श्रीभगवान्** म्हणाले—कर्माच्या फलाचा आश्रय न केलेला जो गृहस्थ अवश्य कर्तव्य कर्म म्ह० नियत कर्म–नित्य अग्निहोत्रादि कर्म करतो, तो संन्यासी व योगी आहे. केवल अग्निरहित व क्रियारहित पुरुषच संन्यासी आहे असें नाहीं. [ ज्यानें श्रौत-स्मार्त अग्नींचा त्याग केला आहे व त्यामुळें अग्निसाध्य क्रिया सोडल्या आहेत, तसेंच तप, दान इत्यादि अग्निसाध्य नसलेल्या क्रियांचाहि त्याग केला आहे. म्ह० ज्यानें यज्ञ, दान, तपोरूप कर्म सोडलें आहे, तोच तेवढा संन्यासी व योगी असें समजूं नये. तर जो कर्मफलाचा अभिलाष न धरतां अग्निहोत्रादिक नित्य कर्तव्यकर्म करतो, तोहि गौण संन्यासीच आहे, असें समजावें. ]

'श्रुत्यादिकांत ज्यानें अग्नींचा व दानादिकांचा यथाशास्त्र त्याग केला आहे, त्यालाच संन्यासित्व व योगित्व सांगितलें आहे. असें असतांना येथें साग्नि म्ह० अग्निहोत्रादिक अग्निसाध्य क्रिया करणारा आणि सक्रिय म्ह० दानादि अनग्निसाध्य क्रिया करणारा जो गृहस्थ, त्याला श्रुत्यादिकांत प्रसिद्ध नसलेले संन्यासित्व व योगित्व आहे, असें तुम्ही कसें सांगतां ! ' असा प्रश्न अर्जुन करील म्हणून **भगवान्** सांगतात—अर्जुना, गृहस्थाचें संन्यासित्व व योगित्व मुख्यवृत्तीनें कधींच संभवत नाहीं, म्हणून मज भगवानाला गौणवृत्तीनें त्याच्या ठिकाणीं तीं दोन्ही संपादन करावयाचीं आहेत. त्यामुळें पूर्वोक्त दोष येत नाहीं. कर्मफलाविषयींचा संकल्प टाकल्यानें—कर्मफलसंकल्पाचा संन्यास केल्यानें गृहस्थाला संन्यासित्व आहे व योगाचें अंग–साधन यारूपानें कर्माचें अनुष्ठान केल्यामुळें किंवा चित्ताच्या विक्षेपाला कारण होणाऱ्या कर्मफलाविषयींच्या संकल्पाचा त्याग केल्यामुळें त्याला योगित्व आहे. याप्रमाणें गृहस्थाचें हें संन्यासित्व व योगित्वहि गौण आहे, 'पण मुख्य संन्यासित्वादि संभवत असतांना येथें गौणसंन्यासित्वादि कां घ्यावयाचें ?' म्हणून म्हणशील—तर कर्मी गृहस्थाच्या ठिकाणीं मुख्य संन्यासित्व व योगित्व शक्य नाहीं. म्हणून त्याच्या कर्मफलाची स्तुति सिद्ध होण्यासाठीं येथील संन्यासित्वादिक गौणच मानणें इष्ट आहे. 'अहो पण, चित्ताच्या व्याकुलतेला कारण होणाऱ्या कामनेचा

त्याग केल्यामुळें चित्ताच्या समाधानादिकांची सिद्धि होते व त्यामुळें कर्मी गृहस्थाच्याहि योगित्वाची सिद्धि होते, हें म्हणणें मान्य आहे. पण त्याला संन्यासी म्हणणें मात्र अयोग्य आहे,' असें म्हणशील, तर सांगतों—

यं संन्यासमिति प्राहुर्योगं तं विद्धि पांडव।
न ह्यसंन्यस्तसंकल्पो योगी भवति कश्चन ॥ २ ॥

—हे अर्जुना, श्रुति-स्मृतिवेत्ते ज्याला संन्यास असें म्हणतात, त्यालाच तूं योग समज. कारण ज्यानें संकल्प टाकलेला नाहीं, असा कोणीहि योगी होत नाहीं. [ खरा संन्यासी काय करतो, तर सर्व कर्में व त्यांचीं साधनें सोडतो. त्यामुळें सर्व प्रकारच्या प्रवृत्तीचें कारण, असा जो काम व त्याचें कारण संकल्प यांचा त्याग करतो. संकल्पाचा त्याग केला असतां त्याचें कार्य—काम सुटतो, कामाच्या अभावीं त्याच्या प्रवृत्तीचा त्याग सिद्ध होतो. संन्यासी सर्व कर्में, त्यांचीं साधनें, त्यांचीं फलें व त्यांविषयींचा संकल्प यांचा त्याग करितो. हा कर्मयोगीहि कर्म करीत असतांनाच त्याच्या फलाविषयींचा संकल्प टाकतो. कारण ज्यानें फलाविषयींचा संकल्प—आशय टाकलेला नाहीं, असा कोणीहि कर्मी—गृहस्थ, योगी—समाधानयुक्त होत नाहीं. ज्यानें कर्माच्या फला-विषयींचा अभिलाष सोडलेला नाहीं, असा कोणीच योगी होऊं शकत नाहीं. उलट ज्या कर्मठ गृहस्थानें फलांविषयींच्या संकल्पाचा त्याग केलेला असतो, तोच योगी—चित्तसमाधानानें युक्त होऊं शकतो. याप्रमाणें परमार्थ संन्यास व कर्मयोग यांचें कर्त्याच्या द्वारा असलेलें संन्यासाचें सादृश्य घेऊन त्याच्या अपेक्षेनें 'ज्याला संन्यास म्हणतात तोच तूं योग समज' या वाक्यानें येथें कर्मयोगाच्या स्तुतीसाठीं कर्मयोग्याला संन्यासित्व सांगितलें आहे. ]

फलाची अपेक्षा न करतां आचरिलेला कर्मयोग हें ध्यानयोगाचें बहिरंग-साधन आहे. म्हणून त्या कर्मयोगाची संन्यासत्वानें स्तुति करून आतां कर्म-योगाला ध्यानयोगाचें साधनत्व आहे, असें भगवान् दाखवितात—

आरुरुक्षोर्मुनेर्योगं कर्म कारणमुच्यते।
योगारूढस्य तस्यैव शमः कारणमुच्यते ॥ ३ ॥

( २ )—ध्यानयोगावर आरूढ होण्याची इच्छा करणाऱ्या मुमुक्षु गृहस्थाला 'फलनिरपेक्ष कर्मानुष्ठान' हें साधन सांगितलें आहे. पण तोच 'मुमुक्षु'—गृहस्थ कर्माभ्यासानें योगारूढ झाला असतां त्याला उपशम—सर्व कर्मांपासून

उपरम पावणें हें साधन सांगितलें आहे. [ ध्यानयोगावर आरूढ होण्याची इच्छा करणाऱ्या मुमुक्षु गृहस्थानें आरूढ होईपर्यंत कर्म करावें आणि कर्मानुष्ठानानें ध्यानयोगावर आरूढ होण्याची, म्हणजे निर्विघ्नपणें ध्यान करण्याची योग्यता आली म्हणजे त्या योगारूढ गृहस्थानेंच शम करावा. सर्व कर्मांपासून निवृत्त व्हावें. योगारूढाला मुख्य योग प्राप्त होण्याचें कर्मनिवृत्ति हेंच एक साधन आहे. साधक जों जों कर्मांपासून उपरम पावतो, तों तों आयासरहित व जितेंद्रिय झालेल्या त्याचें चित्त समाहित होतें आणि तो सत्वर प्राप्तयोग होतो. ध्यान करण्याचें सामर्थ्य येईपर्यंत निष्काम कर्मानुष्ठान व तें आल्यावर कर्मत्याग, ही कर्मानुष्ठानाची व कर्मत्यागाची मर्यादा फार महत्वाची आहे.

यदा हि नेन्द्रियार्थेषु न कर्मस्वनुषज्जते ।
सर्वसंकल्पसंन्यासी योगारूढस्तदोच्यते ॥ ४ ॥

—अर्जुना, जेव्हां योगी विषयांमध्यें व नित्य-नैमित्तिकादि कर्मांमध्यें आसक्त होत नाहीं व सर्व संकल्पांचा संन्यास करतो, तेव्हां तो योगारूढ म्हटला जातो. [ जेव्हां तो 'पुरुष विषय मला अवश्य भोगले पाहिजेत व हीं कर्में मला अवश्य केलीं पाहिजेत,' अशी वृत्ति ठेवीत नाहीं; ऐहिक व पारलौकिक विषयां-विषयींचे सर्व संकल्प सोडतो; किंबहुना तशी वृत्ति न धरणें व संकल्प सोडणें हा त्याचा स्वभावच झालेला असतो, तेव्हां तो योगारूढ म्हटला जातो. संक-ल्पाचाच त्याग केल्यावर विषय व कर्म यांचा त्याग अनायासानें होतो. कारण मूळच उपटून टाकल्यावर त्याच्या कार्याची निवृत्ति होण्यासाठीं निराळा यत्न करावा लागत नाहीं. ]

उद्धरेदात्मनात्मानं नात्मानमवसादयेत् ।
आत्मैव ह्यात्मनो बन्धुरात्मैव रिपुरात्मनः ॥ ५ ॥

( ३ )—याप्रमाणें योगारूढ होणें हाच 'आत्मोद्धार–संसारोद्धार' असल्यामुळें आत्म्यानें–आत्म्याच्याच योगानें आत्म्याला संसारसागरांतून वर काढावें. त्याला अधोगतीस पोंचवूं नये. कारण स्वतः आत्माच आत्म्याचा बंधु आहे व तोच त्याचा रिपु आहे. [ संसारसागरांत बुडालेल्या आत्म्याला आत्म्यानेंच वर काढणें म्हणजे त्याला योगारूढ करणें होय. आत्म्याला योगा-रूढ करणें, हाच त्याचा संसारसागरांतून उद्धार आहे. आत्माच आत्म्याचा बंधु

आहे. संसारसागरांतून मुक्त करील असा त्याचा दुसरा कोणीहि बंधु नाहीं. उलट पुत्र-मित्र-कलत्र वगैरे स्नेहादि बंधनांचीं स्थानें आहेत. तसेंच, स्वतः आत्माच आत्म्याचा शत्रु आहे. ]

बन्धुरात्मात्मनस्तस्य येनात्मैवात्मना जितः ।
अनात्मनस्तु शत्रुत्वे वर्तेतात्मैव शत्रुवत् ॥ ६ ॥

—ज्या पुरुषानें शरीरेंद्रियसंघाताला आपल्या स्वाधीन ठेविलें आहे, तो जितेंद्रिय आत्मा त्या आत्म्याचा बंधु आहे. पण ज्यानें शरीरेंद्रियसंघाताला आपल्या स्वाधीन ठेवलेलें नसतें, त्या अनात्म्याचा आत्माच शत्रूप्रमाणें शत्रुत्व करण्यांत तत्पर रहातो. [ कारण ज्यानें शरीरेंद्रियांना आपल्या स्वाधीन ठेविलें आहे, त्याच्या चित्तांत विक्षेपाचा अभाव असतो. त्यामुळें त्याच्या चित्ताचें समाधान संभवतें. म्हणून तो आत्म्याचा बंधु म्ह० हितकर्ता होतो. पण ज्यानें शरीरेंद्रियसंघाताला आपल्या स्वाधीन ठेवलेलें नसतें, त्याच्या चित्तांत पुनः विक्षेप होतो. त्यामुळें आत्म्यामध्यें चित्ताचें समाधान संभवत नाहीं. म्हणून अजितेंद्रिय आत्मा हाच आत्म्याचा शत्रु आहे. कारण तो प्रसिद्ध बाह्यशत्रूप्रमाणें आपल्यालाच अपकार करतो. ]

जितात्मनः प्रशान्तस्य परमात्मा समाहितः ।
शीतोष्णसुखदुःखेषु तथा मानापमानयोः ॥ ७ ॥

—ज्यानें शरीरेंद्रियसंघाताला जिंकलें आहे, त्याचा आत्माच बंधु कसा, तें सांगतों—ज्यानें शरीरादिसंघाताला जिंकलें आहे व त्यामुळें ज्याचें अंतःकरण अत्यंत प्रसन्न झालें आहे, अशा परमार्थसंन्यासाचा साक्षि-चिद्रूप आत्मा साक्षात् आत्मभावानें रहातो. त्याचप्रमाणें शीत-उष्ण, सुख-दुःख, मानापमान, इत्यादि प्रसंगीं तो सम असतो.

ज्ञानविज्ञानतृप्तात्मा कूटस्थो विजितेन्द्रियः ।
युक्त इत्युच्यते योगी समलोष्टाश्मकाञ्चनः ॥ ८ ॥

( ४ )—शास्त्रोक्त पदार्थांच्या अर्थांचें ज्ञान व त्यांचा तसाच अनुभव घेणें हें विज्ञान; यांच्या योगानें ज्याचें चित्त तृप्त झालें आहे, त्यामुळें जो अप्रकंप्य—मनांत न डगमगणारा व जितेंद्रिय होतो, ज्याला मातीचें ढेंकूळ, दगड व सुवर्ण हीं सम झालीं आहेत, अशा योग्याला—विरक्ताला योगारूढ—समाहित असें म्हणतात. [ हे सर्व धर्म परमहंस परिव्राजकाच्या ठिकाणींच संभवतात, कर्मयोगी गृहस्थाच्या ठिकाणीं संभवत नाहींत. ]

सुहृन्मित्रार्युदासीनमध्यस्थद्वेष्यबन्धुषु ।
साधुष्वपि च पापेषु समबुद्धिर्विशिष्यते ॥ ९ ॥

—तसेंच, प्रत्युपकाराची अपेक्षा न करणारा सुहृद्, स्नेही, शत्रु, कोणत्याहि पक्षाचा अभिनिवेश न धरणारा उदासीन, दोन्ही परस्परविरुद्ध पक्षांचें हित इच्छिणारा मध्यस्थ, अप्रिय असलेला द्वेष्य व संबंधी या सर्वांतील शास्त्रा-नुसार वर्तन करणारे आणि त्याचप्रमाणें शास्त्रनिषिद्ध आचरण करणारे, यांमध्यें समान बुद्धि ठेवणारा–त्या सर्वांकडे समदृष्टीनें पाहणारा ध्यानयोगी उत्तम होय. [ साधु, पापी व सुहृदादि यांतील हा कोणत्या जातीचा व गोत्राचा आहे. हा आपला कोण ? आपल्याशीं कसा व्यवहार करितो, इत्यादि कांहीं विचार न करतां सर्वांच्या ठिकाणीं समानवृत्ति ठेवणारा योगारूढ सर्वांत श्रेष्ठ होय. इष्टानिष्ट, स्वकीय-परकीय, सदाचारी-दुराचारी, यांना एकसारखेंच समजणें–त्यांच्याविषयीं चित्तवृत्ति सम ठेवणें हें योगारूढाचें उत्तम लक्षण होय. ]

योगी युञ्जीत सततमात्मानं रहसि स्थितः ।
एकाकी यतचित्तात्मा निराशीरपरिग्रहः ॥ १० ॥

—म्हणून ध्यानाचा अभ्यास करणाऱ्या योग्यानें एकांतांत एकटेंच बसून आपल्या चित्ताचें व देहाचें नियमन करून तृष्णाशून्य व सर्वपरिग्रहरहित होऊन अंतःकरणाला निरंतर समाहित करावें. [ एकांतांत एकटें बसणें, सर्व तृष्णा व परिग्रह टाकणें, सतत योगाभ्यास करणें, इत्यादि योगाभ्यासाचें सर्व विधान कर्मयोगासाठीं नसून निवृत्त ज्ञानयोग्यासाठींच आहे, हें उघड होतें. ]

योगाचें स्वरूप व त्याचीं कांहीं अंगें यांचें प्रदर्शन केल्यानंतर आतां योगाचा अभ्यास करणाऱ्या यतीला आसन, आहार-विहार, आसनादि-कांचे अवांतर भेद इत्यादिकांचा योगाच्या साधनत्वानें नियम सांगावा व ज्याला योग प्राप्त झाला आहे, त्याचें लक्षण व फल म्ह० योगाचें फल सम्य-ग्ज्ञान, ज्ञानाचें फल कैवल्य, योगभ्रष्टाचा आत्यंतिक नाश न होणें, इत्यादि सांगावें, म्हणून या पुढील ग्रंथसंदर्भ आहे. पण त्यांतील योगानुष्ठानाचें मुख्य अंग–आसनच प्रथम सांगून त्यावर बसून काय करावें, त्याचा उपदेश करितात—

शुचौ देशे प्रतिष्ठाप्य स्थिरमासनमात्मनः ।
नात्युच्छ्रितं नातिनीचं चैलाजिनकुशोत्तरम् ॥ ११ ॥

तत्रैकाग्रं मनः कृत्वा यतचित्तेन्द्रियक्रियः ।
उपविश्यासने युञ्ज्याद्योगमात्मविशुद्धये ॥ १२ ॥

—पवित्र स्थानीं, स्वतःचें, फार उंच नाहीं व फार सखल नाहीं असें व खालीं दर्भ, त्यावर हरिणाचें किंवा व्याघ्राचें चर्म व त्यावर वस्त्र असें अचल आसन स्थापून त्या आसनावर बसावें. चित्त व इंद्रियें यांच्या क्रिया नियमित कराव्या. मनाला एकाग्र करावें आणि चित्तशुद्धीसाठीं ध्यान करावें. [एखादें स्थान स्वभावतःच पवित्र असतें, किंवा झाडणें, सारवणें इत्यादि संस्कारांनीं तें पवित्र करतां येतें. अशा पवित्र स्थानीं आपलें आसन मांडावें. दुसऱ्याच्या आसनावर बसणें हितकर नाहीं, म्हणून 'स्वतःचें' असें मुद्दाम म्हटलें आहे. पाट, चौरंग इत्यादि स्वरूपाच्या त्या आपल्या आसनावर क्रमानें दर्भ, अजिन व वस्त्र अंथरावें. त्या आसनावरून पडण्याची भीति वाटूं नये, म्हणून तें फार उंच नसावें व भूमि, पाषाण यांच्या संसर्गानें शरीरांतील वातादिकांचा क्षोभ होऊं नये, म्हणून अति सखलहि नसावें. असें आसन पवित्र स्थानीं स्थापून, त्यावर बसून, सर्व विषयांपासून मनाचा निग्रह करून त्याचें एकाच ध्येयविषयांत समाधान करणें व चित्त आणि इंद्रियें यांच्या बाह्य क्रियांचें संयमन करणें, या दोन साधनांनीं चित्ताच्या विशेष शुद्धीसाठीं योगाभ्यास करावा.]

समं कायशिरोग्रीवं धारयन्नचलं स्थिरः ।
संप्रेक्ष्य नासिकाग्रं स्वं दिशश्चानवलोकयन् ॥ १३ ॥
प्रशान्तात्मा विगतभीर्ब्रह्मचारिव्रते स्थितः ।
मनः संयम्य मच्चित्तो युक्त आसीत मत्परः ॥ १४ ॥

—बाह्य आसन सांगितलें, आतां शरीरधारण कसें करावें, तें सांगतों—शरीराचा मध्यभाग, शिर व मान, यांना सरळ व निश्चल धारण करावें. शरीर स्थिर ठेवावें. जणुकाय आपल्या नासिकेचें अग्र पहात असल्याप्रमाणें रहावें व इकडे तिकडे पाहूं नये. नंतर शांत चित्त, भयरहित व ब्रह्मचारीव्रतामध्यें स्थित असें होऊन मनाचें संयमन करून, मजमध्यें चित्त समाहित करून, मत्पर होऊन रहावें. [ कंबरेपासून मानेपर्यंत जो शरीराचा भाग तोच शरीराचा मध्यभाग होय. यापुढें मान व मस्तक, या तीन्ही भागांना सरळ व अचल जरी धारण केलें, तरी तशा अवस्थेंतहि हात व पाय हालविण्याची कित्येकांना संवयच असते, किंवा डाव्या किंवा उजव्या बाजूवर झुकतां येतें. त्या सर्व

परिस्थितींचा निषेध करण्यासाठीं सरळ व अचल शरीर धारण करूनहि स्थिर होण्याचें येथें विधान आहे. जणुकाय नासिकाग्रदृष्टि करणें व पूर्वादि दिशेकडे न पहाणें, या विशेषणांनीं दृष्टीचेंहि स्थैर्य विवक्षित आहे. अंतःकरणाची शांति योगाभ्यासाला अत्यंत अवश्य आहे. म्हणून प्रशांतात्मा व्हावें, असें येथें सांगितलें आहे. कर्मपरित्याग केल्यामुळें 'मी पतित तर होणार नाहीं ना?' अशी भीति वाटण्याचा संभव आहे. म्हणून 'विगतभीः' या पदानें तिचा निषेध केला आहे. ब्रह्मचर्य, गुरुशुश्रूषा, भिक्षाभोजन, त्रिकालस्नान, संध्यावंदन, शौच, आचमन इत्यादि ब्रह्मचारीव्रतें योगाभ्यासाला अनुकूल आहेत. यास्तव या सर्व साधनांनीं युक्त होऊन, चित्तवृत्तीचा निरोध करून मज परमेश्वराच्या ठिकाणींच चित्त ठेवावें आणि मलाच श्रेष्ठ मानून शांत चित्तानें माझें ध्यान करावें. अंतःकरणाची शुद्धि हें योगाचें अवान्तर फल आहे. ]

युञ्जन्नेवं सदात्मानं योगी नियतमानसः ।
शान्तिं निर्वाणपरमां मत्संस्थामधिगच्छति ॥ १५ ॥

—योगाचें स्वरूप, त्याचें अंगभूत आसनद्वय व त्याचा विशिष्ट कर्ता, इतकें सांगितल्यावर आतां योगाचें परम फल सांगतों—याप्रमाणें मनाला सर्वदा समाहित करणारा योगी-ध्यायी-योगाभ्यासी पुरुष संयतचित्त होऊन मोक्ष हीच जिची निष्ठा आहे, अशी माझ्या अधीन असलेली जी मद्रूप शान्ति तिला प्राप्त होतो. [ मोक्ष ही शान्तीची पराकाष्ठा आहे. पूर्वोक्त क्रमानें चित्ताला समाहित करणारा पुरुष ब्रह्मावस्थानरूप मोक्षाख्य शांतीला प्राप्त होतो. ]

नात्यश्नतस्तु योगोऽस्ति न चैकान्तमनश्नतः ।
न चातिस्वप्नशीलस्य जाग्रतो नैव चार्जुन ॥ १६ ॥

—योग्याचा आहार, विहार, जाग्रण, झोंप इत्यादिकांविषयीं काय नियम आहेत, ते सांगतों—योग्याला विहित असलेल्या अन्नाहून अधिक अन्न खाणाऱ्या, किंवा मुळींच कांहीं न खाणाऱ्या साधकाला योग साध्य होत नाहीं. त्याचप्रमाणें अतिशय झोंप घेणाऱ्या किंवा सर्वथा जागणाऱ्या पुरुषालाहि योग प्राप्त होत नाहीं.

युक्ताहारविहारस्य युक्तचेष्टस्य कर्मसु ।
युक्तस्वप्नावबोधस्य योगो भवति दुःखहा ॥ १७ ॥

—अर्थात् ज्याचा आहार–अन्नाचे परिमाण व विहार–येणें, जाणें, वगैरे परिमित असतें; कर्मांमध्यें परिमित व्यापार असतो; झोंप व जागणें हीं दोन्ही ज्याचीं परिमित असतात; त्याचा योग सर्व संसारदुःखांचा नाश करणारा होतो. [ ज्या योगाभ्यासी पुरुषाच्या आहार, विहार, कर्मानुष्ठान, झोंपणें व जागणें या सर्व क्रिया परिमित असतात, त्याचा योग आध्यात्मिकादि सर्व दुःखांचा क्षय करतो. याप्रमाणें यत्न करणाऱ्या योग्याचा पुढें सिद्ध होणारा योग विशुद्धविज्ञानद्वारा सर्व संसारदुःखांचा क्षय करणारा होतो. झोंपेंतहि सर्व दुःखांची निवृत्ति होते, पण ती नित्य नसते, पण या योगामुळें विज्ञानाच्या द्वारा सर्व संसारदुःखांची नित्य निवृत्ति होते. ]

यदा विनियतं चित्तमात्मन्येवावतिष्ठते ।
निःस्पृहः सर्वकामेभ्यो युक्त इत्युच्यते तदा ॥ १८ ॥

—ज्यावेळीं विशेषप्रकारें नियमित केलेलें–एकाग्रतेस प्राप्त झालेलें चित्त बाह्य विषयांचें चिंतन सोडून आत्म्यामध्येंच अवस्थित होतें–आत्मस्वरूपांतच मिळून जातें आणि योगी सर्व दृष्टादृष्ट विषयांविषयीं निःस्पृह–तृष्णाशून्य होतो, तेव्हां त्याला युक्त–योगी म्हणतात. [ योगी दोन प्रकारचे आहेत. एक 'युंजान' व दुसरा 'युक्त'. 'युंजान'–निष्काम कर्मानुष्ठानानें योगारूढ होऊन पूर्वोक्त आसनादि प्रकारांनीं ध्यान करणारा आणि युक्त–आत्मस्वरूपांत स्थिर अवस्थित झालेला. यालाच प्राप्तयोग–सिद्धयोग म्हणतात. ]

यथा दीपो निवातस्था नेङ्गते सोपमा स्मृता ।
योगिनो यतचित्तस्य युञ्जतो योगमात्मनः ॥ १९ ॥

—अर्जुना, या युक्त योग्याच्या समाहित चित्ताला मी एक दृष्टान्त देतों. म्हणजे तुला त्याच्या चित्ताची चांगली कल्पना येईल. ज्याप्रमाणें वायुरहित प्रदेशांत असलेला दीप–दीपाची ज्योति हलत नाहीं, तर निश्चल तेवत असते, त्याप्रमाणें आत्म्याच्या योगाचें–समाधीचें अनुष्ठान करणाऱ्या योग्याचें संयत चित्त असतें. [ चित्ताचा प्रचार कसा कसा होत असतो, तें जाणणाऱ्या योगज्ञांनीं मनाच्या समाधीचा अभ्यास करणाऱ्या, नियतचित्त योग्याच्या स्थिर चित्ताला वायुरहित प्रदेशांतील दीपाच्या ज्योतीची उपमा दिली आहे. ]

यत्रोपरमते चित्तं निरुद्धं योगसेवया ।
यत्र चैवात्मनात्मानं पश्यन्नात्मनि तुष्यति ॥ २० ॥

सुखमात्यन्तिकं यत्तद्बुद्धिग्राह्यमतीन्द्रियम् ।
वेत्ति यत्र न चैवायं स्थितश्चलति तत्त्वतः ॥ २१ ॥
यं लब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकं ततः ।
यस्मिन्स्थितो न दुःखेन गुरुणापि विचाल्यते ॥ २२ ॥
तं विद्याद्दुःखसंयोगवियोगं योगसंज्ञितम् ।
स निश्चयेन योक्तव्यो योगोऽनिर्विण्णचेतसा ॥ २३ ॥

( ५ )—याप्रमाणें योगाभ्यासानें एकाग्र व निवात प्रदेशांतील दीपाप्रमाणें स्थिर झालेलें चित्त, जेव्हां निरुद्ध होत्सातें उपरतीस प्राप्त होतें; त्याचप्रमाणें ज्या वेळीं समाधीनें अत्यंत शुद्ध झालेल्या अंतःकरणानें चैतन्य ज्योतिःस्वरूप परमात्म्याचा अनुभव घेणारा हा योगी स्वरूपांत संतुष्ट होतो; ज्यावेळीं केवल बुद्धीनेंच ग्राह्य व इंद्रियांचा विषय न होणारें जें अनंत सुख त्याचा अनुभव घेतो; ज्या अवस्थेंत हा ज्ञानी आत्मस्वरूपांत स्थित झाला असतां त्या तत्त्वापासून च्युत होत नाहीं, त्यावेळीं त्याला योगसिद्धि होते आणि ज्या आत्मलाभाला प्राप्त होऊन हा योगी दुसऱ्या कोणत्याहि लाभाला त्याहून अधिक समजत नाहीं; तसाच ज्या आत्मस्वरूपांत स्थित झालेला हा योगी फार मोठ्या दुःखानेंहि चंचल होत नाहीं, त्या दुःखसंयोगाच्या वियोगाला योगसंज्ञित जाणावें, म्ह० त्या दुःखसंयोग-वियोगालाच योग समजावें व हा योग निश्चयानें व अखिन्न मनानें करावा. [ ज्याचा योग इतका परिपक्क झालेला नसतो, तो योगी शस्त्रप्रहारादिकांमुळें फार मोठें दुःख झालें असतां स्वरूपापासून च्युत होऊन जसा देहभानावर येतो, तसा आत्मस्वरूपांत स्थित झालेला हा योगी शस्त्रपातादिकांमुळें केवढेंहि मोठें दुःख जरी झालें, तरी त्यामुळें स्वस्वरूपापासून च्युत होत नाहीं. या दुःखसंयोगवियोगालाच 'योग' ही संज्ञा आहे. अशा प्रकारचा हा योग निश्चयानें व न त्रासतां साध्य करून घ्यावा. ]

संकल्पप्रभवान्कामांस्त्यक्त्वा सर्वानशेषतः ।
मनसैवेन्द्रियग्रामं विनियम्य समन्ततः ॥ २४ ॥
शनैः शनैरुपरमेद्बुद्ध्या धृतिगृहीतया ।
आत्मसंस्थं मनः कृत्वा न किंचिदपि चिन्तयेत् ॥ २५ ॥

—संकल्प हेंच ज्याचें कारण आहे–संकल्पापासून उत्पन्न झालेल्या सर्व कामांचा समूळ त्याग करून व विवेकयुक्त मनानेंच इंद्रिय समुदायास सर्व

बाजूनीं नियमित करून धैर्यानें युक्त अशा बुद्धीनें हळु हळू उपरत व्हावें. अंतःकरणाला शांत करावें. मनाला आत्म्यामध्यें संस्थित करून, आत्माच सर्व आहे, त्याहून निराळें कांहीं नाहीं. अशाप्रकारें मनाला आत्मसंस्थ करून कशाचेंहि चिंतन करूं नये. मनाची निश्चलता हा योगाचा परम अवधि आहे.

यतो यतो निश्चरति मनश्चञ्चलमस्थिरम् ।
ततस्ततो नियम्यैतदात्मन्येव वशं नयेत् ॥ २६ ॥

—याप्रमाणें योगाभ्यासाच्या आरंभीं मनाला आत्म्यामध्यें निश्चल करावयास प्रवृत्त झालेल्या योग्याचें मन रागादि स्वभावदोषामुळें अत्यंत चंचल व त्यामुळेंच अस्थिर होऊन ज्या ज्या शब्दादि विषयांच्या निमित्तानें बाहेर पडतें—आत्म्यापासून दूर होऊन विषयांच्या मागोमाग धावूं लागतें; त्या त्या शब्दादि विषयांपासून त्याला नियमित करून आत्म्यामध्येंच स्थिर करावें. त्याला आत्मवश करावें. [ शब्दादि विषय, हें निमित्त क्षणभंगुर, दुःखमिश्र, कष्टसाध्य आहे, इत्यादि त्याच्या यथार्थ स्वरूपाचें आलोचन करून व वैराग्यभावनेनें 'हे मला नकोत. हे दुःखद आहेत' अशा चिंतनानें, त्या त्या निमित्ताला आभासरूप करून शब्दादि निमित्त हें सुखसाधन नसून मिथ्या आभास आहे, असा निश्चय करावा आणि त्या त्या निमित्तापासून मनाचें नियमन करून त्याला आत्मवश्यतेला प्राप्त करावें. त्याला आत्म्याच्या अधीन करावें. विषयांकडे जाऊं देऊं नये. याप्रमाणें योगाभ्यासाच्या बलानें योग्याचें मन आत्म्यामध्यें प्रशांत होतें. ]

प्रशान्तमनसं ह्येनं योगिनं सुखमुत्तमम् ।
उपैति शान्तरजसं ब्रह्मभूतमकल्मषम् ॥ २७ ॥

—ज्याचें चित्त अत्यंत शांत झालें आहे व ज्याच्यांतील मोहादि क्लेशरूप मल शांत झाले आहेत, अशा या ब्रह्म झालेल्या जीवन्मुक्त व अधर्मादि रहित योग्याला निरतिशय सुख प्राप्त होतें.

युञ्जन्नेवं सदात्मानं योगी विगतकल्मषः ।
सुखेन ब्रह्मसंस्पर्शमत्यन्तं सुखमश्नुते ॥ २८ ॥

—अर्जुना, हेंच मी अधिक स्पष्ट करून सांगतों—पूर्वोक्त क्रमानें राग-द्वेषशून्य योगी सदा चित्तसमाधानाचा अभ्यास करितो. त्या अभ्यासामुळेंच त्याचें सर्व पाप निवृत्त होतें. त्यामुळें त्याला ब्रह्मस्वरूपभूत नित्य सुख अनायासानें होतें. [ ब्रह्माशीं तादात्म्य पावलेल्या त्याला नित्य सुख स्वभावतःच मिळतें. ]

सर्वभूतस्थमात्मानं सर्वभूतानि चात्मनि ।
ईक्षते योगयुक्तात्मा सर्वत्र समदर्शनः ॥ २९ ॥

—ज्याचें अंतःकरण योगानें युक्त—समाहित आहे आणि ज्याचें ज्ञान सर्व भूतांमध्यें सम आहे, तो स्वात्म्याला सर्वभूतांमध्यें व सर्वभूतांना आत्म्यामध्यें स्थित असलेलें पाहतो. [ समाहितचित्त व सर्वत्र समब्रह्म पहाणारा योगी स्वात्म्याला सर्व भूतांमध्यें पहातो. त्याला ब्रह्मात्मैक्य ज्ञान होतें. तो ब्रह्मादिस्तंबपर्यंत सर्व भूतें आत्म्यामध्यें एकतेला प्राप्त झालीं आहेत, असें जाणतो. येथें सर्व संसाराच्या विच्छेदाचें कारण जें ब्रह्मैकत्वदर्शनरूप योगफल तेंच सांगितलें आहे. ]

यो मां पश्यति सर्वत्र सर्वं च मयि पश्यति ।
तस्याहं न प्रणश्यामि स च मे न प्रणश्यति ॥ ३० ॥

—'आतां या आत्मैकत्व ज्ञानाचें फल काय,' म्हणून विचारशील तर सांगतों—जो योगी—ज्ञानी मज वासुदेवाला—सर्व भूतांच्या आत्म्याला सर्व भूतांमध्यें पहातो आणि ब्रह्मादि सर्व भूतजात मज सर्वात्म्यामध्यें पहातो, त्याला मी—परमानंदात्मा कधीं परोक्ष होत नाहीं. तर नेहमीं प्रत्यक्ष असतो व तो एकत्वदर्शी ज्ञानी मला कधीं परोक्ष होत नाहीं. [ त्याचें व माझें एकात्मत्व असल्यामुळें आम्ही परस्परांना नेहमीं अपरोक्ष असतों. ]

सर्वभूतस्थितं यो मां भजत्येकत्वमास्थितः
सर्वथा वर्तमानोऽपि स योगी मयि वर्तते ॥ ३१ ॥

—एकत्वास पूर्णपणें प्राप्त झालेला जो ज्ञानी सर्व भूतांमध्यें स्थित असलेल्या मला भजतो, तो योगी—ज्ञानी भक्त कोणत्याहि प्रकारें जरी वागत असला, तरी माझ्या ठिकाणीं—परमपदीं रहातो.

आत्मौपम्येन सर्वत्र समं पश्यति योऽर्जुन ।
सुखं वा यदि वा दुःखं स योगी परमो मतः ॥ ३२ ॥

—अर्जुना, जो सर्वभूतांमध्यें आपल्या उपमेनें सुख किंवा दुःख पहातो, तो श्रेष्ठ योगी मानलेला आहे. [ आपल्याला जसें सुख इष्ट व दुःख अनिष्ट त्याचप्रमाणें सर्व प्राण्यांना सुख इष्ट व दुःख अनिष्ट आहे, असें समजून जो ज्ञानी कोणालाहि पीडा देत नाहीं, तो सर्व योग्यांमध्यें श्रेष्ठ योगी होय. ]

अर्जुन उवाच—

योऽयं योगस्त्वया प्रोक्तः साम्येन मधुसूदन ।
एतस्याहं न पश्यामि चञ्चलत्वात्स्थितिं स्थिराम् ॥ ३३ ॥
चञ्चलं हि मनः कृष्ण प्रमाथि बलवद्दृढम् ।
तस्याहं निग्रहं मन्ये वायोरिव सुदुष्करम् ॥ ३४ ॥

या पूर्वोक्त सम्यग्ज्ञानरूप योगाचें संपादन मोठ्या कष्टानेंच करतां येतें. असें पाहून त्याच्या प्राप्तीचा निश्चित उपाय ऐकण्याची इच्छा करणारा अर्जुन म्हणाला—

हे मधुसूदना, तूं जो हा योग समत्वानें सांगितलास, त्या योगाची निश्चल स्थिति मनाच्या चंचलपणामुळें मला संभवनीय दिसत नाहीं. कारण हे कृष्णा, मन अतिशय चंचल आहे. तें शरीर व इंद्रियें यांना व्याकुल करणारें, अतिशय दुर्निवार व अच्छेद्य आहे, त्याचा निग्रह वायूच्या निग्रहाप्रमाणें अति दुष्कर आहे, असें मी समजतों. [ मन अतिशय चंचल आहे, ही गोष्ट प्रसिद्ध असल्यामुळें मनोनिग्रहाच्या द्वारा योगाचें स्थैर्य संपादन करावें, अशी नुस्ती कल्पनाहि करवत नाहीं. मन अतिशय अस्थिर आहे, इतकेंच नव्हे, तर तें अतिशय क्षुब्ध करणारें, बळकट व तंतुनागाप्रमाणें अच्छेद्य आहे. त्यामुळें त्याचा निग्रह करणें म्हणजे वायूची मोट बांधणेंच आहे. ]

श्रीभगवानुवाच—

असंशयं महाबाहो मनो दुर्निग्रहं चलम् ।
अभ्यासेन तु कौन्तेय वैराग्येण च गृह्यते ॥ ३५ ॥

श्रीकृष्ण म्हणाले—हे महापराक्रमी अर्जुना, मन अतिशय दुर्निवार्य व चंचल आहे यांत संशय नाहीं. पण अभ्यास व वैराग्य या उपायांनीं त्याचा निग्रह करतां येतो. [ चित्ताच्या समान प्रत्ययाची आवृत्ति व विषयदोष-वर्णनाचा अभ्यास यांच्या योगानें पूर्ण वैराग्य बाणून चित्ताच्या प्रचाराचा—विषयोन्मुखतेचा निरोध केला असतां तें विषयविमुख—अंतर्निष्ठ होऊन रहातें. ]

असंयतात्मना योगो दुष्प्राप इति मे मतिः ।
वश्यात्मना तु यतता शक्योऽवाप्तुमुपायतः ॥ ३६ ॥

( १ )—ज्याचें चित्त अभ्यास व वैराग्य यांच्या योगानें निरुद्ध झालेलें नसतें, त्याला योग मोठ्या कष्टानें संपादन करतां येतो, अशी माझी मति आहे.

परंतु ज्यानें आपलें अंतःकरण अभ्यास व वैराग्य यांच्या योगानें स्वाधीन करून घेतलें आहे व आणखींहि जो यत्न करीत आहे, त्यालाच पूर्वोक्त उपायानें योग साध्य होणें शक्य आहे. [ अंतःकरण जरी स्वाधीन झालें, तरी वैराग्यादिकांविषयीं अत्यंत आस्था बाळगावी. असें येथें 'यतता' या पदानें सूचविलें आहे. ]

इहलोक-परलोकाच्या प्राप्तीचीं साधनें अशीं जीं अग्निहोत्रादि श्रौत-स्मार्त कर्मे, त्यांचा संन्यास करून योगाभ्यासाला आरंभ केला, पण योग-सिद्धीचें फल व मोक्षाचें साधन असें जें सम्यग्ज्ञान तेंहि प्राप्त झालें नाहीं. त्यामुळें योगी मरणसमयीं योगमार्गापासून चलित चित्त झाला, म्ह० त्याचें चित्त त्या मार्गापासून भ्रंश पावलें. अशा स्थितींत त्याला दोन्ही फलापासून च्युत होण्याचा प्रसंग येतो. अशा आशयानें—

अर्जुन उवाच—

> अयतिः श्रद्धयोपेतो योगाच्चलितमानसः ।
> अप्राप्य योगसंसिद्धिं कां गतिं कृष्ण गच्छति ॥ ३७ ॥
> कच्चिन्नोभयविभ्रष्टश्छिन्नाभ्रमिव नश्यति ।
> अप्रतिष्ठो महाबाहो विमूढो ब्रह्मणः पथि ॥ ३८ ॥
> एतन्मे संशयं कृष्ण छेत्तुमर्हस्यशेषतः ।
> त्वदन्यः संशयस्यास्य छेत्ता न ह्युपपद्यते ॥ ३९ ॥

अर्जुन म्हणाला—हे कृष्णा, योगमार्गावर अतिशय श्रद्धा असल्यामुळें कर्म-त्याग करून योगाचा अंगीकार केला; पण त्यासाठीं जितका प्रयत्न करावयास पाहिजे, तितका केला नाहीं. शिवाय योगसिद्धीला विघ्नें फार असल्यामुळें एका जन्मांत तो सिद्ध होणें शक्य नसतें, अशा अनेक कारणांनीं व मरणसमयीं इंद्रिया-दिकांच्या व्याकुलतेमुळें त्याला योगाचें स्मरण झालें नाहीं, तेव्हां तो योगभ्रष्ट योगसिद्धीला—आत्मसाक्षात्काराला प्राप्त न होतां कोणत्या गतीला जातो ! हे पराक्रमी कृष्णा, कर्ममार्ग व योगमार्ग या दोन्ही मार्गापासून विभ्रष्ट झालेला—भ्रंश पावलेला, त्यामुळें निराधार झालेला, ब्रह्मप्राप्तीच्या मार्गांत अत्यंत मूढ झालेला तो आपल्या आधारापासून तुटून निराळ्या झालेल्या अभ्राप्रमाणें नाश तर पावत नाहींना ? हे कृष्णा, माझ्या या संशयाला पूर्णपणें तोडण्यास—संशय घालविण्यास तूंच योग्य आहेस. कारण या संशयाचा छेद करणारा तुज-

वांचून दुसरा कोणी संभवत नाहीं. [ अभ्युदय व निःश्रेयस यांची अप्राप्ति हाच येथील नाश होय. कारण त्याला कोणत्याच मार्गाचा आधार उरलेला नसतो, त्यामुळें ब्रह्मप्राप्तीच्या मार्गांत विमूढ होत्साता तो उभयभ्रष्ट होतो कीं काय ? हा माझा संशय घालविण्यास तूंच योग्य आहेस. ]

श्रीभगवानुवाच—

पार्थ नैवेह नामुत्र विनाशस्तस्य विद्यते ।
न हि कल्याणकृत्कश्चिद्दुर्गतिं तात गच्छति ॥ ४० ॥

श्रीकृष्ण म्हणाले—हे अर्जुना, त्याचा विनाश या लोकीं तर नाहींच, पण परलोकींहि होत नाहीं. कारण, अरे बाबा, कोणीहि शुभाचरण करणारा दुर्गतीला जात नाहीं. [ योगभ्रष्टाचा शिष्टनिंदारूप ऐहिक नाश किंवा हीनजन्मप्राप्ति-रूप पारलौकिकनाश होत नाहीं. शुभाचरण करणारा कोणीहि निंद्यगतीला प्राप्त होत नाहीं हा नियम आहे. ]

प्राप्य पुण्यकृताँल्लोकानुषित्वा शाश्वतीः समाः ।
शुचीनां श्रीमतां गेहे योगभ्रष्टोऽभिजायते ॥ ४१ ॥

—योगभ्रष्टाचा दोन्ही लोकीं जर नाश होत नाहीं, तर काय होतें, तें सांगतों—योगमार्गापासून भ्रष्ट झालेला संन्यासी पुण्याचरण करणाऱ्या श्रेष्ठांच्या लोकांस प्राप्त होऊन हजारों वर्षें त्या लोकीं राहून शास्त्रोक्त आचरण करणाऱ्या श्रीमंतांच्या घरीं उत्पन्न होतो. [ योगभ्रष्टाच्या मनांत पूर्ण वैराग्य दृढ झालेलें नसल्यास तो पुण्यवानांच्या लोकीं जाऊन व तेथें दीर्घकाल राहून, सुखोपभोगानें पुण्यांशाचा क्षय होतांच येथें शास्त्रविहित आचरण करणाऱ्या श्रीमानांच्या घरीं जन्म घेतो. ]

अथवा योगिनामेव कुले भवति धीमताम् ।
एतद्धि दुर्लभतरं लोके जन्म यदीदृशम् ॥ ४२ ॥

—पण त्याच्यामध्यें श्रद्धा, वैराग्य इत्यादि कल्याणगुणांचें आधिक्य असल्यास कोणता दुसरा पक्ष संभवतो, तेंहि सांगतों—किंवा तो योगभ्रष्ट बुद्धिमान् दरिद्र्यांच्याच कुलांत उत्पन्न होतो. या लोकीं अशाप्रकारचा जन्म होणें हें अतिशय दुर्लभ आहे. [ योगभ्रष्टाचा श्रीमानाच्या कुलांत जन्म होणें हा एक पक्ष व श्रीमानाच्या कुलाहून भिन्न अशा योग्यांच्याच म्ह० बुद्धिमान् दरिद्री लोकांच्याच कुलांत तो होणें हा दुसरा पक्ष होय. ऐश्वर्यवान् व सदा-

चारसंपन्न अशा लोकांच्या घरांत जन्म होणें जरी सुलभ नाहीं, कारण तेंहि मोठ्या पुण्याचेंच फल आहे. तरी शुचि, दरिद्री व विद्यावान् लोकांच्या कुलांत जन्म होणें त्याहूनहि अधिक दुर्लभ आहे. ]

तत्र तं बुद्धिसंयोगं लभते पौर्वदेहिकम् ।
यतते च ततो भूयः संसिद्धौ कुरुनंदन ॥ ४३ ॥

—कारण तो योगभ्रष्ट त्या दरिद्री योग्यांच्या कुलांत पूर्वदेहांतील त्या बुद्धिसंयोगास प्राप्त होतो आणि हे कुरुनंदना, योगसिद्धीसाठीं पूर्वजन्मांतील अभ्यासाच्या संस्कारामुळें अधिकच यत्न करितो. [ या उत्तम जन्मांत त्याला पूर्वजन्मांतील बुद्धीचा लाभ होतो व त्यामुळें तो पूर्वीपेक्षां श्रवणादिकांविषयीं फारच मोठ्या प्रमाणावर यत्न करितो. ]

पूर्वाभ्यासेन तेनैव ह्रियते ह्यवशोऽपि सः ।
जिज्ञासुरपि योगस्य शब्दब्रह्मातिवर्तते ॥ ४४ ॥

—कारण, पूर्वजन्मीं केलेल्या त्याच अभ्यासानें तो अवश असलेलाहि योगभ्रष्ट आकर्षण केला जातो. योगाचें स्वरूप जाणण्याची इच्छा करणाराहि तो वेदोक्त कर्मानुष्ठानफलाचें उल्लंघन करितो. [ कर्ममार्गांत प्रवृत्त झालेला कर्मी त्या मार्गापासून भ्रष्ट होतो, असें म्हणतां येत नाहीं. या सामर्थ्यावरूनच येथील योगभ्रष्टहि संन्यासी घेतला पाहिजे. म्ह० ज्ञानसिद्धीसाठीं कर्ममार्ग सोडून ज्यानें संन्यासलक्षण ज्ञानमार्ग स्वीकारला आहे, तोच योगभ्रष्ट होण्याचा संभव आहे. अधर्मरूप प्रबल प्रतिबंध नसल्यास पूर्वसंस्कार त्या परवश असलेल्या योगभ्रष्टालाहि योगाभ्यासांत, त्याची इच्छा नसली तरी, प्रवृत्त करितो. पण अधर्मरूप प्रबल प्रतिबंध असल्यास तो दुःखभोगानें क्षीण झाल्यावर योगाभ्यासजन्य संस्कार त्याला अभ्यासांत प्रवृत्त करितो. मध्यें कितीहि काल जरी लोटला, तरी तो संस्कार नष्ट होत नाहीं. योगाचें स्वरूप जाणण्याच्या इच्छेनें कर्मत्याग करून योगामध्यें प्रवृत्त झालेला योगभ्रष्टहि जर वेदोक्त कर्म व त्याच्या अनुष्ठानापासून प्राप्त होणारें फल यांचें उल्लंघन करून जातो, म्ह० त्याहून अधिक फलास प्राप्त होतो, तर मग योगाचें स्वरूप जाणून व तन्निष्ठ होऊन जो सतत अभ्यास करतो, त्याच्या अधिक फलप्राप्तीविषयीं काय सांगावें ! ]

प्रयत्नाद्यतमानस्तु योगी संशुद्धकिल्बिषः ।
अनेकजन्मसंसिद्धस्ततो याति परां गतिम् ॥ ४५ ॥

—शिवाय अधिक यत्न करणारा विद्वान् ज्याचें पाप अत्यंत निवृत्त झालें आहे, असा होऊन तो अनेक जन्मांतील थोड्या थोड्या अभ्यासानें संसिद्ध होतो. नंतर योगसिद्धीमुळेंच तो 'मोक्ष' या नांवाच्या श्रेष्ठ गतीला प्राप्त होतो. [ योगसिद्धीसाठीं भगीरथ यत्न करणारा योगी प्रयत्नाची पराकाष्ठा झाली असतां निष्पाप व विद्वान् होतो. प्रत्येक जन्मांत थोडा थोडा असा योगाभ्यासजन्य संस्कार जमतां, जमतां, अनेक जन्मांनीं योगजन्य संस्कारांचा फार मोठा संचय होऊन त्यामुळें तो संसिद्ध होतो. त्याला सम्यग्ज्ञान होतें व त्या ज्ञानामुळें तो संन्यासी श्रेष्ठ गतीला प्राप्त होतो. यास्तव आपल्याला शीघ्र मुक्ति मिळावी, असें ज्याला वाटत असेल, त्यानें पुष्कळ यत्न करावा. ]

तपस्विभ्योऽधिको योगी ज्ञानिभ्योऽपि मतोऽधिकः ।
कर्मिभ्यश्चाधिको योगी तस्माद्योगी भवार्जुन ॥ ४६ ॥

—अर्जुना, कृच्छ्र-चांद्रायणादि तप करणाऱ्या तपस्व्यांहून वर सांगितल्याप्रमाणें योगाभ्यास करणारा अधिक श्रेष्ठ आहे. शास्त्रपांडित्यवान् ज्ञानी पुरुषाहूनहि तो अधिक श्रेष्ठ मानलेला आहे. योगाभ्यासी अग्निहोत्रादि कर्में करणाराहूनहि श्रेष्ठ आहे. तस्मात् तूं योगी हो. [ध्यानयोग सम्यग्ज्ञानाच्या द्वारा मोक्षाला कारण होतो, म्हणून योगाभ्यासी तपस्वी, शास्त्रज्ञानवान् व श्रौत-स्मार्तादि कर्में करणारा यांहून श्रेष्ठ आहे. म्हणून ध्यानयोग हें ज्ञानाचें अंतरंगतर साधन आहे. प्रत्येक मुमुक्षूनें ध्यानयोगी अवश्य व्हावें, हें सुचविण्यासाठीं ध्यानयोगाचें श्रेष्ठत्व येथें प्रतिपादिलें आहे व अर्जुनालाहि 'तूं ध्यानयोगी हो' असा उपदेश केला आहे.]

योगिनामपि सर्वेषां मद्गतेनान्तरात्मना ।
श्रद्धावान्भजते यो मां स मे युक्ततमो मतः ॥ ४७ ॥

—रुद्र, आदित्य इत्यादिकांचें ध्यान करणाऱ्या दुसऱ्या सर्व योग्यांमध्येंहि जो श्रद्धावान् योगी—ध्यायी माझ्या ठिकाणीं स्थिर केलेल्या अंतःकरणानें मला भजतो, तो मला श्रेष्ठ योगी म्हणून मान्य आहे. [ जो सगुण किंवा निर्गुण भगवंताचें, त्याच्या ठिकाणीं अंतःकरण स्थिर करून मोठ्या श्रद्धेनें सतत चिंतन करितो, तो इतर सर्व उपासकांमध्यें श्रेष्ठ योगी—ध्यायी आहे, असें भगवंताचें मत आहे. या अध्यायांत संन्यासाचें साधन, असा जो कर्मयोग त्याची मर्यादा—तो कोठपर्यंत आचरावा, तें सांगितलें. सांगयोगाचें विवरण केलें. मनोनिग्रहाच्या दोन उपायांचा उपदेश केला. योगभ्रष्टाचा आत्यंतिक

नाश होतो कीं काय या शंकेचें निरसन केलें व 'त्वं' पदाचा मुख्य अर्थ आणणाऱ्या साधकाचें ज्ञाननिष्ठत्व सांगून वाक्यार्थ ज्ञानानें–अपरोक्ष आत्मसाक्षात्कारानें मुक्ति मिळते, हें सिद्ध केलें. ]

( येथें भगवद्गीतेचा 'ध्यानयोग–अभ्यासयोग' नांवाचा सहावा अध्याय समाप्त झाला. ) ६. ४. ३०.

## अध्याय ३१ वा.

### ( गीताध्याय ७ वा. ज्ञान-विज्ञानयोग. )

[ १ भगवत्तत्त्व कसें आहे व तद्गत-चित्त कसें व्हावें, याचा उपदेश. २ ज्ञानाचें दुर्लभत्व. ३ ईश्वराची द्विविध प्रकृति व तेंच जगाच्या उत्पत्ति-प्रलयाचें कारण. ४ कोणत्या धर्मानें विशिष्ट असलेल्या ईश्वरामध्यें जगत् प्रथित आहे, त्याचें कथन. ५ ईश्वराला न जाणण्याचें कारण. ६ चार प्रकारचे भक्त. ७ त्यांत ज्ञानवान् श्रेष्ठ. ८ भक्तांच्या फलामध्यें तारतम्य व ईश्वराचें सर्वज्ञत्व. ९ पुण्यवानच ईश्वराला जाणतात. ]

श्रीभगवानुवाच—

**मय्यासक्तमनाः पार्थ योगं युञ्जन्मदाश्रयः ।**
**असंशयं समग्रं मां यथा ज्ञास्यसि तच्छृणु ॥ १ ॥**

**( १ ) सहाव्या अध्यायाच्या शेवटीं " सर्व उपासकांमध्यें माझ्या ठिकाणीं स्थिर केलेल्या अंतःकरणानें जो माझी भक्ति करतो, तो मला 'युक्ततम' म्हणून संमत आहे " असा प्रश्नाच्या बीजाचा उपन्यास करून माझें तत्त्व अशा प्रकारचें आहे व अशा प्रकारें मद्गत-चित्त व्हावें, हें सांगण्याची इच्छा करणारे श्रीकृष्ण म्हणाले—हे अर्जुना, माझ्यामध्यें ज्याचें चित्त आसक्त झालें आहे व मनःसमाधान करणारा असा तूं, विभूति-बल-ऐश्वर्य इत्यादि समस्त गुणांनीं युक्त अशा मला–परब्रह्मरूप परमात्म्याला ज्याप्रकारें निःसंशय जाणशील, तो प्रकार मी तुला सांगतों. ऐक.**

**ज्ञानं तेऽहं सविज्ञानमिदं वक्ष्याम्यशेषतः ।**
**यज्ज्ञात्वा नेह भूयोऽन्यज्ज्ञातव्यमवशिष्यते ॥ २ ॥**

**—मी तुला हें साक्षात्कारासह–अनुभवासह संपूर्ण ज्ञान सांगतों. तें ज्ञान झालें असतां पुनः जाणण्यास योग्य असें कांहीं अवशिष्ट रहात नाहीं.**

मनुष्याणां सहस्रेषु कश्चिद्यतति सिद्धये ।
यततामपि सिद्धानां कश्चिन्मां वेत्ति तत्त्वतः ॥ ३ ॥

( २ )—असंख्य मनुष्यांतील कोणी एखादाच ज्ञानप्राप्तीसाठीं यत्न करतो व अशा यत्न करणाऱ्या सिद्धांतील—साधकांतील कोणी एखादाच मला पूर्णपणें जाणतो. [ येथें यत्न करणाऱ्या साधकालाहि सिद्ध म्हटलें आहे. कारण त्यांना ज्ञानद्वारा सिद्धि प्राप्त होणें सुलभ असतें. ]

याप्रमाणें ज्ञानासाठीं यत्न करणारा दुर्लभ आहे. प्रयत्नाच्या द्वारा ज्ञान प्राप्त होणें त्याहून दुर्लभ आहे आणि त्या दोहोंच्या द्वारा मुक्ति मिळणें तर फारच दुर्लभ आहे. अशा प्ररोचनानें—रुचि उत्पन्न करणाऱ्या स्तुतिवाक्यानें श्रोत्याला पुढील ज्ञान ऐकण्याविषयीं उत्सुक करून भगवान् म्हणतात—

भूमिरापोऽनलो वायुः खं मनो बुद्धिरेव च ।
अहंकार इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा ॥ ४ ॥
अपरेयमितस्त्वन्यां प्रकृतिं विद्धि मे पराम् ।
जीवभूतां महाबाहो ययेदं धार्यते जगत् ॥ ५ ॥

( ३ )—गंधतन्मात्र, रसमात्र, रूपतन्मात्र स्पर्शतन्मात्र व शब्दतन्मात्र, अर्थात् सर्व सूक्ष्म भूतें; तसेंच, अहंकार, महत्तत्त्व व अव्यक्त, अशी ही माझी प्रकृति—मायाशक्ति आठ प्रकारें भिन्न झाली आहे. ही अष्टधा भिन्न असलेली प्रकृति अपरा आहे. म्हणजे परा—श्रेष्ठ नव्हे. निकृष्ट, अशुद्ध म्ह० अनर्थ करणारी—संसारबंधनरूप आहे. पण या पूर्वोक्त अपरा प्रकृतीहून अन्य—अगदीं विलक्षण —अतिशय शुद्ध असलेली जी माझी प्रकृति ( सांख्याप्रमाणें स्वतंत्र नव्हे, तर ) माझ्या स्वरूपभूत आहे, ती माझी परा म्हणजे प्रकृष्ट—श्रेष्ठ, जीवभूत म्हणजे क्षेत्ररूप—प्राणधारणाचें निमित्त असलेली अशी आहे, असें तूं जाण. प्रत्येक कार्यांत प्रवेश केलेल्या या प्रकृतीकडून हें जगत् धारण केलें जातें.

एतद्योनीनि भूतानि सर्वाणीत्युपधारय ।
अहं कृत्स्नस्य जगतः प्रभवः प्रलयस्तथा ॥ ६ ॥

—हीं सर्व भूतें या दोन प्रकृतींपासून उत्पन्न झालीं आहेत. या दोन प्रकृती सर्व भूतांचें कारण आहेत. असा तूं निश्चय कर. मी सर्व जगाचा प्रभव—उत्पत्ति व प्रलय—विनाश आहे. [ सर्व चराचर भूतें यांच कार्यांवरून त्यांच्या कारणभूत दोन परापर प्रकृतींचें तूं अनुमान कर. ]

मत्तः परतरं नान्यत्किंचिदस्ति धनंजय ।
मयि सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव ॥ ७ ॥

—अर्जुना, ज्याअर्थी पूर्वोक्तप्रकारें दोन प्रकृतींच्या द्वारा मीच जगत्कारण आहें, त्याअर्थी मज ईश्वराहून जगाचें दुसरें स्वतंत्र कारण कांहींहि विद्यमान् नाहीं. माळेचे मणि जसे दोऱ्यांत ओंवलेले असतात, त्या दोऱ्याकडूनच धारण केले जातात. दोऱ्याच्या अभावीं ते इतस्ततः पसरतात, त्याप्रमाणें म्ह० सूत्रांतील मणिगणाप्रमाणें आत्मभूत अशा मींच हें सर्व व्यापिलें आहे. माझ्यावांचून हें सर्व विनाशच पावेल. [ त्याची स्थितीच संभवणार नाहीं. ]

रसोऽहमप्सु कौन्तेय प्रभास्मि शशिसूर्ययोः ।
प्रणवः सर्ववेदेषु शब्दः खे पौरुषं नृषु ॥ ८ ॥

( ४ )—हे अर्जुना, 'कोणकोणत्या धर्मांनें विशिष्ट असलेल्या माझ्यामध्यें हें सर्व जगत् प्रथित आहे,' म्हणून विचारशील, तर सांगतों—जलाचें सार रस आहे. त्या रसरूप मजमध्यें आप प्रथित आहे. ज्याप्रमाणें आपामध्यें मी रस आहें, त्याचप्रमाणें मी चंद्र व सूर्य यांमध्यें प्रभा आहें, म्ह०' चंद्र-सूर्यांची जी प्रभा, तद्रूप असलेल्या माझ्या ठिकाणीं ते दोघे गुंफलेले आहेत. सर्व वेदांमध्यें प्रणव—ओंकार हें सार आहे. त्या प्रणवभूत अशा माझ्यामध्यें सर्व वेद प्रोत आहेत. आकाशांत शब्द हा सारभूत गुण आहे, त्या शब्दरूप अशा माझ्यामध्यें आकाश प्रोत आहे. त्याचप्रमाणें पौरुष—पुरुषाचा भाव—पुरुषत्व—ज्यामुळें मनुष्यामध्यें हा पुरुष अशी बुद्धि होते, तद्रूप अशा मजमध्यें पुरुष प्रथित आहेत.

पुण्यो गन्धः पृथिव्यां च तेजश्चास्मि विभावसौ ॥
जीवनं सर्वभूतेषु तपश्चास्मि तपस्विषु ॥ ९ ॥
बीजं मां सर्वभूतानां विद्धि पार्थ सनातनम् ।
बुद्धिर्बुद्धिमतामस्मि तेजस्तेजस्विनामहम् ॥ १० ॥
बलं बलवतामस्मि कामरागविवर्जितम् ।
धर्माविरुद्धो भूतेषु कामोऽस्मि भरतर्षभ ॥ ११ ॥

—मी पृथ्वींतील पुण्यगंध—सुवास, अग्नींतील दीप्ति, सर्व भूतांत जीवन व तपस्व्यांमध्यें चित्तैकाग्र्यरूप किंवा उपवासरूप तप आहे. हे अर्जुना, तूं मला सर्व भूतांचें सनातन—नित्य, बीज—उत्पत्तीचें कारण जाण, तसेंच बुद्धिमानांची—विवेकशक्तिमानांची बुद्धि—अंतःकरणाची विवेकशक्ति मी आहें. जें चैतन्याचें

अभिव्यंजक, तत्त्वनिश्चयाचें सामर्थ्य तीव्र बुद्धि, तद्रूप अशा मजमध्यें सर्व बुद्धिमान् पुरुष ओत-प्रोत आहेत. तेज—प्रगल्भता, दुसऱ्याचा अभिभव—पराभव करण्याचें व दुसऱ्याकडून पराभूत न होण्याचें सामर्थ्य. अशा प्रागल्भ्यानें युक्त असलेल्या तेजस्वी लोकांचें तेज मी आहें. [ प्रागल्भ्यरूप मजमध्यें प्रागल्भ्यवान् लोक ओत-प्रोत आहेत, असा याचा भावार्थ. ] बलवानांचें बल—सामर्थ्य—ओज मी आहें. पण तें बल कसें ? तर काम-रागशून्य—काम व राग यांनीं रहित असलेलें; देहादिकांचें धारण होणें, एवढेंच ज्याचें प्रयोजन आहे, तें बल मी आहें. तसेंच धर्माच्या अविरुद्ध धर्माशीं—शास्त्रार्थाशीं विरुद्ध असलेला जो प्राण्यांतील—भूतांतील काम तो मी आहें. [ देहधारण किंवा यासारखेंच ज्याचें प्रयोजन आहे, अशा अन्न-पानादिकांविषयींचा जो काम तो मी आहें. असा याचा भावार्थ. ]

ये चैव सात्त्विका भावा राजसास्तामसाश्च ये ।
मत्त एवेति तान्विद्धि न त्वहं तेषु ते मयि ॥ १२ ॥

—अर्जुना, प्राण्यांच्या कर्मांमुळें उत्पन्न होणारे जे सत्त्वगुणकार्यरूप सात्त्विक पदार्थ, तसेच रजोगुणापासून झालेले राजस व तमोगुणापासून झालेले तामस पदार्थ, ते सर्व मजपासूनच झालेले आहेत, असें तूं समज. ते जरी मजपासून उत्पन्न होतात, तरी इतर संसारी जीव जसे त्यांच्या अधीन असतात, तसा मी त्यांच्या अधीन नाहीं. ते मात्र मजमध्यें स्थित आहेत. मी तद्वश नाहीं, उलट ते मदधीन आहेत. [ कारण मी सत्य आहें व ते सर्व कल्पित आहेत. त्यामुळें त्यांचे गुण-दोष माझ्या ठिकाणीं येत नाहींत. तसेंच त्या त्रिविधभावांना स्वातंत्र्य नाहीं. कारण ते मज ईश्वराचें कार्य असल्यामुळें मत्परतंत्र आहेत. कल्पित पदार्थ अधिष्ठानाच्या सत्तेनें व प्रतीतीनेंच सत्तावान् व प्रतीतिमान् होतात. त्यामुळें त्याला अधिष्ठानमातृत्व असतें. म्हणून ते सर्व स्वतःसत्ताशून्य असून मत्सत्ताधीन असतात असा भावार्थ. ]

त्रिभिर्गुणमयैर्भावैरेभिः सर्वमिदं जगत् ।
मोहितं नाभिजानाति मामेभ्यः परमव्ययम् ॥ १३ ॥

—हें जगत् या तीन गुणविकाररूप पदार्थांनीं—राग-द्वेष व मोह या प्रकारांनीं मोहित होत्सातें अविवेकावस्थेस प्राप्त झालें आहे. त्यामुळें गुणांहून अगदीं विलक्षण व अविनाशी अशा मला तें जाणत नाहीं.

दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया ।
मामेव ये प्रपद्यन्ते मायामेतां तरन्ति ते ॥ १४ ॥

—कारण ही वर सांगितलेल्या प्रकारची माझी गुणमयी माया-सत्त्वादि गुणसाम्यरूप अलौकिक प्रकृति दुरत्यय आहे. तिचें उल्लंघन मद्भक्तावांचून दुसऱ्या कोणालाहि करतां येत नाहीं. पण जे माझे भक्त मला शरण येतात, तेच या मायेचें उल्लंघन करूं शकतात. [ याप्रमाणें माझी दैवी व गुणमयी माया दुरत्यय असल्यामुळें सर्व धर्मांचा परित्याग करून मलाच—स्वात्मभूत मायावी ईश्वरालाच सर्व मनोभावानें—कर्मानुष्ठानादिकांची व्यग्रता न ठेवतां जे शरण येतात, ते सर्व भूतांना मोह पाडणाऱ्या या मायेला तरून जातात—संसारबंधनांतून मुक्त होतात. मायेचें अतिक्रमण केलें असतां मोहाचें अतिक्रमण केल्यासारखें होतें व त्यामुळें संसारबंध तुटतो असा याचा भावार्थ. ]

न मां दुष्कृतिनो मूढाः प्रपद्यन्ते नराधमाः ।
माययापहृतज्ञाना आसुरं भावमाश्रिताः ॥ १५ ॥

( ५ )—" तर मग सर्व मानव तुलाच शरण येऊन मायेचें उल्लंघन कां करीत नाहींत ? " म्हणून विचारशील तर सांगतों—दुराचरण करणारे अविवेकी लोक मायेनें ज्यांच्या ज्ञानाचा अपहार केला आहे व आसुर भावाचा ज्यांनीं आश्रय केला आहे, असे असतात. त्यामुळें ते अधम जन मला शरण येत नाहींत. [ माया त्यांच्या स्वरूपाला—चैतन्याला झांकून टाकते व हिंसा, असत्य इत्यादि आसुर भावांचा त्यांनीं आश्रय केलेला असतो. त्यामुळें त्यांना परमेश्वराला शरण जाण्याची इच्छाच होत नाहीं, असा याचा भावार्थ.]

चतुर्विधा भजन्ते मां जनाः सुकृतिनोऽर्जुन ।
आर्तो जिज्ञासुरर्थार्थी ज्ञानी च भरतर्षभ ॥ १६ ॥

( ६ )—पण हे अर्जुना, जे पुण्यकर्म करणारे नरोत्तम असतात, ते भगवंताचें भजन करितात. असे पुण्यवान् जन चार प्रकारचे असतात. १ आर्त, पीडा होत असलेला. २ भगवत्तत्त्व जाणण्याची इच्छा करणारा, ३ धनाची इच्छा करणारा, ४ भगवत्तत्त्व जाणणारा, असे चार प्रकारचे पुण्यवान् जन ईश्वराला भजतात. [ यांतील पहिला आर्त व तिसरा अर्थार्थी मायेचें उल्लंघन करूं शकत नाहीं. जिज्ञासु प्रथम शब्दज्ञानवान् होतो व ज्ञानी भक्त बनतो. आणि शेवटीं चवथ्या ज्ञानीभक्ताप्रमाणेंच केवळ तत्त्वसाक्षात्काराचीच इच्छा करणारा तो ज्ञानानें मायेचें उल्लंघन करितो. ]

तेषां ज्ञानी नित्ययुक्त एकभक्तिर्विशिष्यते ।
प्रियो हि ज्ञानिनोऽत्यर्थमहं स च मम प्रियः ॥ १७ ॥

( ७ )—पण या चारी भक्तांची योग्यता एकसारखीच नसते. कारण त्या चार प्रकारच्या भक्तांतील ज्ञानी—तत्त्ववेत्ता, सतत भगवानामध्यें स्थिरचित्त झालेला असतो व एका भगवानामध्येंच त्याची भक्ति असते. त्यामुळें तो सर्वांत अधिक श्रेष्ठ होय, कारण मी त्या तत्त्वज्ञाला अतिशय प्रिय असतों व तो मला अतिशय प्रिय असतो.

उदाराः सर्व एवैते ज्ञानी त्वात्मैव मे मतम् ।
आस्थितः स हि युक्तात्मा मामेवानुत्तमां गतिम् ॥ १८ ॥

—'तर मग आर्त, जिज्ञासु व अर्थार्थी हे तीन भक्त तुला प्रिय नाहींत,' असें म्हणशील, तर तसें मात्र नाहीं. हे सर्वहि उत्कृष्ट आहेत, आर्तादि तीन भक्त उत्तम आहेत खरें, पण 'आत्मवेत्ता माझा आत्माच,' असा माझा निश्चय आहे. कारण तो समाहित चित्त होऊन मला—सर्वोत्तम गतीला जाऊन पोंचण्यास प्रवृत्त झाला आहे.

बहूनां जन्मनामन्ते ज्ञानवान्मां प्रपद्यते ।
वासुदेवः सर्वमिति स महात्मा सुदुर्लभः ॥ १९ ॥

—अनेक जन्मांच्या शेवटीं त्या त्या जन्मांतील पुण्यकर्मांपासून उत्पन्न झालेली जी चित्तशुद्धि, तो ज्ञानार्थ संस्कार—वासना होय. तशा ज्ञानार्थ संस्कारांनीं युक्त अशा अनेक जन्मांच्या शेवटीं ज्याच्या ज्ञानाचा पूर्ण परिपाक झाला आहे, असा ज्ञानी मज वासुदेवाला—आपल्या प्रत्यगात्म्याला—'हें सर्व वासुदेवच आहे' अशाप्रकारें जाणतो. हें सर्व चराचर जगत् वासुदेवच आहे, अशाप्रकारें मला शरण येतो. असला ज्ञानी महात्मा अति दुर्लभ आहे.

कामैस्तैस्तैर्हृतज्ञानाः प्रपद्यन्तेऽन्यदेवताः ।
तं तं नियममास्थाय प्रकृत्या नियताः स्वया ॥ २० ॥

( ८ )—पण 'आत्माच हें सर्व आहे,' असें ज्ञान सर्वांनाच न होण्याचें कारण सांगतों—त्या त्या, पुत्र-पशु-स्वर्गादिकांच्या कामांनीं ज्यांचें विवेकज्ञान हरण केलें आहे, ते आपल्या प्रकृतीकडून नियमित होत्साते, त्या त्या नियमाचा आश्रय करून दुसऱ्या देवतांना शरण जातात. [ पुत्रादि कामांनीं ज्यांच्या विवेकज्ञानाचा अपहार केला आहे, असे ते सकाम पुरुष अभ्यांतरा-

र्जित विशेष संस्काराकडून नियमित होऊन देवतांच्या आराधनेविषयींचे जे जप-उपवास-प्रदक्षिणा-नमस्कार इत्यादि नियम सांगितले आहेत, त्यांचा आश्रय करून अन्य देवतांची आराधना करितात. त्यामुळें ते प्रत्यगात्मभूत परदेवतेला प्राप्त होत नाहींत. तर अन्य देवतांना प्राप्त होतात. ]

यो यो यां यां तनुं भक्तः श्रद्धयार्चितुमिच्छति ।
तस्य तस्याचलां श्रद्धां तामेव विदधाम्यहम् ॥ २१ ॥

—त्या कामी पुरुषांपैकीं जो जो कामीभक्त ज्या ज्या देवतेच्या तनूची श्रद्धेनें पूजा करण्याची इच्छा करितो, त्याच्या त्याच्या त्याच श्रद्धेला मी स्थिर करितों. [ भगवानांनीं स्थिर केलेल्या व पूर्वसंस्काराधीन असलेल्या श्रद्धेनें विशेष देवतेची आराधना करणाऱ्या पुरुषालाहि भगवानांच्या अनुग्रहानेंच फलप्राप्ति होते. ]

स तया श्रद्धया युक्तस्तस्या राधनमीहते ।
लभते च ततः कामान्मयैव विहितान्हि तान् ॥ २२ ॥

—हाच सिद्धान्त अधिक विशद करितों—तो देवतापूजक मीं स्थिर केलेल्या त्या श्रद्धेनें युक्त होत्साता त्या देवतातनूचें आराधन करितो आणि त्या आराधित देवतातनूपासुन कर्मफलविभागाचें ज्ञान असल्यामुळें मींच सर्वज्ञानें निर्माण केलेल्या त्या इष्ट कामांस प्राप्त होतो. आराधित देवतेच्या प्रसादानेंच कांहीं फल मिळत नाहीं. [ प्रत्येकाचें कर्म व फल यांचा विभाग जाणणाऱ्या सर्वज्ञ भगवानाला देवतांचें अधिष्ठातृत्व आहे, त्यामुळें मुख्य फलदाता तोच आहे. कारण ' एको बहूनां यो विदधाति कामान्०'—जो एकच परमेश्वर अनेक जीवांचे इष्ट पदार्थ त्यांस निर्माण करून देतो०' अशी श्रुति आहे.]

अन्तवत्तु फलं तेषां तद्भवत्यल्पमेधसाम् ।
देवान्देवयजो यान्ति मद्भक्ता यान्ति मामपि ॥ २३ ॥

—पण ज्याअर्थी ते कामी पुरुष नाशिवंत फलाचीं साधनें करणारे-विनाशी फल देणाऱ्या कर्मांचें अनुष्ठान करणारे व अविवेकी असतात, त्याअर्थी अल्पप्रज्ञ असलेल्या त्यांचें तें फल अंतवत्-विनाशीच असतें. [ मतिमंद असल्यामुळेंच ते अनित्य फल देणाऱ्याहि कामामध्यें निष्ठा ठेवितात. ] देवांचें यजन जे करितात ते देवयज-देवपूजक देवांस प्राप्त होतात व माझे भक्त मलाच येऊन पोंचतात. [याप्रमाणें देवतांची व माझी आराधना करण्यांत आयास जरी एक-

सारखेच असले, तरी देवतापूजकांना अल्पकाल टिकणारें फल मिळतें व माझ्या पूजकांना अनंत फल मिळतें. तथापि अनंत फल संपादन करण्यासाठीं ते मलाच शरण येत नाहींत. लोक माझेच भक्त बनत नाहींत. अरे, अरे! खरोखर ते फार वाईट गोष्ट करितात. अशी भगवान् सर्वांविषयीं आपली अनुकंपा प्रकट करीत आहेत. ईश्वराचाच भक्त न होण्याचें कारण अविवेकावांचून दुसरें कांहीं नाहीं. ]

अव्यक्तं व्यक्तिमापन्नं मन्यन्ते मामबुद्धयः ।
परं भावमजानन्तो ममाव्ययमनुत्तमम् ॥ २४ ॥

—अर्जुना, अविवेकी जन माझ्या अक्षय, उत्कृष्ट, परमस्वरूपास जाणत नाहींत. उलट पूर्वीं अव्यक्त–अप्रकट असलेल्या मला आतां व्यक्त–प्रकट झालेला समजतात. [ माझें श्रेष्ठ निरुपाधिक स्वरूप न जाणणारे अविवेकी 'पूर्वीं अव्यक्त असलेला मी आतां व्यक्त झालों आहें' असें समजतात, हा याचा भावार्थ. ]

नाहं प्रकाशः सर्वस्य योगमायासमावृतः ।
मूढोऽयं नाभिजानाति लोको मामजमव्ययम् ॥ २५ ॥

—'अविवेकरूप अज्ञान भगवन्निष्ठेला प्रतिबंध करितें,' असें जें वर सांगितलें आहे, त्या अज्ञानाचेंच कारण मी आतां सांगतों.—गुणसाम्यरूप योगमायेनें आच्छादित झालेला मी सर्वांच्याच ज्ञानाचा विषय होत नाहीं—सर्वांनाच प्रत्यक्ष दिसत नाहीं. हा मूढ झालेला लोक अज व अव्यय अशा मला सर्व प्रकारें जाणत नाहीं.

गारुड्याची माया त्याच्या ज्ञानाला प्रतिबंध करीत नाहीं, पण ती गारुड पहाणाऱ्या लोकांच्या ज्ञानाला प्रतिबंध करिते, हें प्रसिद्ध आहे. त्याचप्रमाणें ईश्वराची माया ईश्वराच्या ज्ञानाला प्रतिबंध करीत नाहीं, पण इतर जीवांच्या ज्ञानाला प्रतिबंध करिते. ज्याअर्थीं असें आहे, त्याअर्थीं—

वेदाहं समतीतानि वर्तमानानि चार्जुन ।
भविष्याणि च भूतानि मां तु वेद न कश्चन ॥ २६ ॥

—हे अर्जुना, मी भूत, भविष्यत् व वर्तमान या तिन्ही काळांतील भूतांना जाणतों. पण मला कोणीच जाणत नाहीं. [समतीत–मागें होऊन गेलेलीं भूतें व वर्तमान समयीं सृष्टींत विद्यमान् असलेलीं भूतें यांस मी जाणतों. भविष्य-

त्काळीं होणाऱ्या भूतांनाहि मी जाणतों. पण मला एकट्या माझ्या भक्तावांचून इतर कोणी जाणत नाहीं आणि माझ्या तत्त्वाचें—स्वरूपाचें ज्ञान नसल्यामुळें मला कोणी भजत नाहीं. एखादा विवेकवानच मला भजतो, बाकीचे विवेक-शून्य मला भजत नाहींत. ]

इच्छाद्वेषसमुत्थेन द्वन्द्वमोहेन भारत ।
सर्वभूतानि संमोहं सर्गे यान्ति परन्तप ॥ २७ ॥

—मूळ अज्ञानाहून आणखी दुसऱ्या कोणत्या बरें कारणानें तत्त्वज्ञानाला प्रतिबंध होतो म्हणून विचारशील तर सांगतों—हे शत्रूंना ताप देणाऱ्या अर्जुना, सर्व प्राणी उत्पत्तीच्या वेळींच राग व द्वेष यांपासून उत्पन्न झालेल्या शीतोष्ण-सुख-दुःखादि द्वंद्व-मोहानें अविवेकास प्राप्त होतात. [ सुख व त्याचें निमित्त प्राप्त झालें असतां त्याविषयीं इच्छा आणि दुःख व दुःखनिमित्त प्राप्त झालें असतां त्याविषयीं द्वेष उत्पन्न होतो. ते दोन्ही उत्पन्न होतांच प्राण्यांच्या बुद्धीला आपल्या अधीन करून घेतात व आत्मतत्त्वज्ञानाला प्रतिबंध करणाऱ्या मोहाला उत्पन्न करितात. इच्छा व द्वेष यांनीं दूषित झालेल्या चित्तांत लौकिक पदार्थांचेंहि जर यथार्थ ज्ञान संभवत नाहीं, तर ज्यांचें ज्ञान होण्यास अहंकारादि प्रतिबंध एकसारखे विरोध करीत असतात, त्या अलौकिक प्रत्यगात्म्याचें यथार्थ ज्ञान—सम्यग्ज्ञान कसें होणार ! सर्व भूतें इच्छा-द्वेषजन्य द्वंद्वमोहानें संमूढ होत्सातीं जन्माचे वेळींच मूढतेला प्राप्त होतात. उत्पन्न होणारीं सर्व भूतें मोहवश होऊनच उत्पन्न होतात. ज्याअर्थीं असें आहे त्याअर्थीं त्या द्वंद्व-मोहानें ज्यांचें प्रज्ञान प्रतिबद्ध झालें आहे, अशीं सर्व भूतें संमोहित होत्सातीं त्यांचा आत्माच असलेला जो मी त्या मला जाणत नाहींत व त्यामुळेंच मला आत्मभावानें भजत नाहींत.]

येषां त्वन्तगतं पापं जनानां पुण्यकर्मणाम् ।
ते द्वन्द्वमोहनिर्मुक्ता भजन्ते मां दृढव्रताः ॥ २८ ॥

( ९ )—पण ज्या पुण्यकर्म करणाऱ्या जनांचें पाप क्षीण झालेलें असतें, ते पुण्यवान् लोक द्वंद्वमोहांपासून सर्वथा मुक्त व दृढव्रत होत्साते मला भजतात. [ इच्छा-द्वेषादि द्वंद्वापासून होणाऱ्या मोहाची निवृत्ति पुण्याचरणामुळें होते आणि मोहनिवृत्तीचें पर्यवसान भगवन्निष्ठेंत होतें. परमार्थतत्त्व हें असेंच आहे, त्याहून अन्य प्रकारचें नाहीं. अशाप्रकारें ज्यांचें विज्ञान निश्चित असतें, ते दृढव्रत होत. ]

जरामरणमोक्षाय मामाश्रित्य यतन्ति ये ।
ते ब्रह्म तद्विदुः कृत्स्नमध्यात्मं कर्म चाखिलम् ॥ २९ ॥

—जे जरा व मरण यांपासून मुक्त होण्यासाठीं मज परमेश्वराचा आश्रय करून माझ्याच ठिकाणीं ज्यांनीं आपलें चित्त समाहित केलें आहे, असे होत्साते प्रयत्न करितात, ते परब्रह्माला जाणतात. समस्त प्रत्यगात्म-विषयक तत्त्वाला ओळखतात व समग्र कर्म जाणतात. [ विषयांपासून विमुख होऊन भगवन्निष्ठ होणें म्हणजेच परमेश्वराचा आश्रय करणें आहे. भगवन्निष्ठा सिद्ध होण्यासाठीं यज्ञादि बहिरंग व श्रवणादि त्याहून अंतरंग साधनांचें अनुष्ठान करणें हाच प्रयत्न येथें विवक्षित आहे. ‘ पूर्वी जगाचें उपादान परब्रह्म सांगितलें आहे. तेव्हां त्या ब्रह्माला कसें जाणतात ?’ अशी आकांक्षा झाली असतां समस्त अध्यात्मवस्तु व सकल कर्म या रूपानें त्याला जाणतात. असें येथें सांगितलें आहे. ]

साधिभूताधिदैवं मां साधियज्ञं च ये विदुः ।
प्रयाणकालेऽपि च मां ते विदुर्युक्तचेतसः ॥ ३० ॥

—जे अधिभूत, अधिदैव व अधियज्ञ यांसह मला जाणतात, ते समाहित चित्त-शांतचित्त भक्त मरणाच्या वेळींहि मला जाणतात. [ अध्यात्म, कर्म, अधिभूत, अधिदैव व अधियज्ञ हें पंचक ब्रह्मच आहे, असें जे जाणतात. त्या यथोक्त ज्ञानवान् व समाहितचित्त पुरुषाचें भगवत्तत्त्वज्ञान अल्पकालींहि अखंड —अप्रतिहत रहातें, ते समाहितचित्त ज्ञानी आपत्कालींहि मला जाणतात, या श्लोकांतील ‘ प्रयाणकालेऽपि च ’ येथील ‘ अपि च ’ या दोन अव्ययांवरून मरणसमयीं इंद्रियसमुदाय व्यग्र झाल्यामुळें ज्ञानाचा जरी संभव नसला तरी पूर्वोक्त ज्ञानी समाहितचित्त पुरुषाला भगवतत्त्वज्ञान सुलभ आहे, हें व्यक्त होतें. या सातव्या अध्यायांत उत्तम अधिकाऱ्यासाठीं ज्ञेय ब्रह्माचें निरूपण करणाऱ्या भगवानांनीं त्यासाठींच त्याच्या सर्वात्मत्वादिकांचा उपदेश केला. परा व अपरा प्रकृतींच्या द्वारा ब्रह्म सर्वांचें कारण आहे, हें सांगितलें आणि हें सर्व करीत असतांनाच तत्पदवाच्य व तत्पदलक्ष्य वस्तूचाहि निर्देश केला. माया शक्तिमान् ईश्वर हें तत् या पदाचें वाच्य आणि शुद्ध-निर्गुण ब्रह्म हें त्याचें लक्ष्य आहे. ]

(येथें भगवद्गीतेचा ‘ ज्ञानविज्ञानयोग ’ नांवाचा सातवा अध्याय समाप्त झाला.) ६. ३. ३१.

---

## अध्याय ३२ वा.

### ( गीताध्याय ८ वा तारकब्रह्मयोग. )

[ १ अर्जुनाचे ब्रह्मादिकांविषयीं प्रश्न व भगवानांचीं उत्तरें. २ भगवच्चिंतन करणारा भगवानालाच प्राप्त होतो. ३ योगधारणापूर्वक एकाक्षर ब्रह्माची प्राप्ति करून घेण्याचा उपाय. ४ भगवच्चिंतन करणारांना परमसिद्धि मिळते. ५ ब्रह्मलोकान्त सर्व फलें अनित्य असण्याचें कारण. ६ परमगतिरूप ईश्वर अनन्यभक्तीनें सुलभ होतो. ७ शुक्ल-कृष्णगति व त्याचें फल. ]

सातव्या अध्यायाच्या शेवटीं 'येषां त्वन्तगतं पापं०' इत्यादि वचनांनीं ज्या ब्रह्मादिकांचें अनुसंधान करावयास सांगितलें व मरणसमयीं जें भगवानांचें स्मरण सांगितलें तें सर्व जाणण्याच्या इच्छेनें अर्जुनानें असा प्रश्न केला—

अर्जुन उवाच—

किं तद्ब्रह्म किमध्यात्मं किं कर्म पुरुषोत्तम ।
अधिभूतं च किं प्रोक्तमधिदैवं किमुच्यते ॥ १ ॥
अधियज्ञः कथं कोऽत्र देहेऽस्मिन्मधुसूदन ।
प्रयाणकाले च कथं ज्ञेयोऽसि नियतात्मभिः ॥ २ ॥

**अर्जुन**—हे पुरुषोत्तमा, तें ब्रह्म काय आहे? सोपाधिक कीं निरुपाधिक? या शरीरांत रहाणारें अध्यात्म काय आहे? कर्म काय आहे आणि अधिभूत म्ह० भूतांतील तत्त्व काय सांगितलें आहे? अधिदैव कशाला म्हणतात? हे मधुसूदना, यांमध्यें अधियज्ञ कोणता? त्याचें चिंतन कसें करावें? तो या देहांत आहे कीं कोठें? आणि मरणाच्या वेळीं शांतचित्त पुरुषांकडून तूं कसा जाणण्यास योग्य आहेस?

श्रीभगवानुवाच—

अक्षरं ब्रह्म परमं स्वभावोऽध्यात्ममुच्यते ।
भूतभावोद्भवकरो विसर्गः कर्मसंज्ञितः ॥ ३ ॥

—या प्रश्नांचा क्रमानें निर्णय करण्यासाठीं श्रीकृष्ण म्हणाले—जें निरतिशय अविनाशी तत्त्व तेंच ब्रह्म आहे. त्या परम अक्षर ब्रह्माचाच प्रत्येक देहांतील प्रत्यगात्मभाव—स्वभाव, हेंच अध्यात्म होय. देहापासून साक्षी परब्रह्मापर्यंत उत्तरोत्तर आंत आंत असलेलें जें जीवात्म तत्त्व तेंच 'अध्यात्म' या शब्दानें सांगितलें जातें. परब्रह्मच देहादिकांत प्रवेश करून जीवात्मत्वाचा अनुभव घेतें. याविषयीं 'तत्सृष्ट्वा तदेवानुप्राविशत्' त्याला उत्पन्न करून त्यांतच

मागून प्रविष्ट झालें, अशी तैत्तिरीय श्रुति प्रमाण आहे. भूतांची उत्पत्ति करणारा जो देवतोद्देशानें चरु-पुरोडाशादिकांचा त्याग हेंच कर्म आहे. [ द्रव्य-त्यागरूप यज्ञ हेंच कर्म, याच बीजभूत कर्मसंज्ञक यज्ञापासून वृष्टयादिकांच्या क्रमानें चराचर भूतें—प्राणीशरीरें उत्पन्न होतात. ]

अधिभूतं क्षरो भावः पुरुषश्चाधिदैवतम् ।
अधियज्ञोऽहमेवात्र देहे देहभृतां वर ॥ ४ ॥

—आणखी तीन प्रश्नांचीं उत्तरें—विनाशीभाव हे सर्व भूतांतील—प्राण्यांतील तत्त्व आहे. सर्वांच्या शरीरांत रहाणारा पुरुष हेंच देवांतील तत्त्व आहे. हे देहवानांतील श्रेष्ठ अर्जुना, या देहांत अधियज्ञ—यज्ञाभिमानिनी देवता मीच आहें. [ सर्व कार्यसमूह हेंच अधिभूत होय. ज्यानें हें सर्व परिपूर्ण आहे किंवा शरीराख्य पुरांत जो रहातो, तो पुरुष. अर्थात् विराट्-शरीरास प्राप्त होऊन आदित्यमण्डलादिदेवतांमध्यें—आंत राहिलेला—हिरण्यगर्भ—लिंगात्मा व्यष्टींच्या इंद्रियांवर अनुग्रह करणारा, हा येथील 'पुरुष'-शब्दाचा अर्थ आहे. तो पुरुषच अधिदैवत आहे. अधियज्ञ—सर्व यज्ञांची अभिमानिनी देवता. कारण याविषयीं 'यज्ञ हाच विष्णु आहे' ही श्रुति प्रमाण आहे. परादेवताच अधियज्ञशब्दानें सांगितली जाते. ती परा देवता 'विष्णुच मी आहें'—ती परब्रह्माहून भिन्न नाहीं, तर अत्यंत अभिन्न आहे. या शास्त्रीय व्यवहार-भूमींतील या देहांत जो यज्ञ आहे, त्याचा मी अधियज्ञ आहें. म्ह० मीच या देहांतील यज्ञाभिमानिनी देवता आहें. तात्पर्य अध्यात्मादि पूर्वोक्त पांची पदार्थ ब्रह्ममय आहेत असें विद्वान् पहातो. ]

अन्तकाले च मामेव स्मरन्मुक्त्वा कलेवरम् ।
यः प्रयाति स मद्भावं याति नास्त्यत्र संशयः ॥ ५ ॥

( २ )—आतां शेवटल्या सातव्या प्रश्नाचें उत्तर—आणि मरणसमयीं माझेंच स्मरण करीत शरीराचा त्याग करून जो जातो, तो मद्भावास—वैष्णव-तत्त्वास प्राप्त होतो, यांत संशय नाहीं.

अंतकालीं भगवानाचें ध्यान करणाऱ्या पुरुषाला भगवत्प्राप्ति होते, हा केवल माझ्यापुरताच नियम नाहीं, तर—

यं यं वापि स्मरन्भावं त्यजत्यन्ते कलेवरम् ।
तं तमेवैति कौन्तेय सदा तद्भावभावितः ॥ ६ ॥

—अर्जुना, पुरुष अन्तसमयीं ज्या ज्या पदार्थांचें स्मरण करीत शरीराचा त्याग करितो, तो त्या त्या पदार्थांच्या वासनेचा दीर्घ अभ्यास केलेला पुरुष त्या त्या पदार्थालाच प्राप्त होतो. [ जन्मभर जी वासना अभ्यासानें दृढ केलेली असेल, तीच त्याला मरणसमयीं आठवते. अन्तसमयीं शरीरेंद्रियादि जरी व्याकुल होत असलीं, तरी दीर्घ अभ्यासानें त्यावेळीं भगवानाचें स्मरण जसें होऊं शकतें, तसेंच तें इतर स्मृत पदार्थांचेंहि होतें. ]

तस्मात्सर्वेषु कालेषु मामनुस्मर युध्य च ।
मय्यर्पितमनोबुद्धिर्मामेवैष्यस्यसंशयः ॥ ७ ॥

—ज्याअर्थी याप्रमाणें अन्त्यवासना दुसऱ्या देहाच्या प्राप्तीचें कारण आहे, त्याअर्थीं, सवकालीं—अहो-रात्र माझें स्मरण कर आणि युद्ध कर. म्हणजे सर्व-कालीं मोठ्या आदरानें निरंतर भगवदनुसंधान करीत असतानांच त्याच्या-बरोबर युद्ध या स्वधर्माचें आचरण कर. त्यामुळें माझ्या ठिकाणींच ज्यानें आपलें मन व बुद्धि अर्पिली आहे, असा तूं मलाच प्राप्त होशील, यांत संशय नाहीं.

अभ्यासयोगयुक्तेन चेतसा नान्यगामिना ।
परमं पुरुषं दिव्यं याति पार्थाऽनुचिन्तयन् ॥ ८ ॥

( ३ )—हे अर्जुना, चित्ताला माझ्या ठिकाणीं स्थिर करण्याचा वारंवार प्रयत्न करणें, याच अभ्यासरूपयोगानें—उपायानें युक्त असलेल्या व मला सोडून दुसऱ्या कोणत्याहि विषयाकडे न जाणाऱ्या अशा चित्तानें परम पुरु-षाचें ध्यान करणारा भक्त निरतिशय व सूर्यमंडलांत व्यक्त होणाऱ्या पुरुषाला प्राप्त होतो. [ पूर्वश्लोकांत सांगितल्याप्रमाणें अनुष्ठान करणारा पुरुष अन्तकालीं भगवानाला प्राप्त होतो. याविषयीं स्थिर चित्तानें भगवानाचें चिंतन करणें हें कारण सांगितलें आहे. ]

कविं पुराणमनुशासितार-
मणोरणीयांसमनुस्मरेद्यः ।
सर्वस्य धातारमचिन्त्यरूप-
मादित्यवर्णं तमसः परस्तात् ॥ ९ ॥

—कोणत्या विशेषणांनीं विशिष्ट अशा पुरुषाचें अनुचिंतन करणारा त्याला प्राप्त होतो, तें सांगतों—जो कोणी सर्वज्ञ, नित्य, सर्व जगाचा शास्ता, सूक्ष्मा-हून अति सूक्ष्म, सर्व प्राण्यांना कर्माचें फल देणारा, ज्याचें रूप अचिंत्य आहे,

सूर्याच्या प्रकाशाप्रमाणें ज्याचा नित्य चैतन्य प्रकाश आहे व जो अज्ञानलक्षण मोहान्धकाराच्या पलीकडे आहे, अशा मज ईश्वराचें मरणसमयीं ध्यान करितो, तो त्या मलाच प्राप्त होतो. [ मूळ कारण अज्ञान व त्याचें कार्य, या दोहोंच्या पलीकडे असलेल्या त्यांचा ज्यांना स्पर्शहि झालेला नाहीं, अशा अर्थात् कवि, पुराण, इत्यादि विशेषणांनीं विशिष्ट अशा प्रकारचा सतत स्मरण करणारा त्या पूर्वोक्त दिव्य पुरुषाला प्राप्त होतो. ]

प्रयाणकाले मनसाचलेन
भक्त्या युक्तो योगबलेन चैव ।
भ्रुवोर्मध्ये प्राणमावेश्य सम्यक्
स तं परं पुरुषमुपैति दिव्यम् ॥ १० ॥

—मरणसमयीं भक्तीनें व चित्ताचें समाधान याच बलानें युक्त होऊन भुवयांच्या मध्यें प्राणाला सावधानपणानें स्थापून जो भक्त अचल मनानें पूर्वोक्त पुरुषाचें चिंतन करितो, तो त्या श्रेष्ठ दिव्य पुरुषाला प्राप्त होतो. [मरणाच्या वेळीं भगवानाच्या चिंतनांविषयीं फारच प्रयत्न केला पाहिजे. यास्तव त्यावेळीं भगवदनुस्मरणापासून न ढळणाऱ्या मनानें विषयचिंतन सोडून ईशचिंतन करावें. परमात्म्याविषयीं परम प्रेमानें युक्त व्हावें व आत्मस्वरूपांत चित्ताचें जें स्थैर्य त्याच बलानें ईशस्मरणास समर्थ व्हावें. चित्त स्वभावतःच विषयांकडे धांवत असतें, म्हणून त्याला विषयविमुख करून कमलाकार हृदयांत–परमात्म्याच्या स्थानांत मोठ्या यत्नानें स्थिर करावें. त्यानंतर ‘ इडा व पिंगला ’ या नांवाच्या उजवीकडील व डावीकडील अशा ज्या दोन नाड्या बाहेर निघाल्या आहेत, त्यांचा निरोध करावा. नंतर त्याच हृदयाच्या अग्रापासून वर जाण्याचें जिचें शील आहे, अशा सुषुम्ना नाडीनें हृदयांतील प्राणाला वर चढवून कंठांत लोंबणाऱ्या मांसखंडाच्या द्वारा दोन भुवयांच्या मध्यें त्याचा प्रवेश करवावा. म्हणजे सावधानपणानें ब्रह्मरंध्रांतून बाहेर पडून ‘ कविं पुराणं० ’ इत्यादि विशेषणांनीं विशिष्ट अशा परम पुरुषास तो योगी प्राप्त होतो. याप्रमाणें भगवानांचें अनुस्मरण सफल असल्यामुळें याहि आणखी एका कारणानें तें अवश्य करावें. ]

यदक्षरं वेदविदो वदन्ति
विशन्ति यद्यतयो वीतरागाः ।
यदिच्छन्तो ब्रह्मचर्यं चरन्ति
तत्ते पदं संग्रहेण प्रवक्ष्ये ॥ ११ ॥

—वेदार्थ जाणणारे ज्याला अविनाशी म्हणतात, ज्यांचा राग–आसक्ति नाहींशी झाली आहे, असे विरक्त यति ज्यांत प्रवेश करितात व ज्याला जाणण्याची इच्छा करणारे ब्रह्मचर्यव्रत (गुरूपाशीं राहून) पाळतात, तें अक्षरसंज्ञक पद तुला संक्षेपानें मी सांगेन. [ वेदार्थवेत्ते अर्थात् आत्मज्ञानी ब्राह्मण ज्या अक्षराचें 'अस्थूल, अनणु' इत्यादि निषेधमुखानें वर्णन करितात, निष्काम–विरक्त यति–संन्यासी ज्ञानप्राप्ति होतांच ज्यांत प्रवेश करितात व ज्याला जाणण्याच्या इच्छेनें गुरुसमीप राहून जिज्ञासु ब्रह्मचर्यव्रत पाळतात, तें प्राप्त करून घेण्यास योग्य असलेलें पद मी तुला संक्षेपतः सांगतों. ]

प्रश्नोपनिषदांत व काठकोपनिषदांत 'स यो ह वै०' व 'सर्वे वेदाः०' इत्यादि वचनांनीं मंद-मध्यम बुद्धीच्या अधिकाऱ्यांसाठीं ब्रह्मज्ञानाचें साधन या रूपानें ओंकाराची उपासना सांगितली आहे. ओंकार हें ब्रह्माचें नांव आहे, या रूपानें किंवा प्रतिमेप्रमाणें तो ज्याचें प्रतीक आहे, त्याची उपासना उक्त असून तिचें कालांतरीं मुक्ति मिळणें हें फल सांगितलें आहे. तसेंच येथेंहि 'कविं पुराणं०' 'यदक्षरं०' या वचनांनीं सांगितलेल्या परब्रह्माचें 'ओंकारोपासन' व प्रसंगप्राप्त गति इत्यादि सांगावें, यांसाठीं या अध्यायाचा पुढील भाग आरंभिला आहे.

> सर्वद्वाराणि संयम्य मनो हृदि निरुध्य च ।
> मूर्ध्न्याधायात्मनः प्राणमास्थितो योगधारणाम् ॥ १२ ॥
> ओमित्येकाक्षरं ब्रह्म व्याहरन्मामनुस्मरन् ।
> यः प्रयाति त्यजन्देहं स याति परमां गतिम् ॥ १३ ॥

—श्रोत्रादि सर्व ज्ञानद्वारांचें संयमन करून, मनाचा हृदयांत निरोध करून, वायूलाहि सर्व बाजूंनीं निरुद्ध करून व त्याला हृदयांत स्थिर करून हृदयांतून निघालेल्या सुषुम्ना नाडीनें कंठ, भ्रूमध्य, ललाट या क्रमानें प्राणांचें मूर्ध्नस्थानीं आधान करून योगधारणेवर आरूढ झालेला जो योगी 'ओं' या एकाक्षर ब्रह्माचा उच्चार करीत व त्याचा अर्थ जो मी त्याचें अनुस्मरण करीत शरीर सोडून जातो, तो सर्वोत्तम गतीला प्राप्त होतो.

'अहो, पण ज्यांना वायूचा निरोध करतां येत नाहीं, त्यांना असें स्वेच्छा मरण येणें शक्य नाहीं. तेव्हां अशा लोकांना परमगति कशी मिळणार?' म्हणून विचारशील तर सांगतों—

अनन्यचेताः सततं यो मां स्मरति नित्यशः ।
तस्याहं सुलभः पार्थ नित्ययुक्तस्य योगिनः ॥ १४ ॥

( ४ )—ईश्वरावांचून दुसऱ्या कोणत्याहि विषयांत चित्त न ठेवणारा जो साधक प्रतिदिवशीं निरंतर माझें चिंतन करितो, त्या सदा शांतचित्त योग्याला मी सुलभ आहें. [ अनन्यचित्त योगी सतत व सर्वदा मज परमेश्वराला नित्यशः स्मरतो. सहा महिने किंवा वर्षभर नव्हे, तर यावज्जीव—मरेपर्यंत निरंतर जो माझें स्मरण करितो, त्या योग्याला मी सुलभ—अनायासानें प्राप्त होण्यासारखा आहें. यास्तव अनन्यचित्त होऊन माझ्या ठिकाणीं सदा समाहित व्हावें. ]

मामुपेत्य पुनर्जन्म दुःखालयमशाश्वतम् ।
नाप्नुवन्ति महात्मानः संसिद्धिं परमां गताः ॥ १५ ॥

—मी सुलभ झाल्यामुळें 'मोक्ष'-संज्ञक श्रेष्ठ सिद्धीला प्राप्त झालेले महात्मे माझ्या स्वरूपास प्राप्त होऊन सर्व दुःखाचें आगर—घर व अस्थिर अशा पुनर्जन्मास प्राप्त होत नाहींत.

आब्रह्मभुवनाल्लोका पुनरावर्तिनोऽर्जुन ।
मामुपेत्य तु कौन्तेय पुनर्जन्म न विद्यते ॥ १६ ॥

—'पण ईश्वरावांचून दुसऱ्या श्रेष्ठ फलाला प्राप्त झालेले पुरुष पुनर्जन्म कां घेतात?' म्हणून विचारशील तर सांगतों—अर्जुना, ब्रह्मभुवनासह सर्व लोक पुनः पुनः नाश पावून उत्पन्न होणारे आहेत. परंतु हे कुंतीपुत्रा! मला प्राप्त होऊन पुनर्जन्म घ्यावा लागत नाहीं.

'पण ब्रह्मलोकासह सर्व लोक पुनरावर्ती कां आहेत? व तेथें गेलेल्या लोकांना पुनः पुनः जन्म कां घ्यावा लागतो?' म्हणून विचारशील तर ते ब्रह्मलोकान्त सर्व लोक कालानें परिच्छिन्न आहेत, म्हणून पुनः पुनः त्यांची आवृत्ति होते. ते कालानें परिच्छिन्न कसे आहेत, तेंच आतां सांगतों—

सहस्रयुगपर्यन्तमहर्यद्ब्रह्मणो विदुः ।
रात्रिं युगसहस्रान्तां तेऽहोरात्रविदो जनाः ॥ १७ ॥

( ५ )—दिवस व रात्र यांना जाणणारे ते प्रसिद्ध लोक ब्रह्मदेवाचा जो दिवस तो एक सहस्र युगांनीं व त्याची रात्रहि तितक्याच युगांनीं समाप्त होणारी आहे असें सांगतात. [ ब्रह्मदेवाच्या दिवसाचें प्रमाण आमचीं एक

सहस्र चतुर्युगें किंवा देवांचीं एक सहस्र युगें हें आहे व रात्रीचेंहि प्रमाण तितकेंच आहे, असें कालवेत्ते जाणतात. आमचीं कृत, त्रेता, द्वापर व कलि या चार युगांचें मिळून देवांचें एक युग होतें. म्हणून देवांचीं एक सहस्र युगें म्हणजे मानवांचीं एक सहस्र चतुर्युगें होत. याप्रमाणें ब्रह्मदेवाच्या आयुष्याचें प्रमाणहि कालपरिच्छिन्न असल्यामुळें त्याचा नाश होतो व त्याच्या बरोबर तेथील लोकांची पुनरावृत्ति होते.]

अव्यक्ताद्व्यक्तयः सर्वाः प्रभवन्त्यहरागमे ।
रात्र्यागमे प्रलीयन्ते तत्रैवाव्यक्तसंज्ञके ॥ १८ ॥

—'ब्रह्मदेवाच्या दिवसां व रात्रीं काय होतें' म्हणून विचारशील तर सांगतों—प्रजापति जागा झाला असतां त्याच्या दिवसाचा आरंभ होतो, तेव्हां त्याच्या स्वापावस्थेपासून स्थावर-जंगमरूप सर्व प्रजा अभिव्यक्त होतात. तो निजला म्हणजे त्याची रात्र सुरू होते व तत्क्षणीं दिवसाच्या आरंभीं उत्पन्न झालेले सर्व प्राणी त्याच्या त्याच स्वापावस्थेंत लीन होतात.

'अकृत-अभ्यागम व कृतविप्रणाश'[1] या दोषांच्या परिहारासाठीं बंध-मोक्ष-शास्त्राची प्रवृत्ति व्यर्थ नाहीं, हें प्रदर्शित करण्यासाठीं व अविद्यादि दोषांमुळें पुनः पुनः जन्म घेऊन मरणें या संसाराविषयीं वैराग्य यावें म्हणून **भगवान्** म्हणतात—

भूतग्रामः स एवायं भूत्वा भूत्वा प्रलीयते ।
रात्र्यागमेऽवशः पार्थ प्रभवत्यहरागमे ॥ १९ ॥

—हे पार्था, तोच हा भूतसमुदाय–पूर्वकल्पांतील तोच हा स्थावर-जंगमरूप भूतसमूह प्रजापतीच्या दिवसाचा आरंभ होतांच पुनः पुनः उत्पन्न होऊन त्याची रात्र सुरू होतांच पुनः पुनः लीन होतो. रात्र होतांच प्रळयाचा अनुभव घेणाऱ्या व दिवसाचा आरंभ होतांच जन्म घेणाऱ्या प्राणिसमूहाला एकसारखेंच कर्मपारतंत्र्य आहे.

परस्तस्मात्तु भावोऽन्योऽव्यक्तोऽव्यक्तात्सनातनः ।
यः स सर्वेषु भूतेषु नश्यत्सु न विनश्यति ॥ २० ॥
अव्यक्तोऽक्षर इत्युक्तस्तमाहुः परमां गतिम् ।
यं प्राप्य न निवर्तन्ते तद्धाम परमं मम ॥ २१ ॥

---

१ या शब्दांचा अर्थ खंड ३ पृ० ३२ वर सविस्तर दिला आहे.

—पण त्या अव्यक्ताहून निराळा, अगदीं विलक्षण, इंद्रियांचा विषय न होणारा व नित्य, असा जो भाव आहे तो, सर्व भूतें नाश पावत असतांनाहि नाश पावत नाहीं. जो हा अव्यक्त व अक्षर म्हणून म्हटलेला भाव, त्यालाच परमा गति म्हणतात. ज्या भावाला प्राप्त होऊन हे सर्व जीव पुनः संसार-मार्गांत परत येत नाहींत, तें माझें परम स्थान–परम पद आहे. [ विनाश पावणारा प्रत्येक विकार पुरुषापर्यंत विनाश पावतो. 'अक्षर'-संज्ञक पुरुष मात्र विनाश पावत नाहीं. कारण त्याच्या विनाशाचें कांहीं निमित्तच संभवत नाहीं. ]

पुरुषः स परः पार्थ भक्त्या लभ्यस्त्वनन्यया ।
यस्यान्तःस्थानि भूतानि येन सर्वमिदं ततम् ॥ २२ ॥

( ६ )—हे अर्जुना, ज्याच्या आंत हीं सर्व भूतें आहेत व ज्यानें हें सर्व व्यापिलें आहे, तो परम पुरुष अनन्य भक्तीनेंच प्राप्त होण्याजोगा आहे. [ आकाशानें जसें घटादिक व्यापिलेलें असतें, त्याप्रमाणें पुरुषानें हें सर्व व्यापिलें आहे व ज्याच्यामध्यें हीं सर्व कार्यरूप भूतें रहातात, तो श्रेष्ठ पुरुष ज्ञानलक्षण आत्मविषयक अनन्य भक्तीनेंच प्राप्त होतो. ]

प्रणवामध्यें ज्यांनीं आपली ब्रह्मबुद्धि स्थिर केली आहे, त्यामुळें जे कालां-तरीं–कल्पान्तीं मुक्तीला पात्र आहेत, त्यांना उत्तर मार्ग सांगावा व त्या मार्गाच्या स्तुतीसाठीं दक्षिण मार्गाचाहि उपन्यास करावा, म्हणून भगवान् म्हणतात—

यत्र काले त्वनावृत्तिमावृत्तिं चैव योगिनः ।
प्रयाता यान्ति तं कालं वक्ष्यामि भरतर्षभ ॥ २३ ॥

( ७ )—हे कौंतेया, ज्या कालीं मृत झालेले योगी–ध्यायी–उपासक अना-वृत्तीला म्ह० अपुनर्जन्माला प्राप्त होतात व ज्या कालीं मृत झालेले कर्मी आवृ-त्तीला-पुनर्जन्माला प्राप्त होतात, तो काल मी तुला सांगेन.

अग्निर्ज्योतिरहः शुक्लः षण्मासा उत्तरायणम् ।
तत्र प्रयाता गच्छन्ति ब्रह्म ब्रह्मविदो जनाः ॥ २४ ॥

—'अग्नि' या नांवाची कालाभिमानिनी देवता, 'ज्योति' या नांवाची कालाभिमानिनी देवता, दिवसाची अभिमानिनी देवता, शुक्लपक्षाभिमानिनी देवता, उत्तरायणाच्या सहा महिन्यांच्या अभिमानिनी देवता, या आतिवाहिक

देवता ज्या मार्गांत आहेत, त्या मार्गांत शरीर सोडलेले—मृत झालेले ब्रह्मोपासक—ब्रह्माचें ध्यान करणारे जन क्रमानें ब्रह्माला प्राप्त होतात.

धूमो रात्रिस्तथा कृष्णः षण्मासा दक्षिणायनम्।
तत्र चान्द्रमसं ज्योतिर्योगी प्राप्य निवर्तते ॥ २५ ॥

—धूमाभिमानिनी देवता, रात्रीची देवता, त्याचप्रमाणें कृष्णपक्षाची देवता, दक्षिणायनाख्या सहा महिन्यांची देवता, या देवता ज्या मार्गांतून वाहून नेणाऱ्या आहेत, त्या मार्गांत मरून गेलेला कर्मठ, चंद्रांतील ज्योतीला —कर्मफलाला प्राप्त होऊन त्याचा भोगानें क्षय होतांच तेथून परत येतो. [ ज्या मार्गांत संज्ञाशून्य मृतांना वाहून नेणाऱ्या अग्न्यादि देवता असतात, त्या मार्गांत मृत झालेले ब्रह्मोपासक क्रमानें ब्रह्माला प्राप्त होतात आणि ज्या दक्षिण मार्गांत त्यांना वाहून नेणाऱ्या धूमाद्यभिमानिनी देवता असतात, त्यांत मृत झालेले कर्मी चंद्रलोकाला प्राप्त होऊन कर्मफल भोगक्षयानंतर अवशिष्ट कर्मानें पुनः संसारांत परत येतात.]

शुक्लकृष्णे गती ह्येते जगतः शाश्वते मते।
एकया यात्यनावृत्तिमन्ययावर्तते पुनः ॥ २६ ॥

—ज्ञानकर्माधिकृत जनांच्या या प्रकाश-अप्रकाशरूप दोन गति—मार्ग नित्य मानलेले आहेत. यांतील एका गतीनें योगी—ध्यायी क्रममुक्तीला प्राप्त होतो व दुसऱ्या गतीनें कर्मी संसारांत पुनः परत येतो—पुनर्जन्म घेतो. [ विद्या प्राप्यत्वामुळें म्ह० उपासनेनें—देवताज्ञानानें प्राप्त होण्यास योग्य असल्यामुळें व अग्नि, ज्योति, दिवस इत्यादि प्रकाशानें उपलक्षित झाल्यामुळें देवयान गति ‘ शुक्ला ’ आहे व ज्ञानप्रकाशकत्वाच्या अभावामुळें म्ह० धूमादि अप्रकाशानें उपलक्षित व अविद्याप्राप्य—कर्मानें प्राप्त होण्यास योग्य असल्यामुळें पितृयाण गति ‘ कृष्णा ’ आहे. शास्त्रानें ज्यांना ज्ञानाचा किंवा कर्माचा अधिकार दिला आहे, त्यांच्या या दोन शाश्वत गति आहेत. त्या दोन गतींतील एका—शुक्लगतीनें पुरुष अनावृत्तीला म्ह० क्रममुक्तीला प्राप्त होतो व इतर म्ह० कृष्णगतीनें चंद्रलोकांतील भोक्तव्य पुण्य कर्माचा क्षय झाला असतां अवशिष्ट राहिलेल्या कर्मानें येथें जन्म घेण्यासाठीं परत येतो. ]

नैते सृती पार्थ जानन्योगी मुह्यति कश्चन।
तस्मात्सर्वेषु कालेषु योगयुक्तो भवार्जुन ॥ २७ ॥

—हे अर्जुना, हे दोन मार्ग जाणणारा कोणीहि योगी मोहित होत नाहीं. म्हणून तूं सर्वकालीं समाहित चित्त हो. [ या दोन गतींना उपास्यत्व आहे. हें सूचविण्यासाठीं त्यांच्या विज्ञानाची येथें स्तुति केली आहे. या गतींचेंहि ध्यान करणारा ध्याननिष्ठ योगी मोहित होत नाहीं. म्ह० दक्षिणमार्ग देणारें केवल कर्म आपलें कर्तव्य आहे, असें समजत नाहीं. योग–ध्यान क्रममुक्ति हें फल देणारें असल्यामुळें तें नित्य कर्तव्य आहे. असें सिद्ध झालें असतां भगवान् म्हणतात—' अर्जुना, तूं सर्वकालीं समाहित चित्त हो. ' ]

वेदेषु यज्ञेषु तपःसु चैव
दानेषु यत्पुण्यफलं प्रदिष्टम् ।
अत्येति तत्सर्वमिदं विदित्वा
योगी परं स्थानमुपैति चाद्यम् ॥ २८ ॥

—ध्यान–उपासना करणारा पुरुष या अध्यायांत सात प्रश्नांचा निर्णय करून जें कांहीं सांगितलें आहे, जें जाणून वेदाध्ययन, यज्ञानुष्ठान, तपश्चर्या आणि दान यांत जें पुण्यफल सांगितलें आहे. त्या सर्वांचें उल्लंघन करून जातो आणि अगदीं मूळ कारणरूप ब्रह्मपदाला प्राप्त होतो. [ उत्तम प्रकारें म्ह० हातांत पवित्रकें घालून, पूर्वाभिमुख बसून, नियमपूर्वक अध्ययन केलेल्या वेदांमध्यें, अंगोपांगांसह अनुष्ठिलेल्या यज्ञामध्यें, मन, बुद्धि इत्यादिकांच्या ऐकाग्र्यपूर्वक आचरिलेल्या तपांमध्यें आणि यथाशास्त्र देश-काल-पात्र पाहून दिलेल्या दानांमध्यें शास्त्रानें जें पुण्यफल सांगितलें आहे, त्याहून अधिक फल योग्यास प्राप्त होतें. या अध्यायांत अर्जुनाच्या सात प्रश्नांचें उत्तर देऊन व योगमार्गाचें दिग्दर्शन करून तत्पदार्थाचें ध्येय या रूपानें व्याख्यान केलें. ]

येथें भगवद्गीतेचा ' तारकब्रह्मयोग ' नांवाचा आठवा
अध्याय समाप्त झाला. ) ६. ४. ३२

---

## अध्याय ३३ वा.

### ( गीताध्याय ९ वा. राजविद्या राजगुह्ययोग. )

[ १ गुह्यतमज्ञान सांगण्याची प्रतिज्ञा व त्या ज्ञानाची प्रशंसा. २ गुह्यतमज्ञान. ३ पुण्यवान् महात्मेच मला भजतात, असें सांगून त्यांच्या भजनाचा प्रकार. ४ भगवानाचें सर्वात्मकत्व. ५ केवल कर्मठांची निंदा. ६ अनन्यभक्तांचा योगक्षेम वाहण्याची प्रतिज्ञा. ७ मीच भजनादिकांचा विषय व फलदाता आहें. ८ उपासनेप्रमाणें फल. ९ भगवानाच्या आराधनेची सुकरता, तिचा प्रकार, १० अर्जुनाला ईश्वराराधनेनेंच तूं मुक्त होशील असा उपदेश. ११ भगवानांचें सर्वत्र समत्व. १२ भक्तीचें माहात्म्य व मत्पर होण्याचा उपदेश. ]

पण 'यावर देवयानमार्गानें गेल्यानेंच मोक्ष प्राप्त होतो, दुसऱ्या कोणत्याहि मार्गानें किंवा ज्ञानानें नाहीं,' अशी शंका येते, म्हणून—

श्रीभगवानुवाच—

**इदं तु ते गुह्यतमं प्रवक्ष्याम्यनसूयवे ।**
**ज्ञानं विज्ञानसहितं यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् ॥ १ ॥**

( १ ) श्रीभगवान् म्हणाले—आतां गुणांमध्यें दोषदृष्टि न ठेवणाऱ्या तुला मी हें अतिशय गुह्य अनुभवासह आत्मज्ञान सांगतों. तें ज्ञान झालें असतां तूं या अशुभ संसारापासून मुक्त होशील.

**राजविद्या राजगुह्यं पवित्रमिदमुत्तमम् ।**
**प्रत्यक्षावगमं धर्म्यं सुसुखं कर्तुमव्ययम् ॥ २ ॥**

( २ )—हें ज्ञान सर्व विद्यांचा व सर्व गुह्यांचा राजा व अत्यंत पावन आहे. याचा अनुभव प्रत्यक्ष येतो. हें धर्माला धरून आहे. हें संपादन करण्यास सुलभ व अव्यय आहे. कर्माच्या फलाप्रमाणें याचें फल क्षीण होत नाहीं. [ही ब्रह्मविद्या सर्व विद्यांमध्यें अतिशय देदीप्यमान होते, हें प्रसिद्ध आहे. सर्वांपेक्षां ब्रह्मज्ञांचा आदर लौकिकांतहि फार होत असतो, हें सर्वानुभूत आहे. हें अतिशय गुह्य व सर्व पावन वस्तूंमध्यें अत्यंत उत्कृष्ट शुद्धिकारण आहे. ज्याअर्थी अनेक सहस्र जन्मांमध्यें संचय केलेल्याहि धर्माधर्मादि कर्माला ब्रह्मज्ञान एका क्षणांत समूल भस्म करितें, त्याअर्थी त्याचें पवित्रत्व काय सांगावें ! हें ब्रह्मज्ञान प्रत्यक्षावगम आहे म्ह० सुखादिकांप्रमाणें स्वानुभव हेंच त्याविषयीं प्रमाण आहे. किंवा ज्याचा अवगम–फल प्रत्यक्ष आहे, स्वर्गाप्रमाणें परोक्ष नाहीं, तें

प्रत्यक्षावगम ज्ञान होय. या धर्म्य व सुलभ ज्ञानाचा फलद्वाराहि व्यय होत नाहीं. म्हणून तें अव्यय आहे. ]

अश्रद्दधानाः पुरुषा धर्मस्यास्य परंतप ।
अप्राप्य मां निवर्तन्ते मृत्युसंसारवर्त्मनि ॥ ३ ॥

—हे अर्जुना, या आत्मज्ञानरूप धर्मावर श्रद्धा न ठेवणारे पुरुष मला प्राप्त न होऊन मृत्युयुक्त संसारमार्गांत निवृत्त होतात–संसारमार्गांत परत येतात. [ अश्रद्धालु, अनात्मज्ञ, मूढ, ज्ञानप्राप्तीचा उपाय अशी जी भक्ति तिलाहि प्राप्त न होतां मृत्युयुक्त संसारमार्गांत निश्चयानें फिरत रहातात. या श्लोकांत अश्रद्धालु पुरुषांच्या या निंदेनें या आत्मज्ञानाख्य धर्मावर श्रद्धा ठेवणाऱ्या तन्निष्ठ पुरुषांना परम पदाची प्राप्ति होते. अशा स्तुतीनें अर्जुनाला ज्ञानाभिमुख करून भगवान् यापुढें गुह्य ज्ञानाच्या उपदेशालाच आरंभ करीत आहेत. ]

मया ततमिदं सर्वं जगदव्यक्तमूर्तिना ।
मत्स्थानि सर्वभूतानि न चाहं तेष्ववस्थितः ॥ ४ ॥
न च मत्स्थानि भूतानि पश्य मे योगमैश्वरम् ।
भूतभृन्न च भूतस्थो ममात्मा भूतभावनः ॥ ५ ॥

—ज्याचें स्वरूप व्यक्त नाहीं, अशा मीं हें सर्व जगत् व्यापलें आहे. सर्वभूतें माझ्या मध्यें स्थिर आहेत. पण मी त्या भूतांमध्येंच अवस्थित नाहीं. सर्व प्राणीहि वस्तुतः माझ्यामध्यें नाहींत. माझें ईश्वरसंबंधीं स्वरूप पहा. मी सर्व भूतांचें धारण पोषण करणारा आहें, पण भूतांत राहिलेलों नाहीं. माझें स्वरूप सर्व भूतांना उत्पन्न करणारें आहे. [ जो पदार्थ इंद्रियांचा विषय होत नाहीं. त्याला 'अव्यक्त' म्हणतात. अशा अव्यक्त स्वरूप असलेल्या मीं सर्व जगाला व्यापिलें आहे. सर्व भूतें मजमध्यें स्थित आहेत–मी त्यांचा आत्मा आहें व मजमुळें तीं आत्मवान् झालीं आहेत. पण मी असंग असल्यामुळें त्यांच्यामध्यें स्थित नाहीं. "अहो पण, परमेश्वर जरी सर्व भूतांमध्यें अवस्थित नसला, तरी भूतें त्याच्यामध्यें आहेत, तेव्हां त्याला असंगत्व कसें ?" म्हणून विचारशील तर सांगतों—वस्तुतः भूतें माझ्यामध्यें स्थित नाहींत. माझें तात्त्विक स्वरूप पहा. म्हणजे मी भूतांना धारण करणारा आहें, पण भूतांमध्यें स्थित नाहीं, हें तुला कळेल. माझा आत्मा भूतांच्या उत्पत्तीचें निमित्त आहे. ]

यथाकाशस्थितो नित्यं वायुः सर्वत्रगो महान् ।
तथा सर्वाणि भूतानि मत्स्थानीत्युपधारय ॥ ६ ॥

—सर्वत्र गमन करणारा व त्यामुळेंच महत्परिमाणाचा वायु सदा—उत्पत्ति-स्थिति-लयकालीं जसा आकाशांत त्याला कोणत्याहि प्रकारें संश्लेष न करतां रहातो, त्याप्रमाणें आकाशादि महाभूतें आकाशासारख्या पूर्ण असंग प्रत्यगात्म्यामध्यें संश्लेषावांचून स्थित आहेत, असा तूं निश्चय कर.

सर्वभूतानि कौन्तेय प्रकृतिं यान्ति मामिकाम् ।
कल्पक्षये पुनस्तानि कल्पादौ विसृजाम्यहम् ॥ ७ ॥

—हे कुंतीपुत्रा अर्जुना, कल्पाचा क्षय झाला असतां—प्रलयसमयीं सर्वभूतें माझ्या अधीन असलेल्या त्रिगुणात्मिका अपर प्रकृतीला प्राप्त होतात आणि पुनः उत्पत्तिकाल प्राप्त होतांच—कल्पाच्या आरंभीं मी त्यांना उत्पन्न करितों.

प्रकृतिं स्वामवष्टभ्य विसृजामि पुनः पुनः ।
भूतग्राममिमं कृत्स्नमवशं प्रकृतेर्वशात् ॥ ८ ॥

—आपल्या अविद्यारूप प्रकृतीला स्वाधीन करून स्वभाववशात् परतंत्र झालेल्या या सर्व वर्तमानकालीन् भूतसमूहास मीं पुनः पुनः उत्पन्न करितों. [ अर्थात् हा संसार अनादि आहे. स्वभाववशात् अविद्या, अस्मिता, इत्यादि दोषांनीं त्या भूतसमुदायाला अस्वतंत्र केलें आहे. ]

"तर मग उत्तम-अधम, सुखी-दुःखी, श्रीमान्-दरिद्री इत्यादि विषम भूतसमुदायाला उत्पन्न करणाऱ्या त्या तुज ईश्वराचा त्यापासून उद्भवणाऱ्या धर्माधर्मांशीं संबंध होईल—तूं तन्निमित्त धर्माधर्मांनें लिप्त होशील." असें जर म्हणशील तर सांगतों—

न च मां तानि कर्माणि निबध्नन्ति धनंजय ।
उदासीनवदासीनमसक्तं तेषु कर्मसु ॥ ९ ॥

—धनंजया, विषम सृष्टि उत्पन्न केल्यामुळें उद्भवणारीं शुभाशुभ कर्म मज ईश्वराला बद्ध करीत नाहींत. कारण मला कर्तृत्वाभिमान नसतो व फलासक्तिहि नसते. तर तीं कर्में करीत असतांनाहि मी उदासीनाप्रमाण रहातों. ( मजप्रमाणेंच दुसराहि जो कोणी आसक्तिरहित असतो, तोहि तसाच कर्मांनीं बद्ध होत नाहीं. अ. ४—१४ पहा. )

'मी या भूतसमूहास उत्पन्न करितों' व 'उदासीनाप्रमाणें असणाऱ्या मला तीं कर्में बद्ध करीत नाहींत' हें म्हणणें विरुद्ध आहे. असें कोणी समजेल म्हणून भगवान् म्हणतात—

मयाऽध्यक्षेण प्रकृतिः सूयते सचराचरम् ।
हेतुनाऽनेन कौन्तेय जगद्विपरिवर्तते ॥ १० ॥

—केवल ज्ञानस्वरूप अशा मज अध्यक्षामुळें माझी त्रिगुणात्मिका माया सचराचर जगाला उत्पन्न करिते. हे कुंतीपुत्रा, या अध्यक्षत्वाच्या निमित्तानेंच सर्व सृष्टि पुनः पुनः प्रवृत्त होते. [केवल ज्ञानस्वरूप व अविक्रिय आत्मा अशा मज अध्यक्षाच्या सत्तेनें माझी अविद्यारूप प्रकृति जगाला प्रसवते. माझ्या अध्यक्षत्वामुळेंच हें सर्व व्यक्ताव्यक्तरूप जगत् सृष्टि-स्थिति व संहार या अवस्थांमध्यें विशेष प्रकारें परिवर्तन पावत असतें.]

अवजानन्ति मां मूढा मानुषीं तनुमाश्रितम् ।
परं भावमजानन्तो मम भूतमहेश्वरम् ॥ ११ ॥

—माझ्या अत्यंत श्रेष्ठ भावास—परमतत्त्वास—सर्व भूतांच्या महेश्वरास म्ह० स्वास्म्याला न जाणणारे, अविवेकी मनुष्याची तनु धारण करणाऱ्या मला तुच्छ लेखितात व माझी अवज्ञा करितात. मनुष्यशरीरानें व्यवहार करीत असलेल्या भगवानांचा अनादर करणें किंवा निंदा करणें, हेंच अवज्ञान; वारंवार भगवन्निंदा किंवा भगवदनादर केल्यामुळें त्यांना मोठें पाप लागतें व त्या पापाच्या प्रभावानें त्यांच्या बुद्धि प्रतिबद्ध होतात.]

मोघाशा मोघकर्माणो मोघज्ञाना विचेतसः ।
राक्षसीमासुरीं चैव प्रकृतिं मोहिनीं श्रिताः ॥ १२ ॥

—त्यांच्या सर्व आशा व्यर्थ होतात. त्यांचीं सर्व कर्मेंहि व्यर्थ होतात. त्यांचें ज्ञानहि निष्फल असतें. ते विवेकशून्य होतात आणि ते राक्षसांच्या व असुरांच्या मोह पाडणाऱ्या प्रकृतीचा आश्रय केलेले असतात. [ईश्वराची निंदा व भगवद्द्रोह करणाऱ्या त्यांची कोणतीहि इच्छा नित्य फल देण्यास समर्थ होत नाहीं. त्यांचीं नित्य नैमित्तिक कर्मेंहि निष्फल होतात. शास्त्रार्थ ज्ञानहि फुकट जातें. त्यांच्या ठिकाणीं विवेकाचाहि अभाव असतो. भगवानाचा तिरस्कार किंवा अनादर करणाऱ्या मानवांच्या इच्छादि फुकट जातात. इतकेंच नव्हे तर, मरणोत्तर त्यांना अतिशय क्रूर योनि प्राप्त होते.]

महात्मानस्तु मां पार्थ दैवीं प्रकृतिमाश्रिताः ।
भजन्त्यनन्यमनसो ज्ञात्वा भूतादिमव्ययम् ॥ १३ ॥

( ३ )—पण हे पार्था, शम, दया, श्रद्धा इत्यादि दैवी प्रकृतीचा आश्रय केलेले महात्मे ' मी भूतांचें नित्य कारण आहें,' असें जाणून व अनन्यचित्त होऊन मला भजतात. [ पूर्वोक्त आसुरी प्रकृतीच्या लोकाहून दैवी प्रकृतीचे महात्मे आकाशादि भूतांचा व भौतिक प्राण्यांचा आदि-कारण व अविनाशी अशा मला जाणून माझें भजन करतात. ]

सततं कीर्तयन्तो मां यतन्तश्च दृढव्रताः ।
नमस्यन्तश्च मां भक्त्या नित्ययुक्ता उपासते ॥ १४ ॥

—अहोरात्र माझें कीर्तन–नामस्मरण, वेदान्तश्रवण, प्रणव जप करणारे आणि इंद्रियनिग्रह शम, दम, दया, अहिंसा इत्यादि धर्मांनें यत्न करणारे, ज्यांचें ब्रह्मचर्यादि, नियतव्रत अचल आहे आणि परम प्रेमानें मलाच नमस्कार करणारे माझे भक्त नित्य समाहित होऊन माझेंच चिंतन करितात. [ या श्लोकांत पूर्वोक्त श्लोकांत वर्णिलेला भजनाचा प्रकारच सांगितला आहे. ]

ज्ञानयज्ञेन चाप्यन्ये यजन्तो मामुपासते ।
एकत्वेन पृथक्त्वेन बहुधा विश्वतोमुखम् ॥ १५ ॥

—कांहीं उत्तम अधिकारी भगवानाविषयींचें ज्ञान–हाच यज्ञ, त्यानें मला एकच परब्रह्म आहे, अशा ज्ञानानें उपासितात. कोणी–मध्यम अधिकारी सूर्य, चंद्र इत्यादि भेदानें माझी उपासना करितात आणि कित्येक सामान्य अधिकारी तोच भगवान् सर्वतोमुख–विश्वरूप आहे, असें समजून त्या विश्वरूपाला अनेक प्रकारें उपासितात. [ परमार्थदर्शन हाच येथील ज्ञानयज्ञ आहे. उत्तम अधिकारी ज्ञाननिष्ठ दुसऱ्या उपासनेचा परित्याग करून एकच परब्रह्म आहे, अशा परमार्थ ज्ञानानें माझी उपासना करितात. मध्यम अधिकारी तोच भगवान् विष्णु, आदित्य इत्यादि रूपानें अवस्थित आहे, अशी भेदोपासना करितात व अधम अधिकारी तोच सर्वरूपानें अवस्थित आहे, असें जाणून बहुप्रकारें त्याची उपासना करितात. ]

अहं क्रतुरहं यज्ञः स्वधाहमहमौषधम् ।
मन्त्रोऽहमहमेवाज्यमहमग्निरहं हुतम् ॥ १६ ॥

( ४ )—'पण बहुप्रकारांनीं केलेली उपासना तुझीच उपासना कशी होते ?' म्हणून विचारशील तर सांगतों—मी क्रतु श्रौतकर्मांचा एक प्रकार

आहें. स्मार्त यज्ञ मीच आहें. तसेंच स्वधा–पितरांना जें दिलें जातें, तें अन्न मी आहें. मीच औषध आहें. ज्या मंत्रानें पितरांना व देवतांना हवि दिला जातो, तो मंत्र मीच आहें. मीच आज्य–हवि आहें. ज्यांत होम केला जातो, तो अग्नि मीच आणि मीच हुत–हवनकर्म आहें [ क्रियाकारकफलजात भगवानाहून भिन्न नाहीं. हा या सर्व श्लोकाचा भावार्थ आहे. ]

पिताहमस्य जगतो माता धाता पितामहः ।
वेद्यं पवित्रमोंकार ऋक् साम यजुरेव च ॥ १७ ॥

—मी या जगाचा जनक आहें. जननी आहे. प्राण्यांना कर्मफल देणारा धाता आहें. पित्याचा पिता आहें. ब्रह्मादि ज्ञेय वस्तु मी आहें. पावन करणारें यज्ञ-यागादि पुण्यकर्म मी आहें. प्रणव मी आहें. ऋग्वेद, सामवेद व यजुर्वेद मी आहें. [ अर्थात् भगवान् सर्वात्मक आहे, असें यावरून अनुमान करावें.]

गतिर्भर्ता प्रभुः साक्षी निवासः शरणं सुहृत् ।
प्रभवः प्रलयः स्थानं निधानं बीजमव्ययम् ॥ १८ ॥

—गति–कर्मांचें फल मी आहें. कर्मफल देऊन पोषण करणारा, सर्वांचा स्वामी, प्राण्यांनीं केलेलें व न केलेलें पुण्य-पापादि पहाणारा, सर्व भूतांचें निवासस्थान, रोगादिकांच्या योगानें आर्त होऊन शरण आलेल्या भक्तांची पीडा नाहींशी करणारा, प्रत्युपकाराची अपेक्षा न करतां उपकार करणारा मी आहें. जगाचा उत्पादक, त्याचा संहार करणारा व स्थिति करणारा, कर्मफलांचा निधि व जगाचें अक्षय बीज मी आहें.

तपाम्यहमहं वर्षं निगृह्णाम्युत्सृजामि च ।
अमृतं चैव मृत्युश्च सदसच्चाहमर्जुन ॥ १९ ॥

—मी सूर्यरूपानें ताप देतों; वृष्टीचा निग्रह व उत्सर्ग मीच करतों. अर्जुना, मीच देवांचें अमृत व मर्त्यांचा मृत्यु आहें. तसेंच सत्–कार्य–नाम-रूपांनीं व्यक्त होणारें सर्व आणि असत्–कारण–नाम-रूपांनीं व्यक्त न होणारें सर्व मी आहें. [ भगवान् जर अत्यंत असत् असता तर कार्य-कारणांची कल्पनाच झाली नसती. कारण कोणतीहि कल्पना अधिष्ठानावांचून होऊं शकत नाहीं. त्याचप्रमाणें कार्याचें सत्त्व व कारणाचें असत्त्व मानतां येत नाहीं. असो. या वर सांगितलेल्या ज्ञानयज्ञांनीं भगवत्सेवा करणारांना सद्योमुक्ति किंवा क्रममुक्ति हें फल मिळतें. ]

त्रैविद्या मां सोमपाः पूतपापा
यज्ञैरिष्ट्वा स्वर्गतिं प्रार्थयन्ते ।
ते पुण्यमासाद्य सुरेन्द्रलोक-
मश्नन्ति दिव्यान्दिवि देवभोगान् ॥ २० ॥

( ५ )—पण याच्या उलट ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद यांचें अध्ययन करणारे, त्यांत सांगितलेलीं कर्में करणारे, सोमपान करणारे, जे विषयेच्छु अज्ञ, ते यज्ञांच्या योगानें माझी पूजा करून स्वर्गगतीची प्रार्थना करितात. त्यामुळें ते त्रैविद्य पवित्र्य इंद्रलोकास प्राप्त होऊन स्वर्गांतील अलौकिक देव-भोगास उपभोगितात. [ सकाम पुरुप यज्ञादि कर्मांच्या योगानें स्वर्गास प्राप्त होऊन तेथील विषयोपभोग घेतात. ]

ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं
क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति ।
एवं त्रयीधर्म्यमनुप्रपन्ना
गतागतं कामकामा लभन्ते ॥ २१ ॥

—ते सर्व वैदिक कर्मी त्या विस्तीर्ण स्वर्गलोकास भोगून पुण्य क्षीण झालें असतां मर्त्यलोकांत प्रवेश करितात. याप्रमाणें वैदिक कर्ममार्गास अनु-सरणारे, विषयांची इच्छा करणारे सकाम पुरुष 'जा व ये' या अवस्थेस प्राप्त होतात.

पण त्याच्या उलट जे निष्काम सम्यग्दर्शननिष्ठ असतात, त्यांचा योगक्षेम कसा चालतो तेंच सांगतों—

अनन्याश्चिन्तयन्तो मां ये जनाः पर्युपासते ।
तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम् ॥ २२ ॥

( ६ )—परम देव जो मी नारायण त्याच्याशीं एकरूप होऊन चिंतन करणारे जे लोक मला सर्वप्रकारें उपासितात, त्या सतत ध्यान करीत अस-लेल्या विरक्तांचा योगक्षेम मी वाहतों. [मी सर्वात्मा वासुदेव आहें. माझ्याहून दुसरें कांहीं नाहीं, असें जाणून त्याच प्रत्यक् स्वरूपाचें सतत ध्यान करणारे जे मुख्य अधिकारी संन्यासी माझी उपासना करितात, मला सर्वतः अखंड आत्मरूपानें पहातात, त्या परमार्थदर्शी-नित्यज्ञाननिष्ठांचा योग—अप्राप्य-वस्तूंची प्राप्ति करून देणें व क्षेम—त्याचें रक्षण करणें, हीं दोन्ही मीं करितों. ]

येऽप्यन्यदेवताभक्ता यजन्ते श्रद्धयान्विताः ।
तेऽपि मामेव कौन्तेय यजन्त्यविधिपूर्वकम् ॥ २३ ॥

( ७ )—'पण अन्य देवताहि जर तूंच आहेस, तर त्या देवतांचे भक्तहि तुझीच पूजा करितात, असें म्हटलें पाहिजे,' म्हणून म्हणशील तर तें खरें आहे. तुझे दुसऱ्या देवतांचे भक्तहि श्रद्धेनें युक्त होऊन त्या अन्य देवतांची पूजा करितात, तेसुद्धां, हे कौंतेया, माझेंच अज्ञानानें पूजन करितात. [ जे अन्य देवतांचे भक्त आस्तिक्यबुद्धीनें अन्य देवतांची पूजा करितात, तेहि अज्ञानपूर्वक माझेंच पूजन करितात, हाच माझे भक्त व इतर देवतांचे भक्त यांच्या पूजेंतील फरक आहे. ]

अहं हि सर्वयज्ञानां भोक्ता च प्रभुरेव च ।
न तु मामभिजानन्ति तत्त्वेनातश्च्यवन्ति ते ॥ २४ ॥

( ८ )—त्याच्या अविधिपूर्वक यजनाचें कारण विचारशील तर सांगतों— मी सर्व यज्ञांचा देवतारूपानें भोक्ता व प्रभुच आहें. पण ते अन्य देवतांचे भक्त मला अशा तात्विक रूपानें जाणत नाहींत. म्हणून मुख्य फलापासून च्युत होतात. [ मी श्रौत-स्मार्त यज्ञांचा 'देवतांचा आत्मा' या रूपानें भोक्ता व 'अंतर्यामी' या रूपानें प्रभु आहें, मीच यज्ञांचा स्वामी आहें, या देहांत अधियज्ञ मीच आहें. असें ८ व्या अध्यायाच्या ४ थ्या श्लोकांत सांगितलेंच आहे. पण मीच यज्ञाचा भोक्ता व प्रभु असतांना मला लोक पूर्णपणें जाणत नाहींत—माझें तात्विक स्वरूप जाणत नाहींत, म्हणून ते अविधिपूर्वक यज्ञ करून त्या यज्ञाच्या मुख्य फलापासून च्युत होतात. ]

पण जे इतर देवतांच्या भक्तीनें युक्त होऊनहि अज्ञानपूर्वक यजन करतात, त्यांनाहि त्या यागाचें फल अवश्य मिळतेंच. त्यांचें यजन व्यर्थ होत नाहीं. कारण—

यान्ति देवव्रता देवान् पितॄन्यान्ति पितृव्रताः ।
भूतानि यान्ति भूतेज्या यान्ति मद्याजिनोऽपि माम् ॥ २५ ॥

—देवांमध्यें ज्यांचें व्रत, नियम किंवा भक्ति असते, ते देवांस प्राप्त होतात. पितृभक्त पितरांस प्राप्त होतात. भूतांची पूजा करणारे विनायक, मातृगण, इत्यादि भूतगणांस प्राप्त होतात व माझी पूजा करणारेहि मलाच प्राप्त होतात. [ पितृभक्त म्हणजे श्राद्धादि क्रियांमध्यें तत्पर असलेले पितृभक्त अग्निस्वात्तादि

पितरांस प्राप्त होतात. देवतादिकांचें व माझें पूजन करण्यांत आयास जरी एक-सारखाच असला तरी अज्ञानामुळें ते मलाच भजत नाहींत. त्यामुळें ते अल्प फलास प्राप्त होतात, असा याचा भावार्थ. ]

माझ्या भक्तांना मोक्ष हें अनंत फल मिळतें, इतकेंच नव्हे, तर माझें आराधन अतिशय सुकरहि आहे, कारण—

पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति ।
तदहं भक्त्युपहृतमश्नामि प्रयतात्मनः ॥ २६ ॥

( ९ )—जो मला पान, फूल, फल, जल इत्यादि अति क्षुद्र पदार्थहि देतो, त्या शुद्धचित्त पुरुषाचें भक्तीनें अर्पण केलेलें तें पत्र-पुष्पादि मी स्वीकारतों. [ ज्याअर्थी हा भक्त हें पुष्पादि मला भक्तीनें अर्पित आहे, त्याअर्थी हा शुद्ध-चित्त तपस्वी माझी आराधना करीत आहे, असा मी निश्चय करितों व त्याला तसें फल देतों. ]

यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत् ।
यत्तपस्यसि कौन्तेय तत्कुरुष्व मदर्पणम् ॥ २७ ॥

—हे अर्जुना, ज्याअर्थी माझें आराधन असें सुकर आहे, त्याअर्थी तूं जें करतोस, जें खातोस, जें हवन करतोस, जें दान देतोस, जें तप करतोस, तें मला समर्पण कर. [ तूं जें स्वाभाविक गमनादि व भोजनादि कर्म करशील व जें शास्त्रीय श्रौत-स्मार्त कर्म, दान व तप करशील तें सर्व मला अर्पण कर. ]

शुभाशुभफलैरेवं मोक्ष्यसे कर्मबन्धनैः ।
संन्यासयोगयुक्तात्मा विमुक्तो मामुपैष्यसि ॥ २८ ॥

( १० )—याप्रमाणें तूं करूं लागलास म्हणजे शुभ व अशुभ फल देणाऱ्या कर्मरूपबंधनाकडून मुक्त केला जाशील व ज्याचें अंतःकरण संन्यास व योग यांनीं युक्त आहे, असा तूं सर्वथा मुक्त होऊन मला प्राप्त होशील. [ सर्व मदर्पण करणें हा संन्यासहि आहे व कर्मानुष्ठानामुळें योगहि आहे. यास्तव ज्याचें चित्त संन्यास व योग यांनीं युक्त झालें आहे, असा तूं जीवन्मुक्तीचा अनुभव घेऊन मरणानंतर मला प्राप्त होशील. ]

'तर मग तूं राग-द्वेषवान् आहेस, कारण आपल्या भक्तांवर मात्र अनुग्रह करतोस व इतरांवर करीत नाहींस' असा जर मला दोष देशील तर तो युक्त नाहीं. कारण—

समोऽहं सर्वभूतेषु न मे द्वेष्योऽस्ति न प्रियः ।
ये भजन्ति तु मां भक्त्या मयि ते तेषु चाप्यहम् ॥ २९ ॥

( ११ )—मी सर्वभूतांमध्यें सम—तुल्य आहें. मला कोणी द्वेष्य म्ह० द्वेषास योग्य किंवा प्रियहि नाहीं. तर जे मला भक्तीनें भजतात ते स्वभावतःच मजमध्यें असतात आणि मीहि स्वभावतःच त्यांच्यामध्यें रहातों. [ मी अग्नि-तुल्य आहें. अग्नि जसा दूर असलेल्यांचें शीत घालवीत नाहीं—त्यांच्या थंडीचें निवारण करीत नाहीं, तर तो त्याच्या समीप बसणाराचेंच शीत घालवितो तसाच मी भक्तावर अनुग्रह करतों. इतरांवर करीत नाहीं. जे मज ईश्वराला भजतात, ते माझ्यामध्यें स्वभावतःच रहातात. माझ्या प्रीतीमुळें मजमध्यें रहात नाहींत आणि त्यांच्या ठिकाणींहि मी स्वभावतःच रहातों. इतर अभक्तां-मध्यें रहात नाहीं. स्वभावतःच हें होत असल्यामुळें मी अभक्तांमध्यें रहात नाहीं, एवढ्यावरून त्यांच्याशीं माझा द्वेष आहे असें होत नाहीं. जे वर्णाश्रम-धर्मांच्या योगानें माझें भजन करितात, ते त्याच भजनाच्या अचिंत्य माहात्म्यानें शुद्धचित्त होऊन माझ्या समीप रहातात. त्यांचें चित्त माझ्या अभिव्यक्तीला योग्य होतें. त्यामुळें मीहि स्वभावतःच त्यांच्या समीप राहून त्यांच्यावर अनुग्रह करितों. जसें सूर्याचें तेज व्यापक—सर्वत्र पसरलेलें जरी असलें तरी तें स्वच्छ आरशांतच प्रतिबिंबित होतें, त्याप्रमाणें ज्यांचें चित्त भक्तीनें अत्यंत शुद्ध झालेलें असतें त्यांच्यामध्येंच मी प्रकट होतों. ]

अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् ।
साधुरेव स मन्तव्यः सम्यग्व्यवसितो हि सः ॥ ३० ॥

( १२ )—हे अर्जुना, माझ्या भक्तीचें माहात्म्य तुला किती सांगूं ? जरी कदाचित् अतिशय निंद्य आचरण करणारा एखादा अनन्य भक्त होऊन मला भजूं लागला, तरी तो सदाचारसंपन्नच आहे, असें मानावें. कारण तो चांगल्या प्रकारें निश्चित झालेला असतो. [ एखादा अत्यंत दुराचारी असलेलाहि मनुष्य जर माझी अनन्यभक्ति करूं लागला तर तो साधुच होय. कारण माझी भक्ति करणें हा त्यानें फारच उत्तम निश्चय केलेला असतो. ]

क्षिप्रं भवति धर्मात्मा शश्वच्छान्तिं निगच्छति ।
कौन्तेय प्रतिजानीहि न मे भक्तः प्रणश्यति ॥ ३१ ॥

—बाह्य दुराचारता सोडून मनांत असा उत्तम निश्चय केल्यानें तो सत्वर धर्मात्मा होतो आणि नित्य शांतीला प्राप्त होतो. हे अर्जुना, माझा भक्त केव्हांहि नाश पावत नाहीं, अशी तूं प्रतिज्ञा कर. [ माझा भक्त दुराचारी जरी असला, तरी तो सत्वर धर्मचित्त होतो. दुराचरणापासून नित्य निवृत्त होतो. यास्तव तुला माझ्या भक्ताविषयीं कोठें बोलण्याचा प्रसंग आल्यास तो कधींहि नाश पावत नाहीं, असें तूं प्रतिज्ञेनें सांगत जा. ]

आणखीं याहि एका कारणानें माझी भक्ति करावी, असें भगवान् सांगतात—

मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः ।
स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परां गतिम् ॥ ३२ ॥

—कारण हे अर्जुना, मला आश्रय या रूपानें स्वीकारून स्त्रिया, वैश्य, त्याचप्रमाणें शूद्र, असे जे पापयोनींत उत्पन्न झालेले असतात, तेसुद्धां क्रमानें परम गतीला प्राप्त होतात.

किं पुनर्ब्राह्मणाः पुण्या भक्ता राजर्षयस्तथा ।
अनित्यमसुखं लोकमिमं प्राप्य भजस्व माम् ॥ ३३ ॥

—आणि पापी व पापयोनि मानव जर भक्तीनें मुक्त होतात, तर मग पुण्ययोनींत उत्पन्न झालेले ब्राह्मण, तसेच भक्त राजर्षि–ज्ञानी क्षत्रिय श्रेष्ठ गतीला जातील, हें काय सांगावें ! यास्तव या अनित्य व सुखरहित लोकास प्राप्त होऊन तूं माझें भजन कर. [ पापी व स्त्रिया वगैरे जर भक्तीनें परम गतीला प्राप्त होतात, तर मग पुण्यामुळेंच उत्तम जन्म पावलेल्या ब्राह्मणांना व क्षत्रियांना सर्वोत्तम गति प्राप्त होईल, याविषयीं शंकाच नको. पश्वादि शरीरांत भगवद्भजनाची योग्यताच नाहीं, म्हणून मानुषत्वास प्राप्त झालेल्या जीवांनीं ईश्वराच्या ध्यानादिकांविषयीं अवश्य यत्न करावा. ] आतां 'भक्ति कशी करावी' म्हणून विचारशील तर सांगतों—

मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।
मामेवैष्यसि युक्त्वैवमात्मानं मत्परायणः ॥ ३४ ॥

—अर्जुना, माझ्या ठिकाणींच ज्याचें मन आहे, असा तूं हो. माझा भक्त हो. माझीच पूजा करण्याचें ज्याचें शील आहे, असा हो. मला नमस्कार कर,

याप्रमाणें भगवानांच्या ठिकाणीं चित्ताला समाहित—शांत—स्थिर करून मत्परायण झालेला तूं सर्वांचा आत्मा असा जो मी—ईश्वर त्याला प्राप्त होशील. [ तूं 'मन्मनाः मद्भक्तः' इत्यादि झालास म्हणजे मज सर्वात्म्यालाच प्राप्त होशील. याप्रमाणें या अध्यायांत मध्यमाधिकाऱ्याचें ध्येय सांगून अधमाधिकाऱ्यांनाहि मी आराधना करण्यास योग्य आहें, असें वर्णन केलें. आपल्या पारमार्थिक प्रत्यक्स्वरूपानें आपणाला साक्षात् जाणणें, हें ज्ञानच परमेश्वराचें परम आराधन आहे, असेंहि सुचविलें. अर्थात् तत्पदवाच्य सोपाधिक ब्रह्म व तत्पदलक्ष्य निरुपाधिक ब्रह्म यांचें येथें व्याख्यान केलें आहे. ]

( येथें भगवद्गीतेचा 'राजविद्या-राजगुह्य'-नांवाचा नववा अध्याय समाप्त झाला. ) ६. ४. ३३.

---

## अध्याय ३४ वा.

### ( गीताध्याय १० वा. विभूतियोग. )

[ १ भगवत्तत्त्व दुर्विज्ञेय आहे, म्हणून त्याचें प्रतिज्ञापूर्वक पुनः कथन. २ ईश्वराचें महेश्वरत्व. ३ ईश्वराची पूर्वोक्त विभूति व योग. ४ त्यांचें फल. ५ भगवद्भजनाचा दुसरा प्रकार व त्याचें फल. ६ अर्जुनाचा भगवानाची विभूति सांगण्याविषयीं प्रश्न. ७ श्रीकृष्णाची विभूतिकथनाविषयीं प्रतिज्ञा व तिचें कथन. ]

सातव्या व नवव्या अध्यायांत भगवानांचें सोपाधिक-निरुपाधिक तत्त्व व सविशेष-निर्विशेष रूपाच्या ज्ञानाला उपयोगी असलेल्या विभूति प्रकाशित केल्या. त्यानंतर आतां पुढें ज्या ज्या पदार्थांमध्यें भगवान् चिंत्य—चिंतन करण्यास योग्य आहे, तो तो भाव—पदार्थ सविशेष ध्यानाच्या व निर्विशेष ज्ञानाच्या अंगत्वानें सांगावा आणि भगवानाचें तत्त्वहि सांगावें, म्हणून या अध्यायाचा आरंभ केला आहे. भगवानांचें सविशेष व निर्विशेषरूप पूर्वी ठिकठिकाणीं जरी सांगितलें आहे, तरी तें अतिशय दुर्विज्ञेय असल्यामुळें पुनः सांगणें उचित आहे—

श्रीभगवानुवाच—

**भूय एव महाबाहो शृणु मे परमं वचः ।**
**यत्तेऽहं प्रीयमाणाय वक्ष्यामि हितकाम्यया ॥ १ ॥**

( १ ) श्रीभगवान् म्हणाले—हे पराक्रमी अर्जुना, माझें हें श्रेष्ठ वचन तूं ऐक. कारण माझें वचन ऐकून संतुष्ट होणाऱ्या तुला तुझें हित व्हावें, या इच्छेनें मी तें सांगत आहें. [ माझ्या वचनामुळें तूं जणुकाय अमृतच पीत असल्याप्रमाणें अतिशयच संतुष्ट होतोस, म्हणून हिताच्या इच्छेनें मी जें परम वचन तुला सांगतों, तें ऐक. ]

न मे विदुः सुरगणाः प्रभवं न महर्षयः ।
अहमादिर्हि देवानां महर्षीणां च सर्वशः ॥ २ ॥

—'पण तूंच तें कशासाठीं सांगत आहेस?' असें जर तूं विचारशील तर सांगतों—माझ्या प्रभावाला किंवा उत्पत्तीला ब्रह्मदेवादि देवगण जाणत नाहींत. भृगुप्रभृति महर्षिहि माझ्या प्रभावाला किंवा उत्पत्तीला जाणत नाहींत. कारण मी देवांचें व महर्षींचें सर्व प्रकारें कारण आहें. [ कारण कार्याच्या पूर्वी असतें, त्यामुळें कोणत्याहि कार्याला आपल्या कारणाचा प्रभाव किंवा उत्पत्ति यांचें ज्ञान असणें शक्य नाहीं. ]

यो मामजमनादिं च वेत्ति लोकमहेश्वरम् ।
असंमूढः स मर्त्येषु सर्वपापैः प्रमुच्यते ॥ ३ ॥

—शिवाय जो मला जन्मरहित, कारणरहित व सर्व लोकांचा महेश्वर जाणतो, तो मर्त्यांमध्यें—मनुष्यांमध्यें मोहित न झालेला पुरुष सर्व पापांपासून सर्वथा मुक्त होतो. [ मानवांतील आत्मानात्मविवेकीच सर्व पापांपासून मुक्त होतो. ]

बुद्धिर्ज्ञानमसंमोहः क्षमा सत्यं दमः शमः ।
सुखं दुःखं भवोऽभावो भयं चाभयमेव च ॥ ४ ॥
अहिंसा समता तुष्टिस्तपो दानं यशोऽयशः ।
भवन्ति भावा भूतानां मत्त एव पृथग्विधाः ॥ ५ ॥

( २ )—बुद्धि–अंतःकरणांतील सूक्ष्म विषय जाणण्याचें सामर्थ्य; ज्ञान–आत्मा, प्रकृति इत्यादि शब्दांच्या अर्थांचा बोध; असंमोह–ज्ञातव्य व कर्तव्य पदार्थांमध्यें विवेकपूर्वक प्रवृत्ति; क्षमा–कोणीं शिव्या दिल्या किंवा ताडन केलें असतांहि चित्ताला विकार होऊं न देणें; सत्य–जसें अवगत असेल, तसें दुसऱ्याला सांगणें; दम–बाह्येंद्रियांचा उपशम; शम–अंतःकरणाचा उपशम; सुख-दुःख, भव–उद्भव; अभाव–अनुद्भव, भीति, अभय, अहिंसा–प्राण्यांना पीडा न देणें, समता–संतोष; तप–इंद्रियांचा संयम करून शरी-

राला पीडणें; दान, धर्मसंबंधीं कीर्ति, अकीर्ति, इत्यादि प्राण्यांचे नानाप्रकारचे भाव माझ्यापासूनच होतात. [ सर्व प्राण्यांचे बुद्ध्यादि सर्व विकार मजपासूनच होतात. ]

महर्षयः सप्त पूर्वे चत्वारो मनवस्तथा ।
मद्भावा मानसा जाता येषां लोक इमाः प्रजाः ॥ ६ ॥

—पूर्वीचे सात भृगुप्रभृति महर्षि, तसेच चार सावर्ण्य मनु, हे सर्व माझ्यामध्येंच भावना ठेवणारे असून मीं मनानेंच त्यांना उत्पन्न केलें आहे. या लोकांत त्यांच्याच या सर्व प्रजा आहेत. [ त्या मनूंची व महर्षींची सृष्टि म्ह० विद्या व जन्म यांच्या योगानेंच झालेली संतति या लोकांतील ही सर्व स्थावर-जंगमरूप प्रजा आहे. ]

याप्रमाणें भगवान् सोपाधिक प्रभाव सांगून त्याच्या ज्ञानाचें फल सांगतात—

एतां विभूतिं योगं च मम यो वेत्ति तत्त्वतः ।
सोऽविकम्पेन योगेन युज्यते नात्र संशयः ॥ ७ ॥

( ३ )—जो माझ्या या विभूतीला व घटनेला तत्त्वतः जाणतो तो निश्चल योगानें—सम्यग्दर्शनाच्या स्थैर्यरूप योगानें युक्त होतो, यांत संशय नाहीं. [ ही वर सांगितलेली बुद्धीपासून अयशापर्यंत माझी विभूति व महर्षि, मनु यांतील योग-ऐश्वर्यादिक यांना जो पूर्णपणें जाणतो, तो यथार्थ ज्ञानाची स्थिरता याच ज्ञानास प्राप्त होतो. म्ह० जो माझें सोपाधिक ज्ञान संपादन करतो, त्याला त्याच्या द्वारा निरुपाधिक ज्ञान होतें. ]

'आतां तो कशा प्रकारच्या निश्चल योगानें युक्त होतो' म्हणून विचारशील तर सांगतों—

अहं सर्वस्य प्रभवो मत्तः सर्वं प्रवर्तते ।
इति मत्वा भजन्ते मां बुधा भावसमन्विताः ॥ ८ ॥

—मी 'वासुदेव'-संज्ञक परब्रह्म सर्व जगाची उत्पत्ति आहें. मजपासून सर्व जगत् प्रवृत्त होतें. परमार्थतत्त्वाविषयींच्या भावनेनें युक्त असलेले तत्त्ववेत्ते मला भजतात. [मी सर्वांची प्रकृति—आत्मा आहें. मज अंतर्यामीकडून प्रेरित झालेलें हें सर्व जगत् आपापल्या अधिकाराप्रमाणें मर्यादेचें उल्लंघन न करतां सर्व व्यव-

हार करितें, असें जाणून ज्ञानी मला भजतात. माझें सर्वात्मत्व, सर्व प्रकृतित्व, सर्वेश्वरत्व, सर्वज्ञत्व, इत्यादि सर्व माहात्म्य जाणून माझ्या ठिकाणींच निष्ठा ठेवतात. हा संसार असार आहे, असें ज्यांना निश्चित कळलें आहे, तेच ईश्वराच्या भक्तीचे अधिकारी आहेत. वर सांगितल्याप्रमाणें परमार्थतत्त्व ज्ञात झालें असतां प्रेम व आदर यांचा उद्भव होतो. त्यांनीं युक्त असणें हेंहि भगवद्भक्तीचें निमित्त आहे. ]

भगवद्भजनाचें हें वर सांगितलें आहे एवढेंच साधन नाहीं, तर दुसरेंहि आहे. तें कोणतें ? तर सांगतों—

मच्चित्ता मद्गतप्राणा बोधयन्तः परस्परम् ।
कथयन्तश्च मां नित्यं तुष्यन्ति च रमन्ति च ॥ ९ ॥

(४)—माझ्या मध्येंच ज्यांचें चित्त आहे व ज्यांचीं इंद्रियें मज वासुदेवालाच विषय करतात, असे माझे तत्त्ववेत्ते भक्त आचार्यांपासून ऐकलेलें भगवत्तत्त्व परस्परांस समजावून देत असतात. 'मीच ज्ञान-बल-वीर्यादिकांच्या योगानें विशिष्ट आहें,' असें नित्य सांगतात व त्यामुळें सतत संतुष्ट व रममाण होतात. [ वर सांगितलेल्या सर्वांतर्यामी ईश्वराहून दुसऱ्या कोणत्याहि पदार्थामध्यें चित्ताचा प्रसाद न होणें, चित्तानें प्रत्यगात्म्यावांचून दुसऱ्या कशाचेंहि चिंतन न करणें, हेंच मच्चित्तत्व आहे. माझ्या ठिकाणीं ज्यांनीं आपल्या इंद्रियांचा उपसंहार केला आहे, किंवा मद्गतप्राण म्ह० ज्यांचें जीवन मलाच प्राप्त झालें आहे; भगवानावांचून भक्तांचा आपल्या जीवनामध्येंहि आदर नसतो. त्यांनीं आपलें जीवनहि ईश्वरार्पण केलेलें असतें. यापेक्षां आणखी संन्यास तो कशाचा उरला ? असो. परस्परांस बोध करणारे, त्याचें स्वरूप सांगणारे, आचार्यांपासून श्रवण करून सहाध्यायी वादकथेनें एकमेकांस भगवानाचें ज्ञान करून देतात, तेंहि भगवद्भजनाचें साधन आहे. 'मी भगवान् ज्ञान-बल-वीर्य इत्यादि धर्मांनीं विशिष्ट आहें ' असें माझें कथन करणारे आचार्य शिष्यांना आगम, शास्त्र व उपपत्ति यांच्या योगानें विशिष्ट धर्मांनीं युक्त अशा माझा बोध करतात. तेंहि एक भजनसाधन आहे. असे ते माझे भक्त अत्यंत संतुष्ट होतात आणि प्रिय मनुष्याच्या संगतीनें जसे, तसेच ते त्या भजनांत रत होतात. यावरून भजनाचे अनेक प्रकार आहेत, हें सिद्ध झालें. ]

तेषां सततयुक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम् ।
ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयान्ति ते ॥ १० ॥

(५)—जे माझे भक्त होऊन वर सांगितलेल्या प्रकारांनीं माझें भजन करितात, त्या माझ्यामध्यें चित्ताला सतत स्थिर केलेल्या व मोठ्या प्रेमानें मला भजणाऱ्या भक्तांना मी, ज्याच्या योगानें ते मलाच प्राप्त होतील, असा बुद्धियोग—ज्ञानयोग देतों. [ माझ्या ठिकाणींच चित्ताला स्थिर करून व सर्व एषणांचा त्याग करून मोठ्या प्रेमानें मला भजणाऱ्या भक्तांना मी 'अविकंप' ज्ञानयोग देतों. त्या तत्त्वज्ञानरूप बुद्धियोगानें ते मला प्राप्त होतात. 'हा मी आत्मा आहें' अशा भावनेनें ते मज आत्मरूप परमेश्वराला प्राप्त होतात. ] तूं त्यांना बुद्धियोग कशासाठीं देतोस ! किंवा कोणत्या भगवत्प्राप्तीच्या प्रतिबंधक हेतूचा नाश करणारा बुद्धियोग तूं त्या आपल्या भक्तांना देतोस ?' असें विचारशील तर सांगतों—

तेषामेवानुकम्पार्थमहमज्ञानजं तमः ।
नाशयाम्यात्मभावस्थो ज्ञानदीपेन भास्वता ॥ ११ ॥

—त्यांच्यावर दया करण्यासाठींच, मी त्यांच्या अंतःकरणांत स्थित होऊन देदीप्यमान ज्ञानदीपानें अज्ञानामुळें उत्पन्न झालेला त्यांचा अविवेक घालवितों. [ मी त्यांच्यावर दया करण्यासाठीं त्यांच्या अंतःकरणांत स्थित होऊन आत्मसाक्षात्काररूप अत्यंत प्रदीप्त ज्ञानदीपानें अविवेकजन्य मोहान्धकार घालवितों. ].

अर्जुन उवाच—

परं ब्रह्म परं धाम पवित्रं परमं भवान् ।
पुरुषं शाश्वतं दिव्यमादिदेवमजं विभुम् ॥ १२ ॥
आहुस्त्वामृषयः सर्वे देवर्षिर्नारदस्तथा ।
असितो देवलो व्यासः स्वयं चैव ब्रवीषि मे ॥ १३ ॥
सर्वमेतदृतं मन्ये यन्मां वदसि केशव ।
न हि ते भगवन्व्यक्तिं विदुर्देवा न दानवाः ॥ १४ ॥

( ६ ) भगवानांची पूर्वोक्त विभूति व योग ऐकून अर्जुन म्हणाला—सर्व ऋषि तुला 'आपण परमात्मा अहां, परम तेज अहां, परमपावन अहां व पुरुष, शाश्वत, दिव्य, सर्वांच्या पूर्वीं झालेला देव, जन्मरहित व विभु अहां' असें म्हणतात. त्याचप्रमाणें देवर्षि नारद, असित देवल व व्यासप्रभृति इतर ऋषि तसेंच म्हणतात आणि तूं स्वतःहि मला तेंच सांगतोस. हे केशवा, तूं मला जें

सांगत आहेस, तें सर्व मी खरें समजतों. हे भगवन्, तुझ्या निरुपाधिक स्वरूपाला देव जाणत नाहींत व दानवहि जाणत नाहींत. [ केशवा, ऋषि व तूं जें मला सांगत अहां, त्यावर माझा पूर्ण विश्वास आहे. तुझ्या निरुपाधिक स्वरूपाला देव व दानवहि जाणत नाहींत, मग मानवांची काय कथा ! ]

स्वयमेवात्मनात्मानं वेत्थ त्वं पुरुषोत्तम ।
भूतभावन भूतेश देवदेव जगत्पते ॥ १५ ॥

—हे पुरुषोत्तमा, हे भूतांना उत्पन्न करणाऱ्या व भूतांचें नियमन करणाऱ्या देवांच्याहि देवा, हे जगत्पालका, तूं स्वतःच ज्ञानस्वरूपानें निरतिशय ज्ञानैश्वर्यसंपन्न अशा स्वतःला जाणतोस. [ तुजवांचून सर्व जड असल्यामुळें तुझ्या सोपाधिक स्वरूपालाहि दुसरा कोणी जाणत नाहीं. तुला सर्वप्रकृतित्व, सर्वेश्वरत्व व सर्वकर्तृत्व आहे, तुझें सोपाधिक स्वरूप देवांनाहि आराधना करण्यास योग्य आहे. ]

ज्याअर्थी तुझें स्वरूप आमच्या सारख्यांचा विषय होऊं शकत नाहीं, पण आम्हांला तें जाणण्याची मात्र इच्छा आहे त्याअर्थीं—

वक्तुमर्हस्यशेषेण दिव्या ह्यात्मविभूतयः ।
याभिर्विभूतिभिर्लोकानिमांस्त्वं व्याप्य तिष्ठसि ॥ १६ ॥

—ज्या विभूतींनीं तूं या लोकांस व्यापून रहातोस, त्या आपल्या दिव्य विभूति संपूर्णपणें सांगण्यास तूं योग्य आहेस.

कथं विद्यामहं योगिंस्त्वां सदा परिचिन्तयन् ।
केषु केषु च भावेषु चिन्त्योऽसि भगवन्मया ॥ १७ ॥
विस्तरेणात्मनो योगं विभूतिं च जनार्दन ।
भूयः कथय तृप्तिर्हि शृण्वतो नास्ति मेऽमृतम् ॥ १८ ॥

—तूं माझ्या विभूति कशासाठीं ऐकण्याची इच्छा करतोस, म्हणून विचारशील तर त्याचें कारण सांगतों—हे योगिन्, तुझें सर्वदा चिंतन करणाऱ्या मीं तुला कसें बरें जाणावें ? हे भगवन्, तूं कोण-कोणत्या पदार्थांमध्यें मजकडून चिंतन करण्यास योग्य आहेस ! हे जनार्दना, तुझ्या आत्म्याचा विस्तार—विशेष प्रकारचें योगैश्वर्य व ध्यानास योग्य असलेल्या पदार्थांचा विस्तार पुनरपि सविस्तर सांग. कारण तुझें वाक्यामृत ऐकणाऱ्या माझी तृप्ति होत नाहीं.

[ ऐश्वर्यसंपन्न ईश्वरा, मी स्थूलबुद्धि आहें. म्हणून कोणत्या प्रकारानें सदा तुझें परिचिंतन करीत होत्साता, शुद्धचित्त होऊन निरुपाधिक अशा तुला जाणूं शकेन! तसेंच कोणकोणत्या वस्तूंमध्यें मीं तुझें ध्यान करावें? म्हणून आपली योगैश्वर्यशक्ति व ध्येयपदार्थांचा विस्तार मला पुनरपि सांग. ]

श्रीभगवानुवाच—

हंत ते कथयिष्यामि दिव्या ह्यात्मविभूतयः।
प्राधान्यतः कुरुश्रेष्ठ नास्त्यन्तो विस्तरस्य मे ॥ १९ ॥

( ७ )—अर्जुनाला आश्वासन देत भगवान् म्हणाले—अर्जुना, बरें आहे, मी आतां तुला आपल्या मुख्य मुख्य दिव्य आत्मविभूति सांगतों. कारण माझ्या विस्ताराचा अंत नाहीं. तो अनंत आहे. त्यामुळें तो पूर्णपणें सांगतां येणें शक्य नाहीं.

अहमात्मा गुडाकेश सर्वभूताशयस्थितः
अहमादिश्च मध्यं च भूतानामन्त एव च ॥ २० ॥

—हे अर्जुना, आतां अगोदर माझी पहिली विभूति ऐक. मी सर्व प्राण्यांच्या हृदयांत स्थित असलेला आत्मा आहें. मी सर्व भूतांचा आदि–कारण, मध्य–स्थिति व अंत–प्रलय आहें. [ भूतांच्या आशयांत–अंतर्हृदयांत जेथें कर्म व ज्ञान यांचे संस्कार रहातात, तेथें स्थित असलेला मी प्रत्यगात्मा आहें, असें नित्य ध्यान करावें. पण जो मध्यम किंवा मंद अधिकारी परमात्म्याचें प्रत्यगात्मत्वानें ध्यान करूं शकत नाहीं, त्यानें मीच सर्व भूतांचें कारण, स्थिति व प्रलय आहें, परमात्मा सर्व कारण, सर्वज्ञ व सर्वेश्वर असल्यामुळें तो सर्वत्र ध्यान करण्यास योग्य आहे, दुसरा कोणीहि नाहीं, असें ध्यान करावें. ]

आदित्यानामहं विष्णुर्ज्योतिषां रविरंशुमान्।
मरीचिर्मरुतामस्मि नक्षत्राणामहं शशी ॥ २१ ॥
वेदानां सामवेदोऽस्मि देवानामस्मि वासवः।
इन्द्रियाणां मनश्चास्मि भूतानामस्मि चेतना ॥ २२ ॥

—पण, हें दुसऱ्या प्रकारचें ध्यान करण्यासहि असमर्थ असलेल्या पुरुषानें मी आदित्यांतील विष्णु आहें. ज्योतींतील किरणवान् सूर्य आहें. 'मरुत्' या नांवाच्या देवांतील मी मरीचि आहें. नक्षत्रांतील चंद्र आहें. वेदांतील सामवेद, देवांतील इंद्र, इंद्रियांतील मन व भूतांतील चेतना आहें. [ शरीर

व इंद्रियें यांच्या संघातांत नित्य अभिव्यक्त होणारी जी बुद्धिवृत्ति ती चेतना होय. ]

रुद्राणां शंकरश्चास्मि वित्तेशो यक्षरक्षसाम् ।
वसूनां पावकश्चास्मि मेरुः शिखरिणामहम् ॥ २३ ॥
पुरोधसां च मुख्यं मां विद्धि पार्थ बृहस्पतिम् ।
सेनानीनामहं स्कन्दः सरसामस्मि सागरः ॥ २४ ॥
महर्षीणां भृगुरहं गिरामस्म्येकमक्षरम् ।
यज्ञानां जपयज्ञोऽस्मि स्थावराणां हिमालयः ॥ २५ ॥

—मी अकरा रुद्रांतील शंकर आहें. यक्ष-राक्षसांतील कुबेर आहें. आठ वसूंतील ‘ पावक—अग्नि ’ या नांवाचा वसु मी आहें. मी शिखरयुक्त पर्वतांतील मेरु आहें. हे पार्था, मी पुरोहितांतील मुख्य बृहस्पति आहें, असें तूं जाण. मी सेनापतींतील स्कंद—कार्तिकस्वामी आहें व देवनिर्मित सरोवरांतील सागर आहें. मी महर्षींतील भृगु व पदरूप वाणींतील ओंकार हें एकाक्षर आहें. मी यज्ञांतील जपयज्ञ व स्थावरांतील हिमालय आहें.

अश्वत्थः सर्ववृक्षाणां देवर्षीणां च नारदः ।
गन्धर्वाणां चित्ररथः सिद्धानां कपिलो मुनिः ॥ २६ ॥

—मी सर्व वनस्पतींतील अश्वत्थ—पिंपळ आहें. देवर्षींतील नारद आहें. गंधर्वांतील तुझा मित्र चित्ररथ मी आहें. सिद्धांतील कपिलमुनि मी आहें. [ जे देवच असून मंत्रदर्शित्वामुळें ऋषित्वास प्राप्त होतात, ते देवर्षि. अशा देवर्षींतील नारद मी आहें. जन्मतः धर्म, ज्ञान, वैराग्य व ऐश्वर्य यांच्या आधिक्याला प्राप्त झालेल्या सिद्धांतील मी कपिलमुनि आहें.]

उच्चैःश्रवसमश्वानां विद्धि माममृतोद्भवम् ।
ऐरावतं गजेन्द्राणां नराणां च नराधिपम् ॥ २७ ॥

—मला अश्वांतील अमृतासाठीं केलेल्या क्षीरसागराच्या मंथनांतून उत्पन्न झालेला उच्चैःश्रवा नामक अश्व जाण. मी गजेंद्रांतील ऐरावत व मनुष्यांतील राजा आहें.

आयुधानामहं वज्रं धेनूनामस्मि कामधुक् ।
प्रजनश्चास्मि कन्दर्पः सर्पाणामस्मि वासुकिः ॥ २८ ॥

अनन्तश्चास्मि नागानां वरुणो यादसामहम् ।
पितॄणामर्यमा चास्मि यमः संयमतामहम् ॥ २९ ॥
प्रह्लादश्चास्मि दैत्यानां कालः कलयतामहम् ।
मृगाणां च मृगेन्द्रोऽहं वैनतेयश्च पक्षिणाम् ॥ ३० ॥
पवनः पवतामस्मि रामः शस्त्रभृतामहम् ।
झषाणां मकरश्चास्मि स्रोतसामस्मि जाह्नवी ॥ ३१ ॥

—मी आयुधांतील वज्र, धेनूंतील कामधेनु, प्रजोत्पादनाचें कारण कंदर्प—काम व सविष सर्पांतील वासुकी आहें. निर्विष नागांतील अनंत, जलदेवतांतील वरुण, पितरांतील 'अर्यमा'-नांवाचा पितृराज व संयम करणारांतील यम आहें. मी दैत्यांतील प्रल्हाद आहें. गणना करणारांतील काल आहें. पशूंतील सिंह किंवा वाघ आहें व पक्ष्यांतील गरुड आहें. मी पावन करणारांतील वायु, शस्त्रधारण करणारांतील दाशरथि राम, मांसे, कांसव, इत्यादि जलचर प्राण्यांतील सुसर—मगर मी आहें व प्रवाहांतील गंगा मी आहें.

सर्गाणामादिरन्तश्च मध्यं चैवाहमर्जुन ।
अध्यात्मविद्या विद्यानां वादः प्रवदतामहम् ॥ ३२ ॥

—हे पार्था, मी सृष्टीची उत्पत्ति, स्थिति व लय आहें. विद्यांतील अध्यात्मविद्या आहें. मी वाद, जल्प व वितंडा यांतील वाद आहें. [ कारण वाद अर्थाच्या निर्णयाला कारण होतो. ]

अक्षराणामकारोऽस्मि द्वन्द्वः सामासिकस्य च ।
अहमेवाक्षयः कालो धाताऽहं विश्वतोमुखः ॥ ३३ ॥

—मी अक्षरांतील 'अकार' हें अक्षर आहें. समासांच्या समूहांतील उभयपदार्थप्रधान 'द्वंद्व'-समास मी आहें. [ कारण त्यांतील सर्व पदें अर्थामध्यें येतात. ] अक्षय्य काल मीच आहें. मी सर्व जगाला त्याच्या कर्माचें फल देणारा सर्वतोमुख धाता आहें. ]

मृत्युः सर्वहरश्चाहमुद्भवश्च भविष्यताम् ।
कीर्तिः श्रीर्वाक्च नारीणां स्मृतिर्मेधा धृतिः क्षमा ॥ ३४ ॥

—मी सर्वांच्या धनादिकांचें व प्राणांचें हरण करणारा मृत्यु आहें. ( परमेश्वर प्रलयसमयीं सर्वांचें हरण करीत असल्यामुळें सर्वहर आहे व तोच मी होय. ) पुढें होणाऱ्या उत्कर्षांचा—अभ्युदयाचा उद्भव म्ह० हेतु मी आहें.

आणि सर्व स्त्रियांतील उत्तम स्त्रिया अशा ज्या कीर्ति, श्री, वाक्, स्मृति, मेधा–धारणाशक्ति, धृति व क्षमा या देवता, त्या मी आहें. [ कीर्ति–धार्मिकतेविषयींची ख्याति; श्री–लक्ष्मी, कांति, शोभा; वाक्–सर्व अर्थ प्रकाशन करणारी वाणी; स्मृति–दीर्घ कालापूर्वी अनुभविलेल्या गोष्टींची स्मरणशक्ति; मेधा–ग्रंथधारण शक्ति; धृति–धैर्य; क्षमा–मान व अपमान या दोन्ही वेळीं मन निर्विकार ठेवणें. या अलौकिक स्त्रियांतील या उत्तम स्त्रिया मी आहें. ज्यांच्या आभासमात्र संबंधानेंहि लोक आपल्याला कृतार्थ समजतात त्या कीर्त्यादिक मी आहें. ]

बृहत्साम तथा साम्नां गायत्री छन्दसामहम् ।
मासानां मार्गशीर्षोऽहमृतूनां कुसुमाकरः ॥ ३५ ॥

—त्याचप्रमाणें सामांतील बृहत्साम मी आहें. मी छंदांतील गायत्री छंद आहें. ( कारण गायत्री द्विजांच्या दुसऱ्या जन्माची जननी आहे. ) मी चैत्रादि बारा महिन्यांतील मार्गशीर्ष मास आहें. ( कारण तो महिना परिपक्क धान्यांनीं युक्त असतो. ) तसेंच वसंतादि ऋतूंतील मी वसंत आहें. ( कारण तो ऋतु फार रमणीय असतो. )

द्यूतं छलयतामस्मि तेजस्तेजस्विनामहम् ।
जयोऽस्मि व्यवसायोऽस्मि सत्त्वं सत्त्ववतामहम् ॥ ३६ ॥

—छल म्हणजे कपट करणाऱ्या पदार्थांतील फाशांनीं खेळणें इत्यादि स्वरूपाचें द्यूत मी आहें. ( तें सर्वस्व घालविण्यास कारण होतें. निराळ्याच मिषानें दुसऱ्याच्या इष्टाचा घात करणें व आपलें इष्ट साधणें हा छल होय. ) मी तेजस्वी लोकांतील तेज आहें. विजयीजनांचा जय आहें. व्यवसायी लोकांचा व्यवसाय व सात्त्विक लोकांचें सत्त्व मी आहें.

वृष्णीनां वासुदेवोऽस्मि पाण्डवानां धनंजयः ।
मुनीनामप्यहं व्यासः कवीनामुशना कविः ॥ ३७ ॥
दण्डो दमयतामस्मि नीतिरस्मि जिगीषताम् ।
मौनं चैवास्मि गुह्यानां ज्ञानं ज्ञानवतामहम् ॥ ३८ ॥

—मी वृष्णींतील वासुदेव आहें. पांडवांतील धनंजय आहें. मननशील–सर्व पदार्थांचे ज्ञानी, असे जे मुनि, त्यांमध्यें मी व्यास आहें. सर्वज्ञ विद्वानांतील ‘ शुक्राचार्य ’ या नांवाचा कवि–सर्वज्ञ मी आहें. प्राण्यांचें दमन

करणारांतील दंड, उद्धटांना नम्र करण्याचें साधन मी आहें. जयाची इच्छा करणारांमध्यें मी नीति आहें. गुह्यांतील मौन आहें. ज्ञानवानांतील श्रवणादिकांच्या द्वारा परिपक्व झालेल्या चित्तसमाधीपासून उद्भवलेलें सम्यग्ज्ञान मी आहें.

यच्चापि सर्वभूतानां बीजं तदहमर्जुन ।
न तदस्ति विना यत्स्यान्मया भूतं चराचरम् ॥ ३९ ॥

—हे अर्जुना, याशिवाय सर्वभूतांचें जें बीज, तें मी आहें. जें चर किंवा अचर भूत माझ्यावांचून असेल, असें कांहीं नाहींच. [ सर्व जड समूहांत प्रतिबिंबित झालेलें चैतन्य हेंच बीज आहे. तात्पर्य कोणतेंहि स्थावर-जंगम भूत मजवांचून नाहीं. ]

नान्तोऽस्ति मम दिव्यानां विभूतीनां परंतप ।
एष तूद्देशतः प्रोक्तो विभूतेर्विस्तरो मया ॥ ४० ॥

—अर्जुना, माझ्या दिव्य–अलौकिक विभूतींचा–विस्तारांचा अंत–सीमा नाहीं. तथापि मीं ह्या विभूतींचा विस्तार संक्षेपानें सांगितला आहे. [ सर्वांचा आत्मा, अशा ईश्वराच्या दिव्य विभूतींची मर्यादा कोणालाहि सांगणें किंवा जाणणें शक्य नाहीं. त्याची मर्यादा कोणालाहि ठाऊक नाहीं. त्याचा अन्त कोणालाहि लागला नाहीं. त्यामुळें तो कोणालाहि सांगतां येत नाहीं. यास्तव मीं ह्या विभूतीचा विस्तार एकदेशानें सांगितला आहे. ]

यद्यद्विभूतिमत्सत्त्वं श्रीमदूर्जितमेव वा ।
तत्तदेवावगच्छ त्वं मम तेजोंऽशसंभवम् ॥ ४१ ॥

—वर न सांगितलेल्याहि ईश्वराच्या विभूतींचा संग्रह करण्यासाठीं मी तुला विभूतींचें लक्षण सांगतों—जें जें ऐश्वर्ययुक्त, समृद्धि किंवा कांति यांनीं युक्त अथवा बलाढ्यसत्त्व–वस्तु–प्राणी आहे, तें तेंच माझ्या तेजाच्या अंशापासून झालेलें आहे, असें तूं जाण. यालोकीं उत्कर्षानें युक्त असलेला प्रत्येक प्राणी किंवा पदार्थ ईश्वराच्या तेजोंशापासून झाला आहे. असा तूं निश्चय कर.

अथवा बहुनैतेन किं ज्ञातेन तवार्जुन ।
विष्टभ्याहमिदं कृत्स्नमेकांशेन स्थितो जगत् ॥ ४२ ॥

—किंवा, हे अर्जुना, हें असें तूं पुष्कळ जरी जाणलेंस, तरी तुला त्यापासून काय लाभ होणार आहे ? कांहीं नाहीं. यास्तव मी आपल्या एका अंशानें हें

सर्व जगत् दृढ धारण करून राहिलों आहें. [ कितीहि सांगितलें तरी आणखीं शिल्लकच रहाणारी ही विभूति तूं किती जरी ऐकलीस, तरी ती अपूर्णच रहाणार. माझें पूर्णपणें ज्ञान होणें कोणालाहि शक्य नाहीं. यास्तव तूं माझ्या सकल विभूतींना थोडक्यांत ऐक. माझा एक अवयव म्ह० सर्वभूतस्वरूप—सर्व प्रपंचाची उत्पादनशक्ति याच उपाधीनें युक्त अशा एका पादानें या सर्व जगाचें धारण केलें आहे. याप्रमाणें या अध्यायांत भगवानांच्या नानाप्रकारच्या विभूति ध्येयरूपानें व ज्ञेयरूपानें सांगितल्या आहेत व सर्व प्रपंचात्मक ध्येयरूप प्रदर्शित करून 'याचे तीन पाद निरुपाधिक अवस्थेंत आहेत' अशा अर्थाच्या श्रुतिवचनानें निरुपाधिक—प्रपंचातीत तत्त्वाचा उपदेश करणाऱ्या भगवानांनीं तत्पदाचा परिपूर्ण सच्चिदानंद एकरस आत्मा हा लक्ष्यार्थ निश्चित केला आहे. ]

( येथें भगवद्गीतेचा 'विभूतियोग'-नांवाचा दहावा अध्याय समाप्त झाला. ) ६. ४. ३४.

---

## अध्याय ३५ वा

### ( गीताध्याय ११ वा. विश्वरूपदर्शनयोग. )

[ १ अर्जुनाची भगवानाच्या वैष्णवरूपदर्शनाविषयीं स्तवनपूर्वक प्रार्थना. २ भगवानांचें त्यास अनुमोदन व दिव्यदृष्टीचें दान. ३ संजयानें केलेलें विश्वरूपाचें वर्णन. ४ अर्जुनानें केलेलें त्याचें स्वरूपवर्णन. ५ 'तूं उग्र रूप धारण कां केलेंस' असा अर्जुनाचा प्रश्न. ६ भगवानांचें उत्तर. ७ अर्जुनानें केलेली भगवानाची स्तुति. ८ अर्जुनाच्या प्रार्थनेला मान देऊन भगवानाचें सौम्यरूप धारण व अर्जुनाचें सांत्वन. ९ परमार्थोपदेश. ]

भगवानांच्या विभूति सांगितल्या. परमात्म्याचें सोपाधिक रूप ध्येयत्वानें व निरुपाधिकरूप ज्ञेयत्वानें सांगितलें. त्यांत 'मी एका अंशानें या सर्व जगाला दृढ धारण करून स्थित आहें,' असें भगद्वचन ऐकून ईश्वराचें सोपाधिक, आद्य व सर्व जगदात्मक जें विश्वरूप, त्याला साक्षात् पहाण्याची इच्छा करणारा—

अर्जुन उवाच—

मदनुग्रहाय परमं गुह्यमध्यात्मसंज्ञितम् ।
यत्त्वयोक्तं वचस्तेन मोहोऽयं विगतो मम ॥ १ ॥

( १ ) अर्जुन म्हणाला—हे कृष्णा, माझ्यावर अनुग्रह करण्यासाठीं तूं जें अचिंत्य, गुह्य, ' अध्यात्म '-संज्ञक वचन सांगितलेंस, त्याच्या योगानें माझा हा मोह-अविवेक पार निघून गेला आहे. [ माझी अविवेकबुद्धि नष्ट झाली. ]

भवाप्ययौ हि भूतानां श्रुतौ विस्तरशो मया ।
त्वत्तः कमलपत्राक्ष माहात्म्यमपि चाव्ययम् ॥ २ ॥

—हे कमलनयना, मी तुझ्या तोंडून सर्व भूतांची उत्पत्ति व लय सविस्तर ऐकला व तुझें अव्यय माहात्म्यहि श्रवण केलें. [ भूतांच्या उत्पत्ति-प्रलयांचें निमित्त तूं आहेस. अक्षय्य माहात्म्य म्ह० पारमार्थिक किंवा सोपाधिक सर्वात्मत्वादिरूप तेंहि मीं तुझ्याच मुखानें श्रवण केलें. ]

एवमेतद्यथाऽऽत्थ त्वमात्मानं परमेश्वर ।
द्रष्टुमिच्छामि ते रूपमैश्वरं पुरुषोत्तम ॥ ३ ॥

—हे परमेश्वरा, ज्या सोपाधिक किंवा निरुपाधिक प्रकारें तूं आपलें स्वरूप सांगत आहेस, तसेंच तें आहे, त्याहून निराळ्या प्रकारचें नाहीं. तथापि हे पुरुषोत्तमा ! तुझें ज्ञान-ऐश्वर्य-शक्ति-बल-वीर्य-तेज यांनीं संपन्न असलेलें ईश्वरसंबंधी वैष्णव रूप मी पाहूं इच्छितों. [ तुझ्या वचनावर माझा विश्वास नाहीं म्हणून नव्हे, तर मला तें पहाण्याची इच्छा झाली आहे, म्हणून मी तुझी प्रार्थना करीत आहें. ]

मन्यसे यदि तच्छक्यं मया द्रष्टुमिति प्रभो ।
योगेश्वर ततो मे त्वं दर्शयात्मानमव्ययम् ॥ ४ ॥

—हे स्वामिन्, मी तें विश्वरूप पहाण्यासाठीं अतिशय उत्सुक झालों आहें खरा, पण मला तें पहातां येणें जर शक्य असेल तर हे प्रभो, तूं आपलें अव्ययस्वरूप मला दाखीव. [ ईश्वर सृष्टि, स्थिति, संहार, प्रवेश व प्रशासन करण्यास समर्थ आहे, म्हणून त्याला येथें ' प्रभो ' असें म्हटलें आहे. ]

श्रीभगवानुवाच—

पश्य मे पार्थ रूपाणि शतशोऽथ सहस्रशः ।
नानाविधानि दिव्यानि नानावर्णाकृतीनि च ॥ ५ ॥

( २ ) अर्जुनाची ही प्रार्थना ऐकून श्रीभगवान् म्हणाले—हे पार्था, तूं माझीं अनेक प्रकारचीं दिव्य-अलौकिक आणि नाना वर्णांचीं व नाना आकृ-

तीचीं रूपें शेकडों व हजारों प्रकारें पहा. [ माझीं नाना प्रकारचीं, अलौकिक, नानावर्ण व आकृति यांनीं विशिष्ट अशीं अनेक रूपें पहा. ]

पश्यादित्यान्वसून्रुद्रानश्विनौ मरुतस्तथा ।
बहून्यदृष्टपूर्वाणि पश्याश्चर्याणि भारत ॥ ६ ॥
इहैकस्थं जगत्कृत्स्नं पश्याद्य सचराचरम् ।
मम देहे गुडाकेश यच्चान्यद्द्रष्टुमिच्छसि ॥ ७ ॥
न तु मां शक्यसे द्रष्टुमनेनैव स्वचक्षुषा ।
दिव्यं ददामि ते चक्षुः पश्य मे योगमैश्वरम् ॥ ८ ॥

—बारा सूर्य, आठ वसु, अकरा रुद्र, दोन अश्विनिकुमार यांस, त्याचप्रमाणें जे एकुणपन्नास देवतांचे सात गण त्या मरुद्गणांस, तसेंच, हे भरतकुलोत्पन्ना, मनुष्यलोकीं तूं किंवा तुझ्याहून दुसऱ्या कोणीं कधींच न पाहिलेलीं अशीं दुसरींहि अनेक आश्चर्यें तूं पहा. अर्जुना, आतां तुला माझें केवळ आदित्यादि रूपच दिसेल, असें नाहीं. तर या माझ्या देहांतील एकाच अवयवांत असलेलें सर्व जगत् चराचर प्राण्यांसह तूं पहा आणि दुसरें जें कांहीं जय-पराजयादिक पहावयाचें असेल, तेंहि पहा. पण पार्था, तूं मला याच आपल्या प्राकृत चक्षूनें—बाह्य दृष्टीनें पाहूं शकणार नाहींस, म्हणून मी तुला दिव्यदृष्टि देतों. त्या दिव्यचक्षूनें माझ्या ऐश्वरयोगास तूं पहा. [ मज ईश्वराचा जो योग तो ऐश्वरयोग म्ह० योगशक्तीचें आधिक्य, असा भावार्थ. ]

संजय उवाच—

एवमुक्त्वा ततो राजन् महायोगेश्वरो हरिः ।
दर्शयामास पार्थाय परमं रूपमैश्वरम् ॥ ९ ॥

संजय म्हणाला—त्यानंतर, हे राजा धृतराष्ट्रा, असें बोलून महायोगेश्वर पार्थाला परम ईश्वरसंबंधी हरिरूप दाखविता झाला.

अनेकवक्त्रनयनमनेकाद्भुतदर्शनम् ।
अनेकदिव्याभरणं दिव्यानेकोद्यतायुधम् ॥ १० ॥
दिव्यमाल्याम्बरधरं दिव्यगन्धानुलेपनम् ।
सर्वाश्चर्यमयं देवमनन्तं विश्वतोमुखम् ॥ ११ ॥

( ३ )—ज्याला अनेक मुखें व नेत्र आहेत, ज्यांत अनेक विस्मयकारक दर्शनें आहेत, ज्यांत अनेक दिव्य आभरणें आहेत, ज्यांत दिव्य आयुधें उचल-

केलीं आहेत, ज्यानें दिव्य पुष्पें व वस्त्रें धारण केलीं आहेत, ज्यानें दिव्य गंधाचें अनुलेपन केलें आहे, असें सर्व आश्चर्यमय, प्रकाशमान, अंतरहित व सर्वतोमुख असें विश्वरूप भगवानांनीं त्याला दाखविलें. किंवा अर्जुनानें अशा त्या विश्वरूपाला पाहिलें.

दिवि सूर्यसहस्रस्य भवेद्युगपदुत्थिता ।
यदि भाः सदृशी सा स्याद्भासस्तस्य महात्मनः ॥ १२ ॥

—जर द्युलोकांत–आकाशांत सहस्र सूर्यांची प्रभा एकाच वेळीं उत्पन्न होईल, तर ती प्रभा त्या महात्म्याच्या प्रभेसारखी होईल. [ सहस्र सूर्यांच्या समूहाची जी एकाच वेळीं उदय पावलेली कांति–तेज, तसली कांति जर कदाचित् संभवलीच, तर ती त्या महात्म्या विश्वरूपाच्या कांतीसारखी असलीच तर असेल. पण ती तत्तुल्य होईलच, असा निश्चय नाहीं. सहस्र सूर्यांच्या कांतीहूनहि विश्वरूपाची कांति अधिक आहे. ]

तत्रैकस्थं जगत्कृत्स्नं प्रविभक्तमनेकधा ।
अपश्यद्देवदेवस्य शरीरे पाण्डवस्तदा ॥ १३ ॥

—अर्जुनानें त्या विश्वस्वरूपांत एवढेंच पाहिलें असें नाहीं, तर त्यानें सर्व जगत् एकत्र असलेलें अवलोकन केलें, असें संजय सांगतो—त्या वेळीं अर्जुन त्या देवाधिदेवाच्या शरीरांत एकाच अवयवांत स्थित असलेले देव, पितर, मनुष्य, इत्यादि भेदांनीं अनेक प्रकारें अत्यंत विभक्त झालेलें सर्व जगत् पहाता झाला.

ततः स विस्मयाविष्टो हृष्टरोमा धनंजयः ।
प्रणम्य शिरसा देवं कृताञ्जलिरभाषत ॥ १४ ॥

—विश्वरूप धारण करणाऱ्या भगवानांचें तें स्वरूप व त्यांच्या त्या स्वरूपांत एकीभूत झालेलें तें जगत् यांस पाहून अर्जुन आश्चर्यचकित झाला. त्याच्या अंगावर रोमांच उभे राहिले. त्यानें हात जोडले व मस्तकानें देवाला प्रणाम करून असें म्हटलें—

अर्जुन उवाच—

पश्यामि देवांस्तव देव देहे
सर्वांस्तथा भूतविशेषसङ्घान् ।
ब्रह्माणमीशं कमलासनस्थ-
मृषींश्च सर्वानुरगांश्च दिव्यान् ॥ १५ ॥

( ४ ) अर्जुन म्हणाला—हे कृष्णा, मी तुझ्या देहांत, सर्व देवांना, त्याचप्रमाणें निरनिराळ्या जातींच्यां स्थावर-जंगम प्राणिसमूहांस पहात आहें. सर्व प्रजांचें नियमन करणारा व पृथ्वीकमलाच्या मेरुकर्णिकेंत स्थित असलेला जो चतुर्मुख ब्रह्मदेव त्याला, वसिष्ठादि सर्व ऋषींना आणि वासुकिप्रभृति दिव्य सर्पांना मी पहात आहें.

अनेक बाहूदरवक्त्रनेत्रं
पश्यामि त्वां सर्वतोऽनन्तरूपम् ।
नान्तं न मध्यं न पुनस्तवादिं
पश्यामि विश्वेश्वर विश्वरूप ॥ १६ ॥

—हे विश्वेश्वरा, हे विश्वरूप कृष्णा, मी तुला अनेक हस्त, उदरें, मुखें व नेत्र यांनीं युक्त व सर्व बाजूंनीं अनंतरूपांनीं विशिष्ट, असा पहात आहें, पण मला तुझा आदि, अंत व मध्य दिसत नाहीं. [ तुझें स्वरूप कोठून कोठवर पसरलें आहे, तें पहाण्यास मी समर्थ नाहीं व ज्याचा आदि-अंत दिसत नाहीं, त्याचा मध्यहि कळत नाहीं, हा न्यायच आहे. ]

किरीटिनं गदिनं चक्रिणं च
तेजोराशिं सर्वतो दीप्तिमन्तम् ।
पश्यामि त्वां दुर्निरीक्ष्यं समन्ताद्
दीप्तानलार्कद्युतिमप्रमेयम् ॥ १७ ॥

—भगवन्, मी तुला किरीटी, गदी व चक्री–ज्याच्या मस्तकावर किरीट, खालच्या उजव्या हातांत गदा व वरच्या हातांत चक्र आहे, असा तेजःपुंज, सर्व बाजूंनीं प्रकाशवान्, त्यामुळें सर्वतः दुर्निरीक्ष्य, प्रदीप्त अग्नि किंवा सूर्य यांप्रमाणें कांति असलेला व कोणत्याहि प्रमाणांचा विषय न होणारा असा पहात आहें.

त्वमक्षरं परमं वेदितव्यं
त्वमस्य विश्वस्य परं निधानम् ।
त्वमव्ययः शाश्वतधर्मगोप्ता
सनातनस्त्वं पुरुषो मतो मे ॥ १८ ॥

—हे देवेशा, या योगशक्तिदर्शनावरून तुझ्या निरुपाधिक स्वरूपाचें मला असें अनुमान होतें. तूंच परब्रह्म आहेस, तूं या जगाचें परम आश्रयस्थान

आहेस. तूं क्षय न पावणारा आहेस. शाश्वत धर्माचें रक्षण करणारा चिरंतन पुरुष आहेस, असा तूं मला संमत झालेला आहेस.

अनादिमध्यान्तमनन्तवीर्य-
मनन्तबाहुं शशिसूर्यनेत्रम् ।
पश्यामि त्वां दीप्तहुताशवक्त्रं
स्वतेजसा विश्वमिदं तपन्तम् ॥ १९ ॥
द्यावापृथिव्योरिदमन्तरं हि
व्याप्तं त्वयैकेन दिशश्च सर्वाः ।
दृष्ट्वाद्भुतं रूपमुग्रं तवेदं
लोकत्रयं प्रव्यथितं महात्मन् ॥ २० ॥

—मी तुला आदि-मध्य-अंतरहित, ज्याचें वीर्य व बाहु अनंत आहेत, चंद्र व सूर्य हे ज्याचे नेत्र आहेत, प्रदीप्त अग्नि हेंच ज्याचें मुख आहे व आपल्या तेजानें या विश्वाला ताप देणारा असा पहात आहें. ( अर्जुनानें भगवानांच्या 'विश्वरूप'–संज्ञक स्वरूपाचें वर्णन पुनः आरंभिलें आहे. ) हे भगवन्, तूं एकट्यानें आकाश व पृथ्वी यांच्या मधलें हें अंतर व्यापलें आहेस व सर्व दिशाहि व्यापिल्या आहेस. हे महात्म्या, तुझें हें अद्भुत उग्र रूप पाहून त्रिभुवन अतिशय व्यथित–भयभीत झालें आहे. [ किंवा हें त्रिभुवन प्रचलित झालें आहे, स्वस्थानापासून ढळलें आहे व कांपूं लागलें आहे. ]

अमी हि त्वां सुरसङ्घा विशन्ति
केचिद्भीताः प्राञ्जलयो गृणन्ति ।
स्वस्तीत्युक्त्वा महर्षिसिद्धसङ्घाः
स्तुवन्ति त्वां स्तुतिभिः पुष्कलाभिः ॥ २१ ॥

—भूलोकीं अवतीर्ण झालेले देवांचे हे संघ तुझ्यामध्यें प्रवेश करीत आहेत. त्यांतील भ्यालेले कांहीं देव हात जोडून तुझी स्तुति करीत आहेत. मोठ-मोठे ऋषि व सिद्ध यांचे संघ 'स्वस्ति असो' असें बोलून तुला पुष्कळ स्तुतींनीं स्तवीत आहेत. [ युद्ध पहाण्यासाठीं समरभूमीवर आलेल्या नारदादि ऋषींना व सिद्धांना जगाच्या विनाशाची शंका आल्यामुळें ते 'जगाचें कुशल असो' असें म्हणून तुझी अतिशय स्तुति करीत आहेत. ]

रुद्रादित्या वसवो ये च साध्या
विश्वेऽश्विनौ मरुतश्चोष्मपाश्च ।
गन्धर्वयक्षासुरसिद्धसङ्घा
वीक्षन्ते त्वां विस्मिताश्चैव सर्वे ॥ २२ ॥

—अकरा रुद्र, बारा आदित्य, आठ वसु, साध्य, विश्वेदेव, अश्विनिकुमार, मरुद्गण, पितर, गंधर्व, यक्ष, असुर व सिद्ध यांचे संघ, हे सर्व विस्मित होऊनच तुला पहातात.

रूपं महत्ते बहुवक्त्रनेत्रं
महाबाहो बहुबाहूरुपादम् ।
बहूदरं बहुदंष्ट्राकरालं
दृष्ट्वा लोकाः प्रव्यथितास्तथाहम् ॥ २३ ॥

—हे महापराक्रमी कृष्णा, तुझें हें रूप फार मोठें आहे. त्याला पुष्कळ नेत्र व मुखें आहेत. त्याला पुष्कळ बाहु, मांड्या व पाय आहेत. अनंत उदरें आहेत. हें विश्वरूप अनेक दाढांनीं विकराल झालें आहे. अशा या रूपाला पाहून हे सर्व लोक अतिशय व्यथा पावले आहेत. तसाच मीहि व्यथित झालों आहें. [ ज्याअर्थी तुझें रूप असें उग्र आहे, त्याअर्थी तें पाहून हे सर्व प्राणी व मीहि भयानें थरथरां कांपत आहें. ]

नभःस्पृशं दीप्तमनेकवर्णं
व्यात्ताननं दीप्तविशालनेत्रम् ।
दृष्ट्वा हि त्वां प्रव्यथितान्तरात्मा
धृतिं न विन्दामि शमं च विष्णो ॥ २४ ॥

—हे व्यापक देवा, आकाशाला स्पर्श करणाऱ्या, प्रदीप्त झालेल्या, ज्यांत नानाप्रकारचे वर्ण–रंग आहेत अशा, ज्यांत उघडलेलीं–पसरलेलीं मुखें अनेक आहेत अशा आणि ज्याचे नेत्र दीप्त–प्रदीप्त व विशाल आहेत, अशा भयंकर स्वरूपानें युक्त असलेल्या तुला पाहूनच ज्याचें अंतःकरण अतिशय पीडित झालें आहे, असा मी धैर्याला व मनःसमाधानाला प्राप्त होत नाहीं.

‘ भगवद्रूप प्रत्यक्ष पहात असूनहि तुला संतोष कां बरें होत नाहीं,’ म्हणून विचारशील तर सांगतों—

दंष्ट्राकरालानि च ते मुखानि
दृष्ट्वैव कालानलसंनिभानि ।
दिशो न जाने न लभे च शर्म
प्रसीद देवेश जगन्निवास ॥ २५ ॥

—तुझीं दाढांनीं विकराल झालेलीं प्रलयकालच्या अग्नीसारखीं मुखें पाहू-नच मी दिशांना जाणत नाहीं व मला सुखहि होत नाहीं. यास्तव हे देवांच्या ईश्वरा, हे जगाच्या आश्रयभूत देवा, प्रसन्न हो. [ तुझीं अग्नितुल्य विकृत मुखें पाहून मी दिङ्मूढ व अस्वस्थ झालों आहें. ]

अमी च त्वां धृतराष्ट्रस्य पुत्राः
सर्वे सहैवावनिपालसङ्घैः ।
भीष्मो द्रोणः सूतपुत्रस्तथासौ
सहास्मदीयैरपि योधमुख्यैः ॥ २६ ॥
वक्त्राणि ते त्वरमाणा विशन्ति
दंष्ट्राकरालानि भयानकानि ।
केचिद्विलग्ना दशनान्तरेषु
संदृश्यन्ते चूर्णितैरुत्तमाङ्गैः ॥ २७ ॥

—या पृथ्वीपालांच्या संघासहवर्तमानच हे सर्व धृतराष्ट्राचे पुत्र, पितामह भीष्माचार्य, आचार्य द्रोणाचार्य, त्याचप्रमाणें आमच्याहि धृष्टद्युम्नादि मुख्य योद्ध्यांसह हा सूतपुत्र कर्ण इत्यादि हे सर्व योद्धे मोठ्या त्वरेनें तुझ्या दाढांनीं विकराल दिसणाऱ्या भयानक मुखांत प्रवेश करितात. त्यांतील कांहीं चूर्ण झालेल्या मस्तकांनीं दांतांच्या फटींत अडकून राहिलेले दिसतात. [ भीष्मादिकां-पासून पराजय पावण्याची जी शंका वाटत होती, ती पार नाहींशी झाली.]

यथा नदीनां बहवोऽम्बुवेगाः
समुद्रमेवाभिमुखा द्रवन्ति ।
तथा तवामी नरलोकवीरा
विशन्ति वक्त्राण्यभिविज्वलन्ति ॥ २८ ॥

—ज्याप्रमाणें नद्यांचे अनेक जलप्रवाह समुद्राकडेच वहात जाऊन त्यांतच शिरतात, त्याप्रमाणें हे मनुष्यलोकांतील वीर तुझ्या सर्व बाजूंनीं प्रकाश पाव-णाऱ्या मुखांत प्रवेश करितात.

यथा प्रदीप्तं ज्वलनं पतङ्गा
विशन्ति नाशाय समृद्धवेगाः ।
तथैव नाशाय विशन्ति लोका-
स्तवापि वक्त्राणि समृद्धवेगाः ॥ २९ ॥

—ज्यांच्यामध्यें मोठा वेग उत्पन्न झाला आहे असे पतंग प्रदीप्त अग्नींत नाश पावण्यासाठीं जसे प्रवेश करितात, त्याचप्रमाणें हे सर्व लोकहि ज्यांचा वेग वाढला आहे, असे होत्साते नाश पावण्यासाठीं तुझ्या मुखामध्यें प्रवेश करितात.

लेलिह्यसे ग्रसमानः समंता-
ल्लोकान्समग्रान्वदनैर्ज्वलद्भिः ।
तेजोभिरापूर्य जगत्समग्रं
भासस्तवोग्राः प्रतपन्ति विष्णो ॥ ३० ॥

—हे विष्णो, सव बाजूनीं सर्व लोकांना प्रज्वलित मुखांनीं ग्रासणारा तूं त्यांचा स्वाद घेत आहेस. तुझ्या उग्र कांति स्वतेजांनीं समग्र जगाला भरून सोडून अतिशय ताप देतात.

आख्याहि मे को भवानुग्ररूपो
नमोस्तु ते देववर प्रसीद ।
विज्ञातुमिच्छामि भवन्तमाद्यं
न हि प्रजानामि तव प्रवृत्तिम् ॥ ३१ ॥

( ५ )—ज्याअर्थीं तूं असा उग्र स्वभावाचा आहेस, त्याअर्थीं भयंकर स्वरूप धारण केलेला तूं असा कोण आहेस, तें मला सांग. हे देवा, तुला नमस्कार असो. हे देवांतील श्रेष्ठ देवा, मजवर प्रसन्न हो. जगांतील आदि-कारण अशा तुला मी जाणण्याची इच्छा करितों. कारण तुझ्या या चेष्टेला मी जाणूं शकत नाहीं. [ तूं असा उग्र कां झाला आहेस, तें मला कळत नाहीं. मी तुला नमस्कार करितों. तूं कोण आहेस तें मला सांग. ]

श्रीभगवानुवाच—

कालोऽस्मि लोकक्षयकृत्प्रवृद्धो
लोकान्समाहर्तुमिह प्रवृत्तः ।
ऋतेऽपि त्वां न भविष्यन्ति सर्वे
येऽवस्थिताः प्रत्यनीकेषु योधाः ॥ ३२ ॥

( ६ )—आपली ही प्रवृत्ति कशासाठीं आहे, हें सांगण्यासाठीं श्रीकृष्ण म्हणाले—मी लोकांचा क्षय करणारा काल अतिशय वृद्धि पावलों आहें. मी यावेळीं लोकांचा संहार करण्यास प्रवृत्त झालों आहें. शत्रूंच्या प्रत्येक सैन्यांत जे योद्धे स्थित आहेत, ते सर्व तुजवांचूनहि नष्ट होतील.

तस्मात्त्वमुत्तिष्ठ यशो लभस्व
जित्वा शत्रून्भुङ्क्ष्व राज्यं समृद्धम् ।
मयैवैते निहताः पूर्वमेव
निमित्तमात्रं भव सव्यसाचिन् ॥ ३३ ॥
द्रोणं च भीष्मं च जयद्रथं च
कर्णं तथाऽन्यानपि योधवीरान्
मया हतांस्त्वं जहि मा व्यथिष्ठा
युद्ध्यस्व जेतासि रणे सपत्नान् ॥ ३४ ॥

—ज्याअर्थीं तुजवांचूनहि हे सर्व निश्चयानें मरणार आहेत, त्याअर्थीं तूं ऊठ आणि यश संपादन कर. शत्रूंना जिंकून संपन्न राज्याचा उपभोग घे. मींच या भीष्मादिकांस पूर्वीं मारलें आहे. हे अर्जुना, तूं केवल निमित्त हो. द्रोण, भीष्म, जयद्रथ, कर्ण तसेच दुसरे वीर यांस मींच पूर्वीं मारलें आहे. यास्तव मींच गतप्राण केलेल्या या योद्ध्यांस तूं मार. अशी व्यथा पावूं नकोस. त्यांना भिऊं नकोस, युद्ध कर. रणांत तूं शत्रूंना जिंकशील. [ ज्या ज्या योद्ध्यांविषयीं अर्जुनाला शंका होती त्यांना त्यांना भगवान् 'मीं मारलेले' असें म्हणतात. त्यांतील द्रोण व भीष्म यांच्याविषयींचें शंकेचें कारण तर प्रसिद्धच आहे. द्रोण धनुर्वेदाचा आचार्य, दिव्य अस्त्रांनीं संपन्न असलेला व विशेषतः आपला सर्वोत्तम गुरु; भीष्म आपल्या इच्छेला येईल तेव्हां मरणारा व दिव्य अस्त्रांनीं संपन्न असलेला, त्यानें परशुरामाशीं द्वंद्व युद्ध केलें, पण तो त्यांत पराभूत झाला नाहीं. जो माझ्या पुत्राचें शिर भूमीवर पाडवील, त्याचेंहि शिर तत्काल पडावें, म्हणून ज्याचा पिता तप करीत आहे, असा जयद्रथ; कर्णहि 'वासवदत्ता' या नांवाच्या इंद्रानें दिलेल्या अमोघ शक्तीनें संपन्न असलेला सूर्याचा पुत्र; इत्यादि सर्व वीर अर्जुनाच्या शंकेचे विषय होते. म्हणून भगवान् 'तूं मारण्याच्या पूर्वींच मीं या सर्वांना मारलें आहे, यास्तव तूं केवल निमित्तमात्र होऊन यांचा वध कर, व्यथित होऊं नको. तूं या युद्धांत दुर्योधनादि शत्रूंना जिंकशील' असें सांगत आहेत. ]

संजय उवाच—

**एतच्छ्रुत्वा वचनं केशवस्य**
**कृताञ्जलिर्वेपमानः किरीटी ।**
**नमस्कृत्वा भूय एवाह कृष्णं**
**सगद्गदं भीतभीतः प्रणम्य ॥ ३५ ॥**

संजय म्हणाला—श्रीकृष्णाचें हें वचन ऐकून अतिशय भ्यालेला व थरथर कांपणारा अर्जुन हात जोडून, नमस्कार करून, नम्र होऊन, कंठ दाटून आल्यामुळें कांपऱ्या स्वरानें त्यास असें बोलला—

अर्जुन उवाच—

**स्थाने हृषीकेश तव प्रकीर्त्या**
**जगत्प्रहृष्यत्यनुरज्यते च ।**
**रक्षांसि भीतानि दिशो द्रवन्ति**
**सर्वे नमस्यन्ति च सिद्धसङ्घाः ॥ ३६ ॥**

(७) अर्जुन म्हणाला—हे हृषीकेशा, इंद्रियांच्या ईश्वरा, तुझें माहात्म्य ऐकून सर्व जगत् अत्यंत हृष्ट व अनुरक्त जें होतें, तें योग्यच आहे. राक्षस भयभीत होऊन दश-दिशांत पळतात व सर्व सिद्धांचे संघ तुला नमस्कार करतात, तें योग्यच आहे. [ किंवा सर्व जगाच्या हर्षादिकांचें तूंच स्थान आहेस. ]

**कस्माच्च ते न नमेरन्महात्मन्**
**गरीयसे ब्रह्मणोऽप्यादिकर्त्रे ।**
**अनन्त देवेश जगन्निवास**
**त्वमक्षरं सदसत्तत्परं यत् ॥ ३७ ॥**

—हे महात्मन्, हिरण्यगर्भाचाहि आदिकर्ता व अतिशय श्रेष्ठ गुरु, अशा तुला ते सिद्धादिक कां बरें नमस्कार करणार नाहींत ! हे अनंता, देवाधिदेवा, हे जगन्निवासा, सत् व असत् म्ह० विद्यमान व अविद्यमान असें गौण वृत्तीनें ज्याला म्हणतात, पण वस्तुतः जें अगदीं विलक्षण आहे, तें अक्षर ब्रह्म तूंच आहेस.

**त्वमादिदेवः पुरुषः पुराण-**
**स्त्वमस्य विश्वस्य परं निधानम् ।**
**वेत्तासि वेद्यं च परं च धाम**
**त्वया ततं विश्वमनन्तरूप ॥ ३८ ॥**

—तूं जगाचा स्रष्टा असल्यामुळें आदिदेव आहेस, तूं शरीररूपी पुरांत शयन-वास करतोस, म्हणून पुराण पुरुष आहेस. तूंच या विश्वाचें परम निधान आहेस. महाप्रलयाच्या आरंभीं सर्व जगत् तुझ्यामध्यें स्थापिलें जातें, म्हणून तूं निधान. तूं सर्व विषयवर्गांचा वेत्ता म्ह० जाणणारा आहेस. जाणावयाची वस्तुहि तूंच आहेस आणि परम वैष्णवपदहि तूंच आहेस. तूं सर्व विश्वाला व्यापिलें आहेस.

वायुर्यमोऽग्निर्वरुणः शशाङ्कः
प्रजापतिस्त्वं प्रपितामहश्च ।
नमो नमस्तेऽस्तु सहस्रकृत्वः
पुनश्च भूयोऽपि नमो नमस्ते ॥ ३९ ॥

—तूं वायु-यम-अग्नि-चंद्रमा-वरुण व कश्यपादि प्रजापति आहेस. पितामह-ब्रह्मदेवाचाहि पिता—सूत्रात्मा तूंच आहेस. तुला वारंवार, हजारों वेळां नमस्कार असो. [ ‘ पुनश्च भूयोपि ’ या शब्दांनीं श्रद्धा व भक्ति यांच्या आधिक्यानें सहस्रवार नमस्कार केले तरी आपल्या अंतःकरणाची तृप्ति होत नाहीं, असें अर्जुन प्रदर्शित करीत आहे. ]

नमः पुरस्तादथ पृष्ठतस्ते
नमोऽस्तु ते सर्वत एव सर्व ।
अनन्तवीर्यामितविक्रमस्त्वं
सर्वं समाप्नोषि ततोऽसि सर्वः ॥ ४० ॥

—तुला पूर्वदिशेंत नमस्कार असो व पश्चिम दिशेंतहि तुला नमस्कार असो. हे सर्व ! सर्व दिशांत असलेल्या तुला नमस्कार असो. ज्याचें सामर्थ्य अनंत व पराक्रम अमर्याद आहे, असा तूं सर्व जगाला व्यापितोस. [ पूर्वादि सर्व दिशांमध्यें असलेलें चराचर तूंच आहेस. म्हणूनच तुला ‘ सर्व ’ असें म्हणतात. त्या तुज सर्वात्म्याला नमस्कार असो. तूं ज्यांत नाहींस, असें या सृष्टींत कांहीं नाहींच. ]

सखेति मत्वा प्रसभं यदुक्तं
हे कृष्ण हे यादव हे सखेति ।
अजानता महिमानं तवेदं
मया प्रमादात्प्रणयेन वापि ॥ ४१ ॥

यच्चावहासार्थमसत्कृतोऽसि
विहारशय्यासनभोजनेषु ।
एकोऽथवाप्यच्युत तत्समक्षं
तत्क्षामये त्वामहमप्रमेयम् ॥ ४२ ॥

—तुझ्या माहात्म्यास–विश्वरूपास न जाणणाऱ्या मीं अनवधानामुळें किंवा प्रेमामुळें तूं माझ्या बरोबरीचा मित्र आहेस, असें जाणून हे कृष्ण, हे यादव, हे सखे, असें जें अनादरानें म्हटलें आणि हे अच्युता, विनोदानें, विहार करतांना, शयन करीत असतांना, आसनावर बसतांना, भोजन करीत असतांना, एकटा असतांना किंवा लोकांच्या समक्ष, आजवर अनेकदां मजकडून जो असत्कार केला गेला आहेस, त्या सर्वांची तुज अप्रमेय देवाला मी क्षमा करण्याची प्रार्थना करितों. [तुझ्या माहात्म्याचें पूर्ण ज्ञान नसणें, या अपराधामुळें तूं माझ्या बरोबरीचा मित्र आहेस, असें विपरीत भावनेनें समजून व तुझा तिरस्कार करून तुझ्याशीं भाषणांत व व्यवहारांत आजवर स्नेहानें जे अतिप्रसंग करीत होतों, त्या सर्वांची मला क्षमा कर. मीं जें भाषण केलें, त्याची तेवढी क्षमा कर असें नव्हे, तर क्रीडादि प्रसंगीं, थट्टेनें–स्वतः हंसून दुसऱ्याला हंसविण्यासाठीं, व्यायाम, शयन, आसन, भोजन इत्यादि प्रसंगीं, एकांतांत किंवा लोकांसमक्ष मीं जो तुझा अपमान केला, त्या सर्वांची मला क्षमा कर. ]

पितासि लोकस्य चराचरस्य
त्वमस्य पूज्यश्च गुरुर्गरीयान् ।
न त्वत्समोऽस्त्यभ्यधिकः कुतोऽन्यो
लोकत्रयेऽप्यप्रतिमप्रभाव ॥ ४३ ॥

—तूं या चराचर लोकांचा जनक व पूज्य फार मोठा गुरु आहेस. ज्याचा प्रभाव अप्रतिम आहे, अशा हे श्रीकृष्णा, या तिन्ही लोकांत तुझ्यासारखाहि जर दुसरा कोणी नाहीं, तर तुझ्यापेक्षां अधिक कोठून असणार! [स्थावर-जंगम प्राणिवर्गाचा पिता व गुणांच्या आधिक्यामुळें पूजार्ह, ज्ञानसंप्रदायाचा प्रवर्तक असल्यामुळें तूं सूत्रात्मा, अंतर्यामी, इत्यादि गुरूंचाहि श्रेष्ठ गुरु आहेस. तुझ्यासारखाहि जर दुसरा कोणी संभवेल, तर तोहि ईश्वरच होईल! पण एका जगाचे जर दोन ईश्वर झाले तर अनवस्थाप्रसंग येईल. म्हणून त्वत्सु-

ल्यच जर कोणी नाहीं, तर त्वदधिक कसा संभवणार ! खरोखर, तुझ्या प्रभावाला उपमा नाहीं. ]

तस्मात्प्रणम्य प्रणिधाय कायं
प्रसादये त्वामहमीशमीड्यम् ।
पितेव पुत्रस्य सखेव सख्युः
प्रियः प्रियायार्हसि देव सोढुम् ॥ ४४ ॥

—ज्याअर्थीं असें आहे त्याअर्थीं, शरीर भूमीवर दंडाप्रमाणें स्थापून व प्रणाम करून मी सर्वांचा ईश्वर व स्तुतीला पात्र अशा तुला प्रसन्न करितों. हे देवा, पुत्राचा अपराध पिता जसा सहन करितो, मित्राचा अपराध मित्र सहन करितो आणि प्रिय पत्नीचा अपराध प्रिय पति जसा सहन करितो, तसा तूं माझा अपराध सहन करण्यास योग्य आहेस. [ पित्रादिक पुत्रादिकांना त्यांच्या अपराधाची जशी क्षमा करतात, त्याप्रमाणें तूं मला क्षमा कर. मी तुला प्रणाम व स्तुति यांच्या योगानें प्रसन्न करतों. ]

( ८ )—आतां अर्जुन या विश्वरूपाचा उपसंहार करण्याची प्रार्थना करितो—

अदृष्टपूर्वं हृषितोऽस्मि दृष्ट्वा
भयेन च प्रव्यथितं मनो मे ।
तदेव मे दर्शय देव रूपं
प्रसीद देवेश जगन्निवास ॥ ४५ ॥

—भगवन्, यापूर्वीं मीं किंवा दुसऱ्या कोणींहि कधीं न पाहिलेलें हें विश्वरूप पाहून मी हृष्ट झालों आहें. पण माझें मन भयानें अतिशय व्यथित झालें आहे, यास्तव हे जगन्निवासा, देवा, हे देवेशा, प्रसन्न हो. मला तेंच प्रसिद्ध रूप दाखीव.

किरीटिनं गदिनं चक्रहस्त-
मिच्छामि त्वां द्रष्टुमहं तथैव ।
तेनैव रूपेण चतुर्भुजेन
सहस्रबाहो भव विश्वमूर्ते ॥ ४६ ॥

—'तें प्रसिद्ध रूप कोणतें' म्हणून विचारशील तर सांगतों—ज्याच्या मस्तकावर किरीट आहे, हातांत गदा व चक्र आहे, अशा तुला पूर्वीप्रमाणेंच पहाण्याची मी इच्छा करतों. आतां ज्याला सहस्र बाहु आहेत व सर्व विश्व

हीच ज्याची मूर्ति आहे, अशा हे देवा, त्या तुझ्या पूर्वीच्या चतुर्भुज रूपानें तूं प्रकट हो.

श्रीभगवानुवाच—

मया प्रसन्नेन तवार्जुनेदं
रूपं परं दर्शितमात्मयोगात् ।
तेजोमयं विश्वमनन्तमाद्यं
यन्मे त्वदन्येन न दृष्टपूर्वम् ॥ ४७ ॥

—अर्जुन भ्याला आहे असें पाहून व विश्वरूपाचा उपसंहार करून प्रिय वचनानें त्याच्या मनाचें सांत्वन करणारे श्रीकृष्ण म्हणाले—प्रसन्न झालेल्या मी माझ्या योगसामर्थ्यामुळें तुला हें माझें श्रेष्ठ, तेजोमय, समस्त, अमर्याद व अगदीं आरंभींचें विश्वरूप दाखविलें. तुजवांचून दुसऱ्या कोणींहि तें पाहिलेलें नाहीं.

न वेदयज्ञाध्ययनैर्न दानै-
र्न च क्रियाभिर्न तपोभिरुग्रैः
एवंरूपः शक्य अहं नृलोके
द्रष्टुं त्वदन्येन कुरुप्रवीर ॥ ४८ ॥

—हे अर्जुना, या मनुष्यलोकीं तुजवांचून अन्य कोणीहि अशा स्वरूपाच्या मला पहाण्यास वेद व यज्ञ यांच्या अध्ययनांनीं समर्थ नाहीं. दानें, कर्में व उग्र तपश्चर्या यांनींहि माझें असलें स्वरूप दिसत नाहीं. [ नुसतें अक्षरग्रहण करणें–वेद तोंडपाठ म्हणणें, हें वेदाध्ययन व मीमांसेच्या द्वारा त्याचा अनुष्ठेय अर्थ समजून घेऊन यज्ञाची सर्व इतिकर्तव्यता जाणणें, हें यज्ञाध्ययन आहे. त्यांनीं; तसेंच तुलापुरुषादि दानांनीं, अग्निहोत्रादि श्रौत-स्मार्त क्रियांनीं व चांद्रायणादि उग्र तपांनींहि अशा स्वरूपाचा मी कोणालाहि दिसणें शक्य नाहीं. ]

मा ते व्यथा मा च विमूढभावो
दृष्ट्वा रूपं घोरमीदृङ्ममेदम् ।
व्यपेतभीः प्रीतमनाः पुनस्त्वं
तदेव मे रूपमिदं प्रपश्य ॥ ४९ ॥

—यास्तव माझें हें अशा प्रकारचें घोर रूप पाहून तुला पीडा न होवो. तसेंच तुझ्या चित्ताचा अत्यंत मूढ भावहि न होवो. तुला मोह न होवो. तूं पुनरपि निर्भय व संतुष्टचित्त होऊन तेंच हें माझें रूप पहा.

संजय उवाच—

इत्यर्जुनं वासुदेवस्तथोक्त्वा
स्वकं रूपं दर्शयामास भूयः ।
आश्वासयामास च भीतमेनं
भूत्वा पुनः सौम्यवपुर्महात्मा ॥ ५० ॥

संजय म्हणाला—वासुदेव अर्जुनाला असें वचन बोलून पुनः आपलें स्वकीयरूप दाखविता झाला आणि तो महात्मा पुनरपि सौम्य स्वरूपाचा होऊन व भ्यालेल्या अर्जुनाला धीर देऊन त्याचें समाधान करता झाला.

अर्जुन उवाच—

दृष्ट्वेदं मानुषं रूपं तव सौम्यं जनार्दन ।
इदानीमस्मि संवृत्तः सचेताः प्रकृतिं गतः ॥ ५१ ॥

तेव्हां अर्जुन म्हणाला—हे जनार्दना, तुझें हें मनुष्याकार सौम्य रूप पाहून मी आतां प्रसन्नचित्त व स्वभावास प्राप्त झालों आहें. [ तुझें हें मनुष्य-रूप पाहून मी आतां स्वस्थचित्त झालों आहें. मी देहभानावर आलों आहें. ]

अर्जुनाला दाखविलेलें हें विश्वरूप उपासना करण्यास योग्य आहे, असें सुचविण्यासाठीं—

श्रीभगवानुवाच—

सुदुर्दर्शमिदं रूपं दृष्टवानसि यन्मम ।
देवा अप्यस्य रूपस्य नित्यं दर्शनकांक्षिणः ॥ ५२ ॥

( ९ ) श्रीकृष्ण म्हणाले—अर्जुना, तूं माझें जें हें रूप पाहिलें आहेस, तें दिसणें अतिशयच कठिण आहे. इंद्रादि देव सुद्धां माझ्या या रूपाचें दर्शन व्हावें म्हणून नित्य—सर्वदा आकांक्षा करितात. [ पण त्यांनीं तें अद्यापि पाहि-लेलें नाहीं व पुढेंहि पहाणार नाहींत. ]

नाहं वेदैर्न तपसा न दानेन न चेज्यया ।
शक्य एवंविधो द्रष्टुं दृष्टवानसि मां यथा ॥ ५३ ॥

—'तें रूप दुर्दश कां' म्हणून विचारशील तर सांगतों—तूं जसें मला पाहिलें आहेस, तशा प्रकारचा मी वेदांनें, तपानें, दानानें, यज्ञानें किंवा पूजेनेंहि दिसणें शक्य नाहीं.

भक्त्या त्वनन्यया शक्य अहमेवंविधोऽर्जुन ।
ज्ञातुं द्रष्टुं च तत्त्वेन प्रवेष्टुं च परंतप ॥ ५४ ॥

—'तर मग तूं कोणत्या उपायानें दिसणें शक्य आहेस,' म्हणून विचारशील तर सांगतों—अर्जुना, अशाप्रकारचा मी अनन्य भक्तीनेंच तत्त्वतः जाणण्यास, पहाण्यास व प्रवेश करण्यास शक्य आहें, कोणालाहि अनन्य भक्तीनेंच माझें हें विश्वरूप दिसणें शक्य आहे. [ फार काय ! पण या अनन्य भक्तीनेंच माझें शास्त्रतः ज्ञान होणें, तत्त्वतः अपरोक्षज्ञान होणें व मोक्ष मिळणेंहि शक्य आहे. ]

मत्कर्मकृन्मत्परमो मद्भक्तः सङ्गवर्जितः ।
निर्वैरः सर्वभूतेषु यः स मामेति पाण्डव ॥ ५५ ॥

—हे अर्जुना, जो माझ्यासाठीं कर्में करणारा, मलाच परमा गति—मरणोत्तर प्राप्त करून घेण्यास योग्य फल समजणारा, मलाच सर्व प्रकारें—सर्वभावानें, सर्व उत्साहानें भजणारा, धन-पुत्रादिकांविषयींच्या आसक्तीनें रहित, आपल्याला अतिशय अपकार करण्यास प्रवृत्त झालेल्या सर्व भूतांमध्येंहि शत्रुत्वभावना न करणारा माझा भक्त तो मला प्राप्त होतो. [ अर्जुना, मीं तुला हा अत्यंत इष्ट असा उपदेश केला आहे. याप्रमाणें तूं अनुष्ठान केलेंस, म्हणजे तुला भगवत्प्राप्ति अवश्य होईल. या अध्यायांत विश्वरूप, सर्वात्मा, सर्वज्ञ, सर्वेश्वर, अशा भगवानाचें 'मत्कर्मकृत्०' इत्यादि न्यायानें 'क्रममुक्ति' हें फल देणारें ध्यान सांगणाऱ्या भगवंतांनीं 'तत्'-पदाचा वाच्य अर्थ निश्चित केला आहे. ]

( येथें भगवद्गीतेचा 'विश्वरूपदर्शनयोग'-नांवाचा अकरावा अध्याय समाप्त झाला. ) ६. ३. ३५.

## अध्याय ३६ वा.

### [ गीताध्याय १२ वा. भक्तियोग. ]

[ १ अक्षरोपासक व विश्वरूपोपासक यांतील युक्ततम कोण ? असा अर्जुनाचा प्रश्न. २ त्यांतील विश्वरूपाचें चिंतन करणारे युक्ततम व निर्गुण ब्रह्मोपासकां-विषयीं कांहींच सांगतां येत नाहीं, असें भगवानांचें उत्तर. ३ भगवानांमध्यें चित्तादि स्थापणें या उत्तम साधनापासून कर्मफलत्यागापर्यंत अधिकारीपरत्वें उत्तरोत्तर सुलभ साधनांचा उपदेश. ४ कर्मफलत्यागाची स्तुति. ५ भगवद्भक्ताच्या अद्वेष्टृत्वादि साधनांचा व लक्षणांचा उपदेश. ]

द्वितीयाध्यायांतील 'अशोच्यानन्वशोचस्त्वं०' या श्लोकापासून विभूति-योगाख्य दहाव्या अध्यायाच्या अंतापर्यंत सर्व अध्यायांत परमात्म्याचें–अक्षराचें म्ह० सर्व विशेषशून्य अशा ब्रह्माचें उपासन सांगितलें. म्ह० निरुपाधिक ब्रह्म ज्ञेय–जाणण्यास योग्य आहे असें अनुसंधान करावयास सांगितलें व त्याच अध्यायामध्यें ठिकठिकाणीं सर्व योगैश्वर्य, सर्वज्ञानशक्ति यांनीं युक्त असें सत्त्व हीच ज्याची उपाधि आहे, अशा सोपाधिक ईश्वराचे–तुझेंच ध्येयत्वानें उपासन सांगितलें. पण विश्वरूपाध्यायांत ऐश्वर्य, आद्य, समस्त जगदात्मरूप असें तुझें विश्वरूप उपासनेसाठींच तूं दाखविलेंस आणि शेवटीं 'मत्कर्मकृत्०' इत्यादि सांगितलें आहेस. यास्तव या दोन पक्षांतील अधिक विशिष्ट–अधिक चांगलें उपासन कोणतें ! तें जाणण्याच्या इच्छेनें अर्जुन पुढील प्रश्न करीत आहे—

अर्जुन उवाच—

**एवं सततयुक्ता ये भक्तास्त्वां पर्युपासते ।**
**ये चाप्यक्षरमव्यक्तं तेषां के योगवित्तमाः ॥ १ ॥**

—अर्जुन म्हणाला—अकराव्या अध्यायाच्या शेवटीं सांगितल्याप्रमाणें अहोरात्र भगवत्कर्मादिकांत युक्त होऊन जे मंद व मध्यम अधिकारी भक्त तुला भजतात–तुझें ध्यान करतात आणि जे निर्गुण ब्रह्मनिष्ठ उत्तम अधिकारी भक्त अव्यक्त ब्रह्माची उपासना–भक्ति–ध्यान करतात त्या दोन प्रकारच्या भक्तांतील अधिक योगवेत्ते कोण ? त्यांतील श्रेष्ठ भक्त कोणते ! [ सगुणोपासक चांगले कीं निर्गुणोपासक ? त्यांतील अधिक श्रेष्ठ कोण ? ]

श्रीभगवानुवाच—

**मय्यावेश्य मनो ये मां नित्ययुक्ता उपासते ।**
**श्रद्धया परयोपेतास्ते मे युक्ततमा मताः ॥ २ ॥**

श्रीकृष्ण म्हणाले—जे माझ्या ठिकाणीं–माझ्या सगुण विश्वरूप स्वरूपांत मन स्थिर करून सतत–अहोरात्र युक्तचित्त होऊन व अत्यंत श्रद्धेनें युक्त होऊन माझी उपासना करितात, ते सगुण भक्त मला अतिशय उत्तम भक्त–श्रेष्ठ उपासक म्हणून संमत आहेत. सगुण ईश्वराची उपासना करणारे श्रेष्ठ असें मी समजतों. [ जे सम्यग्ज्ञानी एषणाशून्य अक्षरोपासक ते अगोदर राहूं द्येत. त्यांच्याविषयीं मला जें सांगावयाचें आहे, तें मी पुढें सांगेन. पण त्याहून जे अन्य भक्त मज विश्वरूप परमेश्वराच्या ठिकाणीं मन स्थिर करून श्रद्धेनें युक्त होत्साते माझें सतत चिंतन करितात, ते मला युक्ततम म्हणून मान्य आहेत. कारण ते एक क्षणहि फुकट न घालवितां अहोरात्र माझ्या ठिकाणीं आपलें चित्त लावून दुसऱ्या कशाचेंहि चिंतन न करतां केवळ माझेंच चिंतन करितात. म्हणून त्यांना युक्ततम म्हणणें योग्यच आहे. ]

तर मग निर्गुणोपासक अक्षरब्रह्मोपासक युक्ततम नव्हेत कीं काय ! नाहीं. तसें नाहीं, तर त्यांच्याविषयीं जें कांहीं सांगावयाचें आहे तेंच आतां सांगतों—

ये त्वक्षरमनिर्देश्यमव्यक्तं पर्युपासते ।
सर्वत्रगमचिन्त्यं च कूटस्थमचलं ध्रुवम् ॥ ३ ॥
संनियम्येन्द्रियग्रामं सर्वत्र समबुद्धयः ।
ते प्राप्नुवन्ति मामेव सर्वभूतहिते रताः ॥ ४ ॥

(२)—जे सर्व ठिकाणीं समबुद्धि–प्रत्येक वस्तूमध्यें ब्रह्मबुद्धि ठेवणारे व सर्व प्राण्यांच्या हितामध्यें निमग्न असणारे–निर्गुण ब्रह्माची उपासना करणारे भक्त सर्व इंद्रियांचें संयमन करून—त्यांना स्वाधीन ठेवून अनिर्देश्य, अव्यक्त, सर्वत्रग, अचिंत्य, कूटस्थ, अचळ, ध्रुव, अक्षर ब्रह्माची उपासना करतात–त्याचें अहोरात्र चिंतन करतात, ते निर्गुण ब्रह्मोपासक मलाच प्राप्त होतात. [ अनिर्देश म्ह० ज्याचा नांवानें निर्देश करतां येत नाहीं; अव्यक्त म्ह० जें व्यक्त नाहीं तें; सर्वत्रग म्ह० सर्वसृष्टींत व्यापून रहाणारें; अचिंत्य म्ह० ज्याचें चिंतनहि करतां येत नाहीं; कूटस्थ म्ह० ज्याच्यामध्यें कोणताहि विकार होत नाहीं तें; अचळ म्ह० आपल्या अवस्थेपासून न ढळणारें; ध्रुव म्ह० नित्य; अशा अक्षर ब्रह्माची उपासना जे करितात, ते मलाच प्राप्त होतात. ज्ञानी पुरुषांना त्यांच्या ज्ञानाप्रमाणें भगवत्प्राप्ति होणें ही गोष्ट सिद्धच आहे. त्यामुळें ते मला

प्राप्त होतात, हें सांगावयासच नको. तसेंच भगवत्स्वरूप झालेल्या ज्ञानी पुरुषांना युक्ततम किंवा अयुक्ततम यांतील कांहींच म्हणतां येत नाहीं. ]

क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम् ।
अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ॥ ५ ॥

—पण असें जरी आहे, तरी अव्यक्त ब्रह्मामध्यें ज्यांचें मन आसक्त झालें आहे, अशा त्यांना सगुणोपासकांपेक्षां अधिक क्लेश होतात. कारण व्यक्त देहावर अभिमान ठेवणाऱ्या, 'हा देहच मी' असें समजणाऱ्या लोकांना अव्यक्त ब्रह्माची गति मोठ्या कष्टानें प्राप्त होते. म्हणून निर्गुणोपासकांपेक्षां सगुणोपासक श्रेष्ठ. [ अव्यक्त म्ह० अत्यंत सूक्ष्म, निर्विशेष अक्षर, त्यांत ज्यांचें चित्त आसक्त-'मीच तें' असें अभिनिविष्ट असतें, त्यांना सगुणोपासकांपेक्षां क्लेश अधिक होतात. कारण ज्यांचा देहाभिमान सुटलेला नसतो, त्यांना अव्यक्त अक्षरात्मिका गति मोठ्या कष्टानें प्राप्त होते. ]

'अक्षरोपासक मलाच प्राप्त होतात' असें तूं सांगितलेंस, पण त्यावरून सगुणोपासक तुला प्राप्त होत नाहींत, असें समजावयाचें कीं काय ? असें अर्जुन विचारील म्हणून भगवान् 'ते मला क्रमानें प्राप्त होतात,' असें सांगतात—

ये तु सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य मत्पराः ।
अनन्येनैव योगेन मां ध्यायन्त उपासते ॥ ६ ॥
तेषामहं समुद्धर्ता मृत्युसंसारसागरात् ।
भवामि न चिरात्पार्थ मय्यावेशितचेतसाम् ॥ ७ ॥

—पण, हे अर्जुना, जे सगुण भक्त माझ्या ठिकाणीं सर्व कर्मांचा संन्यास करून-सर्व कर्में मला अर्पण करून मत्परायण-मीच ज्यांना श्रेष्ठ आहें, मजवांचून दुसरा कोणी श्रेष्ठ नाहीं, असे होऊन, विश्वरूप परमेश्वर जो मी, त्या मला सोडून दुसऱ्या कोणाच्याहि ठिकाणीं ज्यांचें चित्त जात नाहीं, अशा अनन्य योगानेंच-केवळ माझ्याच ठिकाणीं चित्ताला स्थिर करून, माझी उपासना करतात, त्या मजमध्यें चित्त स्थिर केलेल्या मज भक्तांचा मी मृत्युयुक्त संसारसागरांतून सत्वर उद्धार करितों. [ ज्यांनीं आपलें चित्त मज विश्वरूपाच्या ठिकाणीं स्थिर केलें आहे, त्यांचा मी उद्धार करितों.]

मय्येव मन आधत्स्व मयि बुद्धिं निवेशय ।
निवसिष्यसि मय्येव अत ऊर्ध्वं न संशयः ॥ ८ ॥

( ३ )—ज्याअर्थी भगवदुपासना असें विशिष्ट फल देणारी आहे, त्याअर्थी तूं माझ्या ठिकाणींच आपलें मन स्थिर कर. तूं आपल्या मनाला माझ्या सगुण स्वरूपांत स्थापन कर. माझ्यामध्येंच निश्चय करणाऱ्या बुद्धीला प्रविष्ट कर. तिलाहि माझ्या स्वरूपांत राहूं दे. याप्रमाणें तूं आपलें मन व बुद्धि या दोन्ही चित्तवृत्तींना माझ्याच स्वरूपांत स्थिर केलेंस, म्हणजे मेल्यावर माझ्या ठिकाणींच रहाशील, यांत संशय नाहीं. [ भगवन्निष्ठाला भगवत्प्राप्ति होते, या विषयीं केव्हांहि संशय ठेवूं नये. ]

स्वमतप्रदर्शनपूर्वक भगवत्प्राप्तीचे दुसरे उपायहि सांगतात—

अथ चित्तं समाधातुं न शक्नोषि मयि स्थिरम् ।
अभ्यासयोगेन ततो मामिच्छाप्तुं धनञ्जय ॥ ९ ॥

—आतां मीं वर सांगितल्याप्रमाणें तूं माझ्या ठिकाणींच आपल्या मनाला अचल स्थापावयास जर समर्थ नसशील, तर हे अर्जुना, अभ्यासयोगानें—मनाला वारंवार आंवरून धरून माझ्या ठिकाणीं तें स्थिर करण्याचा प्रयत्न करणें, या अभ्यासपूर्वक योगानें मला प्राप्त होण्याची इच्छा कर. [ चित्ताला स्थूल प्रतिमादि एकाद्य आलंबनामध्यें सर्व बाजूंनीं आकर्षण करून पुनः पुनः स्थापणें हाच अभ्यास होय. असें अभ्यासपूर्वक समाधान म्ह० चित्ताची एकाग्रता, हाच योग, त्याच्या योगानें मला जाणण्याची आकांक्षा धर. ]

पण हा अभ्यास करण्याचीहि योग्यता नसल्यास त्याहून सुलभ उपाय सांगतात—

अभ्यासेऽप्यसमर्थोऽसि मत्कर्मपरमो भव ।
मदर्थमपि कर्माणि कुर्वन्सिद्धिमवाप्स्यसि ॥ १० ॥

—वर जसा सांगितला, तसा अभ्यास करण्यासहि जर तूं असमर्थ असशील, तर माझ्यासाठीं कर्म करणें हेंच एक कार्य कर. ईश्वरासाठीं कर्म करणें, हेंच आपलें मुख्य कर्तव्य समज. कारण माझ्यासाठींहि कर्में करणारा तूं सिद्धीला—चित्तशुद्धि, योग, ज्ञानप्राप्ति या क्रमानें मोक्ष या सिद्धीला प्राप्त होशील. [ माझ्यासाठीं जें कर्म तें मत्कर्म. तत्परम म्ह० मत्कर्मप्रधान. मुख्यत्वेंकरून माझ्यासाठीं कर्में कर. अभ्यासावांचून केवळ माझ्यासाठीं कर्में करणाराहि तूं चित्तशुद्ध्यादि क्रमानें या जन्मीं किंवा उत्तरजन्मीं ब्रह्मभावाला प्राप्त होशील. येथील ' अपि० ' हा शब्द, ईश्वरार्थ केलेल्या कर्मांचें ब्रह्मभाव हें साक्षात् फल नसून चित्तशुद्ध्यादि क्रमानें मिळणारें फल आहे, हें सुचविण्यासाठीं आहे. ]

अथैतदप्यशक्तोऽसि कर्तुं मद्योगमाश्रितः ।
सर्वकर्मफलत्यागं ततः कुरु यतात्मवान् ॥ ११ ॥

—आतां हें अभ्यासाहून सुलभ असलेलें कार्य म्ह० सर्व कर्में मला अर्पण करून त्यांचें अनुष्ठान करणें या योगाचा आश्रय करून करण्यासहि जर तूं असमर्थ असशील, तर चित्ताचें संयमन केलेला असा होऊन सावधान मनानें सर्व कर्मांच्या फलाचा त्याग कर. [बाह्य विषयांनीं चित्ताचें आकर्षण केल्यामुळें मत्कर्मपरत्वहि अशक्य झाल्यास तूं नियतचित्त होऊन सर्व कर्मांच्या फलांचा संन्यास कर. ]

भगवान् कर्मफलत्यागाची स्तुति करितात—

श्रेयो हि ज्ञानमभ्यासाज्ज्ञानाद्ध्यानं विशिष्यते ।
ध्यानात्कर्मफलत्यागस्त्यागाच्छान्तिरनन्तरम् ॥ १२ ॥

(४)—वर सांगितलेल्या अभ्यासाहून ज्ञान अधिक प्रशंसनीय आहे, हें प्रसिद्धच आहे. पण त्या ज्ञानाहूनहि ज्ञानासह केलेलें ध्यान अधिक चांगलें आणि त्या तसल्या ध्यानाहूनहि ज्ञान-ध्यानयुक्त कर्मांच्या फलाचा त्याग अधिक चांगला आहे. कारण कर्मफलाचा त्याग केल्यानंतर लागलीच संसाराची शांति होते. [अविवेकपूर्वक अभ्यासाहून म्ह० ज्ञानासाठीं केलेल्या श्रवणाभ्यासाहून किंवा ध्यानाभ्यासाहून ज्ञान—शब्द व उपपत्ति, किंवा श्रवण व मनन यांनीं केलेला आत्मनिश्चय अधिक प्रशंसनीय आहे. कारण तो साक्षात्काराला निमित्त होतो. अशा ज्ञानाहूनहि ज्ञानपूर्वक ध्यान श्रेष्ठ आहे. ज्ञानवानाच्या ध्यानाहूनहि कर्मफलत्याग विशिष्ट—श्रेष्ठ आहे. नियतचित्त, या विशेषणानें विशिष्ट असलेल्या पुरुषाच्या कर्मफलत्यागानें कारणांसह संसाराचा उपशम लागलाच होतो. ध्यान हें साक्षात्काराचें अंतरंग साधन आहे. दीर्घकाळ, निरंतर सत्कारानें केलेल्या ध्यानानें तत्त्वसाक्षात्कार होऊन संसारदुःखाची शांति होते. पण तसल्या ध्यानाहूनहि कर्मफलत्याग श्रेष्ठ आहे, असें शेवटीं सांगितलें आहे. त्यामुळें ही कर्मफलत्यागाची स्तुतिच आहे. परम सिद्धान्त नव्हे. कारण अक्षरोपासनादि प्राप्त साधनांतील पूर्व पूर्व साधनाचें अनुष्ठान करण्याचें सामर्थ्य नसल्यास उत्तरोत्तर सुलभ साधनांचा उपदेश करून सर्वांच्या शेवटीं कर्मफलत्याग सांगितला आहे. ]

आत्मा व ईश्वर यांच्या भेदाचा आश्रय करून विश्वरूप ईश्वराच्या ठिकाणीं चित्तसमाधानरूप योग सांगितला. त्यावरूनच ज्याला अभेदज्ञान झालें आहे,

त्याच्यासाठींच कर्मयोगादिक आहे, असें सिद्ध होत नाहीं. कारण 'अथैतद्-प्यशक्तोसि०' असें म्हणून 'असमर्थ असणें,' हें अज्ञानाचें कार्य सुचविलें आहे. अर्थात् अक्षरोपासकाचा कर्मयोग उपपन्न होत नाहीं, असेंच भगवान् प्रदर्शित करीत आहेत. अक्षरोपासकांच्या कर्मयोगाप्रमाणेंच कर्मयोग्याच्या अक्षरोपास-नेची अनुपपत्तिहि भगवान् दाखवीत आहेत. तत्त्वज्ञाननिष्ठ अक्षरोपासक आपल्या ज्ञानाप्रमाणें ईश्वरालाच प्राप्त होतात, पण कर्मी साक्षात् त्याला प्राप्त होण्यास योग्य नसतात. 'ते मलाच प्राप्त होतात' या वचनानें अक्षरोपास-कांचें कैवल्यप्राप्तीविषयीं स्वातंत्र्य सांगून 'त्यांचा मी उद्धार करणारा आहें' या वचनानें इतरांचें पारतंत्र्य–ईश्वराधीनता भगवानांनीं दाखविली आहे—त्यामुळें अक्षरोपासना व कर्मयोग हीं एकत्र संभवत नाहींत. ज्याअर्थीं असें आहे, त्याअर्थीं तत्त्वज्ञाननिष्ठ अक्षरोपासक संन्याशांना 'अद्वेष्टा सर्व भूतानां०' येथून साक्षात् अमृतत्वाचें साधन होणारा धर्मसमूह भगवान् सांगत आहेत. अज्ञ कर्मी पुरुषांच्या ठिकाणीं पुढील सर्वधर्म पूर्णपणें संभवत नाहींत. यास्तव अक्षरब्रह्म-निष्ठासाठींच मुख्यत्वेंकरून हे धर्म आहेत. तथापि त्यांतील जे सामान्य धर्म ज्या इतरांनाहि जितक्या प्रमाणानें आचरतां येतील, तितके त्यांनीं ते अवश्य आचरावे हें इष्टच आहे. कारण कर्मयोग्यांनींहि शक्य तितका द्वेष टाकणें, सर्वांशीं मित्रत्वानें वागणें, इत्यादि केव्हांहि चांगलेंच; पण ते सर्व धर्म पूर्णपणें निष्काम ज्ञाननिष्ठ संन्याश्यांच्या हातूनच घडणें शक्य आहे. म्हणून भगवान् म्हणतात—

अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्रः करुण एव च ।
निर्ममो निरहङ्कारः समदुःखसुखः क्षमी ॥ १३ ॥

(५)—कोणत्याहि प्राण्याचा द्वेष न करणारा, सर्वांशीं मित्रत्वानें रहाणारा, दुःखी जीवावर दया करणारा, असाच तो असतो. सर्व भूतांना अभय देणारा संन्यासी निर्मम असतो–हा अमुक पदार्थ माझा आहे, असें त्याला कधीं वाटत नाहीं. त्याच्या ठिकाणीं 'हा मी' असा अभिमान नसतो. सुख व दुःख हीं दोन्ही त्याला एकसारखींच वाटतात व तो क्षमावान् असतो. [ दुःख द्वेषाची प्रवृत्ति करितें आणि सुख आसक्ति वाढवितें. सामान्य मनुष्य ज्याच्या-पासून दुःख होतें, त्याचा व स्वतः दुःखाचाहि द्वेष करितो आणि ज्यांच्यापासून सुख होतें त्यांवर व सुखावर प्रेम करितो; पण भगवद्भक्त त्या दोहोंनाहि समान मानितो; म्हणून स्वतःला दुःख देणाऱ्या प्राण्यांचाहि द्वेष न

करणें, हें भगवद्भक्ताचें लक्षण आहे. त्याचप्रमाणें कोणीं शिव्या दिल्या किंवा मारलें तरी मनांत क्षुब्ध न होतां शांत रहाणें, हेंच क्षमित्व आहे. इतर शब्दांचा अर्थ स्पष्ट आहे. ]

सन्तुष्टः सततं योगी यतात्मा दृढनिश्चयः ।
मय्यर्पितमनोबुद्धिर्यो मे भक्तः स मे प्रियः ॥ १४ ॥

—सदा संतुष्ट–जिवंत रहाण्यास अवश्य असलेल्या वस्तु मिळाल्या तरी आनंद, न मिळाल्या तरी आनंद; तसेंच सदोदित शांतचित्त असणारा, मनाला केव्हांहि विक्षिप्त होऊं न देणारा, स्वभावाचें नियमन करणारा, म्हणजे मनाच्या प्रत्येक स्वाभाविक वृत्तीचा निरोध करणारा; किंवा शरीर-इंद्रियसंघातांचें नियमन करणारा, आत्मतत्त्वाविषयीं ज्याचा निश्चय अतिशय दृढ आहे व जो माझ्या ठिकाणीं आपलें मन व बुद्धि स्थिर करून राहिला आहे, असा माझा भक्त, मला प्रिय आहे. [ जो अशा प्रकारचा मद्भजनपरायण ज्ञानी, तो मला प्रिय आहे. ' ज्ञानी भक्ताला मी अत्यंत प्रिय आहें व तो मला अत्यंत प्रिय आहें, ' असें जें सातव्या अध्यायांत ( श्लोक १३ ) सुचविलें आहे, त्याचाच हा विस्तार केला आहे. ]

यस्मान्नोद्विजते लोको लोकान्नोद्विजते च यः ।
हर्षामर्षभयोद्वेगैर्मुक्तो यः स च मे प्रियः ॥ १५ ॥

—ज्या माझ्या भक्तांपासून कोणताहि प्राणी उद्विग्न होत नाहीं, कोणालाहि संताप–क्षोभ होत नाहीं, त्याचप्रमाणें जो कोणत्याहि प्राण्यांपासून उद्वेग पावत नाहीं आणि जो हर्ष, क्रोध, भय व खेद यांनीं मुक्त–रहित असतो, तो मला प्रिय आहे.

अनपेक्षः शुचिर्दक्ष उदासीनो गतव्यथः ।
सर्वारम्भपरित्यागी यो मद्भक्तः स मे प्रियः ॥ १६ ॥

—देहादिकांसाठीं ज्यांची अत्यंत अपेक्षा असते, अशा वस्त्रादिकांविषयींहि अनपेक्ष, बाह्य शरीरशुद्धि व आंतील मनाची शुद्धि यांनीं युक्त, म्ह० दोन्ही प्रकारें शुद्ध–पवित्र; अनेक कर्तव्यें प्राप्त झालीं असतां त्यांना बरोबर जाणण्यास समर्थ; यावेळीं मला अमुक करणेंच योग्य आहे, असें समजून तें करणारा; मित्रादिकांचा पक्ष न घेणारा–निःपक्षपात, निर्भय व सर्व सकाम कर्में सोडणारा; असा जो माझा भक्त तो मला प्रिय आहे.

यो न हृष्यति न द्वेष्टि न शोचति न काङ्क्षति ।
शुभाशुभपरित्यागी भक्तिमान्यः स मे प्रियः ॥ १७ ॥

—जो इष्ट वस्तूंची प्राप्ति झाली असतां हृष्ट होत नाहीं व अनिष्ट वस्तूंची प्राप्ति झाली असतां तिचा द्वेष करीत नाहीं, जो प्रिय वस्तूचा वियोग झाला असतां शोक करीत नाहीं व न मिळालेल्या वस्तूंची इच्छा करीत नाहीं आणि जो शुभ व अशुभ वस्तूंचा परित्याग करतो, तो भक्तिमान् मनुष्य मला प्रिय आहे.

समः शत्रौ च मित्रे च तथा मानापमानयोः ।
शीतोष्णसुखदुःखेषु समः सङ्गविवर्जितः ॥ १८ ॥
तुल्यनिन्दास्तुतिर्मौनी सन्तुष्टो येन केनचित् ।
अनिकेतः स्थिरमतिर्भक्तिमान्मे प्रियो नरः ॥ १९ ॥

—शत्रु व मित्र या दोघांशींहि तुल्य व्यवहार करणारा; मान व अपमान या दोहोंनाहि समान मानणारा; शीतोष्ण, सुख-दुःख यांमध्यें एकसारखीच भावना ठेवणारा; कोठेंहि आसक्ति न ठेवणारा, निंदा व स्तुति यांना तुल्य मानणारा, वाणीचें नियमन करणारा, शरीर जीवंत रहाण्यापुरतें जें कांहीं मिळेल, त्यानें संतुष्ट होणारा, ज्याचें निवासस्थान एक नियत नाहीं, जेथें राहील तेंच त्याचें घर असा व ज्याची परमार्थविषयक बुद्धि स्थिर असते, डळमळीत नसते, असा जो भक्तिमान् पुरुष तो मला प्रिय आहे.

'अद्वेष्टा०' या १३ व्या श्लोकापासून सांगावयास आरंभिलेल्या संन्याशयांच्या धर्मांचा उपसंहार करितात—

ये तु धर्म्यामृतमिदं यथोक्तं पर्युपासते ।
श्रद्दधाना मत्परमा भक्तास्तेऽतीव मे प्रियाः ॥ २० ॥

—पण जे श्रद्धावान् व माझे एकनिष्ठ भक्त, हें वर सांगितलेलें, धर्माला सोडून नसलेलें मोक्षाचें साधन करतात, ते श्रेष्ठ भक्त मज परमेश्वराला अतिशयच प्रिय होतात. [ ज्याअर्थीं वर सांगितलेल्या या धर्मामृताचें अनुष्ठान करणारा भक्त, मज व्यापक परमेश्वराला अतिशय प्रिय होतो, त्याअर्थीं विष्णूच्या प्रिय परम धामास—परम पदास प्राप्त होण्याची इच्छा करणाऱ्या मुमुक्षूनें या धर्मामृताचें मोठ्या प्रयत्नानें अनुष्ठान करावें, असा 'अद्वेष्टा०' इत्यादि या सर्व वाक्यांचा अर्थ आहे. याप्रमाणें या अध्यायांत

सोपाधिक ईशस्वरूपाच्या ध्यानाचा परिपाक झाला असतां निरुपाधिक स्वरूपाचें अनुसंधान करणाऱ्या व 'अद्वेष्टा सर्वभूतानां०' इत्यादि ग्रंथानें सांगितलेल्या धर्मांनीं युक्त होऊन श्रवणादिकांची आवृत्ति करीत असलेल्या मुख्य अधिकाऱ्यालाच तत्त्वसाक्षात्कार होतो व त्यामुळेंच ज्याअर्थी मुक्ति मिळते, त्याअर्थी साक्षात्काराला कारण होणाऱ्या वाक्यार्थ ज्ञानाचा विषय, असा जो तत्पदार्थ त्याचें अनुसंधान करावें, असें सिद्ध झालें. ]

(येथें भगवद्गीतेचा 'भक्तियोग'-नांवाचा बारावा अध्याय समाप्त झाला.) ६. ३. ३६.

---

## अध्याय ३७ वा.

(गीताध्याय १३ वा. प्रकृति-पुरुष-क्षेत्र–क्षेत्रज्ञविवेकयोग.)

[ १ क्षेत्र-क्षेत्रज्ञज्ञान व त्याची प्रशंसा. २ क्षेत्राचें स्वरूप. ३ अमानित्वादि ज्ञानसाधनें. ४ ज्ञेयाचें स्वरूप. ५ प्रकृति व पुरुष यांचें वर्णन. ६ आत्मदर्शनाचे उपाय. ७ ज्ञानाचें फल. ]

क्षेत्र-क्षेत्रज्ञरूप द्विविध प्रकृतींचें निरूपण करून तिच्या द्वारा ईश्वराच्या स्वरूपाचा निश्चय करण्यासाठीं हा अध्याय आरंभिला आहे. त्याचप्रमाणें बाराव्या अध्यायाच्या शेवटीं तत्त्वज्ञानी संन्याश्यांची निष्ठा सांगितली. ते कसे वागतात तें सांगितलें, पण ते ज्या तत्त्वज्ञानानें युक्त होत्साते, तसें आचरण करून भगवानास प्रिय होतात, तें तत्त्वज्ञान सांगण्यासाठीं हा अध्याय आरंभिला जातो. हें या अध्यायाच्या आरंभाचें दुसरें प्रयोजन आहे. तसेंच सुख-दुःखादिरूप संसार हा आत्म्याचा धर्म नसून क्षेत्राचा धर्म आहे, इत्यादि दुसऱ्याहि विशेष गोष्टींचें यांत निरूपण केलें आहे.

श्रीभगवानुवाच—

इदं शरीरं कौन्तेय क्षेत्रमित्यभिधीयते ।
एतद्यो वेत्ति तं प्राहुः क्षेत्रज्ञ इति तद्विदः ॥ १ ॥

(१)—श्रीभगवान् म्हणाले—हे कुंतीपुत्रा अर्जुना, हें शरीर क्षेत्र आहे, असें म्हटलें जातें व त्याला जो जाणतो, तो क्षेत्रज्ञ होय, असें क्षेत्र-क्षेत्रज्ञवेत्ते सांगतात. [ क्षेत्र-क्षेत्रज्ञांना जाणणारे तत्त्वज्ञ या शरीराला 'क्षेत्र' व त्याला 'हें मी' किंवा 'मी आत्मा द्रष्टा व हें माझें दृश्य' असें जाणणारा क्षेत्रज्ञ आहे, असें सांगतात. ]

क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि सर्वक्षेत्रेषु भारत ।
क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्ज्ञानं यत्तज्ज्ञानं मतं मम ॥ २ ॥

—हे अर्जुना, सर्व शरीररूप क्षेत्रांतील क्षेत्रज्ञ मी आहें, असेंहि जाण. क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचें जें ज्ञान, तें यथार्थ ज्ञान म्हणून मला संमत आहे. [या श्लोकांत 'च' व 'अपि' असे जे दोन निपात आहेत, ते 'जीवच अक्षर आहे,' या ज्ञानाचा 'तो देहाहून भिन्न आहे,' या ज्ञानाशीं समुच्चय करण्यासाठीं आहे, यास्तव कापिल सांख्यदर्शनाप्रमाणें क्षेत्रज्ञ दृश्याहून अन्य आहे, एवढेंच तूं जाणूं नकोस. तर 'क्षेत्रज्ञ मीच आहें' असेंहि जाण. जो सर्व क्षेत्रज्ञ आहे, तो मीच आहें असें समज. हेंच सम्यग्ज्ञान आहे. ]

तत्क्षेत्रं यच्च यादृक् च यद्विकारि यतश्च यत् ।
स च यो यत्प्रभावश्च तत्समासेन मे शृणु ॥ ३ ॥

—तें क्षेत्र कोणतें ? कोणत्या प्रकारचें ! कोणकोणत्या विकारानें युक्त असलेलें, तें ज्या कारणाचें कार्य आहे, त्याचप्रमाणें क्षेत्रज्ञ कोण ? तो कोणत्या प्रभावानें युक्त आहे ! तें मजपासून ऐक. [ क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचें हें अशाप्रकारचें यथार्थ स्वरूप तूं वाक्यावरून संक्षेपतः ऐक व त्याविषयीं निश्चय कर, असा याचा भावार्थ. ]

ऋषिभिर्बहुधा गीतं छन्दोभिर्विविधैः पृथक् ।
ब्रह्मसूत्रपदैश्चैव हेतुमद्भिर्विनिश्चितैः ॥ ४ ॥
महाभूतान्यहङ्कारो बुद्धिरव्यक्तमेव च ।
इन्द्रियाणि दशैकं च पञ्च चेन्द्रियगोचराः ॥ ५ ॥

—तें वसिष्ठादि ऋषींनीं अनेक प्रकारें गायिलेलें आहे, म्हणजे क्षेत्रक्षेत्रज्ञांचें याथात्म्य त्यांनीं बहुतप्रकारें कथन केलें. अनेक शाखाभेदांनीं विविध झालेल्या वेदांनीं त्यांचें वर्णन केलें. तसेंच उपनिषदांतील युक्तियुक्त व अत्यंत निश्चित अशा ब्रह्मसूचक पदांनीं त्याचें उपपादन केलें आहे.

इच्छा द्वेषः सुखं दुःखं संघातश्चेतना धृतिः ।
एतत्क्षेत्रं समासेन सविकारमुदाहृतम् ॥ ६ ॥

( २ )—पृथ्व्यादि पंच सूक्ष्म भूतें; त्यांचें कारण अहंकार; त्यांचें कारण निश्चयात्मिका बुद्धि; बुद्धीचें कारण अव्यक्त; दहा व एक अशीं अकरा इंद्रियें; पांच इंद्रियांचे विषय; सुखाला कारण होणाऱ्या पदार्थांचें ग्रहण करण्याची

इच्छा, प्रतिकूल पदार्थांविषयीं द्वेष, अनुकूल असलेलें सुख, अप्रिय वाटणारें दुःख, सर्व देहांत व्यक्त झालेली चिदाभासयुक्त अंतःकरणवृत्ति व धैर्य, हें शरीर संक्षेपतः विकारांसह सांगितलें आहे. [ येथें सांगितलेले सूक्ष्म भूतादि पदार्थ, अव्यक्तापर्यंत कारणें व पुढील सर्व कार्यें हेंच क्षेत्र आहे. ]

याप्रमाणें क्षेत्राचें व्याख्यान केल्यावर आतां क्षेत्रज्ञाचें व्याख्यान करणें उचित आहे. पण त्यापूर्वीं भगवान् अमानित्वादि ज्ञानसाधनांचा उपदेश करितात—

अमानित्वमदम्भित्वमहिंसा क्षान्तिरार्जवम् ।
आचार्योपासनं शौचं स्थैर्यमात्मविनिग्रहः ॥ ७ ॥

( ३ )—मी मोठा आहें, इत्यादि आत्मश्लाघा करणें व स्वतःलाच तसें समजणें, हें मानित्व आहे. पण १ तसा मानीपणा न करणें; खरोखर धार्मिक नसतांना तसा आव आणणें, वरवर धार्मिकता प्रकट करणें हा दांभिकपणा आहे, तसा २ दांभिकपणा न दाखविणें; ३ प्राण्यांना पीडा न देणें; ४ दुसऱ्यानें अपराध केला असतांहि मनांत क्रोध हा विकार उत्पन्न होऊं न देणें; ५ अंतःकरणाचा सरलपणा; ६ मोक्षाच्या साधनांचा उपदेश करणाऱ्या आचार्यांची शुश्रूषा करणें; ७ शरीराचे मल जलानें धुवून टाकणें आणि मनाचे रागादि मल वैराग्यादिकांनीं घालविणें, असें हें दोन प्रकारचें शौच म्ह० शुद्धि; ८ मोक्षमार्गाविषयीं दृढ निश्चय; ९ शरीरेंद्रियसमूहाला असन्मार्गापासून परतवून सन्मार्गातच ठेवणें;

इन्द्रियार्थेषु वैराग्यमनहङ्कार एव च ।
जन्ममृत्युजराव्याधिदुःखदोषानुदर्शनम् ॥ ८ ॥

—१० ऐहिक व पारलौकिक विषयांविषयीं वैराग्य; ११ मी अमुक-अमुक अशाप्रकारचा आहें, असा गर्व म्ह० अभिमान केव्हांहि न वहाणें; १२ जन्म-मरण, जरा, रोग व दुःख या प्रत्येकांतील दोषांचा विचार करणें; किंवा जन्म, मरण, जरा, रोग यांतील असह्य दुःख, याच दोषांचें चिंतन करणें;

असक्तिरनभिष्वङ्गः पुत्रदारगृहादिषु ।
नित्यं च समचित्तत्वमिष्टानिष्टोपपत्तिषु ॥ ९ ॥

—१३ विषयांवर प्रीति न ठेवणें, १४ पुत्र, स्त्री, गृह इत्यादिकांमध्यें अत्यंत आसक्ति न ठेवणें आणि १५ इष्ट व अनिष्ट यांची प्राप्ति झाली असतां नेहमीं समचित्त ठेवणें; ( इष्ट प्राप्तीनें हृष्ट न होणें व अनिष्ट प्राप्तीनें खिन्न न होणें. )

**मयि चानन्ययोगेन भक्तिरव्यभिचारिणी ।**
**विविक्तदेशसेवित्वमरतिर्जनसंसदि ॥ १० ॥**

—१६ माझ्या ठिकाणीं अनन्ययोगानें म्ह० वासुदेवाहून श्रेष्ठ कोणी नाहीं, तोच आमची गति आहे, अशा चित्तसमाधानानें अढळ भक्ति; १७ एकान्त, निर्भय, पवित्र प्रदेशांत रहाणें, म्ह० अरण्य, नदीकांठ इत्यादि प्रदेशांचें सेवन करणें; १८ सामान्य प्राकृतजनांच्या समूहांत मिळण्याची आवड नसणें;

**अध्यात्मज्ञाननित्यत्वं तत्त्वज्ञानार्थदर्शनम् ।**
**एतज्ज्ञानमिति प्रोक्तमज्ञानं यदतोऽन्यथा ॥ ११ ॥**

—१९ आत्मा व अनात्मा यांच्या विवेकज्ञानामध्यें सतत गढून जाणें व २० तत्त्वज्ञानाचा अर्थ–फल जो मोक्ष, त्याचें आलोचन करणें हें सर्व ज्ञान म्हणजे ज्ञानाचें साधन आहे असें सांगितलें आहे. जें याच्या उलट असलेलें, मानित्व, दंभित्व, हिंसा, क्रोध, इत्यादि तें अज्ञान होय.

या ज्ञानानें जाणण्यास योग्य असें काय आहे तें सांगतात—

**ज्ञेयं यत्तत्प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वामृतमश्नुते ।**
**अनादिमत्परं ब्रह्म न सत्तन्नासदुच्यते ॥ १२ ॥**

( ४ )—जें ज्ञेय तें मी सांगतों. तें जाणून पुरुष अमरभावास प्राप्त होतो. जें आदिमत नसलेलें निरतिशय ब्रह्म तें ज्ञेय होय. तें सत् म्हटलें जात नाहीं व असत्हि म्हटलें जात नाहीं. [ जी अवश्य ज्ञातव्य वस्तु ती ज्ञेय होय. तिला जाणून मोक्ष मिळतो. अनादि परब्रह्मच अवश्य ज्ञातव्य आहे. त्याला सत् किंवा असत् म्हणतां येत नाहीं. ती ज्ञेय वस्तु सर्व विशेषशून्य आहे. त्यामुळें तिचा उपदेश असाच करतां येणें शक्य आहे. ब्रह्मात्मप्रकाश सिद्ध आहे. त्यामुळें त्याचा उपदेश विधिमुखानें करतां येत नाहीं. वेदान्तामध्येंहि त्याच्यावर आरोपिलेल्या धर्माची निवृत्ति करण्यासाठीं, त्याचा निषेधमुखानेंच उपदेश केला आहे. ]

ज्ञेय ब्रह्म 'सत्' हा शब्द व 'सत्' असा प्रत्यय यांचा विषय होत नसल्यामुळें 'तें मुळीं नाहींच' अशी शंका आली असतां सर्व प्राण्यांचीं इंद्रियें, याच उपाधीच्या द्वारा प्रतिपादन करितात—

**सर्वतः पाणिपादं तत्सर्वतोऽक्षिशिरोमुखम् ।**
**सर्वतः श्रुतिमल्लोके सर्वमावृत्य तिष्ठति ॥ १३ ॥**

—तें ज्ञेय सर्व बाजूंनीं ज्याला हात-पाय आहेत, असें आहे. सर्व बाजूंनीं ज्याला नेत्र, मस्तकें, व मुखें आहेत, असें आहे. ज्याला सर्व बाजूंनीं श्रवणेंद्रियें आहेत, असें आहे. तें तत्त्व या प्राणिसमूहांत सर्वांला व्यापून रहातें. [ज्ञेय ब्रह्माचें केवल सांनिध्यानें इंद्रियादि सर्वांना आपापल्या कार्यांत प्रवृत्त करण्याचें जें सामर्थ्य, त्याच्या सत्तेनेंच हस्त-पादादिक वस्तु घेणें, चालणें, इत्यादि आपापले व्यवहार करूं शकतात. त्यामुळें हस्त-पादादि ज्ञेयब्रह्माच्या अस्तित्वाचीं सूचक चिह्नें आहेत. म्हणून हस्त-पादादिक हे त्या ज्ञेयाचेच अवयव आहेत, असें उपचारानें म्हटलें आहे. येथील अक्षि व श्रवण या इंद्रियांचें ग्रहण बाकीच्या ज्ञानेंद्रियांच्या उपलक्षणार्थ; पाणि, पाद, मुख यांचें ग्रहण कर्मेंद्रियांच्या उपलक्षणार्थ आणि मन व बुद्धि यांचें ग्रहण अन्तरींद्रियांच्या उपलक्षणार्थ केलें आहे. एकच तत्त्व सर्व सृष्टीला व्यापून रहात असल्यामुळें त्यानें सर्वत्र इंद्रियादिकांनीं युक्त असणें, यांत कांहींच विरोध नाहीं.]

पण तें ज्ञेय ब्रह्म खरोखरच हात, पाय इत्यादि अवयवांनीं युक्त आहे, असें कोणाला वाटूं नये म्हणून सांगतात—

सर्वेन्द्रियगुणाभासं सर्वेन्द्रियविवर्जितम् ।
असक्तं सर्वभृच्चैव निर्गुणं गुणभोक्तृ च ॥ १४ ॥

—ज्याचा प्रकाश सर्व इंद्रियांच्या गुणांनीं होतो, पण जें वस्तुतः सर्व इंद्रियांनीं रहित आहे. त्यामुळें कोठेंहि आसक्त न झालेलें, तथापि सर्वांना धारण करणारें व सर्वांचें अधिष्ठान, असें तें गुणरहित आहे. पण गुणांचा—सुख-दुःख व मोह या कार्यांचा भोग घेणारें आहे. [ज्ञानेंद्रियें, कर्मेंद्रियें, बुद्धि व मन या उपाधिभूत सर्व इंद्रियांच्या गुणांनीं म्ह० श्रवणादि, भाषणादि, निश्चय व संकल्प या क्रियांनीं तें भासतें. सर्व इंद्रियांच्या व्यापारांनीं जणुकाय तें व्यापारयुक्त असल्यासारखें दिसतें. पण स्वतः स्वरूपानें सर्व इंद्रियरहित आहे. त्यामुळेंच—असक्त म्ह० सर्वसंबंधशून्य आहे. तथापि सर्वभृत्—स्वतःच्या केवल सत्तेनें अधिष्ठानत्वानें सर्वांचें पोषण करतें. तें निर्गुण—सत्त्व, रज व तम या गुणांनीं रहित आहे. तथापि शब्दादि विषयांच्या द्वारा सुख, दुःख व मोह यांच्या आकारांनीं परिणत झालेल्या गुणांचा अनुभव घेणारें आहे.]

बहिरन्तश्च भूतानामचरं चरमेव च ।
सूक्ष्मत्वात्तदविज्ञेयं दूरस्थं चान्तिके च तत् ॥ १५ ॥

—तें सर्व प्राण्यांच्या बाहेर व आंत आहे. तेंच अचर आहे व चरहि आहे. तें ज्ञेय सूक्ष्म असल्यामुळें विशेषतः ज्ञेय होत नाहीं. म्ह० त्याचें वृक्ष, पाषाण, यांप्रमाणें प्रत्यक्ष ज्ञान होत नाहीं. तें अज्ञदृष्टया अत्यंत दूर आहे व ज्ञानी पुरुषाच्या दृष्टीनें अगदीं समीप—हृदयांत आहे. [ तें भूतांच्या बाहेर विषयादिरूप आहे व भूतांमध्येंहि प्रत्यग्भूत आहे. बाहेर व आंत तें आहे, असें म्हटल्यानें मध्यें तें नाहीं असें कोणाला वाटेल, म्हणून चराचर भूतात्मक म्ह० नानाप्रकारच्या देहरूपानें भासणारें तें ज्ञेयच आहे. अधिष्ठानभूत रज्जूमध्यें कल्पित सर्पादिकाचा अंतर्भाव जसा होतो, तसा देहाभासाचाहि ज्ञेयामध्यें अंतर्भाव होतो. तथापि तें आकाशाप्रमाणें अति सूक्ष्म आहे. त्यामुळें अविद्वानांना त्याचें ज्ञान होत नाहीं. पण विद्वानांना 'आत्माच हें सर्व आहे, ब्रह्मच हें सर्व आहे,' इत्यादि प्रमाणांच्या योगानें नित्य विज्ञातच आहे. अविद्वानांना तें असंख्य वर्षांनींहि प्राप्त होण्यासारखें नसल्यामुळें तें दूर स्थित आहे व विद्वानांच्या प्रत्यगात्मत्वामुळें तें अगदीं समीप आहे. ]

अविभक्तं च भूतेषु विभक्तमिव च स्थितम् ।
भूतभर्तृ च तज्ज्ञेयं ग्रसिष्णु प्रभविष्णु च ॥ १६ ॥

—तें ज्ञेय प्राण्यामध्यें एक म्ह० भिन्न भिन्न नसलेलें असें आहे, पण विभक्त असल्यासारखें राहिलें आहे. तें प्रत्येक शरीरांत भिन्न भिन्न असल्यासारखें दिसतें. तें ज्ञेय स्थितिकालीं भूतांचें भरण—धारण—पोषण करणारें आहे. तसेंच तें प्रलयकालीं भूतांचा ग्रास म्ह० संहार करणारें व सृष्टिसमयीं त्या भूतांना प्रकट करणारें आहे. [ ज्ञेयाच्या अस्तित्वाविषयीं आणखीं असे हेतु आहेत—तें सर्व देहांत आकाशाप्रमाणें एक आहे. कारण त्याचा भेद आहे, असें मानण्यास कांहीं प्रमाण नाहीं. उलट तें जर भिन्न असेल, तर तें घटादिकांप्रमाणें अनात्मा आहे, असें होईल. यास्तव, अद्वितीय व सर्वत्र प्रत्यगात्मभूत असें ज्ञेय नाहीं, असें समजणें हें साहस आहे. 'तर मग प्रतिदेहांत तें भिन्न आहे, अशी प्रतीति कशी येते ?' ( उत्तर—) तें सर्व भूतांमध्यें विभक्त असल्यासारखें स्थित आहे. प्रतिदेहांत भासणारा भेद काल्पनिक आहे. खरा नव्हे. कारण देहामध्येंच त्याची प्रतीति येत असते, देहावांचून त्या ज्ञेयाची प्रतीति येत नाहीं व प्रत्येक देह तर भिन्न भिन्न; त्यामुळें त्यांतील ज्ञेयहि तसेंच भिन्न असावें, अशी अविचारी लोकांची कल्पना होते. तें ज्ञेय

कार्यांच्या स्थितीला कारण होत असल्यामुळेंहि भूतभर्तृ आहे—भूतांचें भरण-पोषण करतें. तें सर्व भूतांच्या उत्पत्ति व प्रलय या समयीं निमित्त व उपादान कारणहि आहे. ज्याप्रमाणें मिथ्या कल्पित सर्पादिकांच्या उत्पत्ति-स्थिति-लयांचें कारण रज्जुप्रभृति अधिष्ठान असतें, त्याप्रमाणें मी ज्ञेय कल्पित भूतांच्या उत्पत्त्यादिकांचें कारण आहें. त्यामुळें अद्वैतस्थितीला बाध येत नाहीं. ]

ज्योतिषामपि तज्ज्योतिस्तमसः परमुच्यते ।
ज्ञानं ज्ञेयं ज्ञानगम्यं हृदि सर्वस्य विष्ठितम् ॥ १७ ॥

—तें ज्ञेय सूर्य-अग्नि इत्यादि जडज्योतींचीहि ज्योति आहे. जड प्रकाशांनाहि प्रकाशित करणारें आहें. तमाचा—अज्ञानाचा त्याला स्पर्शहि झालेला नाहीं, असें म्हटलें जातें. अमानित्वादि ज्ञान, बाराव्या श्लोकापासून सांगितलेलें ज्ञेय व त्याच्या ज्ञानाचें फल, असें तें त्रिविध ज्ञेय सर्व प्राण्यांच्या बुद्धींत विशेषतः स्थित आहे. [ ज्ञेयच ज्ञात झालें असतां ज्ञानगम्य—ज्ञानाचें फल होतें. तें तत्त्व बुद्धिस्थ असल्यामुळें अगदीं प्रकट आहे. बुद्धीमध्येंच या तिहींचा अनुभव येतो, हें प्रसिद्ध आहे. ]

इति क्षेत्रं तथा ज्ञानं ज्ञेयं चोक्तं समासतः ।
मद्भक्त एतद्विज्ञाय मद्भावायोपपद्यते ॥ १८ ॥

—याप्रमाणें क्षेत्र—शरीर, अमानित्वादि ज्ञानसाधनें, त्याचप्रमाणें जाणण्यास योग्य असें परब्रह्म संक्षेपतः सांगितलें. माझ्या ठिकाणींच ज्यानें आपला सर्व भाव ठेवला आहे, असा माझा परम भक्त हें सर्व जाणून, माझ्या स्वरूपाला प्राप्त होतो.

सातव्या अध्यायांत ईश्वराच्या पर व अपर—क्षेत्रज्ञ व क्षेत्र या दोन उपाधि सांगितल्या व याच दोन प्रकृति सर्व भूतांचें कारण आहेत, असें म्हटलें. पण त्या द्विविध प्रकृतीला भूतांचें कारणत्व कसें तें सांगतात—

प्रकृतिं पुरुषं चैव विद्ध्यनादी उभावपि ।
विकारांश्च गुणांश्चैव विद्धि प्रकृतिसम्भवान् ॥ १९ ॥

( ५ )—अष्टधा प्रकृति आणि क्षेत्रज्ञ या दोघांनाहि तूं अनादि—नित्य जाण. त्याचप्रमाणें बुद्धि, इंद्रियें, देह, इत्यादि विकारांस व सुख-दुःख-मोहरूप गुणांस तूं ईश्वराच्या त्रिगुणात्मक मायाख्य प्रकृतीपासून झालेले समज.

कार्यकरणकर्तृत्वे हेतुः प्रकृतिरुच्यते ।
पुरुषः सुखदुःखानां भोक्तृत्वे हेतुरुच्यते ॥ २० ॥

—कार्य–शरीर व करण–सर्व इंद्रियें, यांच्या कर्तृत्वाविषयीं वरील प्रकृति निमित्त आहे, असें सांगितलें जातें, त्याचप्रमाणें सुख-दुःखांच्या भोक्तृत्वाविषयीं क्षेत्रज्ञ–जीव निमित्त सांगितला जातो. [ देहाची आरंभक–देह ज्यांच्यापासून उत्पन्न होतो तीं भूतें, विषय व शरीरें हे विकार हा येथील 'कार्य'-शब्दाचा अर्थ आहे. त्याचप्रमाणें तेरा इंद्रियें व त्यांचा आश्रय करून राहणारे सुख-दुःख-मोहात्मक गुण, हा येथील 'करण'-शब्दाचा अर्थ आहे. त्यांचें कर्तृत्व प्रकृतीला आहे. त्यांना उत्पन्न करणें या रूपानें ती त्यांचें कारण आहे. अशा कार्य, करण, कर्तृत्वामुळें प्रकृति संसारकारण आहे. पुरुष म्ह० जीव–क्षेत्रज्ञ–भोक्ता, सुख-दुःखांच्या भोक्तृत्वाचें निमित्त आहे. प्रकृति शरीरेंद्रियांच्या कर्तृत्वानें व पुरुष सुख-दुःखांच्या भोक्तृत्वानें संसाराचें निमित्त होतो. सुख-दुःखांचा साक्षात्कार हाच अविक्रय आत्म्याचा म्ह० द्रष्ट्याचा संसार व तशा प्रकारचें भोक्तृत्व हेंच त्याचें संसारित्व होय. ]

सुख-दुःखाचें भोक्तृत्व हेंच पुरुषाचें संसारित्व आहे, पण अविक्रय पुरुषाला तें कोणत्या कारणानें प्राप्त होतें तें सांगतात—

पुरुषः प्रकृतिस्थो हि भुङ्क्ते प्रकृतिजान्गुणान् ।
कारणं गुणसङ्गोऽस्य सदसद्योनिजन्मसु ॥ २१ ॥

—कारण पुरुष इंद्रियांच्या रूपानें परिणत झालेल्या–शरीरेंद्रियाकार प्रकृतींत स्थित होऊन, हा शरीरेंद्रियसंघातच मी, असें मानून प्रकृतीपासून उत्पन्न झालेल्या सुख-दुःख-मोहात्मक गुणांस भोगतो, त्यांचा अनुभव घेतो. या भोक्त्याची गुणांवरील आसक्ति हाच त्याचा देवादि 'सत् योनि' व पश्वादि 'असद्योनि' यांत जन्म होण्याचें कारण आहे. [ अविद्या हें संसाराचें उपादान कारण असून 'गुणसंग' निमित्तकारण आहे. 'सदसद्योनि' या शब्दानें मनुष्यांतीलहि उत्तम-अधम योनि घ्याव्या. ]

त्या पुरुषाचाच पुनः साक्षात् निर्देश करितात—

उपद्रष्टानुमन्ता च भर्ता भोक्ता महेश्वरः ।
परमात्मेति चाप्युक्तो देहेऽस्मिन्पुरुषः परः ॥ २२ ॥

—समीप राहून पहाणारा, अनुमोदन देणारा आणि भरण-पोषण करणारा, भोग घेणारा, सर्व ईश्वरांचाहि ईश्वर, 'परमात्मा' असेंहि पण बोलला गेलेला परपुरुष या देहांत आहे. [ 'उपद्रष्टा०' यांतील 'उप' या उपसर्गाचा 'सामीप्य' हा अर्थ आहे. त्यामुळें उपद्रष्टा म्ह० समीप स्थित होऊन पहाणारा, पण हा पुरुष लौकिक उपद्रष्ट्याप्रमाणें स्वतः कांहीं व्यापार करीत नाहीं. त्यामुळें यजमान व ऋत्विक् यांच्या यज्ञकर्मांतील गुण किंवा दोष यांस समीप बसून पहाणारा सर्व यज्ञकुशल विद्वान् जसा सर्व जाणतो, त्याप्रमाणें हा चिन्मात्रस्वभाव आत्मा सर्व पहातो म्हणून तो उपद्रष्टा होय. किंवा देह, चक्षु, मन, बुद्धि व आत्मा हे पांच द्रष्टे आहेत. त्या सर्वांत बाह्यद्रष्टा देह आहे व सर्वांच्या आंतील द्रष्टा आत्मा आहे. तोच प्रत्यक् म्ह० अगदीं समीप आहे. अर्थात् प्रत्यगात्मा हाच उपद्रष्टा होय. 'अनुमन्ता' म्हणजे अनुमोदन देणारा. शरीरेंद्रियें आपापल्या व्यापारामध्यें प्रवृत्त झालीं असतां साक्षी आत्मा त्यांचें निवारण करीत नाहीं, म्हणून तो अनुमन्ता. आपल्या चिदाभासानें शरीर-इंद्रियें-मन व बुद्धि यांचें पोषण करितो. त्यांना परस्पर संबद्ध करितो, म्हणून तो 'भर्ता.' बुद्धीचे सर्व विषयानुभव आत्मचैतन्यानें व्याप्त असेच उत्पन्न होत असलेले दिसतात. कारण चैतन्याच्या व्याप्तीवांचून त्यांचा अनुभवच संभवत नाहीं. म्हणून तो 'भोक्ता.' सर्व ईश्वरांचाहि ईश्वर, म्हणून 'महेश्वर' व देहादि मिथ्या आत्म्याहून श्रेष्ठ, म्हणून तो 'परमात्मा' आहे. 'उपद्रष्टा' इत्यादि विशेषांनीं युक्त असलेला तो या देहांत व्यक्त होतो. ]

> य एवं वेत्ति पुरुषं प्रकृतिं च गुणैः सह ।
> सर्वथा वर्तमानोऽपि न स भूयोऽभिजायते ॥ २३ ॥

—जो याप्रकारें पुरुषाला व गुणांसह प्रकृतीला जाणतो, तो कसाहि जरी वागत असला तरी पुनरपि उत्पन्न होत नाहीं. [ पूर्वोक्त आत्म्याला 'हाच मी' असें जो जाणतो व गुणांसह म्ह० स्वविकारांसह ज्ञानानें निवृत्त केलेल्या प्रकृतीला, ब्रह्मात्मैक्य ज्ञानाच्या योगानें कार्यांसह अविद्येचा अभाव आहे, असें जो जाणतो, तो सर्वथा—विहित किंवा निषिद्ध आचरणानें जरी वागत असला तरी ज्या शरीरांत ज्ञान झालें, तें शरीर मृत झालें असतां पुनः उत्पन्न होत नाहीं, मग जो नियमानें सदाचरणसंपन्न असतो, तो उत्पन्न होणार नाहीं हें काय सांगावें ? ]

आतां या आत्मदर्शनाविषयीं ध्यानादिक निरनिराळे उपाय सांगितले जातात—

ध्यानेनात्मनि पश्यन्ति केचिदात्मानमात्मना ।
अन्ये साङ्ख्येन योगेन कर्मयोगेन चापरे ॥ २४ ॥

( ६ )—कांहीं योगी प्रत्यगात्म्याला ध्यानानें सुसंस्कृत झालेल्या अंतःकरणानें बुद्धींत पहातात. दुसरे ध्यान योगानें व आणखी कित्येक ईश्वरार्पण बुद्धीनें केलेल्या कर्मानुष्ठानानें त्याला पहातात. [ प्रत्यगात्म्यामध्यें एकाग्रतेनें मनाचा उपसंहार करून आत्म्याचेंच चिंतन करणें हें ध्यान होय. तेलाच्या धारेप्रमाणें अविच्छिन्न प्रत्ययाला धार म्हणतात. उत्तम अधिकारी ध्यानानें आत्म्याला पहातात. कित्येक मध्यम अधिकारी सांख्ययोगानें पहातात. ' सत्त्वादि गुण मजकडून पाहिले जाण्यास योग्य आहेत. मी त्यांहून अगदीं निराळा, त्यांच्या व्यापाराचा साक्षी, नित्य निर्गुण आत्मा आहें ' असें चिंतन करणें हाच सांख्ययोग होय. त्यानें प्रत्यगात्म्याला सुसंस्कृत अंतःकरणानें बुद्धींत पहातात. विचारजन्य ज्ञान हेंच 'सांख्य' व तेंच आत्मसाक्षात्काराचा उपाय असल्यामुळें 'योग' होय. मंद अधिकारी कर्मयोगानें त्याला जाणतात. ईश्वरार्पण बुद्धीनें अनुष्ठान केलें जाणारें जें कर्म तेंच योगासाठीं असल्यामुळें ' योग ' आहे. ]

अत्यंत मंद अधिकाऱ्यांची मोक्ष मार्गांत कशी प्रवृत्ति होते, तेंच सांगतात—

अन्ये त्वेवमजानन्तः श्रुत्वान्येभ्य उपासते ।
तेऽपि चातितरन्त्येव मृत्युं श्रुतिपरायणाः ॥ २५ ॥

—पण वर सांगितलेल्या उपायांतील एकाहि उपायानें आत्म्याला न जाणणारे दुसरे कांहीं साधक अन्य आचार्यांपासून 'याचेंच चिंतन करा,' असें ऐकून श्रद्धेनें उपासना करितात. ते श्रवणपरायण असलेले साधकहि—ज्यांच्या मोक्षमार्गप्रवृत्तीचें ' श्रवण ' हेंच परम साधन आहे, तेसुद्धां मृत्युयुक्त संसारास उल्लंघून जातातच. [ परोपदेशानें आत्मचिंतनांत प्रवृत्त झालेल्या त्यांची ही प्रवृत्ति व्यर्थ होत नाहीं. ' श्रुतिपरायण '—श्रुति म्ह० श्रवण, तेंच ज्यांच्या मोक्षमार्गप्रवृत्तींतील श्रेष्ठ साधन आहे, तेच श्रुतिपरायण होत. अर्थात् केवल परोपदेशालाच प्रमाण मानून मोक्षमार्गांत प्रवृत्त होणारे विवेकरहित अधिकारीहि जर मृत्यूचें उल्लंघन करितात, तर प्रमाणाविषयीं स्वतंत्र असलेले विवेकी मृत्यूचें उल्लंघन करतील हें काय सांगावें ? ]

क्षेत्रज्ञ व ईश्वर यांचें एकत्व ज्ञान हें मोक्षाचें साधन आहे, असें वर सांगितलें. पण तें कोणत्या कारणानें ? म्हणून विचारशील तर सांगतों—

यावत्सञ्जायते किञ्चित्सत्त्वं स्थावरजङ्गमम् ।
क्षेत्रक्षेत्रज्ञसंयोगात्तद्विद्धि भरतर्षभ ॥ २६ ॥

—हे भरतश्रेष्ठा, जेवढें कांहीं अचर किंवा चर प्राणिजात उत्पन्न होतें, तें सर्व तूं क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांच्या संयोगापासून होतें असें जाण. वृक्ष-पाषाणादि स्थावर व मनुष्यादि जंगम यांतील जो जो प्राणी उत्पन्न होतो, तो तो क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांच्या संयोगापासून होतो. [पण येथील हा संयोग अध्यासरूप आहे. क्षेत्रज्ञ निरवयव असल्यामुळें त्याचा क्षेत्राशीं खरा संयोग संभवत नाहीं, क्षेत्रज्ञाच्या चैतन्याचा क्षेत्रावर व क्षेत्राच्या जाड्यादिकांचा क्षेत्रज्ञावर आरोप होतो. क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचें यथार्थ स्वरूप न कळणें, हेंच या परस्पर अध्यासाचें कारण आहे. यास्तव शास्त्रानुसार क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचें विवेकज्ञान संपादन करून म्ह॰ पूर्वोक्त क्षेत्राहून क्षेत्रज्ञ अगदीं पृथक् आहे, असें जाणून ' तें सर्व उपाधिशून्य ज्ञेय ब्रह्म मीच आहें ' असा साक्षात्कार झाल्यानें ज्याचें अज्ञान निवृत्त झालें आहे, त्याच्या पुढील जन्माचें कांहीं कारणच उरत नाहीं. त्यामुळें ' ज्ञानी पुनः उत्पन्न होत नाहीं ' असें जें वर म्हटलें आहे तें योग्यच आहे. ]

अविद्यादि संसारबीजाच्या निवृत्तिद्वारा जन्माचा अभाव हेंच सम्यग्ज्ञानाचें फल सांगितलें, क्षेत्र-क्षेत्रज्ञांचा संयोग हें जन्माचें कारण सांगितलें, क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचें अज्ञान हेंच त्यांच्या मिथ्या संयोगाचें कारण सांगितलें आणि आतां त्या अज्ञानाची निवृत्ति करणारें सम्यग्ज्ञान जरी यापूर्वी वारंवार सांगितलें असलें, तरी त्याचा विषय अतिशय सूक्ष्म असल्यामुळें तें पुनः दुसऱ्या शब्दांनीं सांगितलें जातें—

समं सर्वेषु भूतेषु तिष्ठन्तं परमेश्वरम् ।
विनश्यत्स्वविनश्यन्तं यः पश्यति स पश्यति ॥ २७ ॥

( ७ )—जो विनाश पावणाऱ्या सर्व भूतांमध्यें सम असलेल्या व विनाश न पावणाऱ्या परमेश्वराला पहातो, तो यथार्थपणें पहातो. [ ब्रह्मादि स्थावरान्त सर्व भूतांमध्यें निर्विशेष स्थित असलेल्या, त्या भूतांचा नाश जरी झाला तरी नाश न पावणाऱ्या आणि देह, इंद्रियें, मन, बुद्धि, अव्यक्त व जीवात्मा, यांच्या अपेक्षेनें श्रेष्ठ असलेल्या ईश्वराला म्ह॰ निर्विशेष सर्व विकाररहित व अद्वितीय

अशा परमेश्वराला जो पहातो, तोच यथार्थ पहातो. बाकीचे सर्व जरी पहात असले, तरी ते यथार्थ पहात नाहींत. विपरीत पहातात. ]

या सम्यग्दर्शनाचें फल सांगून त्या फलवचनानेंच ज्ञानाची स्तुति करितात—

समं पश्यन्हि सर्वत्र समवस्थितमीश्वरम् ।
न हिनस्त्यात्मनात्मानं ततो याति परां गतिम् ॥ २८ ॥

—कारण सर्व भूतांमध्यें समानत्वानें म्ह० एकरूपानें अवस्थित असलेल्या ईश्वराला सम पहाणारा, आपणच आपल्याला मारीत नाहीं व त्यामुळेंच तो परम गतीला जातो. [ सर्व भूतांमध्यें तुल्यत्वानें अवस्थित असलेल्या ईश्वराला सम पहाणारा पुरुष ज्याअर्थी आपणच आपली हिंसा करीत नाहीं, त्याअर्थी तो मोक्ष नांवाच्या श्रेष्ठ गतीला प्राप्त होतो. या श्लोकाच्या पहिल्या तीन पादांनीं ' ज्ञानानें अज्ञानाचा नाश झाला असतां सर्व अनर्थांचा नाश होतो ' असें सांगितलें आणि चवथ्या पादानें ' अज्ञानावरणाचा नाश झाला असतां तो ज्ञानी सर्वोत्तम गतीला प्राप्त होतो, ' असें सांगितलें. आत्मा नित्य आहे, त्यामुळें त्याची वास्तविक हिंसा संभवत नाहीं. पण अज्ञ देहादि अनात्म्याला आत्मा समजून, त्या मिथ्या आत्म्याच्या योगानें धर्म व अधर्म या नांवांचीं कर्में करून, कर्मानेंच संपादन केलेल्या त्या मिथ्या आत्म्यालाहि मारून, दुसऱ्या नवीन आत्म्याचें ग्रहण करितो व ही त्याची परंपरा ज्ञान होईपर्यंत एकसारखी चाललेली असते, म्हणून विद्वान् आपणच आपला घात करीत नाहीं, असें येथें म्हटलें आहे. तसेंच विद्यमान असलेल्या आत्म्याला अविद्येमुळें न जाणूनहि ज्ञानी त्याला असून नसल्यासारखें करीत नाहीं. ]

" सर्व भूतस्थ ईश्वराला सम पहाणारा आपणच आपला नाश करीत नाहीं, " असें सांगितलें. पण सुख-दुःखादि स्वगुण व धर्माधर्मादि स्वकर्में यांच्या वैलक्षण्यामुळें प्रति शरीरांत भिन्न असलेल्या आत्म्यामध्यें समदृष्टि संभवत नाहीं, अशी आशंका घेऊन भगवान् म्हणतात—

प्रकृत्यैव च कर्माणि क्रियमाणानि सर्वशः ।
यः पश्यति तथात्मानमकर्तारं स पश्यति ॥ २९ ॥

—जो सर्व कर्में प्रकृतीकडूनच–ईश्वराच्या शरीरेंद्रियाकार बनलेल्या मायेकडूनच सर्व प्रकारें केलीं जाणारीं पहातो, त्याचप्रमाणें आत्म्याला अकर्ता पहातो, तोच वास्तविक तत्त्व पहातो. [ कायिक, वाचिक व मानसिक कर्में

शरीरेंद्रियांच्या आकारानें परिणत झालेल्या प्रकृतीकडूनच केलीं जातात, आत्म्याकडून केव्हांहि केलीं जात नाहींत, असा जो साक्षात् अनुभव घेतो आणि क्षेत्रज्ञ आत्म्याला जो अकर्ता व सर्व उपाधिशून्य पहातो, तो परमार्थदर्शी होय. निर्गुण, अकर्ता व निर्विशेष अशा क्षेत्रज्ञाच्या भेदाविषयीं कांहीं प्रमाण नाहीं. अर्थात् आकाशाप्रमाणें तो विभु आहे. ]

यदा भूतपृथग्भावमेकस्थमनुपश्यति ।
तत एव च विस्तारं ब्रह्म सम्पद्यते तदा ॥ ३० ॥

—जेव्हां साधक भूतांचा पृथक्पणा एका आत्म्यामध्येंच स्थित आहे, असें शास्त्र व आचार्य यांच्या उपदेशाप्रमाणें पहातो आणि त्या एक आत्म्यापासूनच भूतांचा विस्तार पहातो, त्यावेळीं तो ब्रह्म होतो.

अनादित्वान्निर्गुणत्वात्परमात्मायमव्ययः ।
शरीरस्थोऽपि कौन्तेय न करोति न लिप्यते ॥ ३१ ॥

—हा परमात्मा अनादित्वामुळें व निर्गुणत्वामुळें अक्षय आहे. हे कुंतीपुत्रा, शरीरांत स्थित असलेलाहि हा पुरुष कांहीं करीत नाहीं व कर्मफलानें लिप्त होत नाहीं. [ आदि म्ह० कारण. तें ज्याला नसतें तें अनादि. जें आदिमत्–कारणयुक्त असतें, तें कार्य स्वतःच्या स्वरूपानें व्यय पावतें. त्याच्या स्वरूपाचा क्षय होतो. पण हा अनादि असल्यामुळें, निरवयव असणें, या कारणानें व्यय पावत नाहीं. त्याचप्रमाणें निर्गुणत्वामुळें त्याचा व्यय होत नाहीं. गुणयुक्त पदार्थच गुणांच्या व्ययामुळें व्यय पावतो म्हणून हा परमात्मा अव्यय आहे. निरवयत्वामुळें अवयवांच्या द्वारा, निर्गुण असल्यामुळें गुणांच्या द्वारा व नित्य असल्यामुळें स्वभावतःहि याचा व्यय होत नाहीं. त्यामुळें शरीरांत जरी त्याचा अनुभव येत असला—तो शरीरस्थ असला तरी स्वतः किंवा देहादि रूपानें कांहीं करीत नाहीं व त्यामुळें फलानें लिप्त होत नाहीं. 'तर मग कोण करतो व लिप्त होतो ' म्हणून विचारशील तर त्याचें उत्तर–मीं 'स्वभावस्तु प्रवर्तते' ( अ. ५. ) या वाक्यानें दिलें आहे. अविद्येमुळें त्याच्यावर कर्तृत्व-भोक्तृत्वाचा आरोप होतो. आत्म्याला वास्तविक कर्तृत्व नाहीं व ज्ञाननिष्ठ संन्यासीच अशा अकर्तृ आत्मभावानें अवस्थित होऊं शकतात. ]

"कोणाप्रमाणें तो करीत नाहीं व लिप्त होत नाहीं ?" उत्तर—

यथा सर्वगतं सौक्ष्म्यादाकाशं नोपलिप्यते ।
सर्वत्रावस्थितो देहे तथात्मा नोपलिप्यते ॥ ३२ ॥
यथा प्रकाशयत्येकः कृत्स्नं लोकमिमं रविः ।
क्षेत्रं क्षेत्री तथा कृत्स्नं प्रकाशयति भारत ॥ ३३ ॥

—ज्याप्रमाणें सर्वव्यापी आकाश सूक्ष्मत्वामुळें कोणत्याहि लेपानें लिप्त होत नाहीं, त्याप्रमाणें, देहांत सर्व ठिकाणीं अवस्थित असलेला—व्यापून राहिलेला आत्मा देहधर्मांनीं लिप्त होत नाहीं.

—हे अर्जुना, ज्याप्रमाणें एक सूर्य या सर्व लोकाला प्रकाशमान करितो, त्याप्रमाणें क्षेत्रज्ञ आत्मा सर्व क्षेत्राला प्रकाशित करितो. [ सूर्याप्रमाणेंच क्षेत्रज्ञ आत्मा महाभूतांपासून धृतीपर्यंत सर्व क्षेत्राला प्रकाशित करतो. येथील हा सूर्याचा दृष्टांत सर्व क्षेत्रांमध्यें आत्मा एक व लेपरहित आहे, या दोन्ही अर्थी आहे. ] सर्व अध्यायार्थाचा उपसंहार—

क्षेत्रक्षेत्रज्ञयोरेवमन्तरं ज्ञानचक्षुषा ।
भूतप्रकृतिमोक्षं च ये विदुर्यान्ति ते परम् ॥ ३४ ॥

जे याप्रमाणें क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांच्यामधील परस्पर विलक्षणता—फरक व भूतांच्या प्रकृतीचा ज्ञानानें होणारा अभाव, ज्ञानदृष्टीनें जाणतात, ते ज्ञानी परमात्मतत्त्वास प्राप्त होतात. [ येथवर क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचें जसें वर्णन केलें आहे, तसेंच म्ह० एक कूटस्थ व दुसरें परिणामी, एक चेतन व दुसरें जड, इत्यादि ज्ञानचक्षूनें जाणतात, त्याचप्रमाणें भूतांच्या अविद्यारूप प्रकृतीचें अभावगमन जे विशेषें करून जाणतात, ते परमार्थ तत्त्वाला प्राप्त होतात. पुनरपि देहधारण करीत नाहींत. याप्रमाणें अमानित्वादि ज्ञानसाधनामध्यें तत्पर झाल्यामुळें क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांच्या यथार्थ स्वरूपाचें विज्ञान ज्याला झालें आहे, त्याच्या सर्व अनर्थांची निवृत्ति होऊन परिपूर्ण परमानंदाचा आविर्भाव होणें, या स्वरूपाचा पुरुषार्थ सिद्ध होतो, हें या अध्यायांत सांगितलें. ]

( येथें भगवद्गीतेचा प्रकृति-पुरुष ( क्षेत्र-क्षेत्रज्ञविवेकयोग ) नांवाचा तेरावा अध्याय समाप्त झाला. ) ६–३–३७.

## अध्याय ३८ वा.

### ( गीताध्याय १४ वा. गुणत्रयविभागयोग. )

[ १ ज्ञानाचें फल. २ कशाप्रकारचा क्षेत्र-क्षेत्रज्ञ संयोग भूतांचें कारण आहे, तें सांगून ईश्वराचें बीजपरत्व. ३ प्रकृतिसंभव सत्त्वादि गुण व त्यांचें सविस्तर कार्य. ४ गुणापासून मोक्ष झाल्यानें ब्रह्मप्राप्ति. ५ गुणातीत होण्याच्या उपाया-विषयीं प्रश्न व त्याचें प्रतिवचन. ]

**उत्पन्न होणारें सर्व कार्य क्षेत्र-क्षेत्रज्ञसंयोगापासून होतें, असें पूर्वाध्यायांत सांगितलें. पण तें कसें होतें, हें प्रदर्शित करण्यासाठीं किंवा ईशपरतंत्र अस-लेल्या क्षेत्र-क्षेत्रज्ञाला जगत्कारणत्व आहे, कापिल सांख्यांच्या मताप्रमाणें स्वतंत्र असलेल्या पुरुष-प्रकृतीला तें नाहीं, हा सिद्धान्त सांगण्यासाठीं या अध्यायाचा आरंभ केला जातो. तसेंच 'प्रकृतिस्थत्व'—गुणांमध्यें आसक्ति हें संसाराचें कारण आहे, असें वर सांगितलें ( १३–२१ ). पण १ ते प्रकृतीचे गुण कोणते, २ कोणत्या गुणांत कसा आसंग होतो, ३ ते पुरुषाला बद्ध कसे करितात, ४ गुणांपासून मोक्ष कसा होतो व ५ मुक्ताचें लक्षण काय ? हें सांगण्यासाठीं—**

श्रीभगवानुवाच—

**परं भूयः प्रवक्ष्यामि ज्ञानानां ज्ञानमुत्तमम् ।**
**यज्ज्ञात्वा मुनयः सर्वे परां सिद्धिमितो गताः ॥ १ ॥**

**( १ ) श्रीकृष्ण म्हणाले—मीं तुला सर्व ज्ञानांतील उत्तम व परम ज्ञान सांगितलें. हें ज्ञान जाणून सर्व मुनि या शरीराच्या नाशानंतर सर्वोत्तम स्थितीला प्राप्त झाले आहेत. [यापूर्वीं सर्व अध्यायांमध्यें अनेकदा जरी सांगितलें असलें तरी मी पुनः तुला ज्ञानांतील उत्तम ज्ञान सांगतों. प्रस्तुत ज्ञानाचा विषय परब्रह्म असल्यामुळें व यज्ञादि इतर ज्ञानें मोक्षाला कारण होत नसून हेंच एक मोक्षाला कारण होत असल्यामुळें तें उत्तम आहे. श्रोत्याच्या अंतःकर-णांत या ज्ञानाविषयीं रुचि उत्पन्न करण्यासाठीं हीं दोन विशेषणें योजून फल-कथनानें त्याची स्तुति केली आहे. ]**

**इदं ज्ञानमुपाश्रित्य मम साधर्म्यमागताः ।**
**सर्गेऽपि नोपजायन्ते प्रलये न व्यथन्ति च ॥ २ ॥**

**—या ज्ञानाचा आश्रय करून माझ्या सारूप्यास प्राप्त झालेले ज्ञानी सृष्टीच्या वेळीं उत्पन्न होत नाहींत व प्रलयाच्या वेळींहि व्यथा—नाश पावत**

नाहींत. [ ते स्वात्मस्वरूपापासून कधींच च्युत होत नाहींत, असें म्हणून भगवानांनीं या सिद्धीचें नित्यत्व दाखविलें आहे. ]

ज्ञानाची अशी स्तुति ऐकून तें श्रवण करण्यास उत्सुक झालेल्या अर्जुनाला अशा प्रकारचा क्षेत्र-क्षेत्रज्ञसंयोग भूतांचें कारण आहे, असें सांगतात—

मम योनिर्महद्ब्रह्म तस्मिन्गर्भं दधाम्यहम् ।
सम्भवः सर्वभूतानां ततो भवति भारत ॥ ३ ॥

( २ ) माझी त्रिगुणात्मिका प्रकृति सर्व भूतांचें कारण आहे. ती सर्व कार्यांहून मोठी असल्यामुळें महती व आपल्या विकारांचें भरण-पोषण करीत असल्यामुळें ब्रह्म आहे. त्या महद्ब्रह्मांत म्ह० भूतांच्या कारणांत मी सर्व भूतांच्या जन्माचें कारण म्ह० बीज स्थापितों. हे अर्जुना, त्यापासून सर्व भूतांची उत्पत्ति होते. [ माझी प्रकृति—माया सर्व कारणांचें उपादान कारण आहे. ती सर्व कारणांहून मोठी असल्यामुळें महती व आपल्या विकारांचें भरण करीत असल्यामुळें ब्रह्म आहे. त्या महद्ब्रह्मास मी हिरण्यगर्भाच्या—सर्व भूतांच्या जन्माचें कारण अशा बीजाला धारण करतों. क्षेत्र व क्षेत्रज्ञ या प्रकृतिद्वयरूप शक्तीनें युक्त असलेला मी—ईश्वर अविद्या-काम-कर्मादिकांच्या संसारांनीं युक्त असलेल्या क्षेत्रज्ञांचा क्षेत्रांशीं संबंध करून देतों. त्या तसल्या गर्भाधानापासून हिरण्यगर्भाच्या उत्पत्तीच्या द्वारा सर्व भूतांची उत्पत्ति होते.]

सर्वयोनिषु कौन्तेय मूर्तयः सम्भवन्ति याः ।
तासां ब्रह्म महद्योनिरहं बीजप्रदः पिता ॥ ४ ॥

—हे अर्जुना, देव, पितर, मनुष्य, पशु, मृग—हरणें इत्यादि सर्व योनींमध्यें ज्या मूर्ति—देहाकार उत्पन्न होतात, त्या मूर्तींची महद्ब्रह्म हीच सर्वावस्थेंतील योनि—कारण आहे व मी ईश बीजप्रद—गर्भाधानाचा कर्ता—पिता आहें. [ प्रत्येक कार्याचें निरनिराळें कारण दिसतें. तेव्हां महद्ब्रह्मच सर्वांचें कारण कसें, असा संशय येऊं नये, म्हणून त्याला सर्वावस्थेंतील कारण समजावें. अर्थात् त्या त्या कारणाच्या रूपानें महद्ब्रह्मच अवस्थित असल्यामुळें सर्व मूर्तींचें कारण तेंच आहे. ]

आतां गुण कोणते व ते कसे बद्ध करतात, तें सांगतात—

सत्त्वं रजस्तम इति गुणाः प्रकृतिसम्भवाः ।
निबध्नन्ति महाबाहो देहे देहिनमव्ययम् ॥ ५ ॥

( ५ )—हे पराक्रमी अर्जुना, सत्त्व, रज व तम हे प्रकृतीपासून उत्पन्न झालेले गुण देहांत अव्यय देहवान् आत्म्याला बद्ध करितात. [ येथील गुण हा शब्द ' पारिभाषिक ' आहे. त्यामुळें हे गुण रूप, रस इत्यादि गुणांप्रमाणें द्रव्याचा आश्रय केलेले नाहींत. ते अविद्यात्मक आहेत. रूपादि गुणांप्रमाणें ते क्षेत्रज्ञांच्या नित्य अधीन असतात. ]

तत्र सत्त्वं निर्मलत्वात्प्रकाशकमनामयम् ।
सुखसङ्गेन बध्नाति ज्ञानसङ्गेन चानघ ॥ ६ ॥

—त्या तीन गुणांतील ' सत्त्व ' हा गुण स्फटिक मण्याप्रमाणें निर्मल असल्यामुळें प्रकाशक व उपद्रवरहित आहे. हे निष्पाप अर्जुना, तें सत्त्व क्षेत्रज्ञाला सुखाच्या संगानें व ज्ञानसंगानें बद्ध करितें. [ ' मी सुखी ' अशा अभिमानानें विषयरूप सुखाचा विषयी आत्म्यामध्यें जो खोटाच संबंध जोडणें, तेंच सुखामध्यें आसक्त करणें होय. तसेंच ज्याच्या योगानें विषयादिक जाणले जातात, तें ज्ञान म्ह० अंतःकरणाचा धर्म. त्याच्या योगानें ' मी ज्ञानी आहें ' अशा विपरीत अभिमानानें सत्त्व गुण आत्म्याला बद्ध करितो. ]

रजो रागात्मकं विद्धि तृष्णासङ्गसमुद्भवम् ।
तन्निबध्नाति कौन्तेय कर्मसङ्गेन देहिनम् ॥ ७ ॥

—रजोगुण रागात्मक आहे, असें तूं जाण. राग म्ह० रंजन—आसक्ति, तो तृष्णा व प्रीति यांस उत्पन्न करणारा आहे. तो कर्मासक्तीनें क्षेत्रज्ञाला—देही आत्म्याला बद्ध करितो. [ अकर्ताच असलेल्या पुरुषाला रजोगुण ' मी करितों ' अशा अभिमानानें प्रवृत्त करितो. ]

तमस्त्वज्ञानजं विद्धि मोहनं सर्वदेहिनाम् ।
प्रमादालस्यनिद्राभिस्तन्निबध्नाति भारत ॥ ८ ॥

—पण या दोन गुणांच्या उलट, सर्व देहवानांना मोह पाडणारें—अविवेकी करणारें तम—तिसरा तमोगुण अज्ञानापासून झालेला आहे, असें तूं जाण. हे भरतकुलोत्पन्ना अर्जुना, तें तम प्रमाद, आलस्य व निद्रा यांच्या योगानें प्राण्याला बद्ध करितें. [ या तीन श्लोकांत सत्त्वादि गुणांचें लक्षण व ते पुरुषाला बद्ध कसे करितात, तें सांगितलें आहे. ]

सत्त्वं सुखे संजयति रजः कर्मणि भारत ।
ज्ञानमावृत्य तु तमः प्रमादे संजयत्युत ॥ ९ ॥

—हे अर्जुना, सत्त्वगुण सुखांत आसक्त होतो, रजोगुण कर्मांमध्यें आणि तमोगुण ज्ञानाला आच्छादित करून अनवधानांत संयुक्त करितो. [ या श्लोकांत गुणांचा व्यापार संक्षेपतः सांगितला आहे. ]

रजस्तमश्चाभिभूय सत्त्वं भवति भारत ।
रजः सत्त्वं तमश्चैव तमः सत्त्वं रजस्तथा ॥ १० ॥

—हे भारता, सत्त्वगुण रजोगुण व तमोगुण यांना पराभूत करून वाढतो. रजोगुण सत्त्वगुण व तमोगुण यांना पराभूत करून उत्कर्ष पावतो आणि तसाच तमोगुणहि सत्त्वगुण व रजोगुण यांना पराभूत करून स्वतः वृद्धि पावतो. [ रज व तम यांना निर्बल करून उत्कर्ष पावलेलें सत्त्व आपलें ज्ञान-सुखादि कार्य आरंभितें. सत्त्व व तम यांचा पराभव करून उत्कर्ष पावलेला रजोगुण कर्म, तृष्णा इत्यादि स्वकर्मांचा आरंभ करितो. तसाच तमोगुण सत्त्व-रजांना दुर्बल करून वृद्धि पावला असतां, ज्ञानाला आच्छादित करणें, इत्यादि कार्य करितो. ]

सर्वद्वारेषु देहेऽस्मिन्प्रकाश उपजायते ।
ज्ञानं यदा तदा विद्याद्विवृद्धं सत्त्वमित्युत ॥ ११ ॥

—ज्यावेळीं या देहांत श्रोत्रादि सव ज्ञानसाधनांच्या निमित्तानें प्रकाश–ज्ञान उत्पन्न होतें, त्यावेळीं सत्त्व वृद्धि पावलें आहे, असें जाणावें. [ श्रोत्रादि इंद्रियें आत्म्याच्या विषयानुभवाचीं द्वारें आहेत. त्या सर्व द्वारांच्या निमित्तानें या शरीरांत ज्ञानरूप प्रकाश जेव्हां उत्पन्न होतो, तेव्हां त्या चिह्नावरूनच सत्त्वगुण अतिशय वृद्धि पावला आहे, असें जाणावें. ]

लोभः प्रवृत्तिरारम्भः कर्मणामशमः स्पृहा ।
रजस्येतानि जायन्ते विवृद्धे भरतर्षभ ॥ १२ ॥

—हे भरतश्रेष्ठा अर्जुना, रजोगुणाची अतिशय वृद्धि झाली असतां लोभ–परद्रव्य घेण्याची इच्छा; प्रवृत्ति–शरीराची सामान्य चेष्टा–हालचाल; काम्य व निषिद्ध लौकिक कर्मांचा आरंभ, बाह्य व आंतर इंद्रियांची अशांति; हर्ष–रागादिकांची प्रवृत्ति व सर्व सामान्य तृष्णा हीं चिन्हें उत्पन्न होतात. [ रजोगुणाची वृद्धि झाली असतां हीं प्रतीत होतात. ]

अप्रकाशोऽप्रवृत्तिश्च प्रमादो मोह एव च ।
तमस्येतानि जायन्ते विवृद्धे कुरुनन्दन ॥ १३ ॥

—हे कुरुवंशजा, तमोगुण विशेषेंकरून वाढला असतां अविवेक, अज्ञान, प्रवृत्तीचा अभाव, अनवधान व मोह, हीं चिह्नें उत्पन्न होतात.

यदा सत्त्वे प्रवृद्धे तु प्रलयं याति देहभृत् ।
तदोत्तमविदां लोकानमलान्प्रतिपद्यते ॥ १४ ॥

—परंतु जेव्हां सत्त्वगुणाची अतिशय वृद्धि झाली असतां देहधारण करणारा आत्मा—प्रलयास प्राप्त होतो—मरतो, तेव्हां हिरण्यगर्भादिकांच्या तत्त्वाला जाणणाऱ्या लोकांच्या निर्मल शुद्ध लोकांस प्राप्त होतो. [ रजोगुण व तमोगुण यांतील कोणत्या तरी गुणाचा उद्भव होणें हाच मल आहे. त्या मलानें रहित अशा आगमसिद्ध ब्रह्मलोकादिकांस तो प्राप्त होतो, असा याचा आशय. ]

रजसि प्रलयं गत्वा कर्मसङ्गिषु जायते ।
तथा प्रलीनस्तमसि मूढयोनिषु जायते ॥ १५ ॥

—रजोगुणांत प्रलयाला प्राप्त होऊन म्ह० रजोगुण वाढला असतां जो मरतो, तो कर्मांमध्यें आसक्ति ठेवणाऱ्या मनुष्यांमध्यें उत्पन्न होतो. त्याचप्रमाणें तमोगुणांत—प्रलीन झालेला—तमोगुण वृद्धि पावला असतां मरण पावलेला पश्वादि मूढ योनींमध्यें उत्पन्न होतो. [ मरणाच्या द्वाराहि जें फल प्राप्त होतें, तें गुणजन्यच असतें, असें या दोन श्लोकांत सांगितलें आहे. ]

कर्मणः सुकृतस्याहुः सात्त्विकं निर्मलं फलम् ।
रजसस्तु फलं दुःखमज्ञानं तमसः फलम् ॥ १६ ॥

—पुण्यकर्मांचें सात्त्विक निर्मल फल असतें, असें सांगतात. पण रजोगुणाचें फल दुःख आहे व तमोगुणाचें फल अज्ञान आहे. [ वरील दोन श्लोकांतील अर्थाचाच येथें संक्षेपानें अनुवाद केला आहे. ]

सत्त्वात्सञ्जायते ज्ञानं रजसो लोभ एव च ।
प्रमादमोहौ तमसो भवतोऽज्ञानमेव च ॥ १७ ॥

—उत्कर्ष पावलेल्या सत्त्वगुणापासून ज्ञान होतें. रजोगुणापासून लोभच उत्पन्न होतो. तमोगुणापासून प्रमाद, मोह व अज्ञान हीं उत्पन्न होतात. [ गुणांपासून आणखीं काय होतें तें येथें सांगितलें आहे. ]

ऊर्ध्वं गच्छन्ति सत्त्वस्था मध्ये तिष्ठन्ति राजसाः ।
जघन्यगुणवृत्तिस्था अधो गच्छन्ति तामसाः ॥ १८ ॥

—सत्त्वगुणवृत्तामध्यें स्थित असलेले सात्त्विक देवादिकांच्या लोकीं जातात. राजसलोक मध्यलोकीं—राजस मनुष्यामध्यें रहातात. शेवटच्या निकृष्ट गुणाच्या वृत्तांत स्थित असलेले तामसवृत्तिजन अधोलोकीं जातात. [ सत्त्वस्थ शुभ

ज्ञान व कर्म या सत्त्वगुणाच्या वृत्तामध्यें निष्ठा ठेवून रहाणारे देवादि ऊर्ध्व-लोकीं उत्पन्न होतात. राजसज्ञान व कर्म यांत निष्ठा ठेवणारे मनुष्यांमध्यें आणि निद्रा-आलस्यादि तमोगुणाच्या वृत्तांत स्थित असलेले मूढ तामस पश्वा-दिकांमध्यें उत्पन्न होतात. ]

प्रकृतिस्थत्वरूप मिथ्या ज्ञानानें युक्त असलेल्या पुरुषाचा सुख-दुःख-मोह-रूप भोग्य गुणांमध्यें ' मी सुखी, दुःखी, मूढ आहें ' अशा प्रकारचा जो संग, तेच पुरुषाच्या सदसद्योनींतील जन्माचें–संसाराचें कारण आहे, असें जें पूर्वा-ध्यायांत संक्षेपतः सांगितलें होतें, तेंच येथें ५ व्या श्लोकापासून सविस्तर सांगून आतां आत्म्याच्या यथार्थ ज्ञानानें गुणांपासून मुक्त होऊन ब्रह्मभावप्राप्ति होते, असें सांगावें म्हणून भगवान् म्हणतात—

नान्यं गुणेभ्यः कर्तारं यदा द्रष्टानुपश्यति ।
गुणेभ्यश्च परं वेत्ति मद्भावं सोऽधिगच्छति ॥ १९ ॥

( ४ )—ज्यावेळीं विद्वान् शरीरेंद्रियें व विषय यांच्या आकारानें परिणत झालेल्या गुणांहून दुसरा कोणी कर्ता पहात नाहीं आणि गुणांहून अगदीं विलक्षण असलेल्या साक्षिभूत आत्म्याला जाणतो, तेव्हां तो विद्वान् माझ्या ईश्वरभावाला–स्वरूपास प्राप्त होतो.

गुणानेतानतीत्य त्रीन्देही देहसमुद्भवान् ।
जन्ममृत्युजरादुःखैर्विमुक्तोऽमृतमश्नुते ॥ २० ॥

—अर्जुना, देहवान् आत्मा देहाच्या उत्पत्तीचें बीज, अशा या तीन गुणांस उल्लंघून जन्म, मृत्यु, जरा व दुःखें यांजकडून सोडला गेलेला असा होत्साता अमृतभावास प्राप्त होतो. [ विद्वान् वर सांगितलेल्या या मायोपाधिभूत–अनर्थरूप देहोत्पत्तीच्या बीजभूत–अविद्यामय तीन गुणांचें उल्लंघन करून जिवंतपणींच जन्म-मरणादिकांनीं रहित होत्साता मोक्षाचा अनुभव घेतो. ]

जिवंत असतांनाच गुणांचें अतिक्रमण करून अमृताचा अनुभव घेतो, असें प्रश्नबीज उपलब्ध झालें असतां—

अर्जुन उवाच—

कैर्लिङ्गैस्त्रीन्गुणानेतानतीतो भवति प्रभो ।
किमाचारः कथं चैतांस्त्रीन्गुणानतिवर्तते ॥ २१ ॥

( ५ ) अर्जुन म्हणाला— हे प्रभो, कोणत्या लिंगांनीं या तीन गुणांना उल्लंघिलेला असा हा पुरुष होतो ? म्ह० पूर्वी सिद्धीसाठीं प्रयत्नानें अनुष्ठि-

लेलीं, पण पुढें यत्नावांचूनच सिद्ध झालेलीं अशीं गुणातीताचीं स्वाभाविक चिह्नें कोणतीं ? त्याचा आचार कसा असतो ? आणि तो या तीन गुणांना कोणत्या प्रकारें उल्लंघितो ? [गुणातीत होण्याचा ज्ञान हा उपाय पूर्वींच सांगितलेला असल्यामुळें त्या उपायाचा प्रकार जाणण्याच्या इच्छेनें येथें तिसरा प्रश्न आहे. ]

अर्जुनानें गुणातीताचें लक्षण व गुणातीत होण्याचा उपाय विचारला असतां—

श्रीभगवानुवाच—

**प्रकाशं च प्रवृत्तिं च मोहमेव च पाण्डव ।**
**न द्वेष्टि संप्रवृत्तानि न निवृत्तानि काङ्क्षति ॥ २२ ॥**

श्रीकृष्ण म्हणाले—हे अर्जुना, सत्त्वगुणाचें कार्य ज्ञान व सुख, रजोगुणाचें कार्य लोभ-दुःखादि आणि तमोगुणाचें कार्य अविवेकादि, हीं तीन गुणांचीं कार्यें विषयरूपानें उद्भूत झालीं असतां ज्ञानी—गुणातीत त्यांचा द्वेष करीत नाहीं व तीं निवृत्त झालीं असतां त्यांची आकांक्षा करीत नाहीं. [ तीं सर्व कार्यें अनात्मरूप आहेत, असें यथार्थ जाणणारा, त्यांच्या ठिकाणीं अनुकूलता व प्रतिकूलता यांचा आरोप करून त्यांची इच्छा करीत नाहीं व द्वेषहि करीत नाहीं. हें गुणातीताचें स्वानुभवसिद्ध चिह्न आहे, तें दुसऱ्याला दिसण्यासारखें नाहीं. ]

**उदासीनवदासीनो गुणैर्यो न विचाल्यते ।**
**गुणा वर्तन्त इत्येव योऽवतिष्ठति नेङ्गते ॥ २३ ॥**

—आतां गुणातीताचा आचार कसा असतो, तें सांगतों, ऐक. उपेक्षा करणारा उदासीन कोणाचाच पक्ष घेत नाहीं. त्याप्रमाणें गुणातीत होण्याचा उपाय जें ज्ञान त्याच्या मार्गांत असलेला हा आत्मज्ञ संन्यासी गुणांकडून म्ह० शब्दादि विषयांकडून विवेकदर्शनावस्थेपासून ढळविला जात नाहीं. तर शरीर, इंद्रियें व विषय यांच्या आकारानें परिणाम पावलेले गुण परस्परांमध्यें प्रवृत्त होतात, अशा निश्चयानें तो स्वरूपांत रहातो; त्यापासून चलन पावत नाहीं. [ इंद्रियाकार गुण विषयाकार गुणांत प्रवृत्त होतात, मी कूटस्थ आत्मा प्रवृत्त होत नाहीं, असें समजून, तो स्वरूपामध्येंच अवस्थित होतो. ]

**समदुःखसुखः स्वस्थः समलोष्टाश्मकाञ्चनः ।**
**तुल्यप्रियाप्रियो धीरस्तुल्यनिन्दात्मसंस्तुतिः ॥ २४ ॥**

—ज्याला सुख व दुःख समान आहेत, जो स्वात्म्यामध्यें स्थित-प्रसन्न आहे, ज्याला मातीचें ढेकुळ, दगड व सोनें सम आहे, प्रिय व अप्रिय तुल्य आहे, जो ज्ञानी आहे व ज्या यतीला आपली निंदा-दोषकथन व स्तुति—गुण-वर्णन तुल्य आहे, तो गुणातीत होय.

मानापमानयोस्तुल्यस्तुल्यो मित्रारिपक्षयोः ।
सर्वारम्भपरित्यागी गुणातीतः स उच्यते ॥ २५ ॥

—मान—सत्कार व अपमान-तिरस्कार यांविषयीं तुल्य—त्यांना समान मानणारा, मित्रपक्ष व शत्रुपक्ष या दोहींशीं समान, सर्व कर्मांचा सर्व प्रकारें त्याग करणारा असा जो पुरुष असतो, तो गुणातीत यति म्हटला जातो. [ येथें वरील तीन श्लोकांत उपेक्षकत्वादि जें धर्मजात सांगितलें आहे, तें ज्ञानाचा उदय होईपर्यंत यत्नसाध्य असतें. यास्तव विद्याधिकाऱ्यानें ज्ञानाचें साधन या रूपानें त्याचें अनुष्ठान करावें. पण पुढें ज्ञानाचा उदय झाला असतां स्थिर झालेलें—स्वभावतःच सिद्ध झालेलें तें धर्मजात जीवन्मुक्ताचें स्वानुभवसिद्ध लक्षण होऊन रहातें. मुमुक्षु व मुक्त यांच्या धर्मांत असा फरक आहे. ]

आतां 'मुमुक्षु तीन गुणांचें उल्लंघन कसें करतो' या तिसऱ्या प्रश्नाचें प्रतिवचन देतात—

मां च योऽव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते ।
स गुणान्समतीत्यैतान् ब्रह्मभूयाय कल्पते ॥ २६ ॥

—जो यति किंवा कर्मी, अर्थात् मुख्य किंवा अमुख्य अधिकारी सर्व-भूतांच्या हृदयाचा आश्रय करून राहिलेल्या मज नारायणाचें अव्यभिचारी भक्तीनें सदा चिंतन करितो, तो या तीन गुणांचें उल्लंघन करून ब्रह्म होण्यास —जीवन्मुक्तीस योग्य होतो.

ब्रह्मणो हि प्रतिष्ठाहममृतस्याव्ययस्य च ।
शाश्वतस्य च धर्मस्य सुखस्यैकान्तिकस्य च ॥ २७ ॥

—कारण मी प्रत्यगात्मा अविनाशी, विकार न पावणाऱ्या व नित्यधर्म-रूप आणि अव्यभिचारी—नित्य सुख, अशा ब्रह्माची म्ह० परमात्म्याची प्रतिष्ठा आहें. [ या श्लोकाचा—१ ब्रह्माची—परमात्म्याची मी प्रत्यगात्मा प्रतिष्ठा आहें,

म्ह० मी प्रत्यगात्मा अपरोक्ष अनुभवानें परमात्मत्वानें निश्चय केला जातों, असा एक अर्थ व २ ब्रह्माची म्ह० सविकल्प ब्रह्माची मी निर्विकल्प ब्रह्म प्रतिष्ठा–आधार आहें, असा दुसरा अर्थ केला जातो. अमृतत्वादि चारी विशेषणें दोन्ही पक्षीं ब्रह्माचींच आहेत. या अध्यायांत क्षेत्र-क्षेत्रज्ञांचा संयोग हें संसाराचें कारण सांगितलें. पांच प्रश्नांच्या निरूपणानें सम्यग्ज्ञानच सर्व अनर्थांचें निवर्तक आहे, असें उपपादन केलें आणि गुणांकडून चंचल केलें न जाणें, हें मुमुक्षूचें यत्नसाध्य साधन व मुक्ताचें अयत्नसिद्ध लक्षण निश्चित केलें. ]

(येथें भगवद्गीतेचा 'गुणत्रयविभागयोग' नांवाचा १४ वा अध्याय समाप्त झाला.)

६. ४. ३८.

---

## अध्याय ३९ वा.

### ( गीताध्याय १५ वा. पुरुषोत्तमयोग. )

[ १ वृक्षाच्या रूपकानें संसारस्वरूपाचें वर्णन. २ संसारवृक्षाची अन्य अवयव-कल्पना व त्याचें अदृश्यरूप पहाण्याचा उपाय. ३ अंतरंगसाधनांनीं युक्त असलेले अधिकारी व त्या पदाचें विशेषवर्णन. ४ जीव ईश्वराचा अंश असूनहि संसार-प्रसंगीं गमनागमन कसा करतो, उपभोग कसा घेतो, विमूढ त्याला कसे पहात नाहींत व ज्ञानी कसे पहातात, यांचें वर्णन. ५ संक्षेपतः विभूतिवर्णन. ६ सर्व गीताध्यायांच्या तात्पर्यार्थाचें तीन विभागांत कथन. ]

**ज्याअर्थी कर्म करणारांचें कर्मफल व ज्ञानी पुरुषाचें ज्ञानफल माझ्या अधीन आहे, त्याअर्थी जे भक्तियोगानें माझें चिंतन करितात, ते उपासकहि माझ्या प्रसादानें ज्ञानप्राप्तीच्या द्वारा गुणातीत–मुक्त होतात. मग जे आत्मतत्त्वालाच साक्षात् जाणतात, ते त्या ज्ञानानेंच गुणातीत व मुक्त होतात हें काय सांगावें? वास्तव अर्जुनानें प्रश्न केला नसतांहि संसाराला कारण होणाऱ्या अज्ञानाचें निरसन ज्याच्या ज्ञानानें होतें, तें आत्मतत्त्व सांगण्यासाठीं भगवान् या अध्या-याचा आरंभ करीत आहेत. जिज्ञासूच्या मनांत वैराग्य उत्पन्न व्हावें, म्हणून आरंभीं वृक्षाचें रूपक करून संसाराच्या स्वरूपाचें वर्णन करितात. कारण संसाराविषयीं विरक्त झालेल्या पुरुषालाच भगवानांच्या तत्त्वज्ञानाचा अधिकार असतो. म्हणून—**

श्रीभगवानुवाच—

ऊर्ध्वमूलमधःशाखमश्वत्थं प्राहुरव्ययम् ।
छन्दांसि यस्य पर्णानि यस्तं वेद स वेदवित् ॥ १ ॥

( १ ) श्रीकृष्ण म्हणाले—सर्वोत्तम ब्रह्म ज्याचें मूळ आहे, ज्याच्या शाखा त्या मूळाच्या अपेक्षेनें खालीं–अगदीं निकृष्ट आहेत, जो कधींहि क्षय पावत नाहीं, असा वृक्ष–क्षणभंगुर संसारवृक्ष सांगतात. ज्या संसारवृक्षाचीं पानें वेद आहेत, अशा त्या वृक्षाला जो जाणतो, तो वेदवेत्ता आहे. [ अव्यक्त माया-शक्तीनें युक्त असलेलें जें ब्रह्म तें नित्य आहे, कारण आहे, व कालतः सूक्ष्म आहे, म्हणून त्याला ऊर्ध्व–उत्तम म्हटलें आहे. तें सर्वोत्तम ब्रह्म या संसार-वृक्षाचें मूळ आहे. त्याच्या अपेक्षेनें या संसारमायामय वृक्षाच्या शाखा निकृष्ट आहेत. महत् अहंकार, तन्मात्रा, इंद्रियें याच जणुकाय त्याच्या शाखा आहेत व त्या ऊर्ध्व-मूलाच्या अपेक्षेनें ‘ अधः ’ आहेत. हा संसारवृक्ष अ-श्व-त्थ–उद्यांहि न रहाणारा, अर्थात् क्षणभंगुर आहे. संसारमायामयवृक्ष अनादि कालापासून प्रवृत्त झालेला असल्यामुळें तो अव्यय आहे. अनादि देहादि परंपरेचा आश्रय असा हा संसारवृक्ष सुप्रसिद्ध असून ऋग्वेदादि वेद हींच जणु काय त्याचीं पानें आहेत. कारण वृक्षाच्या पानांप्रमाणें कर्मकाण्डरूप वेद संसारवृक्षाचें रक्षण करितात. अशाप्रकारच्या या संसारवृक्षाला जो जाणतो, तोच वेदार्थाला जाणणारा आहे. तोच खरा वेदार्थवेत्ता–सर्वज्ञ होय, असें म्हणून भगवानांनीं येथें समूल संसारवृक्षज्ञानाची स्तुति केली आहे. ]

याच संसारवृक्षाची पूर्वोक्त अवयवकल्पनेहून निराळी अवयवकल्पना कर-तात—

अधश्चोर्ध्वं प्रसृतास्तस्य शाखा
गुणप्रवृद्धा विषयप्रवालाः ।
अधश्च मूलान्यनुसन्ततानि
कर्मानुबन्धीनि मनुष्यलोके ॥ २ ॥

( २ )—त्या संसारवृक्षाच्या शाखा म्ह० ज्ञान, उपासना व कर्म यांचीं फळें, असे अधोलोक व ऊर्ध्वलोक मनुष्यलोकापासून खालीं स्थावरापर्यंत व वर ब्रह्मलोकापर्यंत पसरले आहेत. त्या ऊर्ध्व-अधोलोकरूप शाखा, उपादान-रूप सत्त्व, रज व तम या गुणांकडून स्थूल केल्या गेल्या आहेत. शब्दादि

विषय हेच जणुकाय त्या शाखांचे प्रवाल आहेत. म्ह० 'देहादि कर्मफलें' याच शाखा असून त्यांपासून विषयरूप पल्लवांचे जणुकाय अंकुर फुटतात. [ या संसारवृक्षाचें परम मूल म्ह० उपादानकारण ब्रह्म आहे, असें वर सांगितलें व येथें त्याचीं अवान्तर मूलें सांगत आहेत. कर्मफलापासून उत्पन्न झालेल्या ज्या राग-द्वेषांच्या वासना त्याच धर्मप्रवृत्ति व अधर्मप्रवृत्ति यांचीं बीजें म्हणजे अवान्तर मूलें आहेत. हीं सर्व वासनाबीजें लिंगशरीरांत रहात असल्यामुळें देहनाशाबरोबर त्यांचा विच्छेद होत नाहीं. त्यांचा प्रवाह अविच्छिन्न चालतो. तीं मूलें कर्मानुबंधी आहेत. कर्मामुळें रागादिक व रागादि वासनापासून धर्माधर्माख्य कर्में, असा यांचा कार्य-कारणभाव आहे. विशेषेंकरून मनुष्यलोकांत त्यांची अविच्छिन्न प्रवृत्ति होते. ]

न रूपमस्येह तथोपलभ्यते
नान्तो न चादिर्न च संप्रतिष्ठा ।
अश्वत्थमेनं सुविरूढमूल-
मसङ्गशस्त्रेण दृढेन छित्वा ॥ ३ ॥
ततः पदं तत्परिमार्गितव्यं
यस्मिन्गता न निवर्तन्ति भूयः ।
तमेव चाद्यं पुरुषं प्रपद्ये
यतः प्रवृत्तिः प्रसृता पुराणी ॥ ४ ॥

—या संसारांत असलेल्या प्राण्यांना संसारवृक्षाचें रूप येथें जसें वर्णिलें आहे, तसें उपलब्ध होत नाहीं. याचा अंत कळत नाहीं आणि याचा आरंभ कोठून झाला आहे, हेंहि कळत नाहीं. याची स्थिति कळत नाहीं. ज्याचीं मूलें फार खोल गेलीं आहेत, अशा या क्षणभंगुर संसारवृक्षाला अत्यंत दृढ असंगरूप शस्त्रानें तोडून त्यानंतर ज्या पदीं गेलेले पुनरपि निवृत्त होत नाहींत, त्या पदाला शोधावें—त्याला जाणावें. ज्याच्यापासून ही अनादि संसारप्रवृत्ति पसरली आहे, त्याच आद्य पुरुषाला 'मी शरण आहें' अशा भावनेनें सर्व प्रकारें शोधावें. [ येथें वर्णिलेला हा संसारवृक्ष स्वप्न व मृगजळ, यांसारखा दृष्ट-नष्टस्वरूप आहे. कांहीं काल दिसणें व नष्ट होणें, हेंच त्याचें स्वरूप आहे. त्यामुळें त्याचा आरंभ कोठें झाला, अंत कोठें आहे व मध्य कोठें आहे, हें कळत नाहीं. वास्तव ज्याचीं मूलें फार खोल गेलीं आहेत, अशा या अश्वत्थाला

विवेकाभ्यासानें तीक्ष्ण केलेल्या वैराग्यपूर्वक संन्यास, याच दृढ असंग शस्त्रानें तोडून, त्याला बीजासह वर उपटून काढून मग ज्या पदीं प्रविष्ट झालेले ज्ञानी या संसारमार्गांत पुनः परत येत नाहींत, त्या वैष्णवपदाचा शोध करावा—त्याला जाणावें. ज्याच्यापासून या सनातन संसारवृक्षाचा आरंभ झाला आहे, त्या आद्य पुरुषाला मी शरण आहें, अशी भावना करणें, हेंच त्या पदाला जाणण्याचें साधन आहे. ]

कोणत्या अंतरंग साधनानें संपन्न असलेले मुमुक्षु त्या पदाला प्राप्त होतात? उत्तर—

निर्मानमोहा जितसङ्गदोषा
अध्यात्मनित्या विनिवृत्तकामाः ।
द्वन्द्वैर्विमुक्ताः सुखदुःखसंज्ञै-
र्गच्छन्त्यमूढाः पदमव्ययं तत् ॥ ५ ॥

( ३ )—ज्यांच्यापासून मान म्ह० अहंकार—गर्व व मोह—अविवेक, हे दोन्ही दोष निघून गेले आहेत, संग म्हणजे आसक्ति, हाच दोष ज्यांनीं जिंकला आहे, जे श्रवण-मननादिकांच्या योगानें परमात्मस्वरूपाचें आलोचन करण्यांत तत्पर झाले आहेत, ज्यांच्या विषयतृष्णा वासनेसह निवृत्त झाल्या आहेत आणि सुख व दुःख या नांवांच्या द्वंद्वांनीं ज्यांना सर्वथा सोडिलें आहे, असे विवेकी—अनादि-अज्ञानरहित संन्यासी त्या अव्यय पदाला प्राप्त होतात.

त्याच पदाचें पुनः विशेष वर्णन—

न तद्भासयते सूर्यो न शशाङ्को न पावकः ।
यद्गत्वा न निवर्तन्ते तद्धाम परमं मम ॥ ६ ॥

—सर्वांना प्रकाशित करण्याचें सामर्थ्य असूनहि सूर्य त्या तेजोरूप पदाला प्रकाशित करीत नाहीं, चंद्र त्याला प्रकाशित करीत नाहीं व अग्नि त्याला प्रकाशित करीत नाहीं. तर ज्या वैष्णवपदाला प्राप्त होऊन ज्ञानी—यति संसारमार्गांत परत येत नाहींत, तें माझें श्रेष्ठपद—स्वरूप—तेज आहे.

पण सर्व गति आगत्यन्त असते म्ह० गतीचें पर्यवसान आगतींत—परत येण्यांत होतें, असा सामान्य नियम आहे, तेव्हां 'त्या पदास प्राप्त झाले-ल्यांची निवृत्ति होत नाहीं' असें कसें म्हणतां? उत्तर—

ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः ।
मनःषष्ठानीन्द्रियाणि प्रकृतिस्थानि कर्षति ॥ ७ ॥

( ४ )—या जीवलोकांत—संसारांत कर्ता, भोक्ता म्हणून प्रसिद्ध असलेला माझाच पुरातन अंश आहे. तो माझा जीवभूत अंश आपापल्या कर्णादि प्रकृतींत स्थित असलेल्या मनासह सहा इंद्रियांना आकर्षण करितो. [ माझाच सनातन अंश जीवलोकांतील कर्ता—भोक्ता—जीव असल्यामुळें माझी प्राप्ति पूर्वोक्त ज्ञानानें निवृत्त्यंत नाहीं. 'अहो पण, जीव परमेश्वराचा अंश जरी असला, तरी तेवढ्यानें परमेश्वराला प्राप्त झालेले पुरुष पुनः संसारमार्गांत परत येत नाहींत, हें कसें सिद्ध होतें?' उत्तर—जलांत पडलेलें सूर्याचें प्रतिबिंब हा सूर्याचाच अंश असतो व 'जल' या निमित्ताच्या अभावीं तो सूर्यालाच प्राप्त होऊन पुनः परत येत नाहीं. तसाच हाहि जीवभूत अंश म्ह० परमात्म्याचें प्रतिबिंब अंतःकरण-उपाधीचा अभाव झाला असतां आत्म्याला जाऊन मिळतो व त्याच न्यायानें तो परत येत नाहीं. किंवा घटादि उपाधींनीं परिच्छिन्न झालेले घटादि आकाश आकाशाचा अंशच असून घटादि निमित्ताचा नाश झाला असतां, पुनः निवृत्त होत नाहीं; तसाच तो जीवभूत अंश परमात्म्यास प्राप्त होऊन संसारांत येत नाहीं. यास्तव 'ज्याला प्राप्त होऊन पुनः संसारांत निवृत्त होत नाहींत, असें जें म्हटलें आहे तें योग्यच आहे. परमेश्वर वस्तुतः निरंश आहे. म्हणून जीव हा त्याचा काल्पनिक अंश आहे. वास्तविक अंश नव्हे. तो माझा जीवभूत सनातन अंश आपापल्या स्थानामध्यें स्थित असलेल्या मनासह सहा ज्ञानेंद्रियांचें आकर्षण करतो.]

जीव स्वस्थानीं—आपापल्या प्रकृतींत स्थित असलेल्या इंद्रियांचें आकर्षण केव्हां करितो? उत्तर—

> शरीरं यदवाप्नोति यच्चाप्युत्क्रामतीश्वरः ।
> गृहीत्वैतानि संयाति वायुर्गन्धानिवाशयात् ॥ ८ ॥

—ज्यावेळीं हा ईश्वर शरीरेंद्रिय संघाताचा स्वामी—जीव, शरीरांतून निघून जातो व जेव्हां दुसऱ्या शरीराला प्राप्त होतो, तेव्हां वायु पुष्पादि अधिष्ठानांतून सुवासांना घेऊन जसा जातो, त्याप्रमाणें तो माझा अंश पूर्वशरीर सोडून जातांना या मनासह श्रोत्रादि सहा इंद्रियांचें आकर्षण करून घेऊन जातो.

> श्रोत्रं चक्षुः स्पर्शनं च रसनं घ्राणमेव च ।
> अधिष्ठाय मनश्चायं विषयानुपसेवते ॥ ९ ॥

—हा जीव श्रवणाचें साधन श्रोत्र, दर्शनाचें साधन चक्षु, स्पर्श जाणण्याचें

साधन त्वगिंद्रिय, रस चाखण्याचें साधन रसन, सुवास घेण्याचें साधन घ्राण आणि या पांची इंद्रियांशीं संबद्ध होणारें मन, यांचा अधिष्ठाता होऊन शब्दादि विषयांचें सेवन करतो–उपभोग घेतो.

उत्क्रामन्तं स्थितं वापि भुञ्जानं वा गुणान्वितम् ।
विमूढा नानुपश्यन्ति पश्यन्ति ज्ञानचक्षुषः ॥ १० ॥

—याप्रमाणें देहांत असलेल्या, देहांतून निघून जाणाऱ्या, शब्दादि विषयांचा भोग घेणाऱ्या, किंवा सुख-दुःख-मोहसंज्ञक गुणांनीं युक्त असलेल्या या जीवाला नानाप्रकारें मूढ–विषयपरवश झालेले जन पहात नाहींत. पण ज्ञानदृष्टि जन पहातात. [ विषयपरवश झालेले लोक याला पहात नाहींत, ही मोठी दुःखाची गोष्ट आहे. पण जे महावाक्यादि प्रमाणापासून उत्पन्न झालेल्या ज्ञानदृष्टीनें युक्त असतात, ते विद्वान् या आत्म्याला पहातात. ]

यतन्तो योगिनश्चैनं पश्यन्त्यात्मन्यवस्थितम् ।
यतन्तोऽप्यकृतात्मानो नैनं पश्यन्त्यचेतसः ॥ ११ ॥

—श्रवणादि यत्न करणारे योगी या आत्म्याला आपल्या बुद्धींत साक्षात् पहातात. पण अशुद्धचित्त अविवेकी पुरुष या आत्म्याला पहात नाहींत. [ सात्त्विक तप, इंद्रियजय, यांच्या योगानें ज्यांच्या चित्ताला संस्कार झालेला नसतो, त्यांचा यत्न फुकट जातो. ]

ज्या पदाला सर्वांना प्रकाशित करणारे अग्नि-आदित्यादिक प्रकाशित करीत नाहींत, ज्याला प्राप्त झालेले मुमुक्षु पुनरपि संसारोन्मुख होऊन निवृत्त होत नाहींत आणि ज्या पदाचे देहादि-उपाधिभेदाच्या अनुसार स्वतःहि भिन्न भिन्न झालेले जीव आकाशाच्या घटादिकांप्रमाणें कल्पित अंश आहेत, त्या पदाचें सर्वात्मत्व सर्व व्यवहारास्पदत्व सांगण्याची इच्छा करणारे भगवान् चार श्लोकांनीं विभूतींचा संक्षेप सांगतात—

यदादित्यगतं तेजो जगद्भासयतेऽखिलम् ।
यच्चन्द्रमसि यच्चाग्नौ तत्तेजो विद्धि मामकम् ॥ १२ ॥

( ५ )—जें आदित्यांतील तेज सर्व जगाला प्रकाशित करितें, जें तेज चंद्रामध्यें व अग्नींत आहे, तें तेज माझें आहे, असें जाण. [ आदित्यादिकांत स्थित असलेली ब्रह्मचैतन्य ज्योतिच सर्वांना प्रकाशित करणारी आहे. ]

गामाविश्य च भूतानि धारयाम्यहमोजसा ।
पुष्णामि चौषधीः सर्वाः सोमो भूत्वा रसात्मकः ॥ १३ ॥

—मी ईश्वर, पृथ्वीदेवतारूपानें पृथ्वींत प्रवेश करून आपल्या काम-राग-रहित बलानें सर्व प्राण्यांना धारण करितों. त्याचप्रमाणें मी रसात्मक सोम होऊन पृथ्वींत उत्पन्न झालेल्या व्रीहि-यवादि सर्व औषधींना पुष्ट करितों.

अहं वैश्वानरो भूत्वा प्राणिनां देहमाश्रितः ।
प्राणापानसमायुक्तः पचाम्यन्नं चतुर्विधम् ॥ १४ ॥

—मी सर्व प्राण्यांच्या देहाचा आश्रय केलेला जाठराग्नि—जठरांतील वैश्वा-नर अग्नि होऊन प्राण व अपान या सहकारी कारणांनीं युक्त होऊन भक्ष्य, भोज्य, लेह्य व चोष्य असें चार प्रकारचें अन्न पचवितों.

सर्वस्य चाहं हृदि सन्निविष्टो मत्तः स्मृतिर्ज्ञानमपोहनं च ।
वेदैश्च सर्वैरहमेव वेद्यो वेदान्तकृद्वेदविदेव चाहम् ॥ १५ ॥

—मीं ब्रह्मादिस्तंबपर्यंत सर्व प्राण्यांच्या बुद्धींत आत्मरूपानें सम्यक् प्रवेश केला आहे. त्यामुळें सर्व कर्मांचा अध्यक्ष व जगद्यंत्राचा सूत्रधार अशा मज आत्म्यापासून सर्व प्राण्यांची स्मृति, अनुभवज्ञान व त्या दोहोंचाहि नाश, त्यांच्या कर्मांप्रमाणें होतो व सर्व वेदांनीं जाणण्यास योग्य असा मीच पर-मात्मा आहें. मी वेदान्ताच्या विषयाचा संप्रदाय चालविणारा व त्यासाठींच वेदाचा यथार्थ अर्थ जाणणारा आहें.

याप्रमाणें चार श्लोकांनीं 'नारायण'-संज्ञक ईश्वराचा आदित्यादि विशिष्ट उपाधींमुळें झालेला विभूतिसंक्षेप सांगितला. आतां क्षर व अक्षर या दोन उपाधींहून अगदीं विलक्षण व निरुपाधिक अशा त्याच नारायणाच्या स्वरू-पाचा निश्चय करण्यासाठीं पुढील श्लोक आरंभिले जातात. तसेंच, यापुढील ग्रंथांत सर्व गीताध्यायांचा तात्पर्यार्थ तीन भागांत विभागून दाखवतात—

द्वाविमौ पुरुषौ लोके क्षरश्चाक्षर एव च ।
क्षरः सर्वाणि भूतानि कूटस्थोऽक्षर उच्यते ॥ १६ ॥

—या संसारांत क्षर—विनाशी, अक्षर—अविनाशी, असे दोन पुरुष आहेत. ते परम पुरुषाची उपाधि असल्यामुळें त्यांना पुरुष म्हटलें आहे. साक्षात् पुरुष नव्हेत. सर्व भूतें—समस्त विकारजात—सर्व विकार, हा क्षर पुरुष व या क्षर-संज्ञक पुरुषाच्या उत्पत्तीचें बीज म्ह० अनेक संसारी प्राण्यांच्या काम-

कर्मादि संस्कारांचा आश्रय, हा अक्षर पुरुष आहे, असें सांगितलें जातें. [ विकारांचा नाश होत असल्यामुळें त्याला क्षर म्हटलें व संसाराच्या बीजाला अनंतत्व असल्यामुळें म्ह० ब्रह्मज्ञानावांचून त्याचा विनाश होत नसल्यामुळें त्याला अक्षर म्हटलें आहे. भगवानांची मायाशक्ति हाच कूटस्थ अक्षर पुरुष होय. ]

कार्य व कारण म्ह० क्षर व अक्षर अशा ईश्वराच्या दोन उपाधि सांगून आतां तिसरा उत्तम पुरुष सांगतात—

उत्तमः पुरुषस्त्वन्यः परमात्मेत्युदाहृतः ।
यो लोकत्रयमाविश्य बिभर्त्यव्यय ईश्वरः ॥ १७ ॥

—परंतु हा उत्तम पुरुष क्षर व अक्षर या दोन उपाधींहून अगदीं विलक्षण, त्यांच्या दोषांनीं रहित व नित्य शुद्ध, बुद्ध, मुक्तस्वभाव आहे. वेदान्तांत त्याला परमात्मा असें म्हटलें आहे. देहादि मिथ्या कल्पित आत्म्याहून तो सर्वान्तर्यामी श्रेष्ठ आहे, म्हणून परमात्मा होय. तो आपल्या चैतन्यरूप बलां-तील मायाशक्तीनें त्रैलोक्यांत प्रवेश करून त्याला केवल आपल्या स्वरूप-शक्तीनें धारण करितो. त्या ' नारायण 'संज्ञक सर्वज्ञ ईश्वराचा व्यय होत नाहीं.

' पुरुषोत्तम ' या नांवांतील अवयवांचा अर्थ सांगून आपलें हें नांव अन्वर्थ आहे, असें दाखवून मी निरतिशय ईश्वर आहें, असें सांगतात व आपल्या ' पुरुषोत्तम ' स्वरूपाचें ज्ञान करून देतात—

यस्मात्क्षरमतीतोऽहमक्षरादपि चोत्तमः ।
अतोऽस्मि लोके वेदे च प्रथितः पुरुषोत्तमः ॥ १८ ॥

—ज्याअर्थी मीं ' अश्वत्थ '-नांवाच्या संसारमायावृक्षाचें–अक्षर पुरुषाचें अतिक्रमण केलें आहे व संसारवृक्षबीजभूत ' अक्षर ' संज्ञक कूटस्थ माया-शक्तिहूनहि मी उत्तम–अतिशय उत्कृष्ट आहें, त्याअर्थी लोकांत व वेदांत मी पुरुषोत्तम म्हणून प्रसिद्ध आहें. [ भक्तजन मला ' पुरुषोत्तम ' या नांवानें ओळखतात व कवि काव्यादिकांत त्याच नांवानें माझा उल्लेख करितात. ]

यो मामेवमसंमूढो जानाति पुरुषोत्तमम् ।
स सर्वविद्भजति मां सर्वभावेन भारत ॥ १९ ॥

—हे अर्जुना, जो संमोहरहित असलेला पुरुष वर सांगितल्याप्रमाणें मज पुरुषोत्तमाला जाणतो, तो सर्वज्ञ मला सर्वभावानें भजतो. [ सर्वात्मत्व, सर्वो-

समत्व इत्यादि विशेषणांनीं विशिष्ट असलेल्या मज ईश्वराला–पुरुषोत्तमाला ‘ देहादिकांना मी व माझें ’ असें न म्हणणारा जो साधक ‘ क्षराक्षराहून विलक्षण असलेला तो पुरुषोत्तमच मी आहें’ अशाप्रकारें जाणतो, तो सर्वज्ञ होय. अर्जुना, तो सर्वज्ञ पुरुष सर्व भूतांत असलेल्या मला सर्वांचा आत्मा या भावनेनेंच भजतो. ]

याप्रमाणें या अध्यायांत ‘ मोक्ष ’ हें ज्याचें फल आहे, असें भगवत्तत्त्व ज्ञान सांगून आतां या उपसंहार श्लोकांत त्याची स्तुति करितात—

इति गुह्यतमं शास्त्रमिदमुक्तं मयानघ ।
एतद्बुद्ध्वा बुद्धिमान्स्यात्कृतकृत्यश्च भारत ॥ २० ॥

—हे निष्पाप अर्जुना, याप्रमाणें अतिशय गुह्य, अत्यंत रहस्य असें हें शास्त्र मीं तुला सांगितलें. हें जाणून पुरुष बुद्धिमान् व कृतकृत्य होतो. [ गीता हेंच मोक्षशास्त्र आहे. तथापि या अध्यायाची स्तुति करण्यासाठीं यालाच ‘ शास्त्र ’ म्हटलें आहे. कारण या अध्यायांत केवळ गीताशास्त्रार्थच संक्षेपतः सांगितला नसून सर्वच वेदार्थ यांत अंतर्भूत झालेला आहे. म्हणूनच ‘ त्या संसारवृक्षाला जो जाणतो, तो वेदवेत्ता० ’ ( श्लो० १ ) आणि ‘ सर्व वेदांनीं मीच वेद्य आहें ’ असें म्हटलें आहे. अशा प्रकारचें हें शास्त्र जाणून मनुष्य ज्ञानी होतो. केवळ ज्ञानीच नव्हे, तर भगवत्तत्त्वज्ञान झालें असतां तो कृतकृत्य होतो. विशिष्ट कुलांत जन्म घेतलेल्या ब्राह्मणाचें मुख्य कर्तव्य हेंच आहे. अर्जुना, ज्याअर्थी हें परमार्थतत्त्व तूं मजपासून ऐकलें आहेस, त्याअर्थी तूं कृतकृत्य–धन्य आहेस. तुझें भरतकुलांतील जन्माचें साफल्य झालें आहे. याप्रमाणें या अध्यायांत आत्म्याचें देहादिकांहून भिन्नत्व, चिद्रूपत्व, सर्वात्मत्व व कार्यकारणरहित असल्यामुळें असंसारित्व सांगून तो आत्माच अखंड एकरस ब्रह्मरूप आहे, असा साक्षात् अनुभव आला असतां पुरुषार्थांची परिसमाप्ति होते, असें सांगितलें आहे. ]

( येथें भगवद्गीतेचा पुरुषोत्तमयोग नांवाचा पंधरावा अध्याय समाप्त झाला. ) ६. ४. ३९.

---

## अध्याय ४० वा.

### ( गीताध्याय १६ वा. दैवासुरसंपद्विभाग योग. )

[ १ दैवासुर संपत्तीचे गुण व फल. २ आसुर संपत्तीचें सविस्तर वर्णन. ३ त्रिविध नरकद्वार, शास्त्राचें प्रामाण्य. ]

नवव्या अध्यायांत प्राण्यांची दैवी, आसुरी व राक्षसी अशी त्रिविध प्रकृति सुचविली. तिचें विस्तारानें स्वरूपप्रदर्शन करण्यासाठीं 'अभयं सत्त्वसंशुद्धिः०' इत्यादि अध्याय आरंभिला जातो. त्यांतील दैवी प्रकृति संसारांतून मुक्त होण्यास आणि राक्षसी व आसुरी प्रकृति अत्यंत बंधास कारण होते. यास्तव दैवी प्रकृतीचें ग्रहण करण्यासाठीं व दुसऱ्या दोन प्रकृतींचें परिवर्जन करण्यासाठीं येथें त्यांचें स्वरूपप्रदर्शन केलें आहे.

श्रीभगवानुवाच—

अभयं सत्त्वसंशुद्धिर्ज्ञानयोगव्यवस्थितिः ।
दानं दमश्च यज्ञश्च स्वाध्यायस्तप आर्जवम् ॥ १ ॥
अहिंसा सत्यमक्रोधस्त्यागः शान्तिरपैशुनम् ।
दया भूतेष्वलोलुप्त्वं मार्दवं ह्रीरचापलम् ॥ २ ॥
तेजः क्षमा धृतिः शौचमद्रोहो नातिमानिता ।
भवन्ति संपदं दैवीमभिजातस्य भारत ॥ ३ ॥

( १ ) भगवान् म्हणाले—शास्त्रानें उपदेशिलेल्या अर्थाचें निर्भयपणें—निःशंकपणें अनुष्ठान करणें, चित्ताची अतिशय शुद्धि–कपटादिकांचा त्याग करून शुद्ध भावानें व्यवहार करणें, ज्ञान व योग यांतील तन्निष्ठता, यथाशक्ति अन्नादिक वांटणें, बाह्य इंद्रियांचा निग्रह, श्रौत अग्निहोत्र व स्मार्त देवयज्ञ, ऋग्वेदादिकांचें पुण्यासाठीं अध्ययन, कायिक, वाचिक व मानसिक तप, अंतःकरणाचा सरळपणा, प्राण्यांना पीडा न देणें, अप्रिय व अनृत वर्ज करून सत्य भाषण करणें, क्रोध आला असतांहि त्याला शांत करणें, संन्यास, अंतःकरणाचा उपशम, एखाद्याची गुप्त गोष्ट दुसऱ्याला न सांगणें, दुःखी जीवांवर कृपा करणें, विषय समीप असले तरी इंद्रियांचें विकाररहित्य, मृदुत्व, अकार्याविषयीं लोकलज्जा, कारणावांचून हात-पाय इत्यादिकांचा व्यापार न करणें, प्रगल्भता, विशिष्ट सामर्थ्य–धीटपणा, कोणीं कांहीं अपराध केला असतांहि मनांत विकार उत्पन्न होऊं न देणें, शरीर, इंद्रियें, इत्यादिकांना उत्साह देणारें धैर्य, बाह्य

व आंतर शुद्धि, दुसऱ्यांना मारण्याची इच्छा न करणें, अतिशय मानित्व धारण न करणें, हे गुण अर्जुना, दैवी संपत्तीला अनुलक्षून उत्पन्न झालेल्या पुरुषामध्यें असतात. [ यांतील अभय, चित्ताची शुद्धि व ज्ञानयोगव्यवस्थिति हे दैवी संपत्तीचे मुख्य गुण आहेत व दानादि पुढील तेवीस गुण सर्व साधारण दैवी संपत्तीचे आहेत. देवांच्या संपत्तीला अनुलक्षून उत्पन्न झालेल्या पुरुषांमध्यें ते दिसून येतात. पुढें ज्याचें कल्याण व्हावयाचें असतें, त्याचींच हीं विशेषणें आहेत. ]

दंभो दर्पोऽतिमानश्च क्रोधः पारुष्यमेव च ।
अज्ञानं चाभिजातस्य पार्थ संपदमासुरीम् ॥ ४ ॥

—अर्जुना, आतां आसुरी संपत्तीचे गुण तुला सांगतों. आसुरी संपत्तीला अनुलक्षून उत्पन्न झालेल्या पुरुषामध्यें पुढील गुण दिसतात. 'मी मोठा धार्मिक आहें' असें बाह्य वेष व आचार यांवरून लोकांस भासविणें, हा दंभ; पुष्कळ धन असणें, किंवा पिता, बंधु इत्यादि आप्त मोठा अधिकारी-राजाप्रभृति असणें, यामुळें सामान्य मनुष्याच्या ठिकाणीं जो मद उत्पन्न होतो, तो दर्प होय; अशा दर्पानें युक्त असलेला पुरुष मोठ-मोठ्या विद्वान् व शील-संपन्न पुरुषांचाहि धिक्कार करतो. त्याचप्रमाणें 'मी उत्कृष्ट आहें' असें मानणें, कोप, कठोर-मर्मभेदक शब्द बोलणें, जसें कुरूपाला सुस्वरूप, हीनाला उत्तम, आंधळ्याला डोळस, इत्यादि म्हणणें व कर्तव्याकर्तव्याविषयींचें अविवेकज्ञान-मिथ्याप्रत्यय; हे पांच गुण राजस पुरुषांमध्यें मुख्यतः असतात.

दैवी संपद्विमोक्षाय निबन्धायासुरी मता ।
मा शुचः संपदं दैवीमभिजातोऽसि पाण्डव ॥ ५ ॥

—आतां मी या दोन संपत्तींचें कार्य-फल सांगतों. यांतील देवांची संपत्ति संसारबंधापासून विशेषेंकरून मुक्त होण्यासाठीं आहे आणि आसुरांची संपत्ति नियत बंधासाठीं आहे, असें मानलेलें आहे. अर्जुना, तूं शोक करूं नकोस. तूं दैवी संपत्तीला अनुलक्षून उत्पन्न झाला आहेस. [ पुढें तुझें अतिशय कल्याण होणार आहे. दयाशून्य राक्षसांची जी तिसरी प्रकृति तिचा आसुरी प्रकृतींतच अंतर्भाव होतो. ]

द्वौ भूतसर्गौ लोकेऽस्मिन्दैव आसुर एव च ।
दैवो विस्तरशः प्रोक्त आसुरं पार्थ मे शृणु ॥ ६ ॥

—हे पार्था, राक्षसी प्रकृतीचा आसुरी प्रकृतींतच अंतर्भाव होत असल्यामुळें या लोकीं मनुष्यांचे दैव व आसुर असे दोनच सर्ग आहेत. त्यांतील दैवभूत सर्ग १—३ श्लोकांत सविस्तर सांगितला. तो सर्वथा ग्राह्य आहे. आतां तूं मजपासून सर्वथा त्याज्य असलेला असुरांचा सर्ग ऐक. आतां या अध्यायाच्या परिसमाप्तीपर्यंत आसुरी संपत् प्राण्यांच्या विशेषणत्वानें प्रदर्शित केली जाते. कारण आसुरी संपत्ति कोणती, हें प्रत्यक्ष कळलें, म्हणजे तिला वर्ज्य करतां येतें, म्हणून तिचा येथें विस्तार केला आहे.

प्रवृत्तिं च निवृत्तिं च जना न विदुरासुराः ।
न शौचं नापि चाचारो न सत्यं तेषु विद्यते ॥ ७ ॥

( २ )—आसुरी प्रकृतीचे जन प्रवृत्ति कोठें करावी व निवृत्त कशापासून व्हावें तें जाणत नाहींत. त्यांना पुरुषार्थाच्या विहित साधनानुष्ठानांत प्रवृत्त व्हावें व निषिद्ध संसारसाधनानुष्ठानापासून निवृत्त व्हावें, हें कळत नाहीं. त्यांच्या ठिकाणीं पूर्वोक्त द्विविध शौच नसतें, सदाचार नसतो व सत्यहि नसतें. [ आसुर जन अशुचि, दुराचरणी, मायावी—कपटी, असत्य भाषण करणारे असतात, हें प्रसिद्ध आहे. ]

असत्यमप्रतिष्ठं ते जगदाहुरनीश्वरम् ।
अपरस्परसंभूतं किमन्यत्कामहैतुकम् ॥ ८ ॥

—ते आसुरी जन जसे असत्यप्रचुर—आम्हांमध्यें असत्य फार व सत्य थोडें, तसें हें सर्व जगत् असत्यप्रचुर आहे. आम्हांप्रमाणेंच तें खोटें आहे. त्याला धर्माधर्मादिकांची कांहीं प्रतिष्ठा नाहीं. तसेंच धर्म व अधर्म यांची ज्याला विशेष अपेक्षा आहे, असा याचा शास्ता ईश्वरहि नाहीं. यास्तव तें ईश्वररहित आहे, असें म्हणतात. ‘तर मग जगाची उत्पत्ति कशी होते ?’ म्हणून विचाराल तर ते म्हणतात, कामानें प्रेरित झालेली स्त्री व पुरुष यांच्या अन्योन्य संयोगापासून सर्व जगत् उत्पन्न झालें आहे. जगाचें ‘अदृष्ट’ या नांवाचें धर्माधर्मादि दुसरें काय कारण असणार ? कांहीं नाहीं. कामच प्राण्यांच्या उत्पत्तीचें कारण आहे, असें ते सांगतात.

एतां दृष्टिमवष्टभ्य नष्टात्मानोऽल्पबुद्धयः ।
प्रभवन्त्युग्रकर्माणः क्षयाय जगतोऽहिताः ॥ ९ ॥

—पण हे अर्जुना, या नास्तिक दृष्टीचा आश्रय करून ज्यांचा स्वभाव नष्ट

झाला आहे, जे परलोकाच्या साधनापासून विशेषेंकरून भ्रष्ट झाले आहेत, ज्यांची बुद्धि अल्पविषयांविषयींच असते, असे ते क्रूर कर्मे करणारे, हिंसास्वभावाचे जगाचे शत्रु सर्व प्राण्यांच्या क्षयासाठींच उत्पन्न होतात.

कामम‍ाश्रित्य दुष्पूरं दम्भमानमदान्विताः ।
मोहाद्‌गृहीत्वासद्ग्राहान्प्रवर्तन्तेऽशुचिव्रताः ॥ १० ॥

—ज्याची पूर्ति–तृप्ति होणें अशक्य आहे, अशा कामाचा आश्रय करून ते दंभ, मान व मद यांनीं युक्त होत्साते अविवेकामुळें अशुभ निश्चय करून घेऊन तदनुसार जगांतील व्यवहार करितात. त्यांचीं व्रतें अशुचि असतात.

चिन्तामपरिमेयां च प्रलयान्तामुपाश्रिताः ।
कामोपभोगपरमा एतावदिति निश्चिताः ॥ ११ ॥

—ते आसुर लोक जिचें प्रमाण–इयत्ता कळत नाहीं, अशा मरणापर्यंत टिकणाऱ्या–मरणानेंच संपणाऱ्या चिंतेचा आश्रय केलेले असतात. शब्दादि विषयांचा उपभोग घेण्यामध्येंच तत्पर असलेले ते, विषयोपभोग घेणें हाच काय तो परम पुरुषार्थ आहे, असा निश्चय केलेले असतात. [ ते योग-क्षेमांच्या उपायांची मरेपर्यंत चिंता वहातात. चिंतेचे विषय असंख्य असल्यामुळें ती अपरिमेय असते. विषयोपभोग हेंच कायतें एक सुख. या पलीकडे पारलौकिक सुखादि कांहीं नाहीं, असा त्यांचा निश्चय झालेला असतो.

आशापाशशतैर्बद्धाः कामक्रोधपरायणाः ।
ईहन्ते कामभोगार्थमन्यायेनार्थसंचयान् ॥ १२ ॥

—आशा, हेच शेकडों पाश. त्यांनीं बद्ध–नियंत्रित–निगडित होत्साते सर्व बाजूंनीं आकर्षण केले जाणारे, काम व क्रोध ज्यांचा परम आश्रय आहे, असे ते आसुर प्रवृत्तीचे लोक विषयोपभोग हें प्रयोजन सिद्ध व्हावें म्हणून, धर्मासाठीं नव्हे, दुसऱ्याच्या धनाचा अपहार करणें इत्यादि अन्यायानें द्रव्यसंचय करितात.

इदमद्य मया लब्धमिदं प्राप्स्ये मनोरथम् ।
इदमस्तीदमपि मे भविष्यति पुनर्धनम् ॥ १३ ॥
असौ मया हतः शत्रुर्हनिष्ये चापरानपि ।
ईश्वरोऽहमहं भोगी सिद्धोऽहं बलवान्सुखी ॥ १४ ॥

—त्या असुर लोकांचा असा विवेकविरोधी आशय असतो—आतां मीं हें गायी, सुवर्ण, इत्यादि धन संपादन केलें आहे. हें दुसरेंहि संपादन करीन. मनाला संतोष देणारें हें धन आज मजपाशीं आहे. मला हवें असलेलें हें दुसरें धनहि पुढल्या वर्षी मिळेल. त्यामुळें ' हा धनाढ्य आहे, ' अशी माझी ख्याति होईल. ' या एका दुर्जय शत्रूला मीं मारलें आहे. या दुसऱ्याहि दुष्ट व क्षुद्र शत्रूंना मी मारीन. ते गरीब बिचारे माझ्यापुढें काय करणार ! या जगांत माझ्या बरोबरीचा कोणीच नाहीं. मी ईश्वर–सर्व ऐश्वर्याचा उपभोग घेणारा आहें. मी भोगी–पुत्र-पौत्रादिकांनीं संपन्न आहें. मी कांहीं कोणी साधारण मनुष्य नव्हे, तर सिद्ध आहें. मोठा बलाढ्य व सुखी आहें. [ बाकीचे सर्व भूमीला भार होण्यासाठीं उत्पन्न झाले आहेत. ]

विद्या, वर्तन, धन व कुल यांत माझ्या तोडीचा कोणी नाहीं, असें ते समजतात व याप्रमाणें कर्तव्याकर्तव्यविवेकरहित झालेल्या त्यांची काय अवस्था होते, तें सांगतात—

आढ्योऽभिजनवानस्मि कोऽन्योऽस्ति सदृशो मया ।
यक्ष्ये दास्यामि मोदिष्य इत्यज्ञानविमोहिताः ॥ १५ ॥
अनेकचित्तविभ्रान्ता मोहजालसमावृताः ।
प्रसक्ताः कामभोगेषु पतन्ति नरकेऽशुचौ ॥ १६ ॥

—मी धनानें अत्यंत संपन्न व वंशानें अत्यंत कुलीन–सात पुरुषांपर्यंत श्रोत्रियत्वानें संपन्न आहें. त्यामुळेंहि माझी बरोबरी करील, असा कोणी नाहीं. यज्ञाच्या योगानेंहि मी इतरांचा पराभव करीन. नटादिकांना दान देईन व अतिशय हृष्ट होईन. अशा प्रकारें ते आसुर प्रकृतीचे लोक अज्ञानानें मूढ झालेले असतात. याप्रमाणें अनेक चित्तांनीं अनेक प्रकारें भ्रान्त झालेले ते अविवेकाच्या आवरणानें आच्छादित व विषयोपभोगामध्यें आसक्त होत्साते अपवित्र नरकांत पडतात.

पण त्यांच्यांतीलहि कित्येकांची वैदिक याग-दानादि कर्मांमध्यें प्रवृत्ति होत असल्यामुळें सर्वांनींच नरकांत पडणें अयुक्त आहे, असें कोणी म्हणेल म्हणून भगवान् सांगतात—

आत्मसम्भाविताः स्तब्धा धनमानमदान्विताः ।
यजन्ते नामयज्ञैस्ते दम्भेनाविधिपूर्वकम् ॥ १७ ॥

—आसुरलोक 'आम्ही अनेक उत्तम गुणांनीं युक्त आहों,' असें स्वतःच मानणारे व कोणापुढेंहि नम्र न होण्याचा ज्यांचा स्वभाव आहे, असे असतात. धनाविषयींचा मान व मद यांनीं युक्त होत्साते दंभानें नाममात्र यज्ञांनीं अविधीनें यजन करितात. [ आसुर जन आपली धार्मिकता प्रकट करण्याच्या हेतूनें विहित अंगें व इतिकर्तव्यता यांनीं रहित अशा यज्ञांनीं यजन करितात. त्यांचे ते यज्ञ केवल नांवाचे असतात. त्यांत ढोंग फार असतें. त्यामुळें आसुर संपत्तीचे लोक वैदिक मार्गांत जरी प्रवृत्त झाले तरी त्यांत पुण्यापेक्षां पापच अधिक जोडतात. ]

अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं च संश्रिताः ।
मामात्मपरदेहेषु प्रद्विषन्तोऽभ्यसूयकाः ॥ १८ ॥

—अहंकार, बल, दर्प, काम व क्रोध यांचा आश्रय केलेले ते आसुर लोक आपल्या व दुसऱ्यांच्या देहांमध्यें माझा अतिशय द्वेष करणारे व अतिशय असुया करणारे असतात. [ स्वतःमध्यें असलेल्या व नसलेल्या गुणांचा आरोप करून त्यांनीं विशिष्ट अशा स्वतःला 'मी' असें म्हणणें हा अहंकार होय. अविद्या हें त्याचें मूळ आहे. म्हणून त्यालाहि अविद्या म्हणतात. हा अविद्यासंज्ञक अहंकार अतिशय कष्ट देणारा आहे. तो सर्व दोषांचें व अनर्थप्रवृत्तीचें मूळ आहे; पण आसुर लोक अशा अहंकाराचा आश्रय करितात. त्याचप्रमाणें बल म्ह० दुसऱ्यांच्या पराभवाला कारण होणारें व विषयासक्तीनें युक्त असलेलें शरीरेन्द्रियसामर्थ्य; दर्प म्ह० ज्याचा उद्भव झाला असतां मनुष्य धर्माचें अतिक्रमण करितो, असा एक अंतःकरणस्थ दोष, स्त्र्यादिकांविषयींचा काम; अनिष्ट विषयांविषयींचा क्रोध, या व अशाच मात्सर्यादि दुसऱ्या मोठ्या दोषांचा आश्रय केलेले; तसेंच, स्वदेह व परदेह, यांतील ज्ञान व कर्म यांच्या साक्षिभूत अशा माझा अत्यंत द्वेष करणारे व सन्मार्गस्थांच्या गुणांमध्यें दोषदृष्टि ठेवणारे—त्यांचे गुण सहन न करणारे, असे ते सर्व आसुरसंपत्तीचे लोक असतात. ]

अशा आसुर-प्रकृतीच्या लोकांचें शेवटीं काय होतें, तें सांगतात—

तानहं द्विषतः क्रूरान्संसारेषु नराधमान् ।
क्षिपाम्यजस्रमशुभानासुरीष्वेव योनिषु ॥ १९ ॥

—मी त्या माझा द्वेष करणाऱ्या क्रूरांस, अशुभ नराधमास संसारांतील

आसुरी योनींतच सतत टाकतों. [ सन्मार्गाचे प्रतिपक्षभूत शत्रूच अशा साधूंचा व माझा द्वेष करणाऱ्या त्या नराधमांस मी संसारांतच म्ह० नरक-गमनमार्गांतच सतत टाकतों. कारण ते अधर्म दोषानें युक्त असतात. त्या अशुभ कर्में करणाऱ्या मूढांना ज्यांत क्रूर कर्मांचें आधिक्य आहे, अशा व्याघ्र-सिंहादि योनींतच टाकतों. ]

त्यांचेंहि क्रमानें अनेक जन्मांच्या शेवटीं कल्याण होईल, म्हणून म्हणाल तर तसें होत नाहीं. आसुर प्रकृतीचे लोक उत्तरोत्तर अधम योनीलाच प्राप्त होतात, असें सांगतात—

आसुरीं योनिमापन्ना मूढा जन्मनि जन्मनि ।
मामप्राप्यैव कौन्तेय ततो यान्त्यधमां गतिम् ॥ २० ॥

—हे कुंतीपुत्रा, याप्रमाणें आसुर योनीला प्राप्त झालेले व प्रत्येक जन्मा-मध्यें अज्ञानप्रचुर योनींतच उत्पन्न होणारे ते अविवेकी मज ईश्वराला प्राप्त न होतां—फार काय, पण माझ्या प्राप्तीचें साधन जो सन्मार्ग त्यालाहि प्राप्त न होतां उत्तरोत्तर अत्यंत निकृष्ट गतीला जातात.

ज्यांत सर्व आसुर संपत्तीचा अंतर्भाव होतो, ज्याच्या परिहारानें सर्व आसुर संपत्तीचा परिहार होतो व जो सर्व अनर्थांचें मूळ आहे, असा हा सर्व आसुर संपत्तीचा संक्षेप सांगतात—

त्रिविधं नरकस्येदं द्वारं नाशनमात्मनः ।
कामः क्रोधस्तथा लोभस्तस्मादेतत्रयं त्यजेत् ॥ २१ ॥

( १ )—काम, क्रोध व लोभ असें हें तीन प्रकारचें, आत्म्याचा नाश करणारें नरकाचें द्वार आहे; म्हणून या त्रयाचा त्याग करावा. [ त्यांत प्रवेश करतांच आत्मा नाश पावतो, म्हणजे त्याच्यामध्यें कोणत्याच पुरुषार्थाची योग्यता रहात नाहीं. असें हें काम-क्रोध-लोभरूप त्रिविध नरकद्वार आहे. ज्याअर्थी तें आत्म्याचा नाश करणारें आहे, त्याअर्थीं त्याचा त्याग करावा. ही कामादि-कांच्या त्यागाची स्तुति आहे व त्यांचा त्याग केला असतां श्रेयःप्राप्तीच्या प्रति-बंधाची निवृत्ति होते, असा त्या स्तुतीचा भावार्थ आहे. ]

आतां या कामादिकांच्या त्यागाचें फल सांगतात—

एतैर्विमुक्तः कौन्तेय तमोद्वारैस्त्रिभिर्नरः ।
आचरत्यात्मनः श्रेयस्ततो याति परां गतिम् ॥ २२ ॥

—हे अर्जुना, या तीन तमोद्वारांनीं मुक्त झालेला पुरुष आपल्या कल्याणाचें—मोक्षाचें साधन आचरितो, त्यामुळें मोक्ष नांवाच्या परागतीला प्राप्त होतो. [ दुःखमोहात्मक नरकाचीं द्वारेंच अशा कामादिकांपासून मुक्त झालेला पुरुष आपल्या श्रेयःसाधनाचें अनुष्ठान करतो. पूर्वी या त्रिविध नरकद्वारानेंच—प्रतिबद्ध झाल्यामुळें तो श्रेयःसाधन आचरीत नव्हता. पण आतां त्याचा प्रतिबंध निघून गेल्यानें तें आचरितो व त्या योगानेंच श्रेष्ठ गतीला प्राप्त होतो. ]

या सर्व आसुर संपत्तीच्या परित्यागाचें व श्रेयःसाधनाचरणाचें कारण शास्त्र आहे. शास्त्रप्रमाणावरूनच तें करतां येतें, त्यावांचून नाहीं. यास्तव—

> यः शास्त्रविधिमुत्सृज्य वर्तते कामकारतः ।
> न स सिद्धिमवाप्नोति न सुखं न परां गतिम् ॥ २३ ॥

—जो शास्त्राचा—वेदाचा विधि सोडून—वेदविधीचा त्याग करून कामाकडून प्रेरणा केला गेलेला असा होत्साता वर्तन करतो, तो पुरुषार्थाच्या योग्यतेला प्राप्त होत नाहीं. त्याला या लोकीं सुख होत नाहीं व तो स्वर्ग व मोक्ष यांतील एकाहि उत्तम गतीला प्राप्त होत नाहीं. [ कर्तव्य व अकर्तव्य यांच्या ज्ञानाचें साधन असा शास्त्रोक्त विधि व प्रतिषेध, यांना सोडून जो केवल कामानें प्रेरित होत्साता मनसोक्त वर्तन करतो, तो पुरुषार्थाच्या योग्यतेला प्राप्त होत नाहीं. त्याला सुख किंवा सर्वोत्तम गतिहि मिळत नाहीं. ज्याच्या योगानें अपूर्व अर्थ ज्ञात होतो तें शास्त्र. विधि व निषेध हें त्याचें स्वरूप आहे. विधीवरून कर्तव्य व निषेधावरून अकर्तव्य यांचें ज्ञान होतें. अर्थात् विधिनिषेधरूप शास्त्र हेंच कर्तव्य व अकर्तव्य यांच्या ज्ञानाचें साधन आहे. शास्त्रविमुख पुरुषाची प्रवृत्ति कामाधीन असते. पण असे लोक पुरुषार्थाला अयोग्य असतात. हाच यापुढील श्लोक गीतेंतील कर्मादि शब्दांचा अर्थ निश्चित करतांना डोळ्यांपुढें ठेवणें अत्यंत अवश्य आहे. ]

शास्त्राला सोडून केलेलें कर्म निष्फल आहे, असें सुचवून त्यावरून निष्पन्न होणारा अर्थ सांगतात—

> तस्माच्छास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ ।
> ज्ञात्वा शास्त्रविधानोक्तं कर्म कर्तुमिहार्हसि ॥ २४ ॥

—म्हणून कार्याकार्यांची व्यवस्था करावयाची झाल्यास म्हणजे कर्तव्य व अकर्तव्य यांचा निर्णय करण्याचा प्रसंग आल्यास तुला शास्त्र हेंच प्रमाण आहे.

यास्तव शास्त्रानें केलेलें जें विधान म्ह० 'करावें' व 'न करावें,' अशा स्वरूपाचा जो शास्त्रविधि तो समजून घेऊन या कर्माधिकारभूमींत तुला स्वकर्म-युद्धादि करणेंच योग्य आहे. [ या अध्यायांत पूर्व जन्मांतील कर्मवासनानुसार या जन्मांत अभिव्यक्त होणाऱ्या ज्या सात्त्विकादि तीन प्रकृति, त्यांचा दैवी व आसुरी असा विभाग करून त्यांतील पहिल्या संपत्तीचा स्वीकार व दुसरीचा त्याग करावा, असा उपदेश केला आणि परम पुरुषार्थाची इच्छा करणाऱ्या मुमुक्षूनें काम-क्रोध व लोभ यांना टाकून शास्त्रदृष्टि व्हावें आणि शास्त्रविधीच्या अनुसार वर्तन करावें, असा निर्धार केला. ]

येथें भगवद्गीतेचा दैवासुरसंपद्विभागयोग नांवाचा १६ वा अध्याय समाप्त झाला. ६. ४. ४०.

---

## अध्याय ४१ वा.

### [ गीताध्याय १७ वा. श्रद्धात्रयविभागयोग. ]

[ १ त्रिविध श्रद्धेविषयीं अर्जुनाचा प्रश्न व भगवानांचें सोदाहरण उत्तर. २. विविध आहार यज्ञ, तप व दान. ३ यज्ञादिकांतील दोषनिवारणाचा उपाय. ]

भगवानांनीं 'तस्मात् शास्त्रं०' या वचनानें तुला कर्तव्याकर्तव्याचा निर्णय करण्यास शास्त्र प्रमाण आहे, असें सांगितलें. तें ऐकून प्रश्नबीज उपलब्ध झाल्यामुळें—

अर्जुन उवाच—

**ये शास्त्रविधिमुत्सृज्य यजन्ते श्रद्धयान्विताः ।**
**तेषां निष्ठा तु का कृष्ण सत्त्वमाहो रजस्तमः ॥ १ ॥**

(१) अर्जुन—हे कृष्णा, पण जे कित्येक सामान्य लोक श्रुति-स्मृतिरूप शास्त्रविधि सोडून आस्तिक्यबुद्धीनें युक्त होत्साते देवादिकांचें यजन, दान, व तप करितात म्ह० कोणताहि श्रुति-स्मृतिरूप विधि न जाणतां केवल वृद्धांचा व्यवहार म्ह० रूढि पाहून मोठ्या श्रद्धेनें त्याप्रमाणें यज्ञादिक आचरितात,–देवादिकांची पूजा करितात, त्यांची निष्ठा कोणती ? त्यांच्या पूजेला सात्त्विकी म्हणावयाचें ? राजसी कीं तामसी ? [शास्त्रविधीला जाणत असूनहि त्याचा त्याग करून आपल्या कल्पनेनें यज्ञादि करणारे लोक श्रद्धेनें युक्त असणें शक्य नाहीं. यास्तव शास्त्रविधि न जाणतां जे श्रद्धेनें रूढीला अनुसरतात, त्यांच्या यज्ञादिकांविषयीं हा प्रश्न आहे. ]

प्रश्नाचा विषय सामान्य असला तरी त्याचें उत्तर त्याच्या विषयाचा विभाग केल्यावांचून देतां येण्यासारखें नाहीं, म्हणून त्याचें उत्तर विभागपूर्वक देण्यासाठीं—

श्रीभगवानुवाच—

**त्रिविधा भवति श्रद्धा देहिनां सा स्वभावजा।**
**सात्त्विकी राजसी चैव तामसी चेति तां शृणु ॥ २ ॥**

श्रीकृष्ण म्हणाले—ज्या निष्ठेविषयीं म्ह० श्रद्धापूर्वक क्रियेविषयीं तूं प्रश्न करीत आहेस, ती देहवान् जीवांची निष्ठा तीन प्रकारची आहे. ती स्वभावजन्य आहे. पूर्वजन्मीं झालेला जो धर्मादिकांचा संस्कार मरणसमयीं अभिव्यक्त होतो, त्याला स्वभाव म्हणतात. त्या तसल्या स्वभावांपासून झालेली श्रद्धा सात्त्विकी, राजसी व तामसी अशी तीन प्रकारची आहे. [ तिचेंच मी वर्णन करितों, तें ऐक. सत्त्वगुणामुळें झालेली जी श्रद्धा ती सात्त्विकी, रजोगुणापासून झालेली राजसी व तमोगुणापासून झालेली तामसी होय. ]

पूर्वसंस्कारानुसार मरणसमयीं उद्भवलेली तीन प्रकारची 'स्वभाव' संज्ञक वासना, हेंच तीन प्रकारच्या श्रद्धेचें निमित्त वर सांगितलें. आतां तिचेंच उपादान कारण सांगतात—

**सत्त्वानुरूपा सर्वस्य श्रद्धा भवति भारत।**
**श्रद्धामयोऽयं पुरुषो यो यच्छ्रद्धः स एव सः ॥ ३ ॥**

—हे अर्जुना, विशिष्ट संस्कारांनीं युक्त, अशा अंतःकरणाच्या अनुरूप सर्वांची–प्रत्येक मनुष्याची बुद्धि असते. संस्कारविशिष्ट अंतःकरण हेंच श्रद्धेचें उपादान कारण असल्यामुळें त्रिविध संस्कारांच्या अनुसार प्राण्यांची श्रद्धा त्रिविध होते. हा संसारी जीव श्रद्धाप्राय–प्रायः श्रद्धायुक्त असतो. त्यामुळें ज्या जीवाची जी श्रद्धा असते, तसाच तो पुरुष असतो.

अधिकारी पुरुष याप्रमाणें श्रद्धाप्रचुर असल्यामुळें देवादिकांची पूजा, याच कार्यावरून त्यांच्या सत्त्वादि निष्ठेचें अनुमान करावें, असें सांगतात—

**यजन्ते सात्त्विका देवान्यक्षरक्षांसि राजसाः।**
**प्रेतान्भूतगणांश्चान्ये यजन्ते तामसा जनाः ॥ ४ ॥**

—सत्त्वनिष्ठ लोक वस्वादि देवांचें पूजन करितात. रजोनिष्ठ कुबेरादि यक्ष व नैर्ऋतादि राक्षस यांस पूजितात. तामस जन, प्रेत व भूतगण यांची पूजा

करितात. [ स्वधर्मापासून च्युत झालेले ब्राह्मणादिक मरणानंतर वायुदेहाला प्राप्त होतात. तेच प्रेत होत. हे देवादिक आपापल्या सात्त्विकादि पूजकांस सात्त्विकादि फल देतात. ]

याप्रमाणें शास्त्रविधीचा त्याग केला असतां सत्त्वादिनिष्ठ जनांच्या सत्त्वादि निष्ठेचें ज्ञान त्यांच्या पूजादि कार्यावरून होतें. पण त्यांतील हजारों लोकांपैकीं कोणी एखादाच देवादिकांच्या पूजेमध्यें तत्पर–सत्त्वनिष्ठ असतो. जगांत रजोनिष्ठ व तमोनिष्ठ जनांचेंच आधिक्य असतें. कसें तें ऐक—

अशास्त्रविहितं घोरं तप्यन्ते ये तपो जनाः ।
दम्भाहंकारसंयुक्ताः कामरागबलान्विताः ॥ ५ ॥
कर्शयन्तः शरीरस्थं भूतग्राममचेतसः ।
मां चैवान्तःशरीरस्थं तान्विद्ध्यासुरनिश्चयान् ॥ ६ ॥

—शास्त्रानें ज्याचें विधान केलेलें नाहीं, असें प्राण्यांना व स्वतःला पीडा देणारें तप जे करितात, जे दंभ व अहंकार यांनीं युक्त असतात, जे काम्य-विषय, विषयभोगांचा विलास व त्यामुळें प्राप्त होणारें बल–उत्साह, यांनीं युक्त असतात, ते आसुरनिश्चयी लोक रजोनिष्ठ आहेत. शरीरांतील इंद्रिय-समूहास कृश करणारे व त्यांच्या ज्ञानकर्मांचा साक्षिभूत–बुद्धिस्थ, अशा मलाहि कृश करणारे ते अविवेकी आसुरनिश्चयी–तमोनिष्ठ आहेत, असें तूं जाण. [ माझ्या श्रुति–स्मृतिरूप अनुशासनाचें अनुष्ठान न करणें, हेंच माझें कर्शन आहे. या आसुर लोकांचा व त्यांच्या निश्चयाचा परिहार करण्यासाठींच 'तूं त्यांना जाण' असा येथें उपदेश केला आहे. ]

आतां आहार, यज्ञ, तप व दान यांतील प्रत्येकांचे तीन तीन प्रकार त्रिविध पुरुषांना प्रिय असतात, असें सांगतात—

आहारस्त्वपि सर्वस्य त्रिविधो भवति प्रियः ।
यज्ञस्तपस्तथा दानं तेषां भेदमिमं शृणु ॥ ७ ॥

( २ )—भोक्त्या पुरुषाला आहारहि तीन प्रकारचा प्रिय असतो. यज्ञ, तप व दानहि तीन प्रकारचें प्रिय असतें. त्यांचा हा त्रिविध भेद तूं ऐक—

आयुःसत्त्वबलारोग्यसुखप्रीतिविवर्धनाः ।
रस्याःस्निग्धाः स्थिरा हृद्या आहाराःसात्त्विकप्रियाः ॥ ८ ॥

—आयुष्य, मानसबल, शारीरबल, आरोग्य, सुख व प्रीति यांची वृद्धि करणारे, रसयुक्त, स्नेहयुक्त, देहांत परिणामरूपानें चिरकाल रहाणारे व हृदयाला प्रिय वाटणारे, असे आहार सात्त्विक लोकांना प्रिय असतात.

कट्वम्ललवणात्युष्णतीक्ष्णरूक्षविदाहिनः ।
आहारा राजसस्येष्टा दुःखशोकामयप्रदाः ॥ ९ ॥

—अति कटु, आंबट, खारट, उष्ण, तिखट, रूक्ष–नीरस व दाहक म्ह० तोंडाची आग करणारे, असे आणि दुःख, शोक व रोग देणारे आहार राजस प्रकृतीच्या मनुष्याला आवडतात. [ या श्लोकांत राजस लोकांना आवडणारे आहार सांगितले आहेत. 'अति' शब्द कटु, आंबट, खारट, इत्यादि सर्वांच्या मागें जोडावा. ]

यातयामं गतरसं पूति पर्युषितं च यत् ।
उच्छिष्टमपि चामेध्यं भोजनं तामसप्रियम् ॥ १० ॥

—अर्धें कच्चें शिजलेलें, रसरहित, दुर्गंधयुक्त, शिळें, आंबलेलें, वास येत असलेलें, उष्टें व अपवित्र असें अन्न तामस लोकांना प्रिय असतें. [ राजस व तामस आहारांचा त्याग करून सात्त्विक आहारांचें ग्रहण करण्यासाठीं येथें तीन प्रकारचा आहार सांगितला आहे. ]

आतां तीन प्रकारचा यज्ञ सांगतात—

अफलाकाङ्क्षिभिर्यज्ञो विधिदृष्टो य इज्यते ।
यष्टव्यमेवेति मनः समाधाय स सात्त्विकः ॥ ११ ॥

—फलाची आकांक्षा न करणाऱ्या लोकांकडून शास्त्राच्या विधीनें प्राप्त झालेला जो यज्ञ 'मला हा अवश्य करावयास पाहिजे,' असें मनाचें समाधान करून केला जातो, तो सात्त्विक यज्ञ आहे.

अभिसंधाय तु फलं दम्भार्थमपि चैव यत् ।
इज्यते भरतश्रेष्ठ तं यज्ञं विद्धि राजसम् ॥ १२ ॥

—हे भरतकुलश्रेष्ठा, पण फलाची इच्छा ठेवून व केवल दंभासाठींहि जें यजन केलें जातें, त्या यजनाला राजस यज्ञ जाण. [ स्वर्गादिकांच्या उद्देशानें व आपलें धार्मिकत्व प्रकट करण्यासाठीं जो यज्ञ केला जातो, तो राजस होय. ]

विधिहीनमसृष्टान्नं मंत्रहीनमदक्षिणम् ।
श्रद्धाविरहितं यज्ञं तामसं परिचक्षते ॥ १३ ॥

—शास्त्रोक्त विधीवांचून असलेला ज्यांत अन्नदान केलेलें नाहीं, मंत्ररहित, दक्षिणेवांचून व श्रद्धाशून्य, अशा यज्ञाला तामस यज्ञ म्हणतात.

शारीरादि तप त्रिविध आहे. त्यांतील शारीरतप प्रथम सांगतात—

देवद्विजगुरुप्राज्ञपूजनं शौचमार्जवम् ।
ब्रह्मचर्यमहिंसा च शारीरं तप उच्यते ॥ १४ ॥

—देव, ब्राह्मण, गुरु व प्राज्ञ–विद्वान् यांचें प्रणाम-शुश्रुषादि पूजन, पूर्वोक्त द्विविध शुचिर्भूतपणा, अंतःकरणाचा सरलपणा, प्राण्यांना पीडा न देणें, स्त्री-शरीराशीं संसर्ग न करणें, हें शरीरानें होणारें तप म्हटलें जातें. [ शरीर ज्यामध्यें प्रधान आहे, अशा शरीरेंद्रियादिकांनीं होणाऱ्या तपाला शारीरिक तप म्हणतात. ]

अनुद्वेगकरं वाक्यं सत्यं प्रियहितं च यत् ।
स्वाध्यायाभ्यसनं चैव वाङ्मयं तप उच्यते ॥ १५ ॥

—जें वाक्य प्राण्यांच्या मनांत दुःख उत्पन्न न करणारें, खरें व प्रिय आणि हितकर असतें तें वाक्य व यथाविधि वेदशास्त्राध्ययन हें वाङ्मयतप सांगितलें जातें. [ प्राण्यांना दुःखकर न होणारें, सत्य, प्रिय व परिणामीं हितावह, असें जें वाक्य, तेंच श्रेष्ठ वाङ्मय तप होय. या चार विशेषणांपैकीं एखादें विशेषण जरी कमी असलें, तरी त्या वाक्यास वाङ्मय तप म्हणतां येणार नाहीं. तसेंच शास्त्रोक्त विधीनें स्वाध्यायाचें आवर्तन करणें, हेंहि वाङ्मय तप आहे. यामध्यें वाणीचें प्राधान्य असतें. ]

मानसतप सांगतात—

मनःप्रसादः सौम्यत्वं मौनमात्मविनिग्रहः ।
भावसंशुद्धिरित्येतत्तपो मानसमुच्यते ॥ १६ ॥

—मनाची अत्यंत शान्ति–प्रसन्नता, त्यांत रागादि दोषराहित्य, हा गुण संपादन करणें, सर्वांचें हितचिंतन करणें, हेंच सौम्यत्व, त्याला ' सौमनस्य ' असेंहि म्हणतात. मुखाच्या प्रसन्नतेवरून अंतःकरणाचा हा धर्म ओळखला जातो. मौन–न बोलण्याविषयीं मनाचा संयम किंवा मुनीचा भाव–मनन, सर्व बाजूंनीं मनाचा निरोध करणें, मनाचा निष्कपटपणा, अशा प्रकारचें तप, मानसतप म्हटलें जातें. [ वाणीचा संयम हा 'मौन'-शब्दाचा खरा अर्थ आहे. पण मानस

तपामध्यें त्याचा संभव नसल्यामुळें त्या मौनाचें कारण जो मनःसंयम, त्याचें येथें ग्रहण करावें लागतें. आत्मविनिग्रह–सामान्यतः सर्व विषयांपासून मनाचा निग्रह व मौन म्ह० वाक्विषयक मनाचाच निग्रह होय. ]

वर तीन श्लोकांत सांगितलेलें शारीर, वाङ्मय व मानस तप सत्त्वादि भेदानें त्रिविध कसें होतें, तें या पुढील तीन श्लोकांनीं सांगितलें जातें—

श्रद्धया परया तप्तं तपस्तत्त्रिविधं नरैः ।
अफलाकाङ्क्षिभिर्युक्तैः सात्त्विकं परिचक्षते ॥ १७ ॥

—फलाची आकांक्षा न करणाऱ्या समाहित चित्त म्ह० सिद्धि-असिद्धी-विषयीं निर्विकार अशा पुरुषांकडून अतिशय श्रद्धेनें केलें जाणारें जें त्रिविध तप, त्यालाच सात्त्विक असें म्हणतात.

सत्कारमानपूजार्थं तपो दम्भेन चैव यत् ।
क्रियते तदिह प्रोक्तं राजसं चलमध्रुवम् ॥ १८ ॥

—जें तप ' हा साधु, तपस्वी ब्राह्मण आहे, ' असें म्हणून लोकांनीं सत्कार करावा यासाठीं, त्यांनीं उठून उभें रहावें, प्रणाम करावा इत्यादि मानासाठीं, पाद-प्रक्षालन, पूजन, भोजन इत्यादि पूजेसाठीं आणि दंभानें–नास्तिक-पणानें केवल आपलें धार्मिकत्व प्रकट करण्यासाठीं, आचरिलें जातें, तें याच लोकीं फल देणारें असल्यामुळें, राजस, चल व त्याचें फल अनियत असल्यामुळें अध्रुव म्हटलें आहे. [ अशा राजस तपाला त्याज्य मानावें. ]

मूढग्राहेणात्मनो यत्पीडया क्रियते तपः ।
परस्योत्सादनार्थं वा तत्तामसमुदाहृतम् ॥ १९ ॥

—जें तप अविवेकयुक्त निश्चयानें स्वतःच्या देहादिकांना पीडा देऊन किंवा दुसऱ्याच्या उत्सादनार्थ–विनाशासाठीं केलें जातें, त्याला तामस म्हटलें आहे.

दातव्यमिति यद्दानं दीयतेऽनुपकारिणे ।
देशे काले च पात्रे च तद्दानं सात्त्विकं स्मृतम् ॥ २० ॥

—'मला हें दान द्यावयाचें आहे. त्याच्या फलादिकांची इच्छा करावयाची नाहीं' अशी भावना करून जें दान अनुपकारी–उलट उपकार करण्यास अस-मर्थ असलेल्या मनुष्याला दिलें जातें, किंवा प्रत्युपकार करण्यास समर्थ अस-लेल्याहि निरपेक्ष–प्रत्युपकाराची अपेक्षा न करतां, कुरुक्षेत्रादि पवित्र प्रदेशीं, संक्रांत्यादि पर्वकालीं व षडंगवेत्ता, षट्शास्त्रज्ञ, वेदपारंगत इत्यादिकांस दिलें जातें, तें दान सात्त्विक म्हटलेलें आहे.

यत्तु प्रत्युपकारार्थं फलमुद्दिश्य वा पुनः ।
दीयते च परिक्लिष्टं तद्दानं राजसं स्मृतम् ॥ २१ ॥

—पण जें दान प्रत्युपकारासाठीं म्ह० प्रसंगीं हा माझ्यावर प्रत्युपकार करील यासाठीं, किंवा ज्या दानाचें अदृष्ट फल मला प्राप्त होईल, अशा फलोद्देशानें व तसेंच परिक्लेशानें म्ह० खेदयुक्त होऊन दिलें जातें, तें राजस दान म्हटलें आहे.

अदेशकाले यद्दानमपात्रेभ्यश्च दीयते ।
असत्कृतमवज्ञातं तत्तामसमुदाहृतम् ॥ २२ ॥

—जें दान अमंगल मनुष्यें व पदार्थ यांचा ज्याच्याशीं संसर्ग झाला आहे, अशा अपवित्र प्रदेशीं, तसेंच अकालीं–पुण्यहेतुत्वानें प्रख्यात नसलेल्या, संक्रान्त्यादि विशेषरहित कालीं आणि सत्पात्र नसलेल्या मूर्ख, चोर इत्यादिकांना, तसेंच देशादि संपत्ति जरी असली म्ह० योग्य देश, काल व पात्र जरी असलें तरी प्रिय भाषण, पादप्रक्षालन, पूजा इत्यादि न करतां अवज्ञेनें सत्पात्राचा तिरस्कार करून जें दान दिलें जातें, त्याला तामस दान म्हटलें जातें.

—यज्ञ, दान, तप इत्यादि विहित कर्मांचें साद्गुण्य संपादन करण्यासाठीं म्ह० त्यांत प्रमादादि कारणानें घडलेल्या वैगुण्याचा परिहार करून, त्यांना सद्गुणसंपन्न करण्यासाठीं हा पुढील उपदेश केला आहे—

ॐ तत्सदिति निर्देशो ब्रह्मणस्त्रिविधः स्मृतः ।
ब्राह्मणास्तेन वेदाश्च यज्ञाश्च विहिताः पुरा ॥ २३ ॥

(३)—'ॐ तत् व सत्' असा हा ब्रह्माचा तीन प्रकारचा नामनिर्देश उपनिषदांमध्यें ब्रह्मवेत्त्यांनीं कल्पिलेला आहे. सृष्टीच्या आरंभीं ब्रह्मदेवानें या त्रिविध नामनिर्देशानें ब्राह्मण, वेद आणि यज्ञ यांना निर्माण केलें. [ यज्ञांत कांहीं वैगुण्य झालें आहे, असा संशय आल्यास या तीन नांवांतील कोणत्याहि नांवाचा उच्चार करावा, म्हणजे त्या वैगुण्याचा परिहार होतो. या श्लोकाच्या उत्तरार्धानें त्रिविध नांवांची स्तुति केली आहे. ]

त्यांतील ' ओं '-चा विनियोग—

तस्मादोमित्युदाहृत्य यज्ञदानतपःक्रियाः ।
प्रवर्तन्ते विधानोक्ताः सततं ब्रह्मवादिनाम् ॥ २४ ॥

—ज्याअर्थी ‘ ओं ’ हा निर्देश ब्राह्मणादिकांचें कारण आणि ब्रह्माचें नांव आहे, त्याअर्थी ‘ ओं ’ असें म्हणून ब्रह्मवाद्यांच्या म्ह० वेदाध्ययन करणें, हें ज्यांचें शीलच आहे, अशा द्विजांच्या शास्त्रविधानोक्त यज्ञ, दान व तप या क्रिया सर्वदा प्रवृत्त होतात.

‘ तत् ’ या निर्देशाचा विनियोग—

तदित्यनभिसंधाय फलं यज्ञतपःक्रियाः ।
दानक्रियाश्च विविधाः क्रियन्ते मोक्षकाङ्क्षिभिः ॥ २५ ॥

—मोक्षाची इच्छा करणाऱ्या लोकांकडून ‘ तत् ’ या ब्रह्माच्या नांवाचा उच्चार करून व फलाची इच्छा न करून नाना प्रकारचीं यज्ञकर्में, तपश्चर्या व दानक्रिया केल्या जातात.

‘ सत् ’-शब्दाचा विनियोग—

सद्भावे साधुभावे च सदित्येतत्प्रयुज्यते ।
प्रशस्ते कर्मणि तथा सच्छब्दः पार्थ युज्यते ॥ २६ ॥

—‘ अस्तित्व ’ या अर्थी व ‘ सद्वृत्तत्व ’ या अर्थी ‘ सत् ’ हें पद योजिलें जातें. त्याचप्रमाणें हे पार्था, विवाहादि प्रशस्त कर्मांमध्यें ‘ सत् ’ हा शब्द योजिला जातो. [ विद्यमान नसलेल्या वस्तूचें अस्तित्व म्ह० न जन्मलेल्या पुत्राचा जन्म या अर्थी, असाधूचें सद्वर्तन म्ह० साधुभाव याअर्थी, विवाहादि प्रशस्त कर्मांमध्यें ‘ सत् ’-शब्द योजितात. ]

यज्ञे तपसि दाने च स्थितिः सदिति चोच्यते ।
कर्म चैव तदर्थीयं सदित्येवाभिधीयते ॥ २७ ॥

—तसेंच, यज्ञ, तप व दान यांमध्यें जी निष्ठा–तत्परतेनें रहाणें, त्याला विद्वान् ‘सत्’ असें म्हणतात. यज्ञ, दान व तप यांसाठीं केलेलें कर्म आणि ईश्वरार्थ केलेलें कर्म यालाहि ‘ सत् ’ असेंच म्हणतात. [ हें यज्ञ-दान-तप इत्यादि कर्म असात्त्विक व गुणरहित जरी असलें, तरी ब्रह्माच्या या तीन नांवांचा श्रद्धापूर्वक उच्चार केल्यानें तें सगुण व सात्त्विक बनतें. ]

ज्याअर्थी त्या सर्व यज्ञादि कर्मांमध्यें श्रद्धेचें प्राधान्य असल्यामुळें तें सर्व यज्ञादि सगुणसंपन्न होतें, त्याअर्थी—

अश्रद्धया हुतं दत्तं तपस्तप्तं कृतं च यत् ।
असदित्युच्यते पार्थ न च तत्प्रेत्य नो इह ॥ २८ ॥

—अश्रद्धेनें केलेलें हवन, अश्रद्धेनें ब्राह्मणांना दिलेलें दान, अश्रद्धेनें केलेलें तप व अश्रद्धेनेंच केलेलीं स्तुति-नमस्कारादि कर्मे हें सर्व असत् म्हटलें जातें. हे पार्था, तें मरणानंतर फलाच्या उपयोगी नाहीं व येथेंहि उपयोगी नाहीं. [ अश्रद्धेनें केलेलें कर्म पुष्कळ आयासांनीं जरी केलेलें असलें, तरी तें परलोकीं फल देण्यास समर्थ होत नाहीं. तें ऐहिक फलाच्याहि उपयोगी नाहीं. कारण साधुलोक श्रद्धारहित कर्मांची निंदा करीत असतात. म्हणून तें व्यर्थ होतें. या अध्यायांत शास्त्राला न जाणणाऱ्या श्रद्धावानांचे त्यांच्या त्यांच्या श्रद्धे-प्रमाणें सात्त्विकादि तीन प्रकार होतात, राजस व तामस आहारादिकांस टाकून सात्त्विक आहारादिकांचें सेवन केल्यानें केवल सत्त्वनिष्ठ झालेल्या आणि सात्त्विक यज्ञादिकांतील वैगुण्य ब्रह्माच्या त्रिविध नामनिर्देशानें घालविणाऱ्या साधकांची चित्तशुद्धि होते. नंतर श्रवणादि साधनांनीं ज्यांना ' तत्त्व '-साक्षात्कार झाला आहे, अशा त्यांचा मोक्ष उपपन्न होतो, असें सांगितलें आहे. ]

( येथें भगवद्गीतेचा श्रद्धात्रयविभागयोग नांवाचा सतरावा अध्याय समाप्त झाला. ) ६. ३. ४१.

---

## अध्याय ४२ वा.

### ( गीताध्याय १८ वा. मोक्षसंन्यासयोग. )

[ १ अर्जुनाचा त्याग व संन्यास यांविषयीं प्रश्न व भगवानांचें त्याविषयीं सविस्तर उत्तर. २ अज्ञकृत कर्मयोग व विद्वत्कृत ज्ञानयोग, त्यांचें प्रयोजन. ३ अज्ञ कर्मठांचा सर्वकर्मत्याग संभवत नाहीं व सर्वकर्मत्यागाचें फल. ४ कर्मांचे पांच हेतु, दुर्मतित्व, सुमतित्व, त्रिविध कर्मचोदना व कर्मसंग्रह. ५ ज्ञान, कर्म, कर्ता, बुद्धि, धृति, व सुख यांचें त्रैविध्य व संसारांतील प्रत्येक पदार्थाचें त्रैविध्य. ६ ब्राह्मणादिकांचे धर्म. ७ स्वकर्मनिरताला सिद्धि मिळण्याचा प्रकार. ८ स्वधर्म श्रेष्ठ, त्याचा अत्याग, संन्यासानें नैष्कर्म्यसिद्धि. ९ चित्तशुद्ध झालेल्या पुरुषाच्या ब्रह्म-प्राप्तीचा प्रकार. १० ब्रह्मभूत झालेल्या पुरुषाला भक्तीनें ब्रह्मरूपत्व. ११ ईश्वर-प्रसादानें शाश्वतपदप्राप्ति, विवेकानें ईश्वरचित्तत्व, त्याचें फल, विपक्षीं दोष. १२ ईश्वराचें हृदयस्थत्व, त्याची शरणता. १३ ज्ञानोपसंहार व उपदेश. १४ संप्र-दायविधि. १५ अर्जुनाचा मोहनाश व ग्रंथसमाप्ति. १६ कथासंदर्भ. ]

सर्वच गीताशास्त्राचा अर्थ या अध्यायांत संक्षेपतः सांगावा व सर्व वेदार्थांचा

उपसंहार करावा, म्हणून हा अध्याय आरंभिला आहे. कारण मागच्या सर्व अध्यायांमध्यें सांगितलेला अर्थ या अध्यायांत ज्ञात होतो. याप्रमाणें सर्व गीतार्थ व सर्व उपनिषदर्थ यांच्या उपसंहारार्थ जरी हा अध्याय असला, तरी त्याच्या आरंभीं संन्यास व त्याग या शब्दांच्याच अर्थांतील फरक जाणण्याच्या इच्छेनें—

अर्जुन उवाच—

संन्यासस्य महाबाहो तत्त्वमिच्छामि वेदितुम् ।
त्यागस्य च हृषीकेश पृथक्केशिनिषूदन ॥ १ ॥

( १ ) अर्जुन म्हणाला—हे महापराक्रमी कृष्णा, मी 'संन्यास' या शब्दाच्या अर्थाचें तत्त्व–यथार्थ स्वरूप जाणण्याची इच्छा करितों आणि हे इंद्रियांच्या ईशा, हे केशिदैत्याला मारणाऱ्या कृष्णा, त्याग या शब्दाच्या अर्थाचें तत्त्व अगदीं निराळें–पृथक्पणें जाणूं इच्छितों.

पूर्वीच्या अध्यायांमध्यें ठिकठिकाणीं ज्यांचा निर्देश केला आहे, अशा 'संन्यास व त्याग' या शब्दांचा अर्थ अगदीं स्पष्टपणें कोठेंच सांगितलेला नाहीं. म्हणून त्या शब्दांचा पृथगर्थ जाणण्याच्या इच्छेनें प्रश्न करणाऱ्या अर्जुनाला त्याचा निर्णय सांगण्यासाठीं—

श्रीभगवानुवाच—

काम्यानां कर्मणां न्यासं संन्यासं कवयो विदुः ।
सर्वकर्मफलत्यागं प्राहुस्त्यागं विचक्षणाः ॥ २ ॥

श्रीकृष्ण म्हणाले—कांहीं विद्वान् स्वर्गादि फलाच्या उद्देशानें विहित असलेल्या अश्वमेधादि काम्य-कर्मांचा त्याग करणें यालाच संन्यास समजतात. दुसरे कित्येक विद्वान् नित्य-नैमित्तिक सर्व कर्मांच्या फलाचा त्याग करणें याला त्याग म्हणतात. [ अर्थात् ' संन्यास व त्याग ' या दोन शब्दांच्या अर्थामध्यें अवान्तर भेद जरी असला तरी आत्यंतिक भेद नाहीं. नित्य-नैमित्तिक कर्मांचें फलच नाहीं, असें कित्येक म्हणतात. पण भगवानांनीं नित्यकर्मांचेंहि फळ मानलेलें आहे. ]

' काम्य कर्मांचा त्याग करून नित्य-नैमित्तिक कर्में फलाभिलाष सोडून करावीं ' हा पूर्वोक्त पक्ष, प्रतिपक्षाचें निरसन करून दृढ करण्यासाठीं वाद्यांचा आणखी मतभेद सांगतात—

त्याज्यं दोषवदित्येके कर्म प्राहुर्मनीषिणः ।
यज्ञदानतपःकर्म न त्याज्यमिति चापरे ॥ ३ ॥

—कांहीं विद्वान् ‘ दोषयुक्त सर्वच कर्म त्याग करण्यास योग्य आहे ’ असें म्हणतात. सर्वच कर्म बंधाला कारण होत असल्यामुळें दोषयुक्त आहे, किंवा सांख्यादिकांच्या मताचा आश्रय केलेले पंडित ‘ रागादि दोष जसा सोडला जातो, त्याप्रमाणें कर्म सोडावें ’ असें म्हणतात. त्या कर्माधिकारी पुरुषाविषयींच ‘ यज्ञ, दान व तप या नित्य-नैमित्तिक कर्मांचा त्याग करूं नये ’ असें कित्येक म्हणतात. या २ ऱ्या व ३ ऱ्या श्लोकांत सांगितलेले हे सर्व विकल्प कर्माधिकारी गृहस्थासाठींच आहेत. पुत्रादि एषणात्रयाविषयीं विरक्त होऊन संन्यास करणाऱ्या ज्ञाननिष्ठासाठीं हे विकल्प नाहींत. कारण संन्याश्यांची ज्ञाननिष्ठा ज्ञानयोगानें अगदीं निराळी सांगितली आहे.

निश्चयं शृणु मे तत्र त्यागे भरतसत्तम ।
त्यागो हि पुरुषव्याघ्र त्रिविधः संप्रकीर्तितः ॥ ४ ॥

—हे भरतश्रेष्ठा अर्जुना, गौणसंन्यासाविषयीं असे हे विकल्प रूढ असल्यामुळें माझ्या सांगण्यावरून तूं त्याग व संन्यास यांच्या विकल्पाविषयीं निश्चय ऐक. कारण हे पुरुषश्रेष्ठा, तो त्याग तामसादि प्रकारांनीं तीनप्रकारचा सांगितलेला आहे. [ अनात्मज्ञ कर्माधिकाऱ्याचा संन्यास व त्याग तामसादि भेदानें तीनप्रकारचा संभवतो व परमार्थदर्शी पुरुषाच्या त्यागाचा असा त्रिविधभेद संभवत नाहीं. म्हणून त्याचा निर्णय करणें, फारच कठिण झालें आहे, त्यामुळें या त्यागाविषयींचा निर्णय सांगण्यास माझ्यावांचून दुसरा कोणी समर्थ नाहीं. म्हणून तूं खऱ्या शास्त्रार्थाविषयींचा निर्णय माझ्याच तोंडून ऐक. ]

यज्ञदानतपःकर्म न त्याज्यं कार्यमेव तत् ।
यज्ञो दानं तपश्चैव पावनानि मनीषिणाम् ॥ ५ ॥

—यज्ञ, दान व तप असें हें त्रिविध कर्म कधींहि टाकूं नये, तर तें अवश्य करावेंच. कारण तीं तीन कम फलाची इच्छा न करणारांना पावन करणारीं आहेत. [ फलाची इच्छा न करतां त्यांचें अनुष्ठान करणारांची चित्तशुद्धि होते. ]

एतान्यपि तु कर्माणि संगं त्यक्त्वा फलानि च ।
कर्तव्यानीति मे पार्थ निश्चितं मतमुत्तमम् ॥ ६ ॥

—पण हे अर्जुना, हीं त्रिविध कर्मेंहि कर्माविषयींच्या आसक्तीला सोडून व त्यांच्या फलाचा परित्याग करून करावीं, असें माझें निश्चित व उत्तम मत

आहे. [ 'त्याविषयींचा माझा निश्चय ऐक ' अशी प्रतिज्ञा करून ' पावनत्व ' हा त्याचा हेतु सांगून ' हीं कर्मे सुद्धां संग व फल सोडून करावीं, असें हें निश्चित व उत्तम मत आहे. ' असा येथें उपसंहार केला आहे. ]

नियतस्य तु संन्यासः कर्मणो नोपपद्यते ।
मोहात्तस्य परित्यागस्तामसः परिकीर्तितः ॥ ७ ॥

—नित्य कर्में अवश्य केलीं पाहिजेत, हें याप्रमाणें सिद्ध झाल्यामुळें अज्ञ अधिकारी मुमुक्षूच्या नित्य कर्मांचा परित्याग तर उत्पन्नच होत नाहीं. कारण तीं कर्में अज्ञ पुरुषाला पावन करणारीं आहेत. पण हें ज्ञान नसल्यामुळें नियत कर्मांचा परित्याग करणें, हा तामस त्याग सांगितला आहे. [ नियतकर्म व त्याचा त्याग हीं दोन्ही परस्पर विरुद्धच आहेत. ]

दुःखमित्येव यत्कर्म कायक्लेशभयात्त्यजेत् ।
स कृत्वा राजसं त्यागं नैव त्यागफलं लभेत् ॥ ८ ॥

—शरीरेंद्रियांना क्लेश होतात, या भीतीनें नित्य कर्म दुःखद आहे, असें मानून त्यांचा त्याग करणें हा ' राजस त्याग ' होय. त्यामुळें ज्ञानपूर्वक केलेला जो ' सर्वकर्मत्याग ' त्याचें मोक्ष हें फल त्याला प्राप्त होत नाहीं. [ तर त्या राजसत्यागाला अनुरूप असें ' नरक ' हेंच फल त्याला मिळतें. ]

कार्यमित्येव यत्कर्म नियतं क्रियतेऽर्जुन ।
सङ्गं त्यक्त्वा फलं चैव स त्यागः सात्त्विको मतः ॥ ९ ॥

—हे अर्जुना, हें नित्यकर्म मला अवश्य कर्तव्य आहे, असें समजूनच त्याच्या स्वरूपाविषयींची आसक्ति व फल सोडून तें करणें हा सात्त्विक त्याग मानलेला आहे. [ नित्य कर्मांतील संग व फल यांचा परित्याग करणें, हाच सात्त्विक त्याग म्हणून भगवानांना अभिमत आहे. या सात्त्विक त्यागांत, राजस व तामस त्यागाप्रमाणें, साक्षात् कर्मत्याग नाहीं. तर नुस्ता फलत्याग आहे व त्यालाच संन्यास म्हटलें आहे. अर्थात् ही फलत्यागाची स्तुति आहे. त्यावांचून कर्मानुष्ठानाला त्याग म्हणणें संभवत नाहीं. ]

पण जो अधिकारी—कर्मठ संग व फलेच्छा टाकून नित्यकर्मांचें आचरण करितो, त्याचें फलेच्छा व कर्मासक्ति यांच्या योगानें कलुषित केलें न जाणारें व नित्य कर्मांच्या योगानें संस्कार केलें जाणारें अंतःकरण विशेष प्रकारें शुद्ध होतें. शुद्ध चित्त आत्म्याचें आलोचन करण्यास समर्थ होतें. याप्रमाणें नित्य

कर्मांच्या अनुष्ठानानें ज्याचें अंतःकरण अत्यंत शुद्ध झालें आहे आणि जो आत्माभिमुख झाला आहे, त्यालाच श्रवणादिकांच्या द्वारा आत्मनिष्ठा कशी प्राप्त होते, तें सांगावें म्हणून भगवान् म्हणतात—

> न द्वेष्ट्यकुशलं कर्म कुशले नानुषज्जते ।
> त्यागी सत्त्वसमाविष्टो मेधावी छिन्नसंशयः ॥ १० ॥

( २ )—' काम्यकर्म जन्मरूप संसारबंधाला कारण होतें, तेव्हां त्याचें अनुष्ठान करून काय करावयाचें आहे ? ' असें म्हणून पुरुष काम्यकर्मांचा द्वेष करीत नाहीं व नित्य कर्म चित्तशुद्धि, ज्ञानोत्पत्ति व ज्ञाननिष्ठा यांच्या द्वारा मोक्षाचें कारण होते, अशा भावनेनें त्यांत मुळींच आसक्त होत नाहीं. तर तो त्यागी–कर्मासक्ति व त्याचें फल, यांचा त्याग करून नित्य कर्मांचें अनुष्ठान करणारा, म्हणून सत्त्वसमाविष्ट म्ह० आत्मा व अनात्मा यांच्या विवेकज्ञानाला कारण होणाऱ्या शुद्धचित्तानें युक्त, त्यामुळें मेधावी म्ह० आत्मयज्ञरूप प्रज्ञेनें युक्त आणि मेधावित्वामुळेंच सर्वसंशयशून्य असा होतो. आत्मस्वरूपावस्थान हेंच सर्वोत्तम मोक्षसाधन आहे, दुसरें कांहीं नाहीं. अशा निश्चयानें त्याचे सर्व संशय गेलेले असतात. [ जो अधिकारी पुरुष त्यागी, सत्त्वसमाविष्ट, मेधावी व छिन्नसंशय असतो, तो अकुशल कर्मांचा द्वेष करीत नाहीं व कुशल कर्मांमध्यें आसक्त होत नाहीं. उलट निष्क्रिय व निर्विकार आत्म्यालाच आत्मत्वानें जाणून, सर्व कर्मांचा मनानें त्याग करून स्वतः कांहींच न करणारा व न करविणारा असा, शरीरांत राहून नैष्कर्म्यरूप ज्ञाननिष्ठेचा अनुभव घेतो, असें पूर्वोक्त कर्मयोगाचें प्रयोजन या श्लोकानें सांगितलें आहे. ' त्यागी० ' इत्यादि चार विशेषणांना उत्तरोत्तर विशेषणाचें कारणत्व आहे व काम्यकर्मांचा द्वेष न करणें व नित्य-नैमित्तिक कर्मांत आसक्त न होणें, हें त्याचें प्रयोजन आहे. ]

पण ' देहच मी '. अशी ज्याची भावना असते, तो ' मीच कर्ता ' असें निश्चयानें जाणतो. अशा अज्ञ देहात्मवादी मनुष्याचा सर्वकर्मत्याग सर्वथा अशक्य आहे, त्याचा कर्मफलत्यागानें विहित कर्मानुष्ठानांतच अधिकार ओह. कर्मांचा त्याग करण्याचा त्याला अधिकार नाहीं, हें या पुढील श्लोकांत सांगतात—

> न हि देहभृता शक्यं त्यक्तुं कर्माण्यशेषतः ।
> यस्तु कर्मफलत्यागी स त्यागीत्यभिधीयते ॥ ११ ॥

( ३ ) —'देहच मी' असा ज्याला अभिमान असतो, तो देहभृत् होय. अशा पुरुषाकडून कर्में निःशेष टाकिलीं जाणें शक्य नाहीं, पण जो अज्ञ कर्माधिकारी नित्य कर्में करीत असतांना त्यांच्या फलेच्छेचा त्याग करतो, तो 'त्यागी' असें म्हटला जातो. [ विवेकी देहभृत् म्हटला जात नाहीं. कारण 'वेदाविनाशिनं नित्यं०' (२–२१) इत्यादि श्लोकांनीं कर्तृत्वाधिकार व तत्पूर्वक कर्मानुष्ठान यांपासून त्याला निवृत्त केलें आहे. यास्तव ज्ञानी देहधारण जरी करीत असला, तरी त्याला 'देहच मी' असा अभिमान नसल्यामुळें, देहभृताकडून–देहाभिमानी अज्ञाकडून कर्में निःशेष टाकलीं जात नाहींत. म्हणून जो अज्ञ कर्माधिकारी नित्य कर्में करीत असतांना त्यांच्या फलेच्छेचा त्याग करितो, तो 'त्यागी' होय. तो वस्तुतः कर्मानुष्ठान जरी करीत असला, तरी 'फलत्याग' या गुणामुळें त्याच्या फलत्यागाची स्तुति करण्याच्या आशयानें भगवान् त्याला 'त्यागी' म्हणतात. खरा सर्वकर्मत्याग परमार्थदर्शी, विवेक-वैराग्यादिमान् व अदेहभृत् म्ह० देहाभिमानशून्य ज्ञानीच करूं शकतो–त्यालाच सर्वकर्मसंन्यास करतां येतो. ] सर्वकर्मपरित्यागापासून कोणतें फल प्राप्त होतें, तें सांगतात—

> अनिष्टमिष्टं मिश्रं च त्रिविधं कर्मणः फलम् ।
> भवत्यत्यागिनां प्रेत्य न तु संन्यासिनां क्वचित् ॥ १२ ॥

—नरक-पश्वादि तिर्यक् इत्यादि योनि प्राप्त होणें हें अनिष्ट, देवादि-योनिप्राप्तिरूप इष्ट व मनुष्ययोनिप्राप्तिरूप मिश्र–इष्टानिष्ट, असें धर्माधर्मरूप कर्मांचें त्रिविध फल त्याग न करणारांना मेल्यावर प्राप्त होतें. पण परमार्थ संन्याश्यांना मात्र तसें फल कधींच प्राप्त होत नाहीं. [पूर्वोक्त स्वरूपाचें त्रिविध फल जे अत्यागी–अज्ञ–कर्मी–अमुख्य संन्यासी असतात, त्यांनाच मरणोत्तर मिळतें. ]

अज्ञानामुळें आत्म्यावर क्रिया-कारक व फल यांचा आरोप केला जातो, त्यामुळें आत्मा सर्व क्रिया-कारक-फलशून्य, सच्चिद्घनस्वरूप आहे, असें जाणणाऱ्या ज्ञानी पुरुषाचाच सर्वकर्मसंन्यास संभवतो. अधिष्ठानादि क्रिया करणारीं कारकेंच मी–शरीरादिकच मी असें समजणाऱ्या अज्ञाचा सर्वकर्मसंन्यास संभवतच नाहीं, असें भगवान् पुढील चार श्लोकांनीं दाखवितात—

> पञ्चैमानि महाबाहो कारणानि निबोध मे ।
> सांख्ये कृतान्ते प्रोक्तानि सिद्धये सर्वकर्मणाम् ॥ १३ ॥

( ४ )—हे महापराक्रमी अर्जुना, सर्व कर्मांच्या सिद्धीसाठीं मीं सांगत असलेलीं हीं पांच कारणें–क्रिया करणारीं साधनें तूं लक्षपूर्वक ऐक. कर्मांची ज्यांत परिसमाप्ति होते, त्या सांख्य–वेदान्तशास्त्रांत हीं पांच कारणें सर्व कर्मांच्या सिद्धीसाठीं सांगितलीं आहेत. [ त्यांना जाणणें अत्यंत अवश्य आहे. हें अर्जुनाच्या मनावर ठसविण्यासाठीं भगवानांनीं या उत्तरार्धानें त्यांची स्तुति केली आहे. कर्मांची ज्यांत परिसमाप्ति होते, तें सांख्य म्ह० वेदान्त होय. 'सांख्य' शब्दाचा अर्थ वेदान्त असाच कां करावयाचा तें आमच्या गीता-भाष्यार्थांत पृ. ११५०–५३ येथें पहा. ]

आतां तीं पांच कारणें कोणतीं तें सांगतात—

अधिष्ठानं तथा कर्ता करणं च पृथग्विधम् ।
विविधाश्च पृथक्चेष्टा दैवं चैवात्र पञ्चमम् ॥ १४ ॥

—अधिष्ठान म्ह० इच्छा, द्वेष, सुख, दुःख, ज्ञान इत्यादिकांच्या अभिव्यक्तीचा आश्रय-शरीर; २ तसाच उपाधिलक्षण–अंतःकरणरूप उपाधि, हाच ज्याचा स्वभाव आहे, असा भोक्ता; ३ पांच ज्ञानेंद्रियें, पांच कर्मेंद्रियें, मन व बुद्धि असे नाना प्रकारचें इंद्रियजात; ४ वायूच्या श्वासोच्छ्वासादि विविध चेष्टा–क्रिया; ५ चक्षुरादि इंद्रियांवर अनुग्रह करणारें आदित्यादि देवताजात–दैव, अशीं पांच कारणें सर्व कर्मांच्या निष्पत्तीसाठीं वेदान्तशास्त्रांत सांगितलीं आहेत.

आतां हीं पांच कारणें सर्व कर्मांच्या सिद्धीसाठीं कशीं आहेत, तेंच सांगतात—

शरीरवाङ्मनोभिर्यत्कर्म प्रारभते नरः ।
न्याय्यं वा विपरीतं वा पञ्चैते तस्य हेतवः ॥ १५ ॥

—पुरुष शरीर, वाणी व मन या तीन साधनांनीं जीं शास्त्रीय–विहित–धर्म्य, किंवा निषिद्ध–अधर्म्य कर्में आरंभितो, किंवा डोळ्यांची उघड-झांप, श्वासोच्छ्वास, पहाणें, ऐकणें इत्यादि स्वाभाविक कर्में करतो, त्या सर्वांचीं हीं अधिष्ठानादि पांच कारणें आहेत. [ कारण स्वाभाविक कर्मेंहि पूर्वीं केलेल्या धर्माधर्मांचेंच कार्य आहे. यास्तव न्याय्य व विपरीत यांच्या बरोबर त्यांचेंहि ग्रहण करणें योग्यच आहे. ]

याप्रमाणें अधिष्ठानादिकांना क्रिया-कर्तृत्व आहे, असें सांगून अज्ञ त्यामध्यें आत्मदृष्टि ठेवतो, या गोष्टीचा अनुवाद करितात—

तत्रैवं सति कर्तारमात्मानं केवलं तु यः ।
पश्यत्यकृतबुद्धित्वान्न स पश्यति दुर्मतिः ॥ १६ ॥

—याप्रमाणें अधिष्ठानादि पांच हेतूंनीं कोणतेंहि कर्म घडत असतांना, त्या अधिष्ठानादिकांमध्यें अज्ञानानें आत्म्याचा आरोप करून अधिष्ठानादिकांकडून केल्या जाणाऱ्या कर्मांचा मीच कर्ता आहें, असें जो समजतो, तो दुर्बुद्धि होय. शुद्ध, निर्विकार व निष्क्रिय आत्म्यालाच जो अविद्वान् वेदान्तपूर्वक आचार्यांचा उपदेश व तदनुसारी न्याय, यांच्या योगानें बुद्धीला संस्कार झालेलें नसल्या-मुळेंच कर्ता मानतो, तो मूढ बुद्धि होय. [ असंस्कृत बुद्धित्वामुळेंच तो ' निर्वि-कारत्व ' हें आत्म्याचें तत्त्व आणि अविद्याकृत अधिष्ठानादिकांकडून निष्पन्न होणें, आत्म्याशीं त्याचा कांहीं संबंध नसणें, हें कर्मांचें तत्त्व जाणत नाहीं. त्यामुळेंच त्याची मति जन्म-मरणांच्या प्राप्तीला कारण होणारी असते. हेंच त्याचें दुर्मतित्व होय. ज्याप्रमाणें अज्ञ पुरुष ' ढग धांवत असतांना चंद्र धांवत आहे ' असें समजतो, किंवा पालखी, मेणा, रथ इत्यादि वहानांत बसलेला मनुष्य, त्यांचे वाहक–भोयी, अश्व धांवत असतांना 'मीच धांवत आहें' असा अविवेकामुळें अभिमान धरतो, त्याप्रमाणें अधिष्ठानादिक–शरीरेंद्रिया-दिक क्रिया करीत असतांना त्यांतील आत्माच क्रिया करणारा आहे, असें जो समजतो, तो दुर्मति होय. असा याचा भावार्थ. ]

'आत्म्याला कर्ता मानणारा विपरीतदृष्टि पुरुष जर दुर्मति तर सुमति कोण ?' असें अर्जुन विचारील, म्हणून भगवान् ' जो सम्यक्–यथार्थ जाणतो, तो सुमति, असें उत्तर सांगतात—

यस्य नाहंकृतो भावो बुद्धिर्यस्य न लिप्यते ।
हत्वापि स इमाँल्लोकान्न हन्ति न निबध्यते ॥ १७ ॥

—शास्त्र, शास्त्रानुसार आचार्योपदेश व तदनुसार न्याय यांनीं ज्याच्या अंतःकरणाला संस्कार झालेला आहे, अशा ज्याला अहंकृतभाव–' मी करतों ' हा अभिमान नसतो, तर आत्म्याच्या ठिकाणीं अज्ञानानें कल्पिलेले हे अधि-ष्ठानादिकच सर्व कर्मांचे कर्ते आहेत, मी नव्हे. मी त्यांच्या व्यापारांचा साक्षिभूत केवल निरुपाधिक, ज्ञान-क्रिया-शक्तिरहित, जन्मादि-विक्रियाशून्य आहें, असें जाणतो व ज्याची उपाधिभूत बुद्धि ' मीं हें केलें, त्यामुळें नर-काला जाईन ' अशा पश्चात्तापानें युक्त होत नाहीं, तो सर्व प्राण्यांना मारून

सुद्धां मारीत नाहीं, हननक्रिया करीत नाहीं व अधर्मफलाशीं संबद्ध होत नाहीं, [शास्त्राच्या आरंभीं 'हा मारीत नाहीं व मारला जात नाहीं. (२–१९) अशी प्रतिज्ञा करून ' न जायते म्रियते० ' ( २–२० ) इत्यादि हेतु-बोधक वचनांनीं आत्म्याचें अविक्रियत्व सांगून ' वेदाविनाशिनं० ' (२–२१) या वचनानें विद्वानाच्या कर्माधिकाराची निवृत्ति सांगितली. मध्यें ठिक-ठिकाणीं प्रसंग आणून तिचाच विस्तार केला आणि आतां येथें शास्त्रा-र्थाचा उपसंहार केला जात आहे. कर्म शरीरादिकांकडून होतें, तें आत्म्याचें नव्हे. अविद्वानालाच कर्माचा अधिकार आहे. कारण त्याला देहाभिमान असल्यामुळेंच त्याच्या त्यागाचा असंभव आहे. पण विद्वानाच्या ठिकाणीं देहा-भिमान नसल्यामुळें त्याच्या कर्माधिकाराची निवृत्ति होते. या गीताशास्त्राच्या संक्षिप्त अर्थाचा येथें उपसंहार केला आहे आणि हा गीतार्थ म्ह० वेदार्थच असल्यामुळें तोच सर्वथा ग्राह्य आहे. ]

आतां कर्माचें प्रवर्तक सांगतात—

ज्ञानं ज्ञेयं परिज्ञाता त्रिविधा कर्मचोदना ।
करणं कर्म कर्तेति त्रिविधः कर्मसंग्रहः ॥ १८ ॥

—सर्व विषयांविषयींचें सर्व प्रकारचें ज्ञान, सर्व प्रकारचें ज्ञेय–जाणण्यास योग्य असलेले पदार्थ व उपाधिलक्षण अविद्याकल्पित मिथ्या भोक्ता, असें हें त्रय सर्व कर्मांचें प्रवर्तक आहे, तसेंच ज्याच्या योगानें कर्म केलें जातें, तें श्रोत्रादि बाह्य व बुद्धयादि अंतस्थ इंद्रियजात, कर्त्याला प्राप्त करून घेण्यास अत्यंत इष्ट असलेलें वस्तुजात व करणांकडून व्यापार करविणारा उपाधिलक्षण कर्ता, असा हा त्रिविध कर्मसंग्रह आहे. [ ज्ञानादि तीन कारणें एकत्र जमलीं असतां सर्व कर्मांचा आरंभ होतो व करणादि तीन कारकांच्या आश्रयानें कर्म रहातें. ]

सर्व क्रिया, कारक व फल यांना गुणात्मकत्व असल्यामुळें सत्त्वादि तीन गुणांनीं क्रियादिकांचा त्रिविध भेद सांगावा म्हणून पुढील प्रकरण आरंभितात—

ज्ञानं कर्म च कर्ता च त्रिधैव गुणभेदतः ।
प्रोच्यते गुणसंख्याने यथावच्छृणु तान्यपि ॥ १९ ॥

( ५ )—गुणांची गणना ज्यांत केली आहे, त्या कपिलाच्या सांख्यशास्त्रांत ज्ञान, कर्म–क्रिया व कर्ता हे सत्त्वादि गुणांच्या भेदामुळें तीनप्रकारचे सांगि-

तले जातात. यास्तव त्या ज्ञानादिकांचे तीन प्रकार तूं यथाशास्त्र ऐक. [ तें गुणसंख्यान—सांख्यशास्त्रहि परमार्थ ब्रह्मात्मैकत्व विषयामध्यें जरी विरुद्ध आहे, तरी गुण व भोक्ते यांविषयीं प्रमाणच आहे व एका शास्त्राच्या सिद्धान्ताशीं विरुद्ध नसलेल्या दुसऱ्या शास्त्राच्या सिद्धान्ताचा प्रमाणत्वानें उल्लेख करणें, यांत दोष कांहींच नाहीं. उलट गुण आहे. त्यामुळें स्वसिद्धान्ताला अधिक बळकटी येते. यास्तव त्या ज्ञानादिकांचे त्रिविध भेदहि तूं ऐक. ]

अगोदर ज्ञानाचा त्रिविध भेद सांगण्यासाठीं पुढील श्लोक आरंभितात—

सर्वभूतेषु येनैकं भावमव्ययमीक्षते ।
अविभक्तं विभक्तेषु तज्ज्ञानं विद्धि सात्त्विकम् ॥ २० ॥

—पुरुष ज्या ज्ञानानें अगदीं भिन्न भिन्न असलेल्या अव्यक्तापासून स्थावरापर्यंत शरीरेंद्रियसंघातरूप सर्व भूतांमध्यें एक अभिन्न आत्मवस्तु पहातो, तें अद्वैत आत्मदर्शन सात्त्विक ज्ञान आहे, असें तूं जाण. [भिन्न भिन्न असंख्य शरीरांत एक कूटस्थ नित्य आत्म्याला पहाणें हेंच सम्यग्दर्शन आहे. त्यामुळेंच संसारनिवृत्ति होते. ]

पृथक्त्वेन तु यज्ज्ञानं नानाभावान्पृथग्विधान् ।
वेत्ति सर्वेषु भूतेषु तज्ज्ञानं विद्धि राजसम् ॥ २१ ॥

—परंतु पुरुष ज्या ज्ञानानें सर्व भूतांमध्यें निरनिराळ्या स्वरूपाच्या नानाभावांस—अनेक आत्म्यास पहातो, त्या ज्ञानाला तूं राजस जाण. [ तें ज्ञान रजोगुणापासून झालेलें आहे, असें तूं समज. येथें मूळ श्लोकांत 'यज्ज्ञानं नानाभावान् वेत्ति' असें म्हटलें आहे. पण ज्ञान स्वतः जाणूं शकत नाहीं. म्हणून पुरुष ज्या ज्ञानानें नानाभावास पहातो, असा त्याचा अर्थ केला आहे. ]

यत्तु कृत्स्नवदेकस्मिन्कार्ये सक्तमहैतुकम् ।
अतत्त्वार्थवदल्पं च तत्तामसमुदाहृतम् ॥ २२ ॥

—पण जें ज्ञान एका कार्यामध्यें म्ह० देहामध्यें किंवा बाह्य प्रतिमेमध्यें सर्व ज्ञानाप्रमाणें आसक्त असलेलें—आत्मा किंवा ईश्वर काय तो एवढाच, याच्या पलीकडे नाहीं, असें एका कार्यामध्यें आसक्त असलेलें, समस्तविषयक, युक्तिशून्य, तत्त्वार्थरहित व त्यामुळेंच अगदीं अल्प ज्ञान, तें तामस असें म्हटलें आहे. [ दिगंबर जैनादिकांचा शरीरानुवर्ती व शरीराचें जें प्रमाण, त्याच प्रमाणाचा जीव, किंवा केवल पाषाण, काष्ठ, हेंच ज्याचें स्वरूप आहे,

असा ईश्वर आहे. इत्यादि जें युक्तिशून्य, तत्त्वार्थरहित, अल्पविषय व अल्पफल ज्ञान तें तामस होय. अविवेकी प्राण्यांचें ज्ञान अशाच प्रकारचें असतें. ]

आतां कर्माचें त्रिविधत्व सांगण्यास आरंभ करून त्यांतील सात्त्विक कर्म कोणतें, तें सांगतात—

नियतं संगरहितमरागद्वेषतः कृतम् ।
अफलप्रेप्सुना कर्म यत्तत्सात्त्विकमुच्यते ॥ २३ ॥

'या कर्माचें फल मला मिळावें' अशी इच्छा न करणाऱ्या पुरुषांकडून जें नित्य आसक्तिरहित व राग-द्वेषप्रेरित न होतां केलेलें कर्म, तें सात्त्विक कर्म म्हटलें जातें.

यत्तु कामेप्सुना कर्म साहंकारेण वा पुनः ।
क्रियते बहुलायासं तद्राजसमुदाहृतम् ॥ २४ ॥

—पण याच्या उलट या कर्माचें फल आपल्याला मिळावें अशी इच्छा करणाऱ्या पुरुषाकडून, किंवा 'मी' अशा अहंकारानें युक्त असलेल्या पुरुषाकडून पुष्कळ आयासानें जें कर्म केलें जातें त्याला 'राजस कर्म' म्हणतात.

अनुबन्धं क्षयं हिंसामनपेक्ष्य च पौरुषम् ।
मोहादारभ्यते कर्म यत्तत्तामसमुच्यते ॥ २५ ॥

—कर्म केल्यावर त्याच्यापासून होणारा जो परिणाम, तो अनुबंध, तें करीत असतांना होणारा शक्तिक्षय व धनक्षय, त्या कर्मामुळें होणारी हिंसा—प्राणिपीडा व 'मी हें कर्म करूं शकतों' अशाप्रकारचें आत्मसामर्थ्य. यांचा विचार न करतां जें कर्म अविवेकानें आरंभिलें जातें, त्याला तामस म्हटलें आहे.

आतां यापुढील तीन श्लोकांनीं क्रमानें सात्त्विक, राजस व तामस कर्ता सांगतात—

मुक्तसंगोऽनहंवादी धृत्युत्साहसमन्वितः ।
सिद्ध्यसिद्ध्योर्निर्विकारः कर्ता सात्त्विक उच्यते ॥ २६ ॥

—ज्यानें फलासक्तीचा त्याग केला आहे, 'मी' असें म्हणण्याचें ज्याचें शील नाहीं, जो धैर्य व उद्यम यांनीं युक्त आहे आणि केल्या जाणाऱ्या कर्माची फलसिद्धि होणें ही सिद्धि व फल न मिळणें ही असिद्धि, यांविषयीं जो निर्विकार असतो, त्याला सात्त्विक कर्ता म्हणतात. [ जो केवल शास्त्रप्रमाणानेंच

प्रेरित झालेला असतो आणि फलासक्ति व कर्मासक्ति यांनीं प्रेरित झालेला नसतो, तो निर्विकार होय. ]

रागी कर्मफलप्रेप्सुर्लुब्धो हिंसात्मकोऽशुचिः ।
हर्षशोकान्वितः कर्ता राजसः परकीर्तितः ॥ २७ ॥

—पण याच्या उलट, ज्याला कर्मासक्ति आहे, कर्मांचें फल मिळावें, अशी इच्छा आहे, परद्रव्याविषयीं तृष्णा आहे, व जो योग्य स्थानीं—सत्पात्रीं आपल्या द्रव्याचा त्याग करीत नाहीं, दुसऱ्याला पीडा देण्याचाच ज्याचा स्वभाव आहे, जो द्विविध शौचरहित आहे, जो इष्टप्राप्ति झाली असतां हर्ष मानतो व अनिष्टप्राप्ति किंवा इष्टवियोग झाला असतां शोक करतो, तो ' राजस कर्ता ' म्हटला आहे.

अयुक्तः प्राकृतः स्तब्धः शठो नैष्कृतिकोऽलसः ।
विषादी दीर्घसूत्री च कर्ता तामस उच्यते ॥ २८ ॥

—ज्याचें चित्त समाहित नसतें, जो अत्यंत असंस्कृत—मूर्खासारखा असतो, कोणापुढेंहि नम्र न होणारा, मोठा मायावी, दुसऱ्याच्या वृत्तीचा छेद करणारा, आळशी, आपल्या कर्तव्यांतहि प्रवृत्त न होणारा, नेहमीं उद्विग्न असलेला व अतिशय चेंगट—एका दिवसांत होणाऱ्या कामाला एक महिना लावणारा, तो तामसकर्ता म्हटला जातो.

बुद्धेर्भेदं धृतेश्चैव गुणतस्त्रिविधं शृणु ।
प्रोच्यमानमशेषेण पृथक्त्वेन धनंजय ॥ २९ ॥

—हे पार्था, माझ्याकडून निःशेषतः सांगितल्या जाणाऱ्या व गुणांमुळें होणाऱ्या बुद्धीच्या आणि धृतीच्या तीन प्रकारच्या भेदाला तूं विवेकतः ऐक. [ अर्जुनानें दिग्विजयाच्या वेळीं मनुष्यांचें व देवांचें पुष्कळ धन जिंकिलें होतें, म्हणून त्याला धनंजय म्हटलें आहे. या श्लोकांत बुद्धि व धृति यांचे भेद सांगण्याची प्रतिज्ञा केली आहे. ]

या पुढील तीन श्लोकांत क्रमानें त्रिविध बुद्धि सांगतात—

प्रवृत्तिं च निवृत्तिं च कार्याकार्ये भयाभये ।
बन्धं मोक्षं च या वेत्ति बुद्धिः सा पार्थ सात्त्विकी ॥ ३० ॥

—हे अर्जुना, जी बुद्धि प्रवृत्ति म्ह० प्रवर्तन—बंधाला कारण होणारा कर्ममार्ग व निवृत्ति म्ह० मोक्षाला कारण होणारा संन्यासमार्ग, विहित कर्तव्य

च निषिद्ध अकर्तव्य, भय व अभय म्ह० अनिष्टसाधन व इष्टसाधन, कारणासह बंध व मोक्ष यांस जाणते, ती सात्त्विकी बुद्धि होय. [ याच वाक्यांत बंध व मोक्ष यांचा उल्लेख असल्यामुळें प्रवृत्ति-कर्ममार्ग व निवृत्ति-संन्यासमार्ग असाच अर्थ केला पाहिजे. वर ( श्लो. २०-२२ ) ज्ञानाचे तीन भेद सांगितले आहेत, पण तें ज्ञान ही बुद्धीची-अंतःकरणाची एक वृत्ति आहे व येथें बुद्धीचे तीन भेद सांगत आहेत. ही बुद्धि म्ह० अनेक वृत्तींचा आश्रय असें अंतःकरणच होय. पुढें सांगितलेली धृतिहि या अंतःकरणाची एक वृत्तिच आहे. ]

यया धर्ममधर्मं च कार्यं चाकार्यमेव च ।
अयथावत्प्रजानाति बुद्धिः सा पार्थ राजसी ॥ ३१ ॥

—हे अर्जुना, पुरुष ज्या बुद्धीच्या योगानें धर्म, अधर्म आणि कर्तव्य व अकर्तव्य यांस सर्व प्रकारें निर्णय रूपानें नव्हे, तर अनिर्णय रूपानें जाणतो, ती बुद्धि ' राजसी ' होय.

अधर्मं धर्ममिति या मन्यते तमसावृता ।
सर्वार्थान्विपरीतांश्च बुद्धिः सा तामसी मता ॥ ३२ ॥

—जी अविवेकानें आवृत्त झालेली बुद्धि अधर्माला धर्म समजते, किंबहुना कार्य, अकार्य इत्यादि सर्वच ज्ञेय पदार्थांना विपरीत-अगदीं उलट समजते, ती तामसी बुद्धि होय.

आतां धृतीचेच तीन भेद सांगतात—

धृत्या यया धारयते मनःप्राणेन्द्रियक्रियाः ।
योगेनाव्यभिचारिण्या धृतिः सा पार्थ सात्त्विकी ॥ ३३ ॥

—समाधियोगाशीं अव्यभिचारिणी-ब्रह्मामध्यें जें चित्ताचें ऐकाग्र्य त्याला क्षणभरहि न सोडणारी जी धृति, तिच्या योगानें पुरुष मन, प्राण व इंद्रियें यांच्या क्रियांना अशास्त्रीय मार्गानें होणाऱ्या प्रवृत्तीपासून धारण करितो, त्या धृतीला सात्त्विकी धृति म्हणतात. [ धृति म्ह० एक प्रकारचा मानसयत्न. तिच्याकडून धारण केले जाणारे लोक शास्त्राचें उल्लंघन करीत नाहींत. त्यांचें सर्व वर्तन शास्त्रानुसार होतें. ]

यया तु धर्मकामार्थान्धृत्या धारयतेऽर्जुन ।
प्रसङ्गेन फलाकाङ्क्षी धृतिः सा पार्थ राजसी ॥ ३४ ॥

—परंतु हे अर्जुना, पुरुष ज्या धृतीच्या योगानें धर्म, काम व अर्थ, यांना धारण करितो, ते तीन पुरुषार्थ नित्यकर्तव्यरूप आहेत, असा आपल्या मनांत निश्चय करतो व ज्या ज्या धर्मादिकांच्या धारणेचा प्रसंग असतो, त्या त्या प्रसंगानें फलाची आकांक्षा करितो, ती धृति राजसी होय.

यया स्वप्नं भयं शोकं विषादं मदमेव च ।
न विमुञ्चति दुर्मेधा धृतिः सा पार्थ तामसी ॥ ३५ ॥

—दुर्बुद्धि पुरुष ज्या धृतीच्या योगानें निद्रा, भय–त्रास, शोक, इष्टवियोगजन्य संताप, विषाद-निरुत्साह, विषयसेवन हाच मोठा पुरुषार्थ आहे, असा दुरभिमान, यांना सोडीत नाहीं ती तामसी धृति होय.

सत्त्वादि गुणांच्या योगानें होणारा क्रिया व कारकें यांचा त्रिविध भेद सांगितला. आतां फलाचा–सुखाचा त्रिविध भेद सांगतात—

सुखं त्विदानीं त्रिविधं शृणु मे भरतर्षभ ।
अभ्यासाद्रमते यत्र दुःखान्तं च निगच्छति ॥ ३६ ॥

—हे भरतश्रेष्ठा, पण आतां प्राणी ज्या सुखानुभवांत अभ्यासामुळें–परिचयामुळें रममाण होतो, व दुःखाच्या शांतीला निश्चयानें प्राप्त होतो तें त्रिविध सुख माझ्या तोंडून तूं ऐक.

यत्तदग्रे विषमिव परिणामेऽमृतोपमम् ।
तत्सुखं सात्त्विकं प्रोक्तमात्मबुद्धिप्रसादजम् ॥ ३७ ॥

—जें सुख ज्ञान-वैराग्य-ध्यान-समाधि यांच्या आरंभाच्या वेळीं अत्यंत आयासपूर्वक संपादन करावें लागत असल्यामुळें विषाप्रमाणें दुःखात्मक असतें, पण परिणामीं–ज्ञान-वैराग्यादिकांच्या परिपाकावस्थेंत त्यांच्या परिपक्वतेमुळेंच होत असल्यामुळें अमृतासारखेंच असतें, तें आत्मविषयक बुद्धीच्या प्रसादापासून झालेलें सुख सात्त्विक होय. [ आत्मा जिचा विषय आहे, ती आत्मविषयक बुद्धि, किंवा आत्मा हेंच जिचें आलंबन आहे, ती आत्मबुद्धि. तिच्या निर्मूलतेमुळें, किंवा ज्ञानाच्या आधिक्यामुळें उत्पन्न झाल्या कारणानें तें सुख सात्त्विक होय. ]

विषयेन्द्रियसंयोगाद्यत्तदग्रेऽमृतोपमम् ।
परिणामे विषमिव तत्सुखं राजसं स्मृतम् ॥ ३८ ॥

—जें सुख विषय व इंद्रियें यांच्या संयोगापासून होतें. आणि पहिल्या क्षणीं अमृतासारखें व परिणामीं—त्यांच्या उपभोगाचा विपरिणाम झाला असतां विषासारखें वाटतें, तें सुख राजस म्हटलें जातें. [ कारण तें शरीर सामर्थ्य, पराक्रमामुळें प्राप्त होणारें यश, शरीरसौंदर्य, बुद्धीची ग्रहणशक्ति, धारणाशक्ति, धन, उत्साह, यांच्या क्षयाला व अधर्म व त्यापासून उत्पन्न झालेलें नरकादिक यांना कारण होतें. ]

यदग्रे चानुबन्धे च सुखं मोहनमात्मनः ।
निद्रालस्यप्रमादोत्थं तत्तामसमुदाहृतम् ॥ ३९ ॥

—जें सुख आरंभीं व त्या सुखाचा उपभोग घेऊन झाल्यानंतर आत्म्याला—जीवाला मोह पाडतें आणि निद्रा, आलस्य व प्रमाद यांपासून उत्पन्न होतें, तें तामस सुख म्हटलें आहे.

—याप्रमाणें क्रिया-कारक-फलरूप संसाराचें सात्विकादि भेदानें प्रत्येकीं त्रिविधत्व सांगून संसारामध्यें अंतर्भूत होणारें एखादें तरी कांहीं त्रिगुणानें रहित असेल, अशी कोणी शंका घेईल म्हणून व प्रकरणाच्या उपसंहारार्थ हा श्लोक आरंभिला जातो—

न तदस्ति पृथिव्यां वा दिवि देवेषु वा पुनः ।
सत्त्वं प्रकृतिजैर्मुक्तं यदेभिः स्यात्त्रिभिर्गुणैः ॥ ४० ॥

—पृथ्वीमध्यें मनुष्यादि प्राणिजात किंवा अप्राणिजात अर्थात् चराचर किंवा स्वर्गांत देवामध्यें, प्रकृतीपासून झालेल्या या सत्त्वादि तीन गुणांनीं रहित असें कोणतेंच सत्त्व नाहीं. [ आब्रह्म-स्तंबपर्यंत भूतांतील एकहि प्राणी—वस्तु गुणरहित नाहीं. ]

१९ व्या श्लोकापासून ४० व्या श्लोकापर्यंत सर्व संसार क्रिया-कारक-फलरूप आणि त्रिगुणात्मक आहे. तो अविद्याकल्पित आहे. तो समूळ अविद्येसह अनर्थरूप आहे, असें सांगितलें. अर्थात् तो अनेकरूप, आत्म्याहून विलक्षण व अविद्या कल्पित असल्यामुळें अविद्येसह मिथ्या आहे. त्यामुळेंच त्याज्य आहे. १५ व्या अध्यायांत वृक्षरूपककल्पनेनेंहि त्याचेंच वर्णन केलें आहे व 'दृढ असंग शस्त्रानें त्याला तोडून परमपदाला जाणावें' असेंहि त्या संसाराच्या नाशाचें कारण सांगितलें आहे. तेव्हां अशा या अनर्थकर संसाराची निवृत्ति कशी होईल, तें सांगावें. म्हणजे स्वधर्मानुष्ठानानें चित्तशुद्धीच्या द्वारा तत्त्वज्ञान

होऊन अज्ञानात्मक गुणांची निवृत्ति होते, असें सांगावें. त्यासाठीं स्वधर्म सांगावा, सर्व गीताशास्त्रार्थाचा उपसंहार करावा आणि सर्व वेद व स्मृति यांचा प्रतिपाद्य अर्थ कायतो एवढाच असून पुरुषार्थेच्छूंनीं त्याचें अनुष्ठान करावें, म्हणून यापुढील प्रकरण आरंभिलें जातें.

ब्राह्मणक्षत्रियविशां शूद्राणां च परंतप ।
कर्माणि प्रविभक्तानि स्वभावप्रभवैर्गुणैः ॥ ४१ ॥

( ६ )—हे अर्जुना, स्वभाव म्ह० ईश्वराची प्रकृति, त्रिगुणात्मिका माया, तिच्यापासून झालेल्या सत्त्व, रज व तम या गुणांच्या अनुरोधानें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र, यांचीं शमादिक कर्में विभागलीं आहेत. किंवा ब्राह्मण स्वभावाचा सत्त्वगुण प्रभव म्ह० कारण आहे. सत्त्वगुण ज्यांत अमुख्य आहे असा रजोगुण क्षत्रियस्वभावाचें कारण आहे. तमोगुण ज्यांत गौण आहे, असा रजोगुण वैश्यस्वभावाचें कारण आहे. रजोगुण ज्यांत अप्रधान आहे असा तमोगुण शूद्रस्वभावाचें कारण आहे, ब्राह्मणादि चारी वर्णांमध्यें, अत्यंत शांति, ऐश्वर्य व मूढता हीं त्या त्या गुणांचीं कार्यें दिसतात. त्यावरून अशी व्यवस्था करणें अयोग्य नाहीं. किंवा स्वभाव म्ह० प्राण्यांचा या जन्मीं कार्योन्मुख होऊन अभिव्यक्त झालेला, पूर्वजन्मांतील संस्कार, अशा स्वभावप्रभव गुणांनीं आपापल्या कार्यांच्या अनुसार शमादि कर्मांचा पृथक् विभाग केला आहे. शास्त्रानें ब्राह्मणादिकांच्या शमादि कर्मांचें जें विधान केलें आहे, तेंहि सत्त्वादिकांच्या अपेक्षेनेंच आहे. त्यामुळें त्याचा येथील प्रतिपादनाशीं कांहीं विरोध येत नाहीं.

आतां तीं कर्में कोणतीं तेंच पुढील तीन श्लोकांत सांगतात—

शमो दमस्तपः शौचं क्षान्तिरार्जवमेव च ।
ज्ञानं विज्ञानमास्तिक्यं ब्रह्मकर्म स्वभावजम् ॥ ४२ ॥

—अंतःकरणाची शांति, बाह्येंद्रियांचा निग्रह, १७ व्या अध्यायांत सांगितलेलें त्रिविध तप, अंतःशुद्धि व बहिःशुद्धि, क्षमा, अंतःकरणाचा सरळपणा, आत्मादि पदार्थांचें ज्ञान, शास्त्रार्थाचा अनुभव, श्रद्धालुत्व हें ब्राह्मण जातीचें स्वभावजन्य कर्म आहे.

शौर्यं तेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धे चाप्यपलायनम् ।
दानमीश्वरभावश्च क्षात्रकर्म स्वभावजम् ॥ ४३ ॥

—शूरपणा, प्रगल्भपणा, धैर्य, दक्षता, युद्धांतूनहि न पळणें, औदार्य व प्रभुत्व हें क्षत्रिय जातीचें स्वभावजन्य कर्म आहे. [ शौर्य—आपल्या-पेक्षां अधिक बलवान् असलेल्या पुरुषावरहि प्रहार करण्याची प्रवृत्ति, तेज—दुसऱ्याकडून पराभूत न होणें, धृति—मोठ्या आपत्तीमध्येंहि देहेंद्रियादिकांना धारण करणारी चित्तवृत्ति, ज्या धृतीकडून धारण केल्या गेलेल्या पुरुषाचा सर्व अवस्थांमध्यें नाश होत नाहीं, त्याचें धैर्य खचत नाहीं, दाक्ष्य—एकाएकीं अनेक कार्यें उपस्थित झालीं असतां व्यामोह न पावतां—न गांगरतां त्यांत प्रवृत्ति होणें—युद्धांतूनहि पलायन न करणें, शत्रूपासून पराङ्मुख न होणें, दान—देय पदार्थांमध्यें मुक्तहस्तत्व, धनादि कोणताहि पदार्थ सढळ हातानें देणें आणि ईश्वरभाव—ज्यांचें नियमन करावयाचें त्यांच्यापुढें आपली प्रभुशक्ति प्रगट करणें, त्यांना आपल्या सामर्थ्याची कल्पना आणून देणें, हें स्वभावजन्य क्षत्रियकर्म—क्षत्रिय जातीला विहित असलेलें कर्म आहे. ]

कृषिगौरक्ष्यवाणिज्यं वैश्यकर्म स्वभावजम् ।
परिचर्यात्मकं कर्म शूद्रस्यापि स्वभावजम् ॥ ४४ ॥

—शेत नांगरणें, पशूंचें पालन करणें व देव-घेव वगैरे व्यापार करणें, हें वैश्याचें स्वभावप्राप्त कर्म आहे. शुश्रूषा—द्विजसेवा हें शूद्राचेंहि स्वभावजन्य कर्म आहे.

ब्राह्मणादि वर्णांना विहित असलेल्या व यथाशास्त्र अनुष्ठिलेल्या या कर्मांचें स्वभावतःच स्वर्गप्राप्ति हें फल आहे. “स्वकर्मांमध्यें तत्पर असलेले वर्ण व आश्रम मेल्यावर कर्मफलाचा अनुभव घेऊन—कर्मफल भोगून अवशिष्ट राहिलेल्या कर्मानें विशिष्ट देश, विशिष्ट जाति, विशिष्ट कुल, विशिष्ट धर्म, विशिष्ट आयुष्य, विशिष्ट विद्या, विशिष्ट वर्तन, विशिष्ट धन, विशिष्ट सुख, विशिष्ट मेधा—धारणाशक्ति यांनीं युक्त असा जन्म घेतात” इत्यादि स्मृतीं-वरून ही गोष्ट सिद्ध होते. पुराणांमध्येंहि वर्णी व आश्रमी यांना भिन्न भिन्न लोक व फलें यांची प्राप्ति होते’ असें म्हणून त्यांचे लोक व फल यांच्या भेदांचे प्रकार सांगितले आहेत. पण दुसऱ्या कारणानें—मोक्षाच्या अपेक्षेनें अनुष्ठान केल्यास त्याचें कोणतें फळ मिळतें तें सांगतात—

स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः ।
स्वकर्मनिरतः सिद्धिं यथा विन्दति तच्छृणु ॥ ४५ ॥

(७)—आपापल्या वर सांगितलेल्या लक्षणाचा भिन्न भिन्न कर्मांमध्यें अभिरत—तत्पर असलेला पुरुष संसिद्धीला—स्वकर्मानुष्ठानामुळें अशुद्धीचा क्षय झाला असतां, शरीरेंद्रियांची ज्ञाननिष्ठा योग्यता याच स्वरूपाच्या सिद्धीला प्राप्त होतो. [ अर्थात् मोक्षाचे उपाय, अशीं जीं शमादि सात्त्विक कर्में त्यांचा ब्राह्मणांनाच अधिकार असल्यामुळें त्यांनाच तेवढा मोक्ष मिळेल, क्षत्रिया-दिकांना शमादिकांचा अधिकारच नसल्यामुळें मोक्ष मिळणार नाहीं, ही शंका व्यर्थ आहे. आपापल्या विहित कर्मांत तत्पर असलेल्या कोणत्याहि वर्णाच्या मनुष्याची चित्तशुद्धि होऊन तिच्या द्वारा ज्ञाननिष्ठायोग्यता प्राप्त होते आणि ज्याला त्या योग्यतेमुळें ज्ञान झालें आहे, त्याला मोक्ष प्राप्त होतो. ज्ञानी अब्राह्मणालाहि मोक्ष मिळतो, असा याचा भावार्थ. येथील 'संसिद्धि' शब्दाचा मोक्ष असा अथ घेऊन 'केवल स्वधर्मनिष्ठ झाल्यानेंच जर त्याचा लाभ होत असेल, तर त्यासाठीं संन्यासादिकांचें विधान व्यर्थ आहे,' असें म्हणाल तर तसें नाहीं. नुस्त्या स्वकर्मानुष्ठानानेंच साक्षात् मोक्ष किंवा ज्ञान-निष्ठायोग्यता प्राप्त होत नाहीं. ] तर मग स्वकर्मांमध्यें निरत—तत्पर असलेला मनुष्य कोणत्या प्रकारानें सिद्धीला प्राप्त होतो ? तें ऐक. ( तो प्रकार तूं एकाग्र चित्तानें ऐकून त्याविषयीं निश्चय कर. )

यतः प्रवृत्तिर्भूतानां येन सर्वमिदं ततम् ।
स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः ॥ ४६ ॥

—ज्या अंतर्यामी ईश्वरापासून भूतांची—प्राण्यांची प्रवृत्ति होते, व मृत्तिके-कडून जसे घटादि विकार व्यापले जावेत, त्याप्रमाणें ज्यानें हें सर्व जगत् व्यापिलें आहे, त्या ईश्वराला प्रत्येक वर्णासाठीं वर सांगितलेल्या स्वधर्मानें पुजून—त्याची पूजा—आराधना करून मनुष्य केवल ज्ञाननिष्ठायोग्यतारूप सिद्धीला प्राप्त होतो. [ ब्राह्मणादिकांना केवल पूर्वोक्त स्वधर्मनिष्ठेनें साक्षात् मोक्ष मिळणें शक्य नाहीं. कारण तो केवल ज्ञानानेंच प्राप्त होणारा आहे. यास्तव स्वधर्मनिष्ठ झालेल्या ब्राह्मणादिकांची चित्तशुद्धि होते. कर्मफलाची आकांक्षा न करणाऱ्या त्यांना ईश्वरप्रसादानें विवेक—वैराग्यादि साधनसंपत्ति प्राप्त होते. अशा ज्ञान-निष्ठेला योग्य झालेल्या संन्याश्यांना ज्ञानप्राप्तीनेंच मुक्ति मिळते. ]

ज्याअर्थी स्वधर्मानुष्ठानाचें चित्तशुद्ध्यादिकांच्या द्वारा मोक्षामध्यें पर्यवसान होत असतें, त्याअर्थी स्वधर्मानुष्ठान आवश्यक आहे, असें आतां सांगतात—

श्रेयान्स्वधर्मो विगुणः परधर्मात्स्वनुष्ठितात् ।
स्वभावनियतं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम् ॥ ४७ ॥

( ८ )—उत्तमप्रकारें आचरिलेल्या परधर्माहून–अनेक उत्तम गुणांनीं युक्त असलेल्या परधर्माहून, गुणरहित असलेलाहि स्वधर्म अधिक श्रेयस्कर आहे. स्वभावानें नियत केलेलें कर्म–हिंसाप्रधान युद्धादि करणारा पापाला प्राप्त होत नाहीं. [ ज्याप्रमाणें विषांतच उत्पन्न झालेला कृमि, विषानें मरत नाहीं, त्याप्रमाणें स्वभावनियत कर्म करणाराला त्यापासून पाप लागत नाहीं. ]

स्वभावनियत सदोष कर्म करणारालाहि पाप लागत नाहीं व परधर्म भयावह आहे, असें सांगितलें, त्यामुळें सर्वथा निर्दोष असलेलें भिक्षाटनच सर्वांनीं करावें, असें म्हणतां येत नाहीं. तसेंच कोणीहि अनात्मज्ञ एक क्षणभर सुद्धां कर्म न करतां राहूं शकत नाहीं, हेंहि पूर्वीं ( अ. ३–५ ) सांगितलें आहे. त्यामुळें पापाच्या प्राप्तीची शंकाच राहूं नये, म्हणून सर्वांनीं कर्मत्यागच करावा, असेंहि म्हणतां येत नाहीं. कारण ज्ञानाच्या अभावीं कोणालाहि क्षणभर सुद्धां कर्म सोडून रहातां येत नाहीं. गुणातीत ज्ञानी मात्र 'अकर्मकृत' राहूं शकतो. यास्तव आतां आणखीं प्रकारच राहिलेला नसल्यामुळें—

सहजं कर्म कौन्तेय सदोषमपि न त्यजेत् ।
सर्वारम्भा हि दोषेण धूमेनाग्निरिवावृताः ॥ ४८ ॥

—हे कुंतीपुत्रा अर्जुना, जन्मामुळें प्राप्त झालेलें, स्वभावानें नियत केलेलें कर्म सदोष जरी असलें, तरी त्याचा त्याग करूं नये. ( सत्त्वादि गुणांमुळेंच ज्याचा आरंभ झाला आहे, असें कर्म हिंसादि दोषानें युक्त असलें तरी, तें विहित असल्यामुळें अत्याज्य होय. ) कारण स्वधर्मरूप किंवा परधर्मरूप अशीं सर्वच कर्में त्रिगुणात्मक असल्यामुळें दोषांनीं युक्त आहेत. अग्नीबरोबरच उत्पन्न झालेल्या धूमानें अग्नि जसा आच्छादित असतो, त्याप्रमाणें सर्व कम दोषानें युक्त असतात. [ स्वधर्म नांवाच्या सहज कर्मांचा सर्वथा परित्याग करून परधर्मांचें अनुष्ठान जरी केलें, तरी दोषापासून मुक्ति होतच नाहीं. शिवाय परधर्म भयावह आहे आणि ज्याअर्थीं अज्ञाला सर्वकर्मत्याग करतां येणें शक्य नसतें, त्याअर्थीं सहज कर्म सदोष जरी असलें, तरी त्याचा त्याग करूं नये, असा याचा भावार्थ. ]

कर्मांपासून होणारी ज्ञाननिष्ठा योग्यतारूप सिद्धि सांगितली. आतां तिची फलभूत ज्ञाननिष्ठारूप नैष्कर्म्यसिद्धि सांगतात—

असक्तबुद्धिः सर्वत्र जितात्मा विगतस्पृहः ।
नैष्कर्म्यसिद्धिं परमां संन्यासेनाधिगच्छति ॥ ४९ ॥

—पुत्र, स्त्री इत्यादि आसक्तीच्या निमित्तामध्यें ज्याचें अंतःकरण आसक्त नसतें, ज्याचें चित्त त्याच्या अधीन असतें, ज्याला देह, जीवित, भोग इत्यादिकांविषयींहि तृष्णा नसते, असा आत्मज्ञ संन्यासानें श्रेष्ठ नैष्कर्म्यसिद्धीला प्राप्त होतो. [ ‘ निष्क्रिय ब्रह्मच आत्मा आहे ’ असा साक्षात्कार झाल्यामुळें ज्याच्यापासून कर्मांची निवृत्ति झाली आहे, तो निष्कर्मा, असलें निष्कर्मत्व हेंच नैष्कर्म्य व तीच सिद्धि किंवा निष्क्रिय आत्मस्वरूपानें अवस्थित होणें, हें नैष्कर्म्य. त्याची सिद्धि–निष्पत्ति. ‘ परमां ’ म्ह० कर्मजन्य सिद्धीहून विलक्षण–जीवन्मुक्तिरूप, अशा नैष्कर्म्यसिद्धीला पुरुष संन्यासानें–तत्त्वज्ञानानें किंवा तत्त्वज्ञानपूर्वक सर्वकर्मसंन्यासानें प्राप्त होतो. ]

आतां वर सांगितलेल्या ईश्वरार्चनरूप स्वकर्मानुष्ठानानें उत्पन्न झालेल्या ज्ञाननिष्ठायोग्यतारूप सिद्धीला जो प्राप्त झाला आहे व त्यामुळें ज्याला आत्मविवेक झाला आहे, तो केवल ज्ञाननिष्ठारूप नैष्कर्म्यसिद्धीला कोणत्या क्रमानें प्राप्त होतो, तें सांगतात—

सिद्धिं प्राप्तो यथा ब्रह्म तथाप्नोति निबोध मे ।
समासेनैव कौन्तेय निष्ठा ज्ञानस्य या परा ॥ ५० ॥

—हे कुंतीपुत्रा, स्वकर्मानें ईश्वराचें अभ्यर्चन करून त्याच्या प्रसादानें शरीरेंद्रियांच्या ज्ञाननिष्ठा योग्यतारूप सिद्धीला प्राप्त झालेला आत्मविवेकी ज्या ज्ञाननिष्ठारूप प्रकारानें परमात्म्याला प्राप्त होतो, त्या ज्ञाननिष्ठाप्राप्तीच्या क्रमाला तूं माझ्या वचनावरून संक्षेपतः ऐक. ब्रह्मप्राप्ति ही ब्रह्मज्ञानाची परा निष्ठा आहे. [ अत्यंत परिसमाप्ति–पराकाष्ठा आहे. हा ब्रह्मप्राप्तीचाच साक्षात् निर्देश आहे. ]

ही ब्रह्मज्ञानाची परा निष्ठा कशी संपादन करावी तें सांगतात—

बुद्ध्या विशुद्धया युक्तो धृत्यात्मानं नियम्य च ।
शब्दादीन्विषयांस्त्यक्त्वा रागद्वेषौ व्युदस्य च ॥ ५१ ॥
विविक्तसेवी लघ्वाशी यतवाक्कायमानसः ।
ध्यानयोगपरो नित्यं वैराग्यं समुपाश्रितः ॥ ५२ ॥
अहङ्कारं बलं दर्पं कामं क्रोधं परिग्रहम् ।
विमुच्य निर्ममः शान्तो ब्रह्मभूयाय कल्पते ॥ ५३ ॥

( ९ )—' ब्रह्मच आत्मा ' अशा निश्चयात्मक व अत्यंत शुद्ध म्ह० माया–संशय–विपर्ययशून्य अशा बुद्धीनें युक्त होऊन, धैर्यानें शरीरेंद्रियाला नियमित करून, शरीरस्थितीला अवश्य तेवढ्या विषयांना सोडून केवल सुखासाठीं इष्ट असलेल्या शब्दादि सर्व विषयांचा त्याग करून, शरीरस्थितीसाठींहि प्राप्त झालेल्या विषयांतील राग-द्वेषांचा त्याग करून, चित्ताचें ऐकाग्र्य व प्रसाद यांसाठीं अरण्य, नदीचें तीर, पर्वताची गुहा, इत्यादि एकान्त व पवित्र प्रदेशाचें सेवन करण्याचें ज्याचें शीलच होऊन गेलें आहे, असें व्हावें. निद्रादि दोषांच्या निवृत्तीसाठीं परिमित, हितकर व पवित्र अन्नच खावें. वाक्, शरीर व मन यांचें पूर्णपणें नियमन करावें; नंतर आत्मस्वरूपाचें चिंतन हेंच ध्यान व आत्म्यामध्येंच मनाला एकाग्र करणें हा योग. या ध्यान-योगामध्यें ' श्रेष्ठ साधन ' या रूपानें नित्य तत्पर होऊन ऐहिक व पारलौकिक सर्व इष्ट विषयांविषयीं विरक्त व्हावें. ( वैराग्याचा सतत आश्रय करून नित्य ध्यानयोगपरायण व्हावें, असा याचा संबंध. ) शरीरेंद्रियांना मी म्हणणें, हा अहंकार; काम-रागादिप्रयुक्त सामर्थ्य, हर्षानंतर होणारा व धर्माच्या अतिक्रमाला कारण होणारा दर्प, हा मानस विकार; इच्छा, द्वेष, शरीरधारणाच्या प्रसंगानें किंवा धर्मानुष्ठानाच्या निमित्तानें प्राप्त झालेला बाह्य परिग्रह, यांचा परित्याग करून–परमहंस परिव्राजक होऊन देहजीवनासाठीं अवश्य असलेल्या वस्तूंविषयींहि ' ममत्वभाव ' सोडून त्यामुळें शांत व सर्व आयासशून्य झालेला यति ब्रह्मभावास प्राप्त होतो.

या क्रमानें ब्रह्मभूत झालेल्या पुरुषाला कोणतें फल प्राप्त होतें तें सांगतात—

ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा न शोचति न काङ्क्षति ।
समः सर्वेषु भूतेषु मद्भक्तिं लभते पराम् ॥ ५४ ॥

( १० )—वर सांगितल्याप्रमाणें ब्रह्माला प्राप्त झालेला म्ह० जिवंतपणीं सर्व अनर्थशून्य होऊन 'निरतिशय आनंदरूप ब्रह्मच मी' असा अनुभव घेणारा व प्रसन्न चित्त झालेला जीवन्मुक्त बाह्य विषयांतील एखादा पदार्थ नाहींसा झाला किंवा स्वतःच्याच शरीरेंद्रियांत कांहीं वैगुण्य झालें, तर त्यासाठीं शोक करीत नाहीं व कशाची आकांक्षाहि करीत नाहीं. शोक व आकांक्षा न करणें हा त्याचा स्वभावच बनतो. आपल्या उपमेनें सर्व भूतांमध्यें सुख व दुःख सम पहातो. असा जीवन्मुक्त, ज्ञाननिष्ठ माझ्या ज्ञानलक्षण परम भक्तीला प्राप्त

होतो. म्ह० त्याची ज्ञाननिष्ठा सुप्रतिष्ठित होते. [ श्रवण, मनन, निदिध्यास करणाऱ्या समाधियुक्त पुरुषाचें त्या श्रवणादिकांच्या अभ्यासानेंच ‘ ब्रह्मच आत्मा ’ अशा स्वरूपाची ‘ मोक्ष ’ हेंच फल देणारी अपरोक्ष ज्ञानसिद्धि होते.]

या समाधिसाध्य परम भक्तिरूप ज्ञानानें कोणतें अपूर्व फल प्राप्त होतें, तें सांगतात—

भक्त्या मामभिजानाति यावान्यश्चास्मि तत्त्वतः ।
ततो मां तत्त्वतो ज्ञात्वा विशते तदनन्तरम् ॥ ५५ ॥

त्यानंतर पुरुष या ज्ञानलक्षण भक्तीनें माझ्या उपाधिकृत भेदाचा विस्तार केवढा आहे व निरुपाधिक असा जो मी, त्या मला तत्त्वतः जाणतो म्ह० माझ्या औपाधिक स्वरूपाचा व्याप केवढा आहे, हें त्याला कळतें व निरुपाधिक, अपरिच्छिन्न, असंग, अद्वैत, चैतन्यमात्र, एकरसरूप, अज, अमर, अभय, अनिधन–सर्व विकाररहित, अशा मला तो साक्षात् जाणतो आणि असें ज्ञान होतांच तत्काल माझ्यामध्येंच प्रवेश करितो.

स्वकर्मानें भगवानांचें पूजन करणें या भक्तियोगाचें ज्ञाननिष्ठायोग्यता हें फल आहे. त्या योग्यतेच्या निमित्तानें मोक्षफलामध्यें पर्यवसान पावणारी ज्ञाननिष्ठा सिद्ध होते. अर्थात् ज्ञाननिष्ठासिद्धीसाठीं ज्ञाननिष्ठा योग्यता पाहिजे म्हणून ती योग्यता देणाऱ्या भक्तियोगाची या उपसंहारप्रकरणांत स्तुति करितात—

सर्वकर्माण्यपि सदा कुर्वाणो मद्व्यपाश्रयः ।
मत्प्रसादादवाप्नोति शाश्वतं पदमव्ययम् ॥ ५६ ॥

( ११ )—नित्य नैमित्तिक व काम्य कर्माप्रमाणें निषिद्ध कर्मेंहि सतत करणारा पण माझ्या ठिकाणीं ज्यानें सर्वात्मभाव अर्पिला आहे,–माझाच ज्यानें आश्रय केला आहे, असा मुमुक्षु मज ईश्वराच्या अनुग्रहामुळें नित्य अव्यय वैष्णव पदाला प्राप्त होतो. [ हा श्लोक ईश्वराराधनेच्या स्तुतिपर असल्यामुळें सर्व कर्मांत निषिद्ध कर्मांचाहि अंतर्भाव होतो. ]

ज्याअर्थीं परमेश्वराच्या प्रसादाचें असें माहात्म्य आहे, त्याअर्थीं अनुग्रहासाठीं तूं यत्न करावास असें सांगतात—

चेतसा सर्वकर्माणि मयि संन्यस्य मत्परः ॥
बुद्धियोगमुपाश्रित्य मच्चित्तः सततं भव ॥ ५७ ॥

—विवेकबुद्धीनें दृष्ट फल देणारीं व अदृष्ट फल देणारीं सर्व कर्में मज ईश्वराच्या ठिकाणीं 'यत्करोपि यदश्नासि०' (९–२७) या न्यायानें समर्पण करून 'मी वासुदेवच ज्याला श्रेष्ठ आहें असा मत्पर होऊन माझ्या ठिकाणीं बुद्धीला समाहित करणें याच बुद्धियोगाचा आश्रय करून–बुद्धियोगाला अनन्य शरण होऊन तूं सतत मच्चित्त हो. सतत माझ्या ठिकाणींच चित्त ठेव.

मच्चित्त झाल्यानें काय होतें तें सांगतात—

मच्चित्तः सर्वदुर्गाणि मत्प्रसादात्तरिष्यसि ।
अथ चेत्त्वमहंकारान्न श्रोष्यसि विनङ्क्ष्यसि ॥ ५८ ॥

—माझ्याच ठिकाणीं ज्यानें चित्त लावलें आहे, असा तूं माझ्या कृपेमुळें संसाराला कारण होणाऱ्या अज्ञानादि सर्व निमित्तांना तरून जाशील–त्यांचें उल्लंघन करून जाशील. पण असें असूनहि 'मी पंडित आहें' अशा अभिमानानें मीं सांगितलेलें हें जर न ऐकशील, तर विनाश पावशील.

'मी स्वतंत्र आहें, दुसऱ्यानें सांगितलेलें काय म्हणून ऐकूं?' असें तूं समजूं नकोस. कारण—

यदहंकारमाश्रित्य न योत्स्य इति मन्यसे ।
मिथ्यैष व्यवसायस्ते प्रकृतिस्त्वां नियोक्ष्यति ॥ ५९ ॥

—अहंकाराचा आश्रय करून 'मी युद्ध करणार नाहीं' असें जें तूं समजतोस–तूं म्हणत आहेस, तो तुझा खोटा निश्चय आहे. कारण तुझी प्रकृति–तुझा क्षत्रियस्वभाव तुला युद्धामध्यें नियुक्त करील–तुला युद्ध करावयास लावील.

स्वभावजेन कौन्तेय निबद्धः स्वेन कर्मणा ।
कर्तुं नेच्छसि यन्मोहात्करिष्यस्यवशोऽपि तत् ॥ ६० ॥

—हे अर्जुना, स्वभावजन्य पूर्वोक्त शौर्यादिक कर्मानें–आपल्या स्वधर्मरूप कर्मानें निश्चयानें बद्ध झालेला तूं अविवेकामुळें जें कर्म करण्याची इच्छा करीत नाहींस, तें तूं प्रकृतीच्या अधीन होऊनहि करशील. [तुझी प्रकृतीच–स्वभावच तुला तें करावयास लावील.]

याहि कारणानें तूं युद्ध करावेंस असें भगवान् सांगतात—

ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति ।
भ्रामयन्सर्वभूतानि यन्त्रारूढानि मायया ॥ ६१ ॥

( १२ ) हे अर्जुना, ज्याप्रमाणें लौकिक मायावी कळसूत्री बाहुल्यांचा खेळ करणारा पुरुष काष्ठमय बाहुल्यासारख्या यंत्रांना मायेनें–कांहीं गुप्त योजनेनें फिरवीत–त्यांच्याकडून खेळ–भ्रमण करवीत रहातो, त्याप्रमाणें ईश्वरहि जणुं-काय यंत्रारूढ झालेल्या या सर्व भूतांना मायेनें भ्रमण करवीत त्यांच्या हृद-यांत रहातो.

तमेव शरणं गच्छ सर्वभावेन भारत ।
तत्प्रसादात्परां शान्तिं स्थानं प्राप्स्यसि शाश्वतम् ॥ ६२ ॥

—हे अर्जुना, तूं संसारपीडा नाहींशी व्हावी, म्हणून त्याच ईश्वराला शरीर, वाणी व मन यांच्या योगानें शरण जा. त्याचाच आश्रय कर. त्याच्या प्रसादानें म्ह० तत्त्वज्ञानोत्पत्तीपर्यंत ईश्वरानुग्रहानें सर्वोत्तम उपरतीला व ज्यांत मुक्त पुरुष रहातात त्या नित्य स्थानाला म्ह० मज विष्णूच्या परम पदाला प्राप्त होशील.

आतां शास्त्राचा उपसंहार करणारे भगवान् सांगतात—

इति ते ज्ञानमाख्यातं गुह्याद्गुह्यतरं मया ।
विमृश्यैतदशेषेण यथेच्छसि तथा कुरु ॥ ६३ ॥

(१३)—याप्रमाणें मीं सर्वज्ञ ईश्वरानें तुला हें अशा प्रकारचें अतिशय गुह्य ज्ञान–गीताशास्त्र सांगितलें आहे. या शास्त्राचा व त्यांतील सर्व विषयांचा पूर्णपणें विचार करून जशी तुझी इच्छा असेल तसें कर. [ ज्ञान किंवा कर्म यांतील जें तुला इष्ट वाटेल, त्याचें स्वाधिकारानुसार अनुष्ठान कर. ]

गीताशास्त्राचें पूर्वापर विचारानें तात्पर्य ठरविण्यास जर तूं असमर्थ अस-शील तर पुनरपि मी सांगत असलेलें हें तूं ऐक—

सर्वगुह्यतमं भूयः शृणु मे परमं वचः ।
इष्टोऽसि मे दृढमिति ततो वक्ष्यामि ते हितम् ॥ ६४ ॥

—सर्व गुह्यांहून अत्यंत गुह्य, अत्यंत रहस्य, असें हें माझें उत्कृष्ट वाक्य तूं पुनः ऐक. मला तूं अत्यंत प्रिय आहेस, म्हणून मीं तुझें हित सांगतों. [ मीं पूर्वीं वारंवार जरी हें सांगितलें आहे, तरी पुनः सांगतों. भीतीनें किंवा धनाच्या इच्छेनें मी तें तुला सांगत नसून तूं मला अत्यंत प्रिय आहेस, म्हणून पुनः पुनः तुला सांगतों. ज्ञानप्राप्तीचें साधन सर्व हितामध्यें अतिशय हित आहे. म्हणून मी तुला हित–ज्ञानप्राप्तीचें श्रेष्ठसाधन सांगेन. ]

आतां अत्यंत गुह्य काय आहे, तें सांगतात—

मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।
मामेवैष्यसि सत्यं ते प्रतिजाने प्रियोसि मे ॥ ६५ ॥

—तूं माझ्याचमध्यें ज्याचें मन आहे, असा हो. माझाच भक्त हो. माझेंच यजन–पूजन कर. मलाच नमस्कार कर. मी तुला सत्य प्रतिज्ञा करून सांगतों कीं, या व्यवहारभूमींत अशा रीतीनें वागणारा–वासुदेवामध्येंच ज्यानें सर्व साध्य-साधन-प्रयोजनभाव, समर्पिला आहे, असा तूं मलाच येऊन पोंचशील. तूं मला प्रिय आहेस, म्हणून मी अशी प्रतिज्ञा करतों. [ याप्रमाणें भगवानांची प्रतिज्ञा सत्य आहे. ती केव्हांहि असत्य होणार नाहीं. भगवद्भक्तीचें मोक्ष हें फल अवश्य प्राप्त होणारें आहे. असा निश्चय करून केवल भगवच्छरण व्हावें. भगवच्छरण होणें, हीच श्रेष्ठ गति आहे. तेंच परम साधन आहे. असें समजून त्याप्रमाणें वागावें. ]

कर्मयोगनिष्ठेचें जें परम रहस्य–ईश्वरशरणता, तिचा उपसंहार करून आतां यापुढें कर्मयोगनिष्ठेचें फल सर्व वेदान्तविहित सम्यग्दर्शन सांगावें म्हणून भगवान् म्हणतात—

सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज ।
अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः ॥ ६६ ॥

—सर्व धर्मांना व अधर्मांना सोडून–सर्व कर्मांचा संन्यास करून सर्वात्मा, सम, सर्वभूतस्थ, ईश्वर, अच्युत, गर्भ, जन्म, जरा, मरणरहित अशा मला ‘ मीच एक आहें, अन्य कांहीं नाहीं ’ अशाप्रकारें मज एकाला शरण जा. सर्वांचा आत्मा असा जो मी, त्या एका मजवांचून अन्य कांहीं नाहीं, असा निश्चय कर. म्ह० मी तुज एकनिष्ठाला धर्म व अधर्म यांच्या बंधनरूप पापांपासून आपलें निरुपाधिक स्वरूप प्रकाशित करून मुक्त करीन. तूं शोक करूं नको. [ अर्जुन क्षत्रिय असल्यामुळें त्याचा संन्यासद्वारा ज्ञाननिष्ठेंत मुख्य अधिकार नाहीं. तथापि त्याला पुढें करून त्याच्या द्वारा अधिकाऱ्यांना ज्ञाननिष्ठेचा हा उपदेश केला असल्यामुळें त्यांत कांहीं विरोध नाहीं. ]

या अठराव्या अध्यायांत गीताशास्त्रार्थाचा उपसंहार करून आतां यापुढें या शास्त्राचा संप्रदायविधि सांगतात—

इदं ते नातपस्काय नाभक्ताय कदाचन ।
न चाशुश्रूषवे वाच्यं न च मां योऽभ्यसूयति ॥ ६७ ॥

( १४ )—हें शास्त्र तुझ्या संसाराचा विच्छेद होण्यासाठीं–हितासाठीं मीं सांगितलें. तें तूं 'अतपस्क' म्ह० तपोरहित असलेल्या कोणालाहि सांगूं नयेस. तपस्वी असलेल्याहि, गुरु-देव विषयक भक्तीनें रहित असलेल्या अभक्ताला केव्हांहि सांगूं नये. भक्त व तपस्वीहि असून जो गुरुशुश्रूषा न करणारा असतो, त्यालाहि सांगूं नये. व मज वासुदेवाला प्राकृत मनुष्य समजून जो अज्ञ मजवर दोषांचा आरोप करणें, माझें ईश्वरत्व सहन न करणें, इत्यादि माझी अत्यंत असूया करितो, त्यालाहि हें शास्त्र सांगूं नये. [ अर्थात् भगवानांच्या ठिकाणीं परम भक्ति–निसीम प्रेम ठेवणारा, तपस्वी, शुश्रूषु व असूया न करणारा, अशा अधिकाऱ्याला हें शास्त्र सांगावें ]

आतां या शास्त्रसंप्रदायाची प्रवृत्ति होण्यासाठीं संप्रदाय कर्त्याला फल सांगतात—

य इदं परमं गुह्यं मद्भक्तेष्वभिधास्यति ।
भक्तिं मयि परां कृत्वा मामेवैष्यत्यसंशयः ॥ ६८ ॥

—जो कोणी अध्यापक हें परमगुह्य माझ्या भक्ताला सांगेल, तो माझ्या ठिकाणीं ज्ञानरूप श्रेष्ठ भक्ति करून मलाच प्राप्त होईल, यांत कांहीं संशय नाहीं. [ मी तुझ्या ठिकाणीं याची जशी प्रस्थापना केली आहे, त्याप्रमाणें 'परमगुरु जो भगवान् त्याची ही मजकडून शुश्रूषाच केली जात आहे,' अशा भावनेनें परमभक्तीनें माझ्या भक्तांना जो हें मोक्षशास्त्र शिकवील, तो मलाच प्राप्त होईल, यांत कांहीं संशय नाहीं. 'मद्भक्तेषु' असें म्हणून भक्तीचें पुनः ग्रहण केल्यामुळें केवल 'भगवद्भक्ति' याच एका गुणानें मनुष्य या शास्त्रदानाचें पात्र होतो, असें सिद्ध होतें. ]

'अहो पण, सर्व मुक्तिसाधनांमध्यें ध्यान श्रेष्ठ असल्यामुळें ध्याननिष्ठ झालेला जो मुमुक्षु त्याची विद्यासंप्रदायामध्यें प्रवृत्ति होणार नाहीं' अशी आशंका घेऊन भगवान् म्हणतात—

न च तस्मान्मनुष्येषु कश्चिन्मे प्रियकृत्तमः ।
भविता न च मे तस्मादन्यः प्रियतरो भुवि ॥ ६९ ॥

—असल्या शास्त्रसंप्रदायकर्त्या पुरुषाहून मनुष्यांतील दुसरा कोणीहि मला अधिक प्रिय नाहीं.–माझें त्याहून अधिक प्रिय करणारा कोणी नाहीं.

म्हणून मुमुक्षूनें वर सांगितलेल्या विशेषणानें विशिष्ट अशा अधिकाऱ्याला विद्यासंप्रदान करावें. सांप्रत काळीं विद्यमान असलेला कोणीच मला तसल्या मनुष्याहून अधिक प्रिय नाहीं. इतकेंच नव्हे, तर भूतकालीन मनुष्यांतील कोणी अधिक प्रिय नव्हता व भविष्यत्कालींहि या भूलोकीं त्या विद्यासंप्रदाय-कर्त्याहून मला दुसरा कोणी अधिक प्रिय होणार नाहीं. [ अर्थात् ध्यान-निष्ठ जरी श्रेष्ठ असला तरी, या शास्त्राचा संप्रदाय प्रवृत्त करणारा त्याहूनहि अत्यंत श्रेष्ठ असल्यामुळें ध्याननिष्ठानेंहि विद्यासंप्रदान करणें सर्वथा उचित होय. ]

याप्रमाणें संप्रदायकर्त्याचें श्रेष्ठत्व सांगून आतां याचें अध्ययन करणाराला विशिष्ट फल सांगतात—

अध्येष्यते च य इमं धर्म्यं संवादमावयोः ।
ज्ञानयज्ञेन तेनाहमिष्टः स्यामिति मे मतिः ॥ ७० ॥

—जो कोणी भक्तिमान् धर्माला सोडून नसलेल्या आम्हां उभयतांच्या या संवादरूप ग्रंथाचें अध्ययन करील, त्यानें ज्ञानयज्ञानें माझें पूजन केलें आहे, असें मी समजेन. [ सर्व यज्ञांत ज्ञानयज्ञ श्रेष्ठ आहे. म्हणून गीताशास्त्राच्या अध्ययनाला 'ज्ञानयज्ञ' म्हणून त्याची स्तुति केली आहे. किंवा हा फलविधिच आहे. ज्ञानयज्ञाचें कैवल्य हें फल आहे. गीताशास्त्राचें अध्ययन करणाराला त्या सारखेंच फल मिळतें. अर्थात् त्या अध्ययन करणारानें ज्ञानयज्ञतुल्य अध्य-यनानें भगवानांची पूजा केल्यामुळें भगवत्प्रसादानें त्याला ज्ञान होतें व तो ज्ञानानें मुक्त होतो. ]

आतां श्रोत्याला कोणतें फल मिळतें तें सांगतात—

श्रद्धावाननसूयश्च शृणुयादपि यो नरः ।
सोऽपि मुक्तः शुभाँल्लोकान्प्राप्नुयात्पुण्यकर्मणाम् ॥ ७१ ॥

—जो कोणी मोठा श्रद्धालु व गुणामध्यें दोषारोप न करणारा मनुष्य हा आमचा संवाद नुस्ता श्रवणहि करील, तो सुद्धां पापापासून मुक्त होऊन अग्निहोत्रादि पुण्य कर्में करणारांच्या अत्यंत प्रशस्त लोकांस प्राप्त होईल. [ नुस्तें श्रवण करणारालाहि जर एवढें फल मिळतें, तर ज्यानें या शास्त्राचें अर्थज्ञान संपादिलें आहे, तो सर्व पापांपासून मुक्त होईल, हें काय सांगावें ! असा अर्थ ' शृणुयादपि ' येथील ' अपि ' शब्दावरून निघतो. ]

शिष्यानें शास्त्रार्थांचें ग्रहण केलें किंवा नाहीं, हें जाणण्याच्या इच्छेनें भगवान् प्रश्न करितात—

कच्चिदेतच्छ्रुतं पार्थ त्वयैकाग्रेण चेतसा ।
कच्चिदज्ञानसंमोहः प्रणष्टस्ते धनंजय ॥ ७२ ॥

( १५ )—अर्जुना, मीं सांगितलेलें हें सर्व तूं एकाग्र चित्तानें ऐकलेंस का? व समाधान मनानें माझा उपदेश ऐकून तूं याचा अर्थ बरोबर समजलास का? किंवा त्याकडे दुर्लक्ष केलेंस? अज्ञानामुळें झालेला तुझा स्वाभाविक संमोह—अविवेक नष्ट झाला का? [ कारण त्या अविवेकाचा नाश व्हावा, म्हणूनच हा तुझा शास्त्रश्रवण करण्याचा आयास व माझा उपदेश करण्याचा आयास प्रवृत्त झाला आहे. अर्थात् ज्या अविवेकाच्या नाशासाठीं तूं शास्त्रश्रवण करावयास व मी त्याचा उपदेश करावयास प्रवृत्त झालों, तो तुझा अविवेक—मोह नष्ट झाला कीं नाहीं? शिष्यानें शास्त्रार्थांचें ग्रहण केलें किंवा नाहीं, हें जाणून त्यानें त्याचें ग्रहण केलें नसल्यास दुसऱ्या उपायानें त्याच्याकडून शास्त्राचें ग्रहण करवावें, अशा अभिप्रायानें भगवान् येथें हा प्रश्न करीत आहेत. त्यावरून कोणत्याना कोणत्या तरी उपायानें शिष्याला कृतार्थ करावें, हा आचार्यांचा धर्म व्यक्त होतो. ]

याप्रमाणें भगवानांनीं ज्याला मोठ्या प्रेमानें आत्मज्ञानाचा उपदेश केला आहे व त्यामुळें ज्याचें अज्ञान, संशय, विपर्यय नष्ट झाले आहेत, असा—

अर्जुन उवाच—

नष्टो मोहः स्मृतिर्लब्धा त्वत्प्रसादान्मयाच्युत ।
स्थितोऽस्मि गतसंदेहः करिष्ये वचनं तव ॥ ७३ ॥

अर्जुन भगवदनुग्रह झाल्याचें सांगून भगवानांना संतुष्ट करीत होत्साता म्हणाला—हे कृष्णा, संसारांतील सर्व अनर्थांचा हेतु व सागरासारखा दुस्तर असा हा माझा अज्ञानजन्य अविवेक—मोह, नष्ट झाला. तुझ्या कृपेमुळें मला आत्मतत्त्वाविषयींची आठवण झाली. मी आतां सर्व संदेहानें रहित होऊन राहिलों आहें. मी तुझें म्हणणें मानीन म्ह० तुझ्या म्हणण्याप्रमाणें वागेन. [ ज्या स्मृतीच्या लाभामुळें कामादि सर्व अनर्थांचा सर्वथा नाश होतो, ती आत्मतत्त्वाविषयींची स्मृति तुझ्या अनुग्रहानें मला झाली आहे. अज्ञानजन्य

संमोहाचा अज्ञानासह नाश व आत्मस्मृतीचा लाभ, हेंच सर्वशास्त्रार्थ-ज्ञानाचें मुख्य फल आहे. याविषयीं उपनिषदांत अनेक वचनें आढळतात. शेवटीं अर्जुन म्हणतो—' तुझ्या प्रसादानें मी कृतार्थ झालों आहें. माझें कर्तव्य कांहीं उरलेलें नाहीं. ]

शास्त्रार्थ संपला. आतां कथेचा संबंध प्रदर्शित करण्यासाठीं—

संजय उवाच—

**इत्यहं वासुदेवस्य पार्थस्य च महात्मनः ।**
**संवादमिममश्रौषमद्भुतं रोमहर्षणम् ॥ ७४ ॥**

( १६ ) **संजय** म्हणाला—याप्रमाणें मी वासुदेवाच्या आणि महात्म्या अर्जुनाच्या या आश्चर्यकारक, अंगावर रोमांच उभे करणाऱ्या संवादाला मीं ऐकलें.

' हा सर्वोत्तम संवाद तूं कसा ऐकलास ' असें कोणी म्हणेल, म्हणून संजय सांगतो—

**व्यासप्रसादाच्छ्रुतवानेतं गुह्यमहं परम् ।**
**योगं योगेश्वरात्कृष्णात्साक्षात्कथयतः स्वयम् ॥ ७५ ॥**

—मीं भगवान् व्यासांनीं मजवर अनुग्रह करून मला दिव्यदृष्टि दिल्यामुळें या गुह्य व परम योगरूप संवादाचें योग्यांचा ईश्वर जो कृष्ण त्याच्या तोंडून साक्षात् श्रवण केलें. [ तो आपल्या परमेश्वरस्वरूपानें सांगत असतांना मीं प्रत्यक्ष आपल्या कानांनीं तें सर्व ऐकलें. हा संवाद ज्ञान व कर्म यांसाठीं असल्यामुळें, किंवा त्याला चित्तवृत्तिनिरोधरूप योगाचें अंगत्व असल्यामुळें त्याला 'योग' असें म्हटलें आहे. तो परमपुरुषार्थोपयोगी आहे, म्हणून त्याला 'परम' हें विशेषण दिलें आहे व तें अत्यंत रहस्य असल्यामुळें त्याला ' गुह्य ' म्हटलें आहे. ]

**राजन्संस्मृत्य संस्मृत्य संवादमिममद्भुतम् ।**
**केशवार्जुनयोः पुण्यं हृष्यामि च मुहुर्मुहुः ॥ ७६ ॥**

—हे राजा धृतराष्ट्रा, कृष्ण व अर्जुन, यांच्या या अद्भुत व पुण्यप्रद संवादाला पुनः पुनः आठवून मीं वारंवार–प्रतिक्षणीं आनंदित–हृष्ट–संतुष्ट होत आहें.

आतां संजय भगवानांनीं अर्जुनाला ध्यानासाठीं जें आपलें सगुण विश्वरूप दाखविलें, त्याची स्तुति करितो—

तच्च संस्मृत्य संस्मृत्य रूपमत्यद्भुतं हरेः ।
विस्मयो मे महान् राजन् हृष्यामि च पुनः पुनः ॥ ७७ ॥

—हे धृतराष्ट्रा ! आणि तें हरीचें अतिशय अद्भुत विश्वरूप पुनः पुनः आठवून मला मोठा विस्मय वाटतो व मी वारंवार आनंदित होत आहें.

नर-नारायणरूप अर्जुन व कृष्ण यांच्या संवादाला प्रामाण्य आहे, हें सुचविण्यासाठीं संजय त्यांचा परम उत्कर्ष सुचवितो—

यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थो धनुर्धरः ।
तत्र श्रीर्विजयो भूतिर्ध्रुवा नीतिर्मतिर्मम ॥ ७८ ॥

—ज्या पक्षामध्यें योगेश्वर कृष्ण व गांडिव धनुष्य धारण करणारा अर्जुन आहे, त्या पांडवांच्या पक्षामध्येंच लक्ष्मी, विजय—परम उत्कर्ष, भूति—श्रीचाच विशेष विस्तार व नित्य न्याय रहातात, असा माझा दृढ निश्चय झाला आहे. [ या वाक्यानें संजयानें धृतराष्ट्राची विजयाशा पार घालवून 'पांडवांना निश्चयानें जय मिळणार' हें सुचविलें. योगाच्या उत्पत्तीचें कारण असल्यामुळें भगवान् सर्व योगांचा ईश्वर, ज्ञान आणि कर्म हाच सर्व योग; शास्त्रीय ज्ञान—वैराग्यादिक हेंच त्याचें बीज, तें भगवानांच्या अधीन असतें. त्यामुळें ज्याच्यावर भगवदनुग्रह झाला नाहीं, त्याला तें प्राप्त होत नाहीं. अर्थात् योग व त्याचें फल हीं दोन्ही भगवदनुग्रहाधीन असल्यामुळें भगवानाला योगेश्वरत्व आहे. असो. याप्रमाणें येथें उपाय-उपेयभावानें सांगितलेल्या द्विविध निष्ठेची स्थापना केलेली असून 'कर्मनिष्ठा परंपरेनें—चित्तशुद्धीच्या द्वारा ज्ञाननिष्ठेला कारण होते आणि ज्ञाननिष्ठा साक्षात् मोक्षाला कारण होते' या शास्त्रार्थाचा उपसंहार केला आहे. ]

( येथें भगवद्गीतेचा 'मोक्षसंन्यासयोग' नांवाचा अठरावा अध्याय समाप्त झाला. ) ६. ३. ४२.

येथें तिसरें भगवद्गीतापर्व संपलें.

---

# भीष्मवधपर्व ४.



## अध्याय ४३ वा.

[ १ गीतामाहात्म्य. २ युधिष्ठिराचें कौरवसेनेंत गमन, चारी भ्राते व वासुदेव यांचें अनुगमन. ३ कौरवसैनिकांचे वृथाप्रलाप. ४ युधिष्ठिराचें पितामहापाशीं गमन. त्याची युद्धार्थ अनुज्ञा. ५ द्रोणाशीं संवाद व त्याचा आशीर्वाद. ६ कृपाचा जयाशीर्वाद. ७ शल्याचा वर. ८ कर्ण-कृष्णसंवाद. ९ युयुत्सूचा पांडवपक्षस्वीकार. १० पांडवांचें स्वसैन्यांत आगमन. ]

( १ ) **वैशंपायन**—राजा जनमेजया, जी गीता साक्षात् पद्मनाभाच्या मुखकमलांतून निघाली, तिचेंच चांगलें पठन करावें. अन्य शास्त्रांचा संग्रह करून काय करावयाचें आहे ! हे प्रभो, गीता सर्वशास्त्रमयी आहे म्ह० गीतेंत सर्व शास्त्रांचा अंतर्भाव होतो. हरीमध्यें सर्व देव अंतर्भूत होतात. गंगेंत सर्व तीर्थांचा समावेश होतो व मनुस्मृतींत सर्व वेद संग्रहित आहेत. गीता, गंगा, गायत्री व गोविंद हे चार 'ग'कार ज्याच्या हृदयांत स्थित असतात, त्याला पुनर्जन्म प्राप्त होत नाहीं. गीतेंतील सहाशें वीस श्लोक केशवानें सांगितले. त्यांतील अर्जुनाचे सत्तावन, संजयाचे सदुसष्ट व धृतराष्ट्राचा एकच आहे. याप्रमाणें गीतेंतील श्लोकसंख्येचें प्रमाण सांगितलें आहे[१]. श्रीकृष्णानें सर्व भारतामृताचें मंथन करून गीतारूप सार काढिलें व तें सर्व अर्जुनाच्या मुखांत ओतलें.

( २ ) **संजय**—राजा धृतराष्ट्रा, याप्रमाणें समग्र गीताशास्त्र ऐकल्यानंतर अर्जुनानें 'करिष्ये वचनं तव' अशी प्रतिज्ञा केली व तो युद्धार्थ सज्ज झाला. तेव्हां सज्ज झालेल्या धनंजयाला पाहून महारथांनीं उच्च स्वरानें पुनरपि सिंहनाद केला. पांडव, सोमक आणि त्यांचे सर्व अनुयायी यांनीं अतिशय संतुष्ट होऊन आपापले सागरोत्पन्न शंख वाजविले. त्यामुळें पुनः एकदां फार मोठा ध्वनि झाला. त्यावेळीं भेरी, नगारे, कर्णे इत्यादि सर्व मंगल रणवाद्यें एकाच वेळीं वाजूं लागलीं व त्या महानादानें सर्व दिशा दुमदुमून गेल्या. हे जनाधिपा, तो ध्वनि ऐकून गंधर्वांसह देव, पितर व सिद्ध चारणांचे संघ संग्राम

---

१ हें प्रमाण प्रचलित गीतेशीं सुसंगत नाहीं. त्यांत धृतराष्ट्राचा १, संजयाचे ४१, अर्जुनाचे ८४ व भगवानांचे ५७४ मिळून ७०० श्लोक आहेत.

पहाण्याच्या इच्छेनें अंतरिक्षांत जमले. महाभाग ऋषि शतक्रतूला पुढें करून ते महायुद्ध पहाण्यासाठीं एकत्र जमले.

त्यानंतर युद्धार्थ सज्ज झालेलें तें समुद्रप्राय सैन्य वारंवार उत्साह व्यक्त करीत असलेलें पाहून वीर युधिष्ठिरानें कवच काढून ठेवलें, आपलें श्रेष्ठ धनुष्य खालीं ठेवलें. तो रथांतून खालीं उतरला व हात जोडून पायांनींच निघाला. युधिष्ठिराची आपल्या जयाविषयीं दृढ बुद्धि होती. तथापि त्याच्या सिद्ध्यर्थ विचार करण्यासाठीं तो पितामहाकडे जाण्यास निघाला व त्यानें मौन धारण करून पूर्वाभिमुख होऊन शत्रुसैन्यांत प्रवेश केला.

याप्रमाणें धर्मराजाला शत्रुसैन्याकडे जातांना पाहून धनंजय रथांतून उतरला व आपल्या तिघां भ्रात्यांसह त्याला अनुसरला. भगवान् वासुदेवहि त्यांच्या मागोमाग निघाला. तेव्हां आश्चर्योत्सुक झालेले मुख्य राजेहि त्यांच्या मागून चालले.

अर्जुन—हे राजन्, तूं आम्हांला सोडून पायांनींच शत्रुसैन्याकडे चालला आहेस. हें तूं काय आरंभिलें आहेस!

भीम—हे राजेंद्रा, शत्रुसैन्य युद्धार्थ सज्ज झालें आहे. अशा वेळीं तूं कवच व आयुधें टाकून निःशस्त्र होऊन कोठें निघालास!

नकुल—भारता, तूं आमचा ज्येष्ठ भ्राता असा निघून जाऊं लागलास तर आम्हीं काय करावें! हें पाहून माझें हृदय विदीर्ण होत आहे. तूं कोठें चाललास!

सहदेव—हे नृपते, या रणसंग्रामांत महाभय उपस्थित झालें असतां आम्हांला सोडून तूं शत्रूच्या अभिमुख कोठें जातोस!

संजय—राजा धृतराष्ट्रा, भ्राते जरी याप्रमाणें चकित होऊन प्रश्न करीत होते, तरी युधिष्ठिर त्यांना कांहींच उत्तर न देतां मुकाट्यानें पुढें चालला. तें पाहून महाप्राज्ञ वासुदेव हंसतच म्हणाला—" अरे, याचा आशय मला समजला आहे. हा भीष्म, हा द्रोण, हा कृप व हा शल्य या सर्व गुरुजनांची अनुज्ञा घेऊन हा पार्थिव शत्रूंशीं युद्ध करणार आहे. कारण जो गुरूंची अनुज्ञा न घेतां युद्ध करितो, त्याचें ते महात्मे गुरु अनिष्ट चिंतितात, असें प्राचीन शास्त्रांत सांगितलें आहे. परंतु जो गुरूंची यथाशास्त्र अनुमति घेऊन श्रेष्ठांशीं युद्ध आरंभितो, त्याचा युद्धांत जय निश्चित आहे, असें माझें मत आहे."

( २ ) हे राजा, याप्रमाणें कृष्ण बोलत असतां इकडे कौरवसेनेंत हाहाकार उडाला व पांडवाचें सैन्य स्तब्ध उभें राहिलें. युधिष्ठिर येत आहे, असें दुरूनच

पाहून दुर्योधनाचे सैनिक परस्परांत मिथ्या प्रलाप करूं लागले. ते म्हणाले— "अहो, हा युधिष्ठिर कुलकलंकच दिसत आहे. तो युद्धाला भिऊन भीष्माजवळ येत आहे. हा युधिष्ठिर भ्रात्यांसह शरणेच्छेनें याचना करण्यासाठींच येत असावा. धनंजयासारखा समर्थ वीर व भीम-नकुल-सहदेव यांच्यासारखे भ्राते साह्यकर्ते असतांना या धर्मराजाला भीति कसली वाटते ! खरोखर, पृथ्वीवर प्रसिद्ध असलेल्या क्षत्रियकुलांत याचा जन्म झाला नसावा. म्हणूनच या क्षुद्र जीवाचें हृदय या समराला भीत आहे."

याप्रमाणें युधिष्ठिराची निंदा करून ते सर्व सैनिक कौरवांची प्रशंसा करूं लागले. ते हृष्ट होऊन प्रसन्न चित्तानें आपलीं वस्त्रें हवेंत फडफडवूं लागले. पांची पांडव व केशव यांची निंदा करून कौरवपक्षीय सर्व महारथ पुनः 'युधिष्ठिराचा धिक्कार असो' असें म्हणाले व पुढें काय होतें तें पहाण्याच्या इच्छेनें स्वस्थ बसले. आतां हा धर्मराजा भीष्माला काय सांगतो ! भीष्म त्याला काय उत्तर देतो ! हा समरश्लाघी भीष्म आणि कृष्णार्जुन काय बोलतात ! त्यांचें विवक्षित काय असावें ! अशा जिज्ञासेनें तीं दोन्ही सैन्यें युधिष्ठिराविषयीं साशंक झालीं.

( ४ ) इतक्यांत शर, शक्ति इत्यादि आयुधांनीं सज्ज झालेल्या त्या शत्रुसैन्यांत प्रवेश करून युधिष्ठिर भ्रात्यांसह मोठ्या वेगानें भीष्मापाशीं आला आणि युद्धाला सज्ज झालेल्या शांतनवाचे दोन्ही चरण आपल्या हातांनीं घट्ट धरून त्याला म्हणाला—

"हे दुर्धर्ष तात, मी भ्रात्यांसह तुला वंदन करीत आहें. आम्ही तुझ्याशीं युद्ध करणार आहों. यास्तव मला अनुज्ञा दे. मी तुझा आशीर्वाद घेण्यास आलों आहें."

भीष्म—हे भारता, तूं माझी अनुज्ञा घेण्यास आलास, हें फार चांगलें केलेंस. तूं जर अशा प्रकारें माझा आशीर्वाद मागण्यास आला नसतास तर मीं 'तुझा पराभव व्हावा' असा शाप दिला असता. पण बा युधिष्ठिरा, तूं धर्माला विसरला नाहींस, म्हणून मी तुझ्यावर प्रसन्न झालों आहें. तूं युद्ध कर व विजयी हो. वत्सा, या युद्धांत तुझें जें कांहीं अभिलषित असेल तें मजकडून मागून घे. मी तुला इष्ट वर देतों. तूं मजकडून कसली आकांक्षा करीत आहेस ! अशा प्रकारें आचरण करणाऱ्या तुझा कदापि पराभव होणार नाहीं.

हे कुरुनंदना, पुरुष अर्थाचा–द्रव्यादि विषयांचा दास आहे. पण अर्थ कोणाचाहि दास नाहीं. कौरवांनीं मला अर्थानें बद्ध केलें आहे, हें खरें आहे. यास्तव मी तुला युद्धावांचून अन्य कोणताहि वर देईन. दुर्योधनानें माझें पोषण केलें आहे, तेव्हां मला त्याच्या बाजूनें युद्ध करणें प्राप्त आहे. यास्तव एखाद्या दुर्बलाप्रमाणें मी तुला युद्धांत साह्य करण्यास समर्थ नाहीं. तथापि युद्धावांचून तुला माझ्या अन्य कोणत्या साह्याची अपेक्षा आहे, तें सांग.

युधिष्ठिर—हे पितामह, तूं नित्य माझ्या हिताचें चिंतन कर व कौरवांच्या बाजूनें युद्ध कर. हाच मला तुझा सतत वर असावा.

भीष्म—हे राजन्, मी तुला कोणतें साह्य करूं तें सांग. मी कौरवांसाठीं युद्ध करणार आहें. पण त्याबरोबरच तुझें कोणतें इष्ट करूं तें सांग.

युधिष्ठिर—हे तात, तुला जर सांगणें योग्य वाटत असेल तर अजिंक्य असलेल्या तुला मी संग्रामांत कोणत्या उपायानें जिंकूं शकेन, हें मला सांग. माझ्या हिताची एवढी सल्ला मला दे.

भीष्म—हे कौंतेया, मला युद्धांत जिंकूं शकेल, असा एकहि पुरुष या लोकीं दिसत नाहीं. साक्षात् शतक्रतु इंद्रहि माझा पराभव करण्यास समर्थ नाहीं.

युधिष्ठिर—हे पितामह, मी तुला हात जोडून नमस्कार करितों व विचारतों कीं, समरांत परपक्षाकडून तुझा वध कोणत्या उपायानें होईल ? तें मला सांग.

भीष्म—बाबारे, युद्धांत माझा वध करील असा कोणीहि मला दिसत नाहीं. शिवाय माझा मृत्युकालहि अद्यापि आलेला नाहीं. यास्तव तूं पुनः मजकडे ये.

संजय—राजा धृतराष्ट्रा, युधिष्ठिरानें भीष्माचें हें वचन शिरसा मान्य केलें व त्याला पुनः एकदां अभिवादन करून तो महाबाहु द्रोणाचार्यांच्या रथाकडे निघाला. सर्व सैन्यें पहात असतां भ्रात्यांसह तो राजा द्रोणाकडे गेला आणि त्याला प्रदक्षिणा घालून व अभिवादन करून स्वतःच्या हिताचें असें वचन बोलला.

( ५ ) युधिष्ठिर—हे भगवन्, मी तुझी अनुज्ञा घेऊन तुझ्याशीं युद्ध करणार आहें. यास्तव मी शत्रूंचा कोणत्या उपायानें पराभव करूं शकेन तें मला सरळ मनानें सांग.

यांवर द्रोणानें भीष्मासारखेंच उत्तर दिलें व त्या दोघांचा पूर्वोक्त प्रकारेंच संवाद झाला. नंतर युधिष्ठिरानें जयाशीर्वाद मागितला असतां द्रोण म्हणाला—हे राजन्, जेथें साक्षात् हरि तुझा मंत्री आहे, तेथें विजय निश्चित आहे. कारण जेथें धर्म तेथें कृष्ण व जेथें कृष्ण तेथें जय. यास्तव हे कौंतेया, जा, युद्ध कर. तुला आणखीं कांहीं हवें असेल तें विचार. मी सांगतों.

**युधिष्ठिर**—हे द्विजश्रेष्ठा, माझें अभिकांक्षित सांगतों, तें ऐक. आपण अजिंक्य आहांत. आपल्याला युद्धांत आम्हीं कोणत्या उपायानें जिंकावें, तें मला सांगा.

**द्रोण**—अरे बाबा, जोंवर मी युद्ध करीत आहें, तोंवर तुला जय मिळणार नाहीं. यास्तव तूं भ्रात्यांसह माझ्या निधनाचा सत्वर यत्न कर.

**युधिष्ठिर**—हे आचार्य, तुला नमस्कार असो. तुला प्रणिपात करून मी विचारीत आहें. मला आपल्या वधाचा उपाय सांग.

**द्रोण**—वत्सा, शत्रूवर शरांची वृष्टि करीत क्षुब्ध होऊन युद्ध करणाऱ्या माझा वध करील असा एकहि वीर मला दिसत नाहीं. मी शस्त्रत्याग करून प्रायोपवेशन करून चेतनाशून्य झाल्यावांचून कोणताहि योद्धा मला मारण्यास समर्थ होणार नाहीं. हें मी तुला सत्य सांगतों. अतिशय श्रद्धेय अशा पुरुषाच्या वचनावरून एखादी अत्यंत अप्रिय वार्ता जेव्हां मला कळेल, तेव्हां मी रणांत शस्त्रत्याग करीन. हेंहि मी तुला अगदीं सत्य सांगत आहें.

( ६ ) **संजय**—महाराज, याप्रमाणें धीमान् भारद्वाजाचें वचन ऐकून धर्मराजानें त्या आचार्यांचा निरोप घेतला व तो शारद्वताकडे गेला. तेथें कृपाचार्यांला प्रदक्षिणा घालून आणि त्याला अभिवादन करून तो वक्त्यांतील श्रेष्ठ युधिष्ठिर त्याला पूर्वींप्रमाणेंच नम्र वचन बोलला व त्याचें त्या गुरूनें भीष्मद्रोणांसारखेंच उत्तर दिलें.

तें ऐकून **युधिष्ठिर** म्हणाला—हे गुरो, मी तुला कांहीं विचारतों, तें माझें वचन ऐक.

इतकें बोलून तो राजा व्यथित झाला. त्याचें देहभान नाहींसें झालें व त्याच्या मुखांतून शब्द उमटेनासा झाला. तेव्हां कृपाचार्यांनें युधिष्ठिराचा

---

१ भीष्म, द्रोण व कृप या तिघांच्याहि संभाषणाचे आरंभाचे श्लोक एकसारखेच असल्यामुळें त्यांच्या अर्थाची येथें पुनरावृत्ति केली नाहीं.

आशय जाणला व तो म्हणाला—हे अजातशत्रो, मी अवध्य आहें, तरीहि तूं युद्ध कर व विजयी हो. तूं अशा रीतीनें माझ्याकडे आलास हें पाहून मला फार संतोष झाला आहे. मी तुझा जय व्हावा, असा नित्य प्रातःकाळीं उठल्या-बरोबर आशीर्वाद देत जाईन. हें मी तुला सत्य सांगतों.

( ७ ) त्यानंतर कृपाचार्यांची अनुमति घेऊन युधिष्ठिर मद्राधीश शल्याकडे गेला, व त्यानें त्यालाहि प्रदक्षिणापूर्वक अभिवादन करून पूर्ववत् आशीर्वचनाची प्रार्थना केली; त्यावर शल्यानेंहि प्रथम आचार्यांप्रमाणेंच उत्तर देऊन म्हटलें कीं, तुझ्या या सत्कारानें मी संतुष्ट झालों आहें. तुझी जी इच्छा असेल ती पूर्ण होवो. तुला माझी अनुज्ञा आहे. युद्ध कर व जय मिळीव. हे भागि-नेया, मी तुला कोणतें साह्य करूं तें सांग.

युधिष्ठिर—हे मातुल, पूर्वी युद्धार्थ उद्योग चालला असतां उद्योगपर्वांत आपली भेट झाली होती. त्यावेळीं तूं आम्हांला जें अभिवचन दिलें आहेस त्याप्रमाणें संग्रामांत कर्णाचा तेजोभंग कर.

शल्य—हे कुंतीपुत्रा, मी तुझा हा मनोरथ पूर्ण करीन. जा, युद्ध कर. तूं कांहीं चिंता करूं नकोस. तुझें इष्ट कार्य करण्याची मी पुनः प्रतिज्ञा करितों.

संजय—हे राजा, त्यानंतर त्या कौंतेयानें आपल्या मातुलाची अनुज्ञा घेतली व तो ज्येष्ठ पांडव भ्रात्यांसह आपल्या महासैन्याकडे परत येण्यास निघाला. इतक्यांत वासुदेव राधेयाकडे गेला व त्याला पांडवांसाठीं असें वचन बोलला—

( ८ ) वासुदेव—हे कर्णा, माझें ऐक. तूं भीष्माच्या द्वेषानें युद्ध न करण्याची प्रतिज्ञा करून बसला आहेस. यास्तव जोंवर भीष्म हत झाला नाहीं, तोंवर तूं आमच्या पक्षाचा स्वीकार कर आणि भीष्माचा वध झाल्या-वर दुर्योधनाला युद्धांत साह्य करण्यास ये. म्हणजे दोन्ही पक्षांशीं तुझी सम-दृष्टि राहील.

कर्ण—हे केशवा, मी दुर्योधनाच्या हितासाठीं प्राणत्यागहि करीन, पण त्या धृतराष्ट्रपुत्राचें कदापि अप्रिय करणार नाहीं, हें तूं निश्चित समज.

संजय—राजा, कर्णाचा तो निश्चय पाहून कृष्ण तेथून परत फिरला व युधिष्ठिराला पुढें करून आपल्या सैन्याकडे जाणाऱ्या पांडवांस येऊन मिळाला. नंतर सैन्याच्या मध्यभागीं स्थित राहून धर्मराज उच्च स्वरानें म्हणाला—

" प्रतिपक्षांतील ज्या कोणाची आमच्या साह्याथ येण्याची इच्छा असेल, त्यांचा आम्ही स्वीकार करूं."

( ९ ) तें ऐकून संतुष्ट झालेला युयुत्सु पांडवांकडे पहात धर्मराजाला असें बोलला—हे महाराज, तूं जर माझा स्वीकार करशील, तर मी या संग्रामांत तुमच्या बाजूनें धार्तराष्ट्रांशीं युद्ध करीन.

युधिष्ठिर—हे युयुत्सो, ये, ये, आपण सर्व मिळून या मूढ धार्तराष्ट्रांशीं युद्ध करूं. वासुदेव आणि आम्ही सर्व तुला हें एकमतानें सांगत आहों. हे महाबाहो, मी तुझा स्वीकार केला आहे, ये आणि माझ्या पक्षानें युद्ध कर. हे राजपुत्रा, तूंच एक धृतराष्ट्राचें संतान पितृयज्ञ करण्यास अवशिष्ट रहाशील व इतर सर्व युद्धांत मरण पावतील, असेंच दिसत आहे. तुझ्यावर आमचें प्रेम आहे व तूंहि आमच्याशीं प्रेमानें वाग. हा अमर्षि दुर्बुद्धि दुर्योधन मृत्युमुखीं पडेल.

संजय—धृतराष्ट्रा, त्यानंतर तुझ्या पुत्रांचा त्याग करून युयुत्सु-'मी पांडवांच्या पक्षाला मिळत आहें,' अशी दुंदुभि वाजवून घोषणा करीत पांडुपुत्रांच्या सेनेंत गेला.

( १० ) त्यानंतर आपल्या अनुजांसह संतुष्ट झालेल्या युधिष्ठिरानें पुनः आपलें उज्ज्वल सुवर्णासारखें देदीप्यमान कवच धारण केलें आणि ते सर्व पुरुषश्रेष्ठ आपापल्या रथांवर आरूढ होऊन पूर्ववत् व्यूह रचून उभे राहिले. त्यावेळीं विविध वाद्यांचा घोष झाला, वीरांनीं सिंहनाद केले. पुरुषव्याघ्र पांडव रथस्थ झालेले पाहून धृष्टद्युम्नादि सर्व पार्थिव पुनः हृष्ट झाले. भीष्मादि श्रेष्ठ मान्यांचा मान करणाऱ्या व त्या पूज्यांकडून गौरवास पात्र झालेल्या पांडवांचा सर्व नृपालांनीं अतिशय सत्कार केला. महात्म्या पांडवांची मैत्री, स्नेह, परदुःख दूर करण्याची इच्छा व आप्त जनांविषयींची दया पाहून सर्वत्र 'धन्य धन्य' असे स्तुतिवाद ऐकूं येऊं लागले. ज्या म्लेच्छ व आर्य जनांनीं पांडवाचें हें पुण्यप्रद वृत्त ऐकलें व पाहिलें होतें त्यांनीं सद्गदित होऊन अश्रु ढाळले. त्यानंतर पुनः एकदा सहस्रावधि नगारे वाजले व हृष्ट झालेल्या वीरांनीं आपले गायीच्या दुधासारखे शुभ्र शंख वाजविले. ६. ४. ४३.

---

## अध्याय ४४ वा.

[ १ कौरव-पांडवांच्या सैन्याचा युद्धारंभ. ]

धृतराष्ट्र—संजया, याप्रमाणें व्यूह रचून सज्ज झालेल्या त्या उभय सैन्यांपैकीं युद्धाला प्रथम आरंभ कोणीं केला ? पांडवांनीं कीं माझ्या पुत्रांनीं ?

(१) संजय—हे राजन्, तुझा पुत्र दुःशासन आपले भ्राते व सैन्य यांसह भीष्माला पुढें करून संग्रामार्थ सज्ज झाला. त्याचप्रमाणें हृष्टचित्त असलेले सर्व पांडव भीमसेनाला पुढें करून भीष्माशीं युद्ध करण्याच्या इच्छेनें पुढें सरसावले. त्यावेळीं वीरांचे सिंहनाद, अश्व-गजांचे निःस्वन आणि विविध वाद्यांचे ध्वनि यांचा फार मोठा शब्द झाला व दोन्ही सैन्यें परस्परांच्या संमुख आलीं. त्या वेळच्या त्या प्रचंड कोलाहलानें वायूनें कांपणाऱ्या वनाप्रमाणें तीं दोन्ही सैन्यें थरथरां कांपूं लागलीं. अशुभ मुहूर्तावर तेथें जमलेल्या अश्व, गज, नर, रथ यांनीं व्याप्त असलेल्या त्या महासेनेचा निर्घोष वादळानें क्षुब्ध झालेल्या समुद्राप्रमाणें भासला. तेव्हां तो अंगावर रोमांच आणणारा तुमुल शब्द ऐकून भीमसेनानें एखाद्या मत्त बलिवर्दाप्रमाणें आरोळी ठोकली, त्याच्या त्या सिंहनादानें सर्व सैन्याचा प्रचंड ध्वनि लोपून गेला व सर्व सेना भयभीत झाली. विद्युल्लतेनें युक्त असलेल्या मेघगर्जनेप्रमाणें भीमाची ती रणगर्जना ऐकून सैन्यांतील अश्व-गजादि वहानें भीतीनें त्रस्त झालीं व तेथेंच देहधर्म करूं लागलीं.

सिंहाला पाहून भयाकुल होणाऱ्या श्वापदांप्रमाणें भीमाला पाहून त्यांची स्थिति झाली.

याप्रमाणें भीमसेन उग्र रूप धारण करून महामेघाप्रमाणें गर्जना करीत पुढें आला असतां तुझे पुत्र भयभीत झाले. तो महाधनुर्धर येत आहे, असें पाहून सूर्याला आच्छादित करणाऱ्या मेघाप्रमाणें तुझ्या पुत्रांनीं शरजालांनीं त्याला झांकून टाकिलें. दुर्योधन, दुर्मुख, दुःशल, शल, दुःशासन, दुर्मर्षण, विविंशति, चित्रसेन, विकर्ण, पुरुमित्र, जय, भोज, व सौमदत्ति, यांनीं विद्युल्लतायुक्त मेघाप्रमाण आपलीं धनुष्यें आकर्ण ओढून अनेक बाणांनीं त्याला झांकून टाकिलें. ते नाराच बाण कात टाकलेल्या सर्पाप्रमाणें तेजस्वी दिसत होते.

त्यावेळीं द्रौपदीचे पुत्र, महारथ सौभद्रेय, नकुल, सहदेव व पार्षत धृष्टद्युम्न तीक्ष्ण शरांनीं धार्तराष्ट्रांना वेध करीत धांवले. तीक्ष्ण वज्रांनीं पर्वताचीं शिखरें

जशीं छिन्न भिन्न व्हावीं, तशी त्यांच्या शरांनीं ( तुझ्या पुत्रांची ) अवस्था केली. धनुष्याचे टणत्कार व तलत्राणांचा निर्घोष यांचा भयंकर ध्वनि होऊं लागला. त्या युद्धाच्या पहिल्याच प्रसंगीं दोन्ही पक्षांतील एकहि योद्धा युद्ध पराङ्मुख झाला नाहीं. त्या वेळचें त्या द्रोणशिष्याचें हस्तलाघव अप्रतिम होतें. धनुष्यापासून सुटणाऱ्या शरांचा व धनुष्यांचा निर्घोष क्षणभरहि शांत झाला नाहीं. अंतरिक्षांतून सुटणाऱ्या ताऱ्याप्रमाणें ते शर शोभत होते.

तेथें जमलेल्या सर्व महीपालांनीं आप्तबांधवांचा तो भयंकर संग्राम पाहिला. कौरव पांडवांनीं परस्परांचे अपराध केले होते; कौरवांनीं जसे पांडवांचे अक्षम्य व अगणित अपराध केले होते, त्याचप्रमाणें भीमसेनानें बालवयांत कौरवांचें मर्दन करून त्यांना पीडा दिली होती. त्यामुळें ते स्पर्धेनें परस्परांस शरांनीं आच्छादित करीत होते. हत्ती, अश्व, रथादिकांनीं संकुल झालेलीं तीं दोन्ही सैन्यें चित्रपटांतील सेनेप्रमाणें अतिशय शोभलीं. त्यानंतर ते सर्व राजे सैन्या-सह आपापले भाते सांवरून तुझ्या पुत्राच्या आज्ञेनें शत्रूवर धांवून आले. त्याचप्रमाणें युधिष्ठिराच्या आदेशाप्रमाणें त्याच्या पक्षांतील सहस्रावधि पार्थिव सिंहनाद करीत तुझ्या सैन्यावर धांवले. उभय सैन्यांचा असा तुमुल समागम झाला असतां सर्व अंतरिक्ष धूलीनें आच्छादित झालें. सूर्य झांकून गेला. युद्धार्थ पुढें जाणारे, पळणारे व परत फिरून युद्ध करणारे, यांतील आपले कोण व परकीय कोण हें ओळखूं येईनासें झालें. याप्रमाणें भयप्रद तुमुल संग्राम चालला असतां सर्व सैन्याचें अतिक्रमण करून तुझा पिता शांतनव भीष्म अग्रभागीं अतिशय शोभला. ६. ४. ४४.

---

## अध्याय ४५ वा.

[ १ युद्ध करणारा प्रमुख योद्धा व त्याचा प्रतिपक्षी यांचें वर्णन. ]

(१) **संजय**—हे राजा, पूर्वाह्णसमयीं महाघोर युद्ध प्रवृत्त झालें. परस्परांस जिंकण्याची इच्छा करणाऱ्या कौरव व सृंजय यांच्या नृपतींचे देह छिन्न-विच्छिन्न होऊन पडलेले दिसूं लागले. गर्जना करणाऱ्या शूरांच्या आरोळया व शंखांचा प्रचंड ध्वनि यांनीं अंतरिक्ष व पृथ्वी निनादित झाली. अश्व, गज, पदाति, अश्वसादी, गजरोही व विविध वाद्यें आणि मेघगर्जनेसारखा रथनिर्घोष यांचा अंगावर रोमांच आणणारा भयंकर शब्द झाला.

सर्व कौरव जीवावर उदार झाले होते. त्यांनीं आपलीं मनें निष्ठुर केलीं होतीं. ते सर्व आपापले ध्वज उभारून पांडवांवर धांवून गेले. त्यावेळीं शान्तनव भीष्म आपलें कालदण्डोपम घोर धनुष्य घेऊन धनंजयावर चालून गेला. तेव्हां तेजस्वी अर्जुनहि आपलें लोकप्रसिद्ध धनुष्य घेऊन गांगेयावर तुटून पडला. ते दोघेहि कुरुश्रेष्ठ परस्परांच्या वधाची इच्छा करीत होते. गांगेयानें पार्थाला विद्ध केलें असतां तो कंपित झाला नाहीं, किंवा पार्थहि गांगेयाला वेध करून कांपवूं शकला नाहीं.

महाधनुर्धर सात्यकि कृतवर्म्यावर धांवून गेला, त्यावेळीं त्या दोघांचें तुमुल युद्ध झालें. त्या उभयतांनीं परस्परांस तीक्ष्ण शरांनीं आच्छादून टाकिलें. तेव्हां शरांनीं सर्वांगविद्ध झालेले ते दोघे वीर वसंतऋतूंतील पुष्पित पलाशवृक्षाप्रमाणें शोभले.

अभिमन्यु बृहद्बलावर चालून गेला. त्यावेळीं त्या कोसलराजानें अभिमन्यूच्या ध्वजाचा छेद केला व त्याच्या सारथ्याला पाडलें. त्या वेळीं क्रुद्ध झालेल्या सौभद्रानें बृहद्बलाला नऊ शरांनीं विद्ध केलें व सारथ्यासह त्याचा रथ पाडला. नंतर एका तीक्ष्ण भल्ल बाणानें त्याचा ध्वज तोडला व दुसऱ्या बाणानें सारथ्याला व पृष्ठरक्षकाला विद्ध केलें.

हे राजन्, भीमसेन दुर्योधनावर धांवून गेला. त्या दोघां महाबलाढ्य नरश्रेष्ठांनीं परस्परांवर शरांची वृष्टि केली. विचित्र युद्ध करणाऱ्या त्या युद्धकुशल वीरांना पाहून सर्व प्राणी विस्मित झाले. दुःशासनानें शंभर मर्मभेदी बाणानें नकुलाला विद्ध केलें. तेव्हां नकुलानें हंसतच तीक्ष्ण बाण सोडले आणि त्याचा ध्वज, बाण व भाते यांचा छेद केला. तें पाहून तुझ्या दुर्धर्ष पुत्रानें अनेक बाण सोडले व नकुलाच्या अश्वांचा छेद करून त्याचा ध्वज पाडविला.

दुर्मुखानें महाबलाढ्य सहदेवाशीं युद्ध आरंभिलें. त्यानें शरवर्षावानें त्या पांडवाला विद्ध केलें. तेव्हां त्या माद्रीपुत्रानें तीक्ष्ण बाण सोडून दुर्मुखाच्या सारथ्याला खालीं पाडविलें. याप्रमाणें त्या रणांगणांत दोघांहि युद्धदुर्मद वीरांनीं तीक्ष्ण शरांनीं परस्परांस त्रस्त केलें.

हे राजा, युधिष्ठिर स्वतः मद्रराजावर धांवून गेला असतां मद्रराजानें त्याच्या धनुष्याचे दोन तुकडे करून टाकिले. तेव्हां त्या कुंतीपुत्रानें दुसरें दृढ व वेगवान् धनुष्य धारण केलें व क्रुद्ध होऊन 'थांब थांब' असें म्हणत

मद्रराजाला शरवृष्टीनें आच्छादून टाकिलें. धृष्टद्युम्न द्रोणावर धांवून गेला. तेव्हां त्या क्रुद्ध झालेल्या आचार्यानें त्याच्या धनुष्याचा तीन ठिकाणीं छेद केला व कालदंडाप्रमाणें दुसरा शर सोडून त्या पांचालाचें शरीर विद्ध केलें. तेव्हां द्रुपदपुत्रानें दुसरें धनुष्य घेऊन चवदा शरांनीं द्रोणाला विद्ध केलें व क्रुद्ध झालेल्या त्या दोघांचें तुमुल युद्ध सुरू झालें.

त्या संग्रामांत शंख 'थांब थांब' असें म्हणत सौमदत्तीवर धांवून गेला व त्यानें त्याचा दक्षिण बाहु विद्ध केला. तेव्हां सौमदत्तीनें शंखाच्या कंठप्रदेशीं वेध केला. त्या वेळीं दृप्त झालेल्या त्या दोघांचा तो घोर संग्राम वृत्र-वासवाच्या युद्धाप्रमाणें भासला. महारथ धृष्टकेतु क्रुद्ध होऊन बाह्लीकावर धांवून गेला. तेव्हां बाह्लीकानें सिंहनाद करून अनेक शरांनीं त्याला आच्छादून टाकिलें. त्यावेळीं एक मत्त गज जसा दुसऱ्या मत्त गजावर प्रहार करितो, तसा तो चेदिराज बाल्हीकावर प्रहार करण्यासाठीं चालून गेला व त्यानें नऊ शरांनीं त्याला वेध केला. त्यावेळीं ते दोघे गर्जना करणारे क्रुद्ध वीर परस्परांच्या समीप येणाऱ्या बुध व मंगळ या ग्रहांप्रमाणें भासले.

क्रूरकर्मा घटोत्कच बलीवर चालून जाणाऱ्या इंद्राप्रमाणें अलंबुष राक्षसावर धांवून गेला व त्यानें नव्वद शरांनीं त्याला विदीर्ण केलें. तेव्हां त्या राक्षसानेंहि अनेक नतपर्व बाणांनीं त्या भीमसेनाच्या पुत्राला विद्ध केलें. त्यावेळीं त्यांचीं अंगें शरांनीं क्षतयुक्त झालीं व ते दोघेहि बलाढ्य योद्धे देवासुरांच्या युद्धांतील बल व शक्र यांप्रमाणें शोभले. शिखंडी अश्वत्थाम्यावर चालून गेला, तेव्हां त्या द्रौणीनें तीक्ष्ण नाराच बाण सोडून शिखंडीला कंपित केलें. शिखंडीनेंहि तीक्ष्ण धारेचा बाण सोडून त्याला पीडित केलें. त्या दोघांनीं याप्रमाणें विविध प्रकारच्या बाणांनीं एकमेकांस अतिशय पीडा दिली. सेनापति विराट शूर भगदत्तावर चाल करून गेला व त्या दोघांचें तुमुल युद्ध जुंपलें. पर्वतावर जशी मेघवृष्टि व्हावी, त्याप्रमाणें विराटानें भगदत्तावर शरांचा वर्षाव केला. तेव्हां मेघानें जसें सूर्याला आच्छादून टाकावें, त्याप्रमाणें भगदत्तानें विराटराजाला बाणांनीं झांकून टाकिलें.

शारद्वत कृपानें कैकेय बृहत्क्षत्राला शरवृष्टीनें आच्छादून टाकिलें. क्रुद्ध झालेल्या कैकेयानेंहि कृपावर उलट शरवृष्टि केली. त्या दोघां वीरांनीं परस्परांचे अश्व मारले व धनुष्यें तोडलीं. तेव्हां ते विरथ झालेले योद्धे खड्गांनीं युद्ध

करूं लागले व त्या अमर्षी वीरांचें दारुण युद्ध जुंपलें. प्रसन्नचित्त द्रुपदराजा प्रसन्नवदन जयद्रथावर धांवला. तेव्हां सैंधवानें तीन विशिख बाण सोडून द्रुपदाला विद्ध केलें व द्रुपदानें पुनः त्याला वेध केला. त्यावेळीं त्या दोघांचें तें दारुण युद्ध शुक्र व मंगळ यांच्या युतीप्रमाणें नेत्रांना आल्हादकारक वाटलें.

राजा, तुझा पुत्र विकर्ण महाबलाढ्य सुतसोमावर वेगवान् अश्वांसह धांवून आला. त्यानें त्या भीमसेनाच्या पुत्रावर अनेक शर सोडले, पण तो वीर यत्किंचित्हि व्याकुल झाला नाहीं. त्यानें उलट आपल्या प्रतियोद्धयावरच प्रहार केले. याप्रमाणें त्या दोघांचें अद्भुत युद्ध झालें. महारथ चेकितान पांडवांच्या बाजूनें सुशर्मावर चाल करून गेला. तेव्हां सुशर्मानें फार मोठा शरवर्षाव करून त्याचें निवारण केलें. तें पाहून क्षुब्ध झालेल्या चेकितानानें पर्वताला आच्छादित करणाऱ्या महामेघाप्रमाणें त्याला शरांनीं आच्छादून टाकिलें.

हे महाराज, एखादा मत्त सिंह गजावर जसा चालून जातो, तसा शकुनि प्रतिविंध्यावर धांवून गेला. त्यावेळीं त्या युधिष्ठिरपुत्रानें दानवाला विद्ध करणाऱ्या इंद्राप्रमाणें त्याला तीक्ष्ण धारेच्या शरांनीं विदीर्ण केलें. श्रुतकर्मा काम्बोजांच्या महारथ सुदक्षिणावर चालून गेला. सुदक्षिणानेंहि त्या सहदेवपुत्राला शरांनीं विद्ध केलें. परंतु तो मैनाकपर्वताप्रमाणें अकंप्य राहिला व त्यानें क्रुद्ध होऊन त्या काम्बोजवीराला अनेक शरांनीं झांकून टाकिलें. अर्जुनाचा पुत्र इरावान् श्रुतायुषावर धांवला व त्याच्या अश्वांचा वध करून त्यानें उच्च रवानें सिंहनाद केला. त्याच्या गर्जनेनें तें सर्व सैन्य निनादित झालें. तेव्हां क्रुद्ध झालेल्या श्रुतायूनें गदाघातानेंच फाल्गुनीच्या अश्वांस गतप्राण केलें व त्या दोघांचें तुमुल युद्ध प्रवृत्त झालें.

आवंत्य वीर विन्दानुविन्दांनीं ससैन्य व सपुत्र अशा महारथ कुन्तिभोजांशीं द्वंद्व युद्ध आरंभिलें. त्याच्या फार मोठ्या सेनेसह त्या दोघांनीं स्थिर राहून युद्ध केलें. प्रथम अनुविन्दानें गदेनें कुंतिभोजाला ताडन केलें. कुन्तिभोजानें त्याच्यावर शरवर्षाव केला. कुन्तिभोजाच्या पुत्रानें विन्दाला बाणांनीं विद्ध केलें व त्यानें त्याला प्रतिवेध केला. त्यांचें तें युद्ध फारच अद्भुत झालें.

ससैन्य पांच कैकेयांनीं सेनेसह पांच गान्धारांशीं युद्ध केलें. तुझा पुत्र वीरबाहु विराटपुत्राशीं युद्ध करूं लागला. त्यानें उत्तराला तीक्ष्ण शरांनीं विद्ध केलें व उत्तरानें त्यालाहि तसाच वेध केला. चेदिराजानें उलूकावर शरवृष्टि

केली व उलूकानें त्याच्यावर तीक्ष्ण शर सोडिले. त्या दोघांहि अजिंक्य वीरांचें त्यावेळीं घोर युद्ध प्रवृत्त झालें.

हे महाराज, याप्रमाणें आरंभाला दोन दोन योद्ध्यांचें युद्ध चाललें होतें. रथ, अश्व, गज व पदाति यांनीं संकुल असलेल्या उभय सैन्यांचें तें युद्ध मुहूर्तमात्र प्रेक्षणीय होतें. परंतु नंतर त्याला उग्र स्वरूप प्राप्त झालें. त्या रणांगणांत गज गजांवर, अश्व अश्वांवर, रथी रथ्यांवर व पदाति पदातींवर धांवून गेले व दारुण युद्ध प्रवृत्त झालें. भूमीवरील तो घोर रणसंग्राम पाहून तेथें जमलेले सिद्ध, चारण व देवर्षि यांना देवदानवांच्याच युद्धाचा भास झाला. त्या रणधुमाळीमध्यें नियमांचें अतिक्रमण होऊन सहस्रावधि गज, रथ व अश्व यांचा समुदाय व पुरुषांचे संघ परस्परांवर तुटून पडले आणि जेथें तेथें त्यांचें पुनः पुनः होत असलेलें युद्ध दृष्टीं पडलें. ६. ४. ४५.

---

## अध्याय ४६ वा.

[ १ संकुलयुद्ध. ]

( १ ) **संजय**—हे राजन्, त्या रणांगणांत सहस्रावधि पदातींचें जेथें तेथें अमर्याद युद्ध कसें झालें, तें मी तुला सांगतों, ऐक. त्या संग्रामांत पुत्र पित्याला जाणत नव्हता, किंवा पिता आपल्या औरस पुत्राला ओळखीत नव्हता. त्याचप्रमाणें भ्राता भ्रात्याला, मातुल भागिनेयाला किंवा सखा सख्याला मानीत नव्हता. ते परस्परांवर तुटून पडत होते. अशाप्रकारें अंगांत संचार झाल्याप्रमाणें पांडव कौरवांशीं युद्ध करीत होते.

कांहीं नरव्याघ्र रथारूढ होऊन रथांवर तुटून पडत होते. अश्वांच्या खांद्यावरील जूं—आडवें ठेवलेलें जें रथाचें लांकुड, तें दुसऱ्या जुवावर आपटून भग्न होत होतें. रथदंड दुसऱ्या दंडावर आणि रथकूबर—जुंवाचे खिळे—दुसऱ्या कूबरावर आपटत होते. याप्रमाणें परस्परांना मारण्याच्या इच्छेनें ते रथ दुसऱ्या रथांशीं इतके भिडले होते कीं, त्यांस आपल्या जागेवरून हलतांहि येत नव्हतें. क्रुद्ध झालेले व प्रचंड शरीरी मदोन्मत्त गज आपल्या शुंडांनीं परस्परांस विदीर्ण करीत होते. अंबाऱ्यांनीं युक्त असलेले व पताका उभारलेले कांहीं वेगवान् महागज टक्कर देऊं लागले असतां त्या महागजांच्या दातांचे प्रहार सहन न झाल्यामुळें सामान्य गज विह्वल होऊन चीत्कार करूं लागले. कांहीं हत्ती उत्तम प्रकारें शिकविलेले

होते, ते मदोन्मत्त नसूनहि अंकुशाचा मार सहन करून मदोन्मत्त हत्तींशीं टक्कर देऊं लागले, पण त्यांच्यावर मदोन्मत्त गज प्रहार करूं लागतांच ते क्रौंच-पक्ष्यांप्रमाणें आक्रोश करीत दश-दिशांत पळत सुटले. कित्येक ऋष्टि, तोमर, नाराच यांनीं विद्ध झाल्यामुळें चीत्कार करीत गतप्राण होऊन पडले. कांहीं कर्कश शब्द करीत इतस्ततः धांवूं लागले.

त्या गजांचे पादरक्षक वीर, गदा, मुसळें, खड्ग, इत्यादि विविध आयुधें हातांत घेऊन परस्परांचा वध करण्याच्या इच्छेनें धांवत असलेले दृष्टीं पडले. ते वीर रक्तानें माखलेल्या तलवारी हातांत घेऊन शत्रूंच्या मर्मांवर आघात करीत असतां त्यांच्या आयुधांचा फार मोठा खणखणाट झाला. त्याचप्रमाणें जेथें तेथें गदा, मुसळें यांच्या प्रहारांनीं छिन्न भिन्न झालेल्या, तीक्ष्ण खड्गांनीं कापलेल्या व हत्तींनीं दांतांनीं छेद केलेल्या, पायांनीं तुडविलेल्या आणि परस्परांच्या नांवांनीं आक्रोश करणाऱ्या सैनिकांचा फार मोठा कोलाहल ऐकूं येत होता. तो मरणोन्मुख जीवांचा आर्तस्वर अतिशय हृदयद्रावक होता. हंसासारख्या अतिशय वेगवान् अश्वावर आरूढ झालेले योद्धे सर्पासारखे तीक्ष्ण बाण सोडीत परस्परांस विद्ध करीत होते. कांहीं अश्वसादी आपल्या नतपर्व बाणांनीं वीरांच्या मस्तकांचा छेद करीत होते व बाणांच्या संमुख आलेल्या योद्ध्यांना गतप्राण करीत होते.

नवमेघासारखी कांति असलेले, सुवर्णभूषित मत्त गज अश्वांना आपल्या पायांखालीं चिरडून टाकीत होते. कांहीं गजांचीं गंडस्थलें व दोन्ही बाजू बाणांनीं विदीर्ण झाल्यामुळें ते विह्वल होऊन चीत्कार करूं लागले. ते अतिशय क्षुब्ध झाले व भयंकर संग्राम सुरू झाला. त्या श्रेष्ठ गजांनीं सैन्यांत सर्वभर धांवून आपल्या दंताग्रांनीं अश्वसादींसह अश्वांना उडवून दिलें, कांहीं मदोन्मत्त गजांनीं अश्व व त्यांवरील योद्धे या दोघांनाहि आपल्या शुंडांनीं पाडून पायांखालीं तुडविले व ध्वजांसह रथसमूहास सोंडांनीं चिरडून टाकिले. अश्वसादी व गजसादि यांनीं सोडलेले सर्पतुल्य शर शत्रूंचीं शरीरें विद्ध करीत होते. वीरांच्या उल्केसारख्या घोर शक्ति योद्ध्यांच्या पोलादी कवचांचा भेद करून आणि त्यांच्या व अश्वांच्या शरीरांचा छेद करून खालीं पडत होत्या. वाघ व चित्ते यांच्या कातड्यांनीं मढविलेल्या म्यानांतून चकचकीत खड्गें उपसून कांहीं महारथ शत्रूंच्या वीरांवर प्रहार करीत होते. कित्येक शत्रूंच्या पुढें निर्भयपणानें उभे रहात होते, कांहीं दांत-ओंठ खात होते व कोणी डाव्या

बाजूनें एकदम प्रहार करीत होते. कांहीं गज आपल्या सोंडांनीं अश्वांसह रथांना ओढीत धांवत होते.

हे राजन्, याप्रमाणें त्या समरांगणांत कोणी रथदंडाच्या खिळयांनीं विदीर्ण होऊन, कोणी शस्त्रांनीं छिन्न-भिन्न होऊन आणि कित्येक गज, अश्व व रथ यांच्या खालीं तुडविले जाऊन विह्वल झाले होते. कित्येक आपल्या पुत्रांच्या नांवांनीं, पुत्र पित्यांच्या नांवांनीं, भाचा मामाच्या नांवानें, मामा भाच्याच्या नांवानें, तर कांहीं शत्रूंच्याहि नांवानें आक्रोश करीत होते. त्यांतील बहुतेकांचे हात-पाय तुटले होते व शरीर छिन्न-भिन्न झालें होतें. ते तृषार्त झाले होते व जीवितेच्छेनें आक्रोश करीत होते. कांहीं दुर्बल मनाचे योद्धे तृषेनें व्याकुल होऊन भूमीवर पडले होते व ' कोणी तरी थोडेंसें पाणी द्या हो ' अशी दीन-वाणीनें जलाची याचना करीत होते. कित्येक रक्तानें माखलेले व क्षतांनीं विह्वल झालेले योद्धे स्वतःची व तुझ्या पुत्रांची निंदा करीत होते. दुसरे जे कांहीं शूर क्षत्रिय होते, ते हातांतील शस्त्र न टाकतां क्रोधानें शत्रूंवर तुटून पडत होते. ते दांत ओंठ खात परस्परांकडे भ्रुकुटी वक्र करून पहात होते. कांहीं बलाढ्य योद्धे समर्थ असूनहि शरार्त झाल्यामुळें निःशब्द होऊन पडले होते. कांहीं शूरांना मत्त गजांनीं रथांतून खालीं पाडविलें, त्यामुळें ते विरथ झालेले वीर अन्य रथस्थ योद्धयांची रथांत घेण्याविषयीं प्रार्थना करीत होते. त्यावेळीं ते रक्तानें माखलेले वीर पुष्पांनीं प्रफुल्ल झालेल्या पलाशवृक्षांप्रमाणें शोभले. त्या घोर संग्रामांत योद्धयांचा संहार होत असतां सर्वत्र दारुण आर्त-स्वर ऐकूं येऊं लागला. त्या रणधुमाळींत कोणी कोणास ओळखलें नाहीं. पित्यानें पुत्रावर प्रहार केले, पुत्रानें पित्याला गतप्राण केलें. मामानें भाच्याचा वध केला. भाच्यानें मामाला यमसदनीं पाठविलें. स्नेह्यानें स्नेह्यावर शस्त्र चालविलें व आप्तांनीं आप्तांना विद्ध केलें. याप्रमाणें त्या निर्मर्याद भयानक संग्रामांत कौरव-पांडवांचें युद्ध चाललें होतें. पांडवांची सेना भीष्मापर्यंत जेव्हां येऊन पोंचली, तेव्हां त्या नरश्रेष्ठाला पाहून ती कांपूं लागली. भीष्माच्या ध्वजा-वर पांच तारे असून तो रौप्य दंडावर उंच उभारलेला होता. अशा ध्वजानें युक्त असलेल्या सोनेरी रथांत बसलेला भीष्माचार्य मेरुपर्वतावरील चंद्राप्रमाणें शोभला. ६. ४. ४६.

---

## अध्याय ४७ वा.

[ १ भीष्माचें अभिमन्यूशीं युद्ध. २ उत्तराचा वध. ३ श्वेताशीं युद्ध. ]

( १ ) **संजय**—हे महाराज, त्या दिवशीं पूर्वाह्ण संपून अपराह्ण प्रवृत्त झाला असतां तें वीर क्षयकर युद्ध अधिकच घोर झालें. त्यावेळीं तुझ्या पुत्राच्या आज्ञेनें दुर्मुख, कृतवर्मा, कृप, शल्य व विविंशति भीष्माचें संरक्षण करूं लागले. तेव्हां या पांच योद्ध्यांनीं ज्याचें रक्षण केलें आहे, अशा भीष्मानें निःशंकपणें शत्रू-सैन्यांत संचार केला. चेदि, काशि, करुष व पांचाल, यांच्या सैन्यांतून भीष्माचा तालध्वज वारंवार दिसूं लागला. त्या गांगेयानें वेगवान् बाणांनीं शत्रूंचीं मस्तकें, ध्वज व जूं यांसह रथ भग्न करून टाकिले. त्यावेळीं भीष्म रथमार्गांत जणुंकाय नृत्यच करीत होता. तेव्हां मर्मावर ताडन केल्यामुळें अनेक गज आर्त स्वरांनीं चीत्कार करूं लागले.

तें पाहून अभिमन्यु अतिशय क्षुब्ध झाला. त्यानें पिंगल वर्णाचे अश्व जोडलेल्या व सुवर्णानें भूषित असलेल्या रथांत बसून भीष्माशीं युद्ध आरंभिलें. त्याच्या रथावर कर्णिकाकार ध्वज शोभत होता. तो सौभद्रेय तालध्वज असलेल्या भीष्माशीं व त्याच्या संरक्षक पांच वीरांशीं युद्ध करूं लागला. त्यानें कृतवर्म्याला एका बाणानें व शल्याला पांच बाणांनीं विद्ध केलें आणि नऊ तीक्ष्ण शर प्रपिता-महावर सोडिले. एका बाणानें दुर्मुखाच्या ध्वजाचा छेद केला. कवचाचा भेद करणाऱ्या तीक्ष्ण नतपर्व बाणानें दुर्मुखाच्या सारथ्याचा शिरश्छेद केला. एक तीक्ष्ण बाण सोडून कृपाचें धनुष्य तोडून टाकिलें आणि दुसरे अनेक तीक्ष्ण शर सोडून इतर योद्ध्यांचा वध केला. त्यावेळीं त्या रणांगणांत तो क्रुद्ध झालेला वीर जणु काय नृत्यच करीत आहेसें भासलें. त्याचें तें हस्तचापल्य पाहून देवताहि संतुष्ट झाल्या. अभिमन्यूचें लक्ष्यवेधांतील प्राविण्य अनुभवून भीष्मादि सर्व रथी त्याला साक्षात् धनंजयच समजले. त्याचें तें गांडिवा-सारखेंच टणत्कार करणारें दिव्य धनुष्य दाही दिशांत चपलतेनें फिरत असतां अलातचक्राचाच भास झाला.

त्यावेळीं परवीरहा भीष्मानें अभिमन्यूवर नऊ वेगवान् शर सोडले व तीन भल्ल बाणांनीं त्याच्या ध्वजाचा छेद केला. तीन बाणांनीं सारथ्याला विद्ध केलें. त्याचप्रमाणें कृतवर्मा, कृप व शल्य यांनींहि त्याला शरांनीं विद्ध केलें. पण तो वीर यत्किंचित्‌हि कंपित न होतां मैनाक पर्वताप्रमाणें अचल राहिला. याप्र-

माणें भीष्म धार्तराष्ट्राच्या पांच महारथांनीं परिवेष्टित असतांहि त्या शूर अभिमन्यूनें शत्रूवर शरांचा वर्षाव केला. त्या योद्ध्यांच्या आयुधांचें आपल्या शरवृष्टीनें निवारण करीत भीष्मावर बाण सोडिले व सिंहनाद केला. तेव्हां भीष्माला शरांनीं जर्जर करणाऱ्या त्या वीराचें बाहुबल सर्वांच्या प्रत्ययास आलें. भीष्मानेंहि त्याच्या शरांचें निवारण केलें व त्यानें भीष्माच्या धनुष्यापासून सुटलेल्या बाणांचे तुकडे केले. नंतर त्या वीरानें नऊ अमोघ शर सोडून भीष्माचा ध्वज तोडून टाकिला. तेव्हां योद्ध्यांनीं फार मोठी गर्जना केली. सौभद्रानें विशिख बाणांनीं छिन्न केलेला ध्वज भूमीवर पडलेला पाहून भीमानें फार मोठ्यानें सिंहनाद केला. त्या प्रोत्साहनानें अभिमन्यु अतिशय हृष्ट झाला.

या घोर संग्रामांत पितामहानें अनेक दिव्य महाअस्त्रें सोडून अभिमन्यूला आच्छादून टाकिलें. तें मोठें अद्भुत युद्ध झालें. त्यावेळीं अभिमन्यूच्या रक्षणार्थ विराट, उत्तर, धृष्टद्युम्न, भीम, सात्यकि व पांच केकय भ्राते असे दहा पांडवांचे वीर धांवून आले. वेगानें चालून येणाऱ्या त्या योद्ध्यांना पाहून भीष्मानें धृष्टद्युम्नावर तीन व सात्यकीवर नऊ बाण सोडिले व आकर्ण धनुष्य ओढून सोडलेल्या तीक्ष्ण बाणानें भीमसेनाच्या ध्वजाचा छेद केला. भीमाचा तो श्रीमान् ध्वज सुवर्णाचा असून सिंहाच्या चिह्नानें युक्त होता. तो भीष्माच्या शरांनीं तुटून खालीं पडला. तें पाहून भीमानें तीन बाणांनीं पितामहास, एकानें कृपाचार्यास व आठांनीं कृतवर्म्यास वेध केला.

( २ ) याप्रमाणें भीष्माशीं घनघोर युद्ध चाललें असतां दुसरीकडे विराटपुत्र उत्तर आपल्या मत्त गजावर आरुढ होऊन मद्राधिप शल्यावर धांवून गेला. तेव्हां तो श्रेष्ठ गज आपल्या रथावर चाल करून येत आहे, असें पाहून शल्यानें अनेक शरांची वृष्टि करून त्याचा अप्रतिम वेग थांबविण्याचा यत्न केला, परंतु त्यामुळें त्याचें निवारण न होतां तो गजेंद्र अधिकच क्षुब्ध झाला. त्यानें शल्याच्या रथाचा रथदंड पायांखालीं दाबून त्याच्या चारी धिप्पाड अश्वांना तुडवून टाकिलें. याप्रमाणें अश्वांचा वध झाला असतांहि शल्य त्या अश्वरहित रथांतच बसून राहिला व त्यानें उत्तराचा अंत करणारी एक सर्पतुल्य लोहमय शक्ति त्यावर सोडिली. ती उत्तराच्या कवचाचा भेद करून त्याच्या शरीरांत शिरली, तेव्हां त्या विराटपुत्राला मूर्च्छा आली, त्याच्या दृष्टीपुढें अंधकार पसरला, त्याच्या हातांतून अंकुश व तोमर गळून तो गजस्कंधावरून खालीं पडला. तेव्हां शल्यानें रथांतून उतरून खड्ग हातीं घेतलें व त्या गजाची दीर्घ

शुंडा तोडून टाकिली. त्यावेळीं मर्मावर आघात झालेला तो श्रेष्ठ गज मोठ्यानें चीत्कार करून खालीं पडला व मृत्यु पावला. अशाप्रकारें पराक्रम करून शल्य कृतवर्म्याच्या श्रेष्ठ भास्वर रथावर चढला.

( ३ ) त्यावेळीं उत्तराचा वध करून शल्य कृतवर्म्याच्या रथांत बसलेला पाहून विराटपुत्र श्वेत अतिशय क्रुद्ध झाला. तो उत्तराचा भ्राता हवीनें प्रज्वलित होणाऱ्या अग्नीप्रमाणें क्रोधानें संतप्त झाला. त्यानें आपलें विशाल धनुष्य आकर्ण ओढलें व तो बलीचा वध करणाऱ्या इंद्राप्रमाणें शल्यावर धांवून गेला. शल्य फार मोठ्या रथसमुदायानें परिवेष्टित होता. तरीहि श्वेत बाणांचा वर्षाव करीत शल्यापर्यंत जाऊन पोंचला. तेव्हां एखाद्या मत्त गजाप्रमाणें येत असलेल्या त्या वीराला पाहून तुझ्या पक्षांतील कोसलाधिप बृहद्बल, मगधाधिश जयत्सेन, शल्यपुत्र रुक्मरथ, अवंतीचे राजपुत्र विंद व अनुविंद, कांबोजचा सुदक्षिण आणि बृहत्क्षत्राचा सिंधुपति जयद्रथ हे सात रथी शल्याला मृत्युमुखांतून वांचविण्यासाठीं पुढें झाले व त्यांनीं श्वेताला वेढून टाकिलें. त्या साती योद्ध्यांचीं आकर्ण ओढलेलीं चित्र-विचित्र धनुष्यें मेघमंडलावरील विद्युल्लतेप्रमाणें चमकत होतीं. वर्षाकालीं वायूनें उडवून नेलेले मेघ पर्वतावर जशी जलवृष्टि करितात, तशी त्या सात वीरांनीं श्वेताच्या मस्तकावर शरवृष्टि केली.

तेव्हां क्षुब्ध झालेल्या त्या सेनापतीनें सात भल्ल बाणांनीं त्या सातीजणांचीं धनुष्यें तोडून टाकिलीं. तोंच एका निमेषार्धांत त्यांनीं दुसरीं धनुष्यें घेतलीं व श्वेतावर दुसरे सात बाण सोडिले. परंतु अमेयात्म्या श्वेतानें पुनः सात भल्ल बाण सोडून त्यांचीं धनुष्यें कापून टाकिलीं. त्या वेळीं त्या महारथांनीं सात रथशक्ति घेऊन भयंकर गर्जना करीत त्या श्वेताच्या रथावर सोडिल्या, परंतु महेंद्राच्या अशनीप्रमाणें प्रज्वलित असलेल्या त्या शक्ति त्याच्या रथापर्यंत येऊन पोंचण्यापूर्वींच परम अस्त्रवेत्त्या श्वेतानें सात तीक्ष्ण धारेचे भल्ल बाण सोडून छेदून टाकिल्या.

त्यानंतर श्वेतानें सर्व शरीराचें विदारण करणारा एक शर रुक्मरथावर सोडिला. तो वज्रासारखा तीव्र शर त्याच्या शरीराचा भेद करून निघून गेला. त्यामुळें रुक्मरथ मूर्च्छित होऊन रथांतच पडला. तेव्हां आंपला स्वामी संज्ञाशून्य होऊन निश्चेष्ट पडलेला पाहून त्याच्या सारथ्यानें सर्व लोकांच्या समक्ष

त्याचा रथ रणांगणांतून दूर नेला. नंतर श्वेतानें सुवर्णानें भूपित असलेले सहा शर घेऊन त्या सहा रथ्यांच्या रथावर सोडले व त्यांच्या ध्वजांचीं शिखरें तोडून टाकिलीं. त्यांचे अश्व व सारथि यांचा वध केला व तो राजपुत्र पुनः शल्यावर चालून गेला.

तो विराटाचा पुत्र शल्यावर धांवून जात आहे, हें पाहून तुझ्या सैन्यांत हाहाकार झाला. तेव्हां भीष्माला पुढें करून तुझा महाबल पुत्र सर्व सैन्यांसह श्वेताच्या रथाकडे धांवला व त्यानें मृत्युमुखांत पडलेल्या शल्याला वांचविलें. नंतर तुझ्या पुत्राचें व शत्रूचें अंगावर रोमांच आणणारें तुमुल युद्ध झालें. त्या युद्धांत रथ व गज यांनीं तें रणांगण व्यापिलें होतें. कुरुवृद्ध पितामहानें त्या वेळीं अभिमन्यु, भीमसेन, सात्यकि, कैकेय, विराट, धृष्टद्युम्न, हे नरश्रेष्ठ आणि चेदि व मत्स्य यांचीं सैन्यें यांवर शरांची वृष्टि केली. ६. ४. ४७.

---

## अध्याय ४८ वा.

[ १ श्वेताशीं तुमुलयुद्ध. २ श्वेताचा वध. ]

( १ ) **धृतराष्ट्र**—हे संजया, महा धनुर्धर श्वेत शल्याच्या रथासमीप आला असतां कौरव, पांडव आणि शान्तनव भीष्म यांनीं काय केलें तें मला सांग.

**संजय**—राजन् त्यावेळीं सेनापति श्वेताला पुढें करून सहस्रावधि क्षत्रियश्रेष्ठ राजा युधिष्ठिराचें सामर्थ्य दाखविण्यासाठीं निघाले व श्वेताचें रक्षण करण्याच्या इच्छेनें ते महारथ शिखंडीला पुढें करून भीष्माच्या सुवर्णभूषित रथाकडे धांवून गेले. त्यावेळीं त्यांचें तुमुल युद्ध झालें. तुझ्या पुत्रांचा व शत्रूंचा तो संग्राम कसा झाला, तें मी तुला सांगतों, ऐक. त्या समयीं शांतनव भीष्मानें अद्भुत युद्ध केलें. त्यानें अनेक रथस्थ वीरांना नाहींसें करून टाकिलें. सूर्यासारख्या पराक्रमी भीष्मानें आपल्या शरजालांनीं सूर्यालाहि आच्छादून टाकिलें. उदय पावणारा रवि जसा अंधकाराला दूर घालवितो, तद्वत त्या तेजस्वी पितामहानें आसमंतात् असलेल्या शत्रुसैन्यास दूर पळविलें. क्षत्रियांचा अंत करणारे असंख्य बाण सोडून त्यानें शेकडों वीरांच्या मस्तकांचा छेद केला.

हे विशांपते, त्या वीरानें वज्रानें पर्वतांचा जसा छेद करावा, तसें बाणवृष्टीनें कांटेरी कवचें धारण केलेल्या मत्त गजांना खालीं पाडविलें. त्या घनघोर संग्रामांत रथांत रथ अडकून राहिले. कांहीं चपल अश्वांनीं आपले रथ नेऊन दुसऱ्या रथांवर आपटले. कांहीं योद्धे मृत झाले असूनहि आपल्या आयुधांसह तसेच अश्वांच्या पाठीवर लोंबकळत राहिले. त्यांच्यासह ते अश्व इतस्ततः धांवत होते. पाठीवर भाते बांधलेले व कमरेला तरवारी असलेले सहस्रावधि वीर मस्तकें तुटल्यामुळें भूमीवर शयन करीत होते. कांहीं सैनिक त्वेषानें परस्परांवर धांवत असतां विद्ध होऊन वाटेंतच पडत होते व पुनः उठून शत्रूंवर चालून जात असतां त्यांचें शत्रुसैनिकांशीं द्वंद्वयुद्ध जुंपत होतें व दोघेहि क्षतांनीं व्याकुल होऊन रणांगणावर लोळत पडत होते. कांहीं योद्धे आयुधांनीं सज्ज असतांहि शत्रूंकडून कपटानें शरपीडित होत्साते प्राण सोडीत होते. कांहीं सादिरहित अश्वांना मत्त गज सोंडांनीं आपटीत होते व कांहीं रथी आपल्या रथाखालीं विद्ध होऊन भूमीवर पडलेल्या अनेक जीवांना तुडवीत चालले होते. रथावरील रथी व सारथि हे दोघेहि शत्रूंकडून विद्ध झाले असतां जेव्हां मृत होऊन पडले, तेव्हां तो रथहि काष्ठवत् भूमीवर पडला.

हे महाराज, याप्रमाणें तुमुल युद्ध प्रवृत्त झालें असतां सर्व दिशा धूलीनें आच्छादित झाल्या. पुढली वस्तूहि दिसेनाशी झाली. त्यावेळीं धनुष्याच्या टणत्कारावरून प्रतियोद्धा ओळखावा लागत असे आणि समीप आलेल्या योद्ध्याच्या स्पर्शानें त्याची ओळख पटत असे. वीर परस्परांस आह्वान करून रणगर्जना करीत होते. परंतु धनुष्याचे टणत्कार, नगाऱ्यांचा ध्वनि व सैन्याचा प्रचंड कोलाहल यांत तो शब्दहि परस्परांच्या कांनीं पडत नव्हता. त्यामुळें युद्ध करणारे वीर परस्परांस आपलें नाम व गोत्र कथन करीत असतां तेंहि मला ऐकूं आलें नाहीं.

त्या संग्रामांत भीष्माच्या धनुष्यापासून सुटलेले शर आर्त झालेल्या वीरांचीं मनें कंपित करीत होते. त्या समरांत पिता पुत्राला व पुत्र पित्याला ओळखीत नव्हता. ज्यांचीं रथचक्रें मोडलीं आहेत, रथदंड तुटले आहेत, धुरा भग्न झाल्या आहेत व अश्व हत झाले आहेत, अशा रथांत बसलेले वीर सारथ्यांसह सरळ चालले होते. याप्रमाणें विरथ झालेले योद्धे समंततः धांवत असलेले दिसत होते. भीष्म शत्रूंचा संहार करीत चालला असतां त्या युद्धांत अक्षत

असा कोणीच दिसला नाहीं. गज हत झाले होते, त्यांचीं मस्तकें छिन्नभिन्न झालीं होतीं व अश्वांच्या मर्मांचा छेद होऊन ते मृत होऊन पडले होते.

त्या महायुद्धांत श्वेतानेंहि शेकडों राजपुत्र व रथी यांचा वध करून आणि आपल्या तीक्ष्ण बाणांनीं वीरांचीं मस्तकें तोडून कौरवांचा पुष्कळच क्षय केला. रथ, रथचक्र, रथकूबर, पताका, छत्रें, धनुष्यें, विविध आयुधें, गज, अश्व आणि नर यांचा समुदाय, अशा सहस्रावधि वस्तूंचा श्वेतानें नाश केला. त्यावेळीं आम्ही सर्व श्वेताच्या भयानें त्याच्या रथापासून दूर पळालों. म्हणूनच जिवंत राहिलों व मी आज तुला पाहूं शकलों. भीष्माच्या संरक्षणार्थ असलेले सर्व कौरव श्वेत बाणांचें अतिक्रमण करून दूर अंतरावर उभे असलेले आमच्या दृष्टीं पडले.

पण त्या दीन होण्याच्या प्रसंगींहि दीन न होणारा असा पितामह भीष्म हा एकच योद्धा आमच्या पक्षांत होता. तो एकटाच नरव्याघ्र श्वेतासमोर मेरु पर्वताप्रमाणें अचल उभा राहिला. तो महाधनुर्धर भीष्म आपल्या तीक्ष्ण शरांनीं युद्धांत प्राण्यांना जीवितापासून विमुक्त करीत असतां शिशिर ऋतूच्या शेवटीं आपल्या प्रखर किरणांनीं जीवांचे प्राण हरण करणाऱ्या तेजस्वी सूर्याप्रमाणें भासला. वज्रपाणि इंद्र जसा असुरांचा नाश करतो, तसा तो पितामह अनेक शरांची वृष्टि करून शत्रूंचा संहार करीत होता. याप्रमाणें भीष्मानें रणांगणांत शरवर्षाव करतांच श्वेताचे संरक्षक सर्व वीरहि त्याला सोडून दूर पळाले. आपल्या संघांतून टाकून दिल्याप्रमाणें ते जरी श्वेताला त्या दारुण रणभूमीवर एकटाच सोडून गेले, तरी तो शूर श्वेत तेथून हालला नाहीं.

तेव्हां आपल्यापुढें शत्रूंचा एकच वीर उभा आहे, हें पाहून भीष्म संतुष्ट झाला. तो दुर्योधनाचें प्रिय करणारा भीष्म आपल्या दुस्त्यज प्राणांवर उदार झाला व निर्भयपणें पांडवांच्या सेनेचा संहार करूं लागला. तें पाहून पांडव खिन्न झाले. सेनापति श्वेत सेनेवर प्रहार करीत आहे, हें पाहून तुझा पिता देवव्रत त्याच्यावर धांवून गेला. तेव्हां त्यानें भीष्माला शरांनीं झांकून टाकिलें व भीष्मानेंहि श्वेताला शरौघानें आच्छादित केलें. ते दोघे बलाढ्य गजांप्रमाणें मत्त होते. वृषभाप्रमाणें गर्जना करीत होते व व्याघ्राप्रमाणें क्षुब्ध होऊन परस्परांवर प्रहार करीत होते. ते पुरुषश्रेष्ठ अस्त्रांनीं अस्त्रांचें निवारण करीत होते. याप्रमाणें परस्परांच्या वधाची इच्छा करणारे भीष्म व श्वेत यांचें युद्ध प्रवृत्त झालें.

त्या दिवशीं श्वेतानें जर रक्षण केलें नसतें, तर परम क्रुद्ध झालेल्या भीष्मानें आपल्या शरवृष्टीनें एका दिवसांत पांडवांच्या सर्व सेनेचा नाश केला असता. श्वेतानें पितामहाचा पराभव केलेला पाहून पांडवांना हर्ष झाला व दुर्योधनाला खेद झाला. त्यानंतर नृपालांनीं परिवेष्टित झालेला दुर्योधन क्रुद्ध होऊन सैन्यासह पांडवांच्या सेनेवर धांवून गेला. त्याच्याच प्रेरणेनें दुर्मुख, कृतवर्मा, कृप व शल्य हे चौघे वीर भीष्माच्या संरक्षणार्थ त्याच्या समीप आले.

तेव्हां दुर्योधनादि सर्व कौरव पांडवसेनेचा संहार करीत आहेत, हें पाहून श्वेतानें गांगेयाला सोडिलें व वायु जसा वृक्षांचें उन्मूलन करून त्यांना भूमीवर पाडवितो, तसा तो त्वरेनें तुझ्या सैन्याचा नाश करूं लागला आणि तुझ्या सैन्याला पळवून लावल्यावर तो क्रोधानें संतप्त झालेला विराटपुत्र पुनरपि भीष्माकडे वळला. बाणाच्या दीप्तीनें शोभणाऱ्या त्या दोघां परस्परवधेच्छु महाबलाढ्य महात्म्यांचें वृत्र व वासव यांच्यासारखें युद्ध जुंपलें. श्वेतानें आपलें धनुष्य आकर्ण ओढून भीष्मावर सात बाण सोडिले. तेव्हां एक मत्त गज जसा दुसऱ्या मत्त गजाचें निवारण करितो, त्याप्रमाणें भीष्मानें मोठ्या त्वरेनें नतपर्व बाण सोडून आपल्या पराक्रमानें त्याच्या पराक्रमाचें निवारण केलें.

परंतु श्वेतानें त्याच्यावर पंचवीस बाण सोडून अद्भुत कर्म केलें. तेव्हां भीष्मानें त्याला दहा बाणांनीं विद्ध केलें. तथापि तो वैराटि यत्किंचित्‌हि कंपित झाला नाहीं. पर्वताप्रमाणें निष्कंप राहिला. त्या क्रुद्ध झालेल्या राजपुत्रानें जिभल्या चाटीत हंसत हंसतच नऊ शर सोडले व भीष्माचें धनुष्य तोडून टाकिलें. नंतर एका बाणानें शांतनवाच्या ध्वजाचें शिखर खालीं पाडविलें, त्यावेळीं भीष्माचा ध्वज खालीं पडलेला पाहून 'भीष्म श्वेताच्या अधीन होऊन मरण पावला,' असेंच तुझे पुत्र समजले आणि महात्म्या भीष्माचा तालकेतु पडलेला पाहून पांडवांनीं संतुष्ट होऊन शंख वाजविले. तेव्हां दुर्योधनानें त्वेषानें स्वसैन्याला अशी आज्ञा केली—" हे वीरहो, तुम्ही सर्व सज्ज होऊन भीष्माचें सर्व बाजूंनीं संरक्षण करा. आपल्या समक्ष शूर शांतनवाला श्वेताच्या हातून मृत्यु येतां कामा नये, हें मी तुम्हांला सत्य सांगत आहें."

राजाची ही आज्ञा ऐकून कौरवांकडील महारथ बाह्लीक, कृतवर्मा, चित्रसेन, विविंशति, कृप, शल्य, शल, जलसंध व विकर्ण हे चतुरंग सैन्यासह

मोठ्या त्वरेनें पुढें सरसावले व ते भीष्माचें रक्षण करूं लागले. त्या सर्वांनीं श्वेतावर बाणांचा वर्षाव चालविला. तथापि युद्धकुशल श्वेतानें आपलें अप्रतिम हस्तलाघव प्रकट करीत त्यांच्यावर शरवृष्टि केली, गजाच्या कळपाचें निवारण करणाऱ्या सिंहाप्रमाणें त्या सर्वांचें एकट्यानें निवारण केलें व भीष्माचें धनुष्य तोडून टाकलें, तेव्हां भीष्मानें दुसरें धनुष्य घेऊन तीक्ष्ण कंकपत्र शरांनीं श्वेताला विद्ध केलें. त्यावेळीं तो सेनापति श्वेत अतिशय क्षुब्ध झाला व त्यानें क्रुद्ध होऊन भीष्माला अनेक लोखंडी बाणांनीं पीडिलें.

त्यावेळीं सर्व लोकांतील धनुर्धरश्रेष्ठ व युद्धकुशल अशा पितामहाचेंहि श्वेतानें निवारण केलेलें पाहून दुर्योधन व्यथित झाला. तुझें सर्व सैन्य भयानें हतबल झालें व श्वेतबाणांनीं विद्ध झालेल्या भीष्माला पाहून आतां पितामह श्वेताच्या हातून मरण पावणार, असेंच सर्व मानूं लागले. परंतु आपला ध्वज मोडला व सेना मागें हटत आहे, हें पाहून देवव्रत भीष्म अतिशय संतप्त झाला आणि त्या तुझ्या पित्यानें श्वेतावर शरवर्षाव चालविला. पण त्या सर्वांचेंहि निवारण करून श्वेतानें पुनः भीष्माचें धनुष्य तोडून टाकिलें. तेव्हां क्रोधसंतप्त झालेल्या भीष्मानें दुसरें अतिशय दृढ धनुष्य घेतलें व तीक्ष्ण धारेचे सात बाण सोडले. त्यांतील चार बाणांनीं त्या सेनापतीच्या अश्वांचा संहार केला, दोन बाणांनीं ध्वजाचा छेद केला व सातव्या भल्ल बाणानें त्याच्या सारथ्याचा शिरच्छेद केला. तेव्हां आपला सारथि अश्वांसह हत झालेला पाहून त्या महाबलाढ्य श्वेतानें रथांतून खालीं उडी टाकिली व क्रोधाधीन झालेला तो रथी व्याकुल झाला.

तेव्हां रथिश्रेष्ठ श्वेत विरथ झाला आहे, असें पाहून पितामहानें त्याच्यावर सर्व बाजूंनीं तीक्ष्ण बाणांचा वर्षाव केला. भीष्माच्या शरांनीं ताडित झालेल्या श्वेतानें आपलें धनुष्य रथांत ठेविलें व सुवर्णाची शक्ति हातांत घेतली. ती कालदंडासारखी घोर शक्ति महाभयानक होती. अशा प्रकारची मृत्यूची जिह्वाच असलेली ती शक्ति हातांत घेऊन निश्वास टाकीत श्वेत भीष्माला म्हणाला—'थांब, थांब, आतां सज्ज हो, माझा पुरुषार्थ पहा व युद्ध कर.'

असें बोलून पांडवांचें हित चिंतिणाऱ्या व तुझ्या अनिष्टाची इच्छा करणाऱ्या त्या श्वेतानें ती भुजगोपम शक्ति भीष्मावर सोडिली. श्वेताच्या हातांतून सुटलेली ती शक्ति कात टाकलेल्या सर्पाप्रमाणें तेजस्वी व कालदंडासारखी प्रका-

णारी होती. ती शक्ति वेगानें भीष्माकडे येत आहे, हें पहातांच तुझे पुत्र हाहाकार करूं लागले. परंतु तुझा पिता देवव्रत मात्र यत्किंचित्‌हि भ्रांत झाला नाहीं.

अग्निज्वालांनीं संवृत्त झालेली ती शक्ति प्रदीप्त उल्केप्रमाणें अंतरिक्षांतून येत आहे, असें पहातांच शान्तनवानें आठ तीक्ष्ण बाण सोडून त्या शक्तीचे नऊ तुकडे करून टाकिले. याप्रमाणें त्या शक्तीचा नाश झालेला पहातांच तुझे पुत्र आनंदानें उच्च स्वरानें गर्जना करूं लागले. श्वेत क्रोधानें देहभान विसरला. कालानेंच त्याची मति कुंठित झाली व त्याला क्षणभर आपलें कर्तव्य सुचेनासें झालें. तो भ्रांत झाला आणि कांहीं विचार न करतां त्यानें भीष्माचा वध करण्याच्या निश्चयानें हंसतच गदा हातीं घेतली. त्यावेळीं हातांत दंड घेतलेल्या अंतकाप्रमाणें त्याचे नेत्र क्रोधानें आरक्त झाले होते. पर्वतावरून वेगानें वहाणाऱ्या जलौघाप्रमाणें तो श्वेत मोठ्या त्वरेनें भीष्मावर धांवून गेला. तेव्हां वेगानें येणाऱ्या त्या गदेचें निवारण करणें शक्य नाहीं, हें जाणून प्रहार चुकविण्यासाठीं पितामह तत्क्षणीं भूमीवर बसला. क्रोध संतप्त झालेल्या श्वेतानें आपली गदा गरगरा फिरवून कुबेराप्रमाणें मोठ्या वेगानें भीष्माच्या रथावर फेंकली. तेव्हां भीष्मवधार्थ योजिलेल्या त्या गदेनें त्याचा रथ, ध्वज, अश्व, रथदंड व सारथि या सर्वांचा चुराडा करून टाकिला.

त्यावेळीं भीष्माला विरथ झालेलें पाहून शल्यादि कौरव त्याच्याकडे धांवत गेले. भीष्मानें दुसऱ्या रथांत बसून आपलें धनुष्य आकर्ण ओढलें व तो गांगेय हंसतच श्वेताकडे हळुहळू निघाला. इतक्यांत त्यानें आपल्या हिताची अशी आकाशवाणी ऐकली—"भीष्मा, भीष्मा, त्वरा कर. तुला जय मिळण्याचा हाच काल विश्वकर्म्यानें पूर्वींच नियत केलेला आहे. यास्तव आतां सत्वर यत्न कर. वेळ घालवूं नको." देवदूतांचें हें भाषण ऐकून भीष्म संतुष्ट झाला व श्वेतवधाला सज्ज झाला.

इकडे श्वेत विरथ होऊन भूमीवरच स्थित आहे, हें पाहून पांडवांकडील सात्यकि, भीमसेन, धृष्टद्युम्न, कैकेय, धृष्टकेतु व अभिमन्यु हे सर्व रथिश्रेष्ठ त्याच्या रक्षणार्थ धांवून आले आणि ते मोठ्या वेगानें भीष्मावर चालून गेले. त्यावेळीं पर्वत जसा जलौघाचें सहज निवारण करितो, त्याप्रमाणें भीष्मानें द्रोण, शल्य व कृप यांच्या साह्यानें त्या सर्वांचें निवारण केलें. भीष्म पांडवांच्या सर्व

योद्धयांचा निरोध करीत आहे, हें पाहून श्वेतानें आपलें खड्ग उपसलें व भीष्माचें धनुष्य तोडून टाकिलें. परंतु देवदूतांचें वचन ऐकून तुझ्या पित्यानें श्वेतवधाचा निश्चय केला. तें भग्न झालेलें धनुष्य टाकून त्यानें इंद्राच्या धनुष्यासारखें दुसरें दृढ धनुष्य घेतलें, तें एका क्षणांत सज्ज केलें व भीमसेनादि नरव्याघ्रांनीं परिवेष्टित असलेल्या सेनापति श्वेतावर मोठ्या वेगानें चाल केली.

(२) इतक्यांत प्रतापवान् भीमसेन पुढें झाला, त्याचें निवारण करण्यासाठीं भीष्मानें त्याच्यावर साठ बाण सोडिले. अभिमन्यूवर तीन, सात्यकीवर शंभर, धृष्टद्युम्नावर वीस व कैकेयावर पांच बाण सोडून त्या सर्वांचें निवारण केलें व तो देवव्रत श्वेतावर धांवून गेला. त्या बलाढ्य गांगेयानें मृत्यूसारखा एक दुरासद शर काढला व तो ब्रह्मास्त्रानें मंत्रून धनुष्याला जोडला. त्यावेळीं देव, गंधर्व, पिशाच, उरग व राक्षस, हे सर्व त्या शराकडे पाहूं लागले. तो अस्त्रयुक्त शर भीष्माच्या धनुष्यापासून सुटतांच मोठ्या वेगानें श्वेताच्या कवचाचा भेद करून त्याच्या हृदयांत शिरला व तें भेदून प्रज्वलित अशनीप्रमाणें भूमीवर पडला. त्यावेळीं आदित्य जसा आपली प्रभा बरोबर घेऊन अस्ताला जातो, त्याप्रमाणें तो देदीप्यमान बाण श्वेताच्या शरीरांतून त्याचे प्राण घेऊन गेला.

हे राजा, पर्वताचें शिखर जसें पडावें तसें भीष्माकडून वध पावलेलें तें श्वेताचें धिप्पाड शरीर खालीं पडलेलें आम्हीं पाहिलें. त्यावेळीं पांडव आणि महारथ क्षत्रिय अत्यंत शोकमग्न झाले आणि तुझे पुत्र व कौरव संतुष्ट झाले. श्वेत मृत झालेला पाहून तुझ्या दुःशासन पुत्रानें रणवाद्यें वाजविलीं व तो आनंदानें नाचूं लागला. रणधुरंधर भीष्मानें श्वेतासारख्या धनुर्धराचा त्या युद्धांत वध केल्याचें पाहून शिखंडिप्रभृति रथ्यांचाहि थरकांप झाला.

याप्रमाणें विराटाचा सेनापति हत झालेला पाहून धनंजय व केशव यांनीं आपलीं सैन्यें हळुहळू परत फिरविलीं. तेव्हां तुझ्या पुत्रांनींहि वारंवार आरोळ्या देत आपलें सैन्य परतविलें. त्यावेळीं पार्थ त्या द्वैरथ युद्धांत झालेल्या श्वेताच्या वधाचा विचार करीत अतिशय खिन्न होऊन परत फिरले. ६. ४. ४८.

---

## अध्याय ४९ वा.

[ १ धृतराष्ट्राचा प्रश्न. २ शंखाचें भीष्माशीं युद्ध. ३ प्रथमदिन युद्धसमाप्ति. ]

( १ ) **धृतराष्ट्र**—हे संजया, संग्रामांत सेनापति श्वेत हत झाला असतां पांडवांसह पांचालांनीं काय केलें ! खरोखर हें युद्ध कोणालाच रुचत नव्हतें. भीष्म, कृप व गांधारी हीं त्याचा वेळोवेळीं निषेधच करीत आलीं. मलाहि तें मान्य नव्हतें. वासुदेव, धर्मराज, भीमार्जुन व नकुलसहदेव यांनाहि तें संमत नव्हतें. हे संजया, गांधारी, विदुर, जामदग्न्य राम, महात्मा व्यास व मी स्वतःहि नित्य दुर्योधनाचें निवारण करीत होतों, पण त्यानें आमच्या बोलण्याकडे लक्ष दिलें नाहीं. पापी शकुनि, कर्ण व दुःशासन यांच्याच मतानें चालणाऱ्या त्या दुर्मतीनें पांडवांचा यत्किंचित्‌हि विचार केला नाहीं, त्याचाच हा परिणाम आतां भोगावा लागत आहे व या दुराग्रहामुळेंच त्यानें घोर अनर्थ स्वतःवर ओढवून घेतला आहे, असें मला वाटतें.

भीष्माच्या विजयानें व श्वेताच्या वधानें दुर्योधनाला जरी संतोष वाटला असला, तरी कृष्णासहित पार्थानें क्रुद्ध होऊन काय केलें ! बा सूता, मला अर्जुनाचें अतिशय भय वाटत आहे. माझें मन भयभीत झालें आहे, तें शांत होत नाहीं. तो शूर धनंजय क्षिप्रकारी आहे. तो आपल्या शरांनीं शत्रूंचीं शरीरें छिन्न-भिन्न करून टाकील. तो इंद्रपुत्र उपेंद्रासारखा आहे. त्याचें सामर्थ्य साक्षात् इंद्रतुल्य आहे. त्याचा अमोघ क्रोध व संकल्प पाहून तुमच्या मनाची स्थिति काय झाली ? त्याचप्रमाणें तो वेदवेत्ता, शूर व इंद्रास्त्रवेत्ता आहे. त्याची कांति प्रज्वलित सूर्याप्रमाणें आहे. तो शत्रूवर तुटून पडला कीं विजयीच होतो. वज्रासारख्या दुःसह अस्त्रांचा प्रयोग करण्यांत तो निष्णात आहे. तो महारथ खड्गक्षेप करण्यांतहि प्रवीण आहे. त्याचा सिंहनादहि शत्रूला भयभीत करीत असतो. अशा प्रकारचा तो असामान्य योद्धा आहे.

त्याचप्रमाणें श्वेत युद्धांत पडलेला पाहून महाप्राज्ञ, बलाढ्य धृष्टद्युम्नानें काय केलें ? हे संजया, पूर्वींचे अपराध व आतां झालेला हा सेनापतीचा वध यांच्या योगानें महात्म्या पांडवांच्या मनांतील क्रोध अधिकच प्रज्वलित झाला असेल, असेंच मला वाटतें. हे संजया, त्यांच्या क्रोधाचा विचार करूं लागलों कीं

१ या पुढील सहा श्लोक परस्परविसंगत असल्यामुळें त्यांचा संबंध लागत नाहीं. यास्तव भाषांतरांत ते श्लोक सोडले आहेत.

रात्रंदिवस माझ्या मनाला शांति प्राप्त होत नाहीं. खरोखर दुर्योधनाच्या दुष्कृतीचें हें फल आहे. संजया, तें महायुद्ध पुढें कसें झालें तें मला सांग.

( २ ) **संजय**—हे राजन्, स्वस्थ हो आणि मन स्थिर करून ऐक. हा सर्व महान् अपराध तुझा आहे. तूं व्यर्थ तो पुत्रावर लादीत आहेस, पण त्यांत दुर्योधनाचाच दोष नाहीं. जल वाहून गेल्यावर बांध घालावा किंवा घराला अग्नीनें भस्मसात् केल्यानंतर जशी विहीर खणावी, त्याप्रमाणें तुझें हें वर्तन आहे. हे राजा, त्या दारुण दिवशीं पूर्वाह्णानंतर पुनः तुझ्या पुत्रांचें पांडवांशीं घोर युद्ध प्रवृत्त झालें.

विराटाचा सेनापति श्वेत हत होऊन पडला व शल्य कृतवर्म्यासह रथांत स्थित आहे, हें पाहून शंख अतिशय क्रुद्ध झाला. हवीनें प्रज्वलित होणाऱ्या अग्नीप्रमाणें त्याचा संताप वाढला व त्या बलाढ्य वीरानें आपलें शक्रचापासारखें प्रचंड धनुष्य आकर्ण ओढलें आणि तो त्या मद्राधिपाच्या वधेच्छेनें त्याच्या रथाकडे धांवला. त्याच्या सभोंवार फार मोठा रथसंघ त्याचें संरक्षण करीत होता. त्याच्यासह शर वर्षाव करीत तो शल्याच्या रथापाशीं जाऊन पोंचला.

तेव्हां मत्त गजासारखा ज्याचा पराक्रम आहे, असा शंख शल्यावर तुटून पडत असलेला पहातांच ‘तो मद्रराज आतां मृत्यूच्या दाढेंतच सांपडला आहे’ असें तुझ्याकडील योद्धयांना वाटलें व बृहद्बल, जयत्सेन, शल्याचा मानलेला पुत्र रुक्मरथ, अवंतीचे दोघे भ्राते विंदानुविंद, सुदक्षिण व सिंधुपति जयद्रथ, या सात रथश्रेष्ठांनीं समंततः शंखाचें निवारण केलें. त्या वीरांचीं आकर्ण ओढलेलीं चित्र-विचित्र धनुष्यें मेघांतील विद्युल्लतेप्रमाणें शोभत होतीं. ग्रीष्म ऋतूच्या अंतीं वायूनें उडवून दिलेले मेघ जशी पर्वतावर जलवृष्टि करितात, तशी त्या वीरांनीं शंखाच्या मस्तकावर शरवृष्टि केली.

तेव्हां क्रुद्ध झालेल्या त्या सेनापतीनें मोठ्यानें सिंहनाद करून सात तीक्ष्ण भल्लबाण सोडले व त्या सर्वांचीं धनुष्यें तोडून टाकिलीं. तें पाहून महाबाहु भीष्मानें मेघाच्या गडगडाटासारखी प्रचंड गर्जना केली व तो आपलें दीर्घ धनुष्य हातांत घेऊन शंखावर धांवून गेला. त्यावेळीं वेगानें येणाऱ्या त्या बलाढ्य धनुर्धराला पाहून झंझावातांत सांपडलेल्या नौकेप्रमाणें पांडवी सेना त्रस्त झाली.

तें पाहून अर्जुन पुढें सरसावला आणि 'आज शंखाचें भीष्मापासून रक्षण केलें पाहिजे' असें बोलून त्याच्या पुढें जाऊन उभा राहिला व त्यांचें तुमुल युद्ध जुंपलें. युद्ध करणाऱ्या योद्ध्यांनीं फार मोठा हाहाकार केला. दोन तेजें एकत्र व्हावीं, त्याप्रमाणें त्या दोघांचें युद्ध पाहून सर्व लोक विस्मित झाले. इतक्यांत शल्य हातांत गदा घेऊन रथांतून खालीं उतरला व त्यानें शंखाच्या चारी अश्वांना गतप्राण केलें. तेव्हां शंख आपल्या अश्वरहित रथांतून त्वरेनें खालीं उतरला व हातांत खड्ग घेऊन जेव्हां अर्जुनाच्या रथावर चढला, तेव्हां तो स्वस्थ झालेला दिसला. त्यावेळीं भीष्माच्या हातून सुटणाऱ्या बाणांनीं भूमि व अंतरिक्ष व्यापून टाकिलें. त्या प्रहार करणारांतील श्रेष्ठ भीष्मानें पांचाल, मत्स्य, केकय व प्रभद्रक यांचे असंख्य योद्धे शरवृष्टीनें विद्ध करून पाडले.

हे राजन्, नंतर भीष्म अर्जुनाला सोडून सेनेनें परिवेष्टित असलेल्या पांचाल्य द्रुपदाकडे वळला व त्यानें त्या प्रिय संबंधी जनांना शरांनीं आच्छादित केलें. शिशिर-ऋतूच्या शेवटीं अग्नीनें दग्ध होणाऱ्या वनाप्रमाणें द्रुपदाचें सैन्य शरांनीं दग्ध होत असलेलें दिसलें. त्यावेळीं भीष्म त्या समरांगणांत निर्धूम अग्नीप्रमाणें निर्भय स्थित होता. मध्याह्न समयीं प्रखर सूर्याकडे जसें पहावत नाहीं, तसें त्यावेळीं त्या तेजस्वी पितामहाकडे पहाण्यास पांडव समर्थ झाले नाहींत. थंडीनें गारठलेल्या गायींप्रमाणें भयपीडित झालेले पांडव समंततः पाहूं लागले. परंतु त्यांना कोणी त्राता दिसेना. ती युधिष्ठिराची सेना सिंहानें विदीर्ण केलेल्या गोपालांच्या शुभ्र गायींप्रमाणें हतबल झालेली दिसूं लागली.

याप्रमाणें पांडवांचें कांहीं सैन्य नाश पावलें, कांहीं पळालें, कांहीं निरुत्साह झालें व कांहीं मृदित झालें असतां पांडवसेनेंत फार मोठा हाहाकार उडाला. भीष्मानें आपल्या मंडलाकार धनुष्यांपासून प्रदीप्त ज्वालांसारखे व सर्पांप्रमाणें प्राणांतक बाण सोडून सर्व दिशा एक करून टाकिल्या व पांडवांच्या रथ्यांना नामनिर्देशपूर्वक सावधान करून हत केलें.

(३) अशाप्रकारें सर्व सैन्य मृदित व विद्ध होऊन इतस्ततः पसरलें असतां आदित्य अस्ताला गेला. कांहीं दिसेनासें झालें. तेव्हां भीष्मानें युद्ध थांबविण्याविषयीं स्वसैन्याला उच्च स्वरानें आज्ञा केली, ती ऐकून पांडवांनींहि त्या महायुद्धापासून आपलें सैन्य परत फिरविलें. ६. ४. ४९.